पहिली आवृत्ती : जून १९८१

मूल्य : ५० रुपये



प्रकाशक :
केशव विष्णु कोठावळे,
मॅजेस्टिक बुक स्टॉल,
गिरगाव नाका, मुंबई ४.

मुद्रक :
अ. के. कोठावळे,
ॐ मुद्रणालय,
२५० अ, शनिवार पेठ, पुणे ३०.

या ग्रंथाच्या प्रकाशनासाठी
महाराष्ट्रराज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले आहे.

मुखपृष्ठ व मांडणी : अरुण घाटे

## ऋणनिर्देश

ह्या ग्रंथ लिहिण्याच्या कामात आरंभी श्रीमती दुर्गाबाई भागवत, श्रीयुत रा. भि. जोशी, श्रीयुत प्र. ना. परांजपे यांनी मोलाचे दिशासूचन केले. त्यानंतर श्रीमती सरोजिनी वैद्य व प्रा. स. ह. देशपांडे यांनी विशेष आत्मीयतेने समग्र लिखाण वाचून अनेक उपयुक्त सूचना केल्या.

या सर्वांचा मला फार उपयोग झाला आहे.

याखेरीज श्रीमती सरलाताई देवधर व श्रीमती अनुताई वाघ या ताराबाईंच्या निकटवर्तीयांनी आस्थापूर्वक व वेळोवेळी संदर्भ आणि तपशील पुरवले. श्री. स. आ. केळकरांनी दिलेल्या माहितीचा तसेच त्यांनी अभ्यासपूर्वक लिहिलेल्या बालशिक्षणविषयक पुस्तकांचाही मला अतिशय उपयोग झाला आहे.

इतर अनेकांनी जी प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष मदत केली त्यांच्या परिश्रमांची मला जाणीव आहे व त्यांना मी या पुस्तकाचे आप्त समजते.

सर्वांना कृतज्ञतापूर्वक धन्यवाद.

—पद्मजा फाटक

## ताराबाई मोडक : चित्रदर्शन



ताराबाई, के. व्ही. आणि प्रभा




अमरावती में ताराबाई
आ गयी है।
(१९१५)



प्रभा आणि ताराबाई : हे रूप...



दक्षिणामूर्तीतली
प्रभा



...आणि हे रूप



ताराबाईंनी सरलाताईंना आपली मुलगी मानले होते
तर अनुताईंना ' मुलगा '



ताराबाई, सत्तरीत



न्याहरीचे क्षण : भविष्याचे मनसुबे !



एक अनौपचारिक
प्रसन्न हास्य :
ताराबाई ऍशीच्या
घरात



शिशुविहारच्या मुलांना गोष्ट सांगताना ताई '...गोष्टी होती जाडजूड '



अक्षरओळखीपासून मुद्रणापर्यंत



' सरकारी किताब घ्यायला जायला आम्हाला वेळ कुठे आहे ? '



परदेशातील ' मॉन्टेसोरी ' पाहताना



ताराबाईंचा वाढदिवस : ' कामापाठीमागे पैसा येतोच ! ' ( देणगी स्वीकारताना )



टेकडीवरची पुस्तकजत्रा :
' एक दिवस आपोआप मुलं
पुस्तकांची मागणी करतील. '



रानात भरणारी, ताराबाईंची कुरणशाळा



रात्रशाळा :
अंधाराकडून
उजेडाकडे...



बालकांना शोधीत त्यांच्या घरापर्यंत पोचून त्यांच्या अंगणातच भरणारी
अंगणवाडी ( बोर्डी )



विकासवाडीत
पाहुणे



ताराबाई आणि ताया



स्वच्छतेचा धडा
मौजमजेचा !



‘ शिक्षणाचे नवे
युग बालकावर
विश्वास ठेवील. ’
-मादाम मारिया
मॉन्टेसोरी



परदेशी पाहुण्यांची भेट



सफाईयुद्धावर बालसैनिक

# १. संस्कार

जवळ जवळ शंभर वर्षांपूर्वीची ही घटना आहे.

त्या दिवशी मुंबईच्या आर्यसमाजाच्या मंदिरात एक पुनर्विवाहोत्तेजक सभा भरली होती. न्यायमूर्ती माधवराव रानडे हे या सभेचे अध्यक्ष होते. या सभेत श्री. गजानन भास्कर वैद्य नावाचे एक तरुण गृहस्थ बोलण्यास उभे राहिले. पुनर्विवाहाच्या चळवळीला अजून यावे तसे आणि तितके यश आले नाही या मुद्यावर हा वक्ता आवेशाने आपले मत मांडू लागला.

संतापाच्या भरात श्री. गजाननराव वैद्य म्हणाले, " पुनर्विवाहाच्या चळवळीला जर यश आले नसले तर त्याचे सर्व खापर आजच्या सभेचे अध्यक्ष न्यायमूर्ती रानडे ह्यांच्या डोक्यावरच फोडले पाहिजे. आजच्या प्रसंगी सदाशिवराव केळकरांसारख्यांची अध्यक्ष-स्थानी योजना व्हावयास हवी होती. "

हे कडक शब्द उच्चारीत असताना त्या संतप्त तरुणाने आपले हातदेखील आपल्या आवेशाला साजेशा पद्धतीने रानड्यांच्या डोक्यावर नाचविले !

स्वतः रानड्यांनीही ही निर्भर्त्सना शांतपणे झेलली. आपल्या समारोपाच्या भाषणात त्यांनी असे कबूल केले की, " आपले तरुण मित्र रा. गजानन भास्कर वैद्य यांचे म्हणणे अगदी बरोबर आहे; आजच्या प्रसंगी माझे बंधू सदाशिवराव केळकर ह्यांचीच खरोखर अध्यक्षस्थानी योजना व्हावयास पाहिजे होती. "*

न्यायमूर्ती रानड्यांनी पाच-सहा वर्षे पुनर्विवाहाच्या चळवळीचे नेतृत्व व पुरस्कार केल्यानंतर १८७३ साली, वयाच्या बत्तिसाव्या वर्षी आपली प्रथम पत्नी निवर्तताच आपल्या वडिलांच्या — गोविंदरावांच्या दबावामुळे अकरा वर्षांच्या रमाशी दुसरा विवाह केला. रानड्यांच्या या कृतीमुळे त्यांची व पुनर्विवाह पक्षाची बरीच नाचक्की झाली व होत राहिली. या घटनेचा संदर्भ येथे पोचतो.

---

* पुढे १६ जानेवारी १९०१ रोजी न्या. रानडे मृत्यू पावले त्या दिवशी स्मशानात त्यांच्यासंबंधी पहिले भाषण श्री. ग. भा. वैद्य यांनीच केले व वरील प्रसंगी त्यांचा जाहीर उपमर्द केल्याबद्दल खेदही व्यक्त केला.

'प्रार्थना समाजाचा इतिहास' या ग्रंथाचे लेखक व संपादक श्री. द्वा. गो. वैद्य. या दोन्ही प्रसंगी हजर असल्याचे त्यांनी नमूद केले आहे.

—योगायोग असा की १८७८ साली या सदाशिवराव केळकरांचा पुनर्विवाह स्वतः न्या. रानड्यांनीच मिरज येथील श्री. सीतारामपंत अलूरकरांच्या दुर्गाशी लावून दिला होता ! — हे सदाशिवराव आणि या उमाबाई ( दुर्गाबाई ) म्हणजेच ताराबाई मोडकांचे आईवडील.

× × ×

आपल्या या दुसऱ्या लग्नात दुर्गा चांगली जाणती म्हणजे सोळा वर्षांची होती. दुर्गाला वडील नव्हते त्यामुळे तिचा हा पुनर्विवाह घडवून आणण्यात पुढाकार घेतला तो श्री. त्र्यंबकराव गर्गे या तिच्या आजोबांनी — तिच्या आईच्या वडिलांनी. अलूरकरांचे घराणे तसे जुने. घरात रामाचे मंदिर व त्याला अनुरूप असे जुने वातावरण, आचार-विचार होते. दुर्गा माहेरी परतल्यावर तिचे केशवपन झाले नाही हीच त्या घराने कशी-बशी पचवलेली खळबळजनक सुधारणा. घरात केशवपनाचा घाट घातला गेला होताही; परंतु दुर्गाचा थोरला भाऊ रघुनाथ याने तिला पाठीशी घातले आणि आपण बहिणीचे केशवपन होऊ देणार नाही असा निर्धार व्यक्त केला. अलूरकरांच्या घरात तिघां भावां-मध्ये मिळून सीतारामपंतांची ही दोनच मुले होती; तरीही बहीणभावांच्या या जोडीला या बंडखोरीबद्दल आपले घर सोडावे लागले.

दोन्ही भावंडे त्यानंतर तासगाव येथे आपल्या आजोळी, श्री. त्र्यंबकराव गर्गे यांच्या घरी आश्रयाला आली. आजोबांनी आपल्या दुर्दैवी नातीला शाळेत घातले. तिथे दुर्गाचे दोन-चार इयत्ता शिक्षणही झाले.

आजोबांची वृद्ध नजर आपल्या लहानशा खेड्यातून बाहेर पडून दूर मुंबईपुण्यापर्यंत पोचली होती. नातीची ही दुर्दशा पाहून त्यांना स्वस्थ बसवेना. दहाव्या वर्षी मोठ्या थाटात दुर्गाचे लग्न झाले होते आणि आता तेराव्या वर्षी बिचारी आपले सौभाग्य हरवून परतसुद्धा आली होती. त्यांची मुलगी, म्हणजे दुर्गाची आईसुद्धा अशीच तरुण वयात विधवा होऊन माघारी आली होती आणि आता ही नात आणि लेक दोघीही जोडीने त्यांच्या डोळ्यांदेखत वैधव्य कंठीत वावरत होत्या. आपल्या समाजात त्या काळी विधवांची स्थिती अतिशय दयनीय असे. पतिनिधनाचे पाप जन्मभर माथ्यावर वागवावे लागे. प्रभातकाळी व शुभप्रसंगी विधवा स्त्रीचे दर्शन होणे अशुभ समजत. तिची खानगी सर्वार्थाने व कायमची माजघरात केली जाई. सकेशा विधवेचा पति रौरव नरकात पडतो अशीही समजूत होती. आपल्या नातीपुढचे हे सारे भवितव्य लक्षात येऊन आजोबांनी मनाशी काही निश्चय केला.

त्या काळी म्हणजे सन १८७०–७५ च्या सुमारास महाराष्ट्रात विधवाविवाहाच्या चळवळीला थोडे दृश्य स्वरूप आले होते. १८६९ साली श्री. पां. वि. करमरकर व



श्रीमती वेणूताई यांचा विवाह मोठ्या थाटात पार पडला होता.*

त्यानंतर वर्षभरातच, १८७० साली श्री. वासुदेव बाबाजी नवरंगे या चव्वेचाळीस वर्षांच्या व्यापारी पेशाच्या गृहस्थांनी श्रीमती कृष्णाबाई बापट नावाच्या विधवा स्त्रीशी ब्राह्मो-पद्धतीने विवाह केला होता. त्यानंतर पुढच्या सहासात वर्षांत तुरळक परंतु ठळक पुनर्विवाह होत होते. न्या. रानड्यांसारखे समाजसेवक पुनर्विवाहाच्या या चळ-वळीमागे ठामपणाने उभे होते. बालविधवांनासुद्धा आपल्या समाजात पुनर्विवाहाची संधी नसावी ही गोष्ट त्यांना मोठी अन्यायाची वाटत असे. वर्तमानपत्रांमधून, सभांमधून या क्रांतिकारक चळवळीचे मोठे खळबळजनक प्रतिसाद उमटत होते.

तासगावात श्री. अप्पाराव वैद्य नावाचे एक समाजसुधारक राहत असत. अप्पाराव पुनर्विवाहाचे मोठे कैवारी होते. गर्गेमंडळींचा व अप्पारावांचा चांगला परिचयही होता. अप्पाराव दुर्गाला आपल्या लेकीसारखी समजत. गर्गे आजोबांनी या अप्पारावांशी संपर्क साधला. घरातल्या मंडळींकडून आपल्या या बेताला तीव्र विरोध होणार ह्याची कल्पना आजोबांना होतीच. अखेर दुर्गाची आजी पंढरपूरच्या यात्रेला गेलेली पाहून त्यांनी संधी साधली आणि दुर्गाला अप्पारावांबरोबर गुपचुप पुण्याला पाठवून दिले. तिचे वय १४ च्या वर असल्यामुळे तिचा विवाह कायदेशीररीत्या होऊ शकत होता. अप्पारावांबरोबर दुर्गा पुण्याला गेली; तिथून पुढे थेट मुंबईत येऊन दाखल झाली. या ठिकाणी अप्पा-रावांनी तिच्या संदर्भात न्यायमूर्ती रानड्यांची गाठ घेतली.

रानडे बालविधवांची आणि त्यांच्या पालकांची मने वळविण्याचा प्रयत्न करीत. तरुणांना ते असे विवाह करण्यास प्रोत्साहन देत आणि अशा खटपटीतून जी लग्ने जुळून येत ती ते स्वतः पुढाकार घेऊन लावून देत. सदाशिवरावांच्याच शब्दांत सांगायचे तर, "रा. ब. रानडे आज ह्या कार्यास साहाय्य करण्याचे राहिले आहेत. यांजवर या कार्यास फार उत्तम रीतीने साहाय्य करण्याचे प्रसंग ईश्वरेच्छेने आला होता. पण तो

* हा विवाह विष्णुशास्त्री पंडितांच्या खटपटीने प्रत्यक्षात उतरला होता. पुनर्विवाहाच्या चळवळीच्या इतिहासात या विवाहाला अतिशय महत्त्व आहे, कारण या विवाहामुळे मुंबई-पुण्यात प्रचंड खळबळ माजून अखेर शंकराचार्यांकडे पुनर्विवाहाच्या सशास्त्रते-संबंधी निकाल देण्याचे प्रकरण गेले. पुनर्विवाह हा अशास्त्र की सशास्त्र हा वाद बराच काळ पेटून राहिला. अखेर शंकराचार्यांनी त्या दांपत्याशी अन्नोदक व्यवहार करू नये अशी आज्ञा काढली. त्यावेळी अनेक प्रमुख व्यक्तींना प्रायश्चित्त घेऊन पावन व्हावे लागले ( उदाहरणार्थ, श्री. गो. ह. देशमुख ). प्रायश्चित्त न घेता राहिलेल्यांपैकी रा. ब. रानडे विधवाविवाहास साहाय्य करण्यास नेहमी तत्पर असत.
मुंबई येथे, कोकणस्थ ब्राह्मण ज्ञातीत झालेला हा पहिला पुनर्विवाह.

जरी त्यांनी दवडला व ह्यामुळे हे अनेक लोकांकडून उलट टीका करून घ्यावयास ते पात्र झाले, व त्यांच्या या कृत्यामुळे ह्या कार्यास बराच मोठा धक्का बसला तरी मुळापासून तो आजपर्यंत यांचा ह्या कामी उद्योग सतत चालू आहे. कोणास विवाह कर्तव्य झाल्यास आज साहाय्य मागण्यास प्रसिद्ध असे हेच एक स्थळ आहे. "*

अप्पारावांनी दुर्गाला बरोबर आणले ह्याबद्दल रानड्यांनी समाधान व्यक्त केले. एक होतकरू, पुनर्विवाहेच्छू तरुण त्यांच्या माहितीतलाच होता. करायचा तर पुनर्विवाहच अशा निर्धाराने सात आठ वर्षे विधुरावस्थेत तो राहिलेला होता. दुर्गाबाईकरिता रानड्यांनी सुचविलेले हे स्थळ होते सदाशिवराव केळकर या तडफदार तरुणाचे. सदाशिवरावांचे मूळ गाव चाकण. त्यांची आई त्यांच्या लहानपणीच वारली होती. आईच्या निधनानंतर त्यांचा व त्यांच्या दोन धाकट्या भावंडांचा ( एक भाऊ व एक बहीण ) सांभाळ त्यांच्या मावशीने केला. पुढे मुलांच्या मुंजी झाल्यावर वडिलांनी तिन्ही मुलांना आपल्याकडे नेले.

हाताने स्वयंपाक करून, जेवू घालून त्यांना ते शाळेत पाठवीत. पुढे ही मुले इंग्रजी शिकण्यासाठी पुण्याला आली. मात्र त्यापूर्वीच वडिलांनी आपल्या दोन्ही मुलांची लग्ने लावून दिली होती. पुण्यातल्या होळकर आळीत, मावशीच्या वाड्यात राहून बाबा गोखल्यांच्या शाळेत सदाशिवरावांचा इंग्रजी मॅट्रिक्युलेशनपर्यंत अभ्यास झाला. सदाशिवराव मॅट्रिकला असताना त्यांच्या पत्नीला दुसऱ्या खेपेस दिवस गेलेले होते. याच बाळंतपणात सदाशिवरावांची ही पत्नी वारली. त्यांची दोन्ही मुलेही जगली नाहीतच. त्यामुळे बाविसाव्या वर्षी सदाशिवराव केळकर विनापत्य विधुर झाले. बायको जाऊन पंधरा दिवस होतात तोच मावशीने त्यांच्या दुसऱ्या लग्नाचा बेत रचलासुद्धा. परंतु भाच्याने या गोष्टीला ठाम नकार दिला. आता दुसरे लग्न करायचेच तर ते विधवा मुलीशी करायचे असा निश्चय सदाशिवरावांनी केला होता.

याच वर्षी म्हणजे १८७० साली सदाशिवराव पुण्याहून मुंबईला येऊन मॅट्रिक्युलेशन परीक्षेला बसले. ते उत्तीर्ण मात्र झाले नाहीत.

या सर्व घडामोडींनंतर उण्यापुऱ्या आठ वर्षांनी आता सदाशिवरावांच्या दुसऱ्या लग्नाचा योग जुळून येत होता. एव्हाना एक स्वदेशाभिमानी, ध्येयवादी वृत्तीचा आणि उमदा तरुण म्हणून रानड्यांच्या ते चांगल्या परिचयाचे झाले होते. समाजसुधारणांची त्यांच्या ठिकाणी विशेष तळमळ होती आणि ते अशा कार्यांना सक्रिय हातभारही लावीत होते.

न्या. रानड्यांनी सदाशिवराव केळकरांना दोन मुली दाखविल्या. त्यांपैकी एक म्हणजे अळूरकरांची दुर्गा. सदाशिवरावांनी दुर्गाची निवड केली. दुर्गाचे लग्न सदाशिवरावांशी

* ' प्रार्थनासमाजाचा इतिहास ' : —द्वा. गो. वैद्य



ठरले त्यावेळी ( १८७८ ) सदाशिवराव सोलापूर येथे एका कापडगिरणीत नोकरी करीत होते. त्या काळाच्या मानाने त्यांची शैक्षणिक पात्रता ( मॅट्रिक-अनुत्तीर्ण ) दुसरीकडे कोठेही चांगल्या पगाराची नोकरी मिळण्यास पुरेशी होती. तरी त्यांनी पेशा म्हणून विणकराची नोकरी पत्करली यामागेही थोडा इतिहास आणि ध्येयवाद होता.

सदाशिवराव पुण्यात शिकत असताना त्यांच्या अवतीभवती राजकीय, सामाजिक, धार्मिक चळवळी आकार घेऊ लागल्या होत्या. भोवतालचे हे सर्व बदल सदाशिवराव लक्षपूर्वक पाहत होते. त्यात मन घालीत होते.

मॅट्रिकच्या परीक्षेकरिता सदाशिवराव पुण्याहून मुंबईला आले असताना त्यांची उतरण्याची व्यवस्था श्री. गंगाधरपंत गद्रे या नावाच्या एका सुधारक गृहस्थांच्या घरी करण्यात आली होती. श्री. गद्रे हे नव्या सुधारणांचे, नव्या मतांचे पुरस्कर्ते होते. प्रार्थनासमाज या नव्या धर्मपंथाचे ते सदस्यही झाले होते. त्यानंतर वर्षभरातच ( १८७१ ) या गंगाधरपंतांनी दुर्गाबाई नावाच्या विधवेशी पुनर्विवाह केला ( पुढे तर ते ख्रिस्तीही झाले. ) परीक्षेच्या दिवसांत आणि नंतरही काही दिवस सदाशिवराव या तरुण, कार्यशील समाजसुधारकांकडे राहिले. तिथल्या वातावरणाचा, एकूण चळवळींचा चांगलाच ठसा त्यांच्या मनावर उमटला.

पुण्यातदेखील त्यावेळी सामाजिक, राजकीय जागृती वाढलेली होती. श्री. वासुकाका जोशी, श्री. रा. ब. गवंडे या दोन गृहस्थांनी या सुमारास स्वदेशीची चळवळ जोरात सुरू केली होती. १८७१ साली मकरसंक्रांतीच्या दिवशी हे दोन गृहस्थ मुद्दाम जाडेभरडे खादीच्या देशी कापडाचे पोशाख करून घरोघर तिळगूळ देण्यास गेले. लोकांनी त्याबद्दल त्यांची टवाळीही केली. आपल्या देशातले उद्योगधंदे आपल्याच सुशिक्षित, इंग्रजी शिकलेल्या मंडळींनी हाती धरले पाहिजेत, म्हणजे देशाची सुधारणा होईल अशी या स्वदेशप्रेमी मंडळींची धारणा असे. देशी कारखान्यांतून निघालेला माल निकृष्ट असला तरीही आपल्या कारखानदारांना उत्तेजन म्हणून तो आपण खरेदी केला पाहिजे अशी त्यांची भूमिका होती.

लोकांनी उपहास केला तरी तरुण सदाशिवरावांना मात्र त्यांच्या या खटपटीचे महत्त्व पटले. जोशी, गवंडे, न्या. रानडे हीच मंडळी येथून पुढे त्यांची मार्गदर्शक ठरली.

त्या काळी कापडगिरण्यांमध्ये ज्या वीव्हिंग मास्टरसारख्या अधिकाराच्या जागा होत्या तिथे सरसकट परदेशी माणसांना नेमण्याचा प्रघात होता, कारण त्या जागांसाठी या क्षेत्रात योग्य शिक्षण व अनुभव घेतलेली देशी माणसेच मिळत नसत. याही क्षेत्रात हिंदी माणसांनी मागे असू नये या दृष्टीने सदाशिवरावांच्या या हितकर्त्यांनी त्यांचे लक्ष या उपेक्षित व्यवसायाकडे वेधले. श्री. काका जोशी यांच्या मध्यस्थीने सदाशिवरावांनी परळ येथील शेठ मोरारजी गोकुळदास यांच्या गिरणीत राहून कापड विणण्याचे तंत्र शिकण्यास

सुरुवात केली. या सर्व व्यवहारात न्या. रानड्यांनी जातीने लक्ष घातले.

सोलापूर येथेही शेट मोरारजींची गिरणी होती. १८७८ साली सदाशिवरावांचा दुसरा विवाह जुळून आला त्यावेळी ते या गिरणीत द. म. रु. १००।– पगार घेऊन नोकरी करीत होते. त्याचप्रमाणे प्रार्थना समाजाचे सदस्यत्वही त्यांनी स्वीकारलेले होते. सदाशिवरावांबरोबर त्यांच्या भावानेही प्रार्थनासमाजाचे अनुयायित्व पत्करले. ही बातमी त्यांच्या वडिलांना कळताच त्यांनी आपले दोन्ही मुलगे मेले, म्हणून त्यांच्या नावाने आंघोळी केल्या आणि त्यांच्याशी संबंध तोडले. केळकरांच्या घरात विठ्ठलमंदिर होते, ते व जो थोडाफार पैसाअडका असेल तो त्यांनी पुढे, विधवा होऊन परतलेल्या आपल्या लेकीला देऊन टाकला.

प्रचलित हिंदुधर्मातील मूर्तिपूजा व इतर काही चालीरीती पटत नाहीत आणि महमदी अगर ख्रिस्ती धर्म स्वीकारार्ह वाटत नाहीत म्हणून काही मंडळींनी महाराष्ट्रात हिंदू धर्माचीच एक नवीन, सुधारलेली आवृत्ती म्हणून एक नवा धर्मपंथ काढला होता. त्याचे नाव प्रार्थनासमाज. ( मतसाधर्म्यामुळे बंगालमधल्या ब्राह्मोसमाजाचे हे भावंड बनले. ही मंडळी स्वतःला ब्राह्मोसमाजीही म्हणवून घेत. कायदेशीररीत्या हिंदू म्हणूनच ओळखली, समजली जात. ) प्रार्थनासमाजाचे संस्थापक आणि सदस्य एकेश्वरवादी होते, मूर्तिपूजेवर त्यांची श्रद्धा नव्हती. जातिभेद न पाळणे, बालविवाह बंद करणे, स्त्री–शिक्षण, पुनर्विवाहासारख्या नव्या प्रथांना उत्तेजन देणे अशी काही त्यांची उद्दिष्टे होती. पूजाअर्चा, व्रतवैकल्ये, ब्राह्मणभोजन, उपासतापास, सोवळेओवळे इ. ऐवजी परमेश्वराची प्रार्थना, उपासना व प्रत्यक्ष लोकसेवेतून–समाजसेवेतून ईश्वरसाधना, असे या मंडळींचे धोरण असे. न्या. महादेव गोविंद रानडे, डॉ. रा. गो. भांडारकर, डॉ. आत्माराम पांडुरंग, भिकोबा ल. चव्हाण, भास्कर हरि भागवत, वा. वि. माडगावकर, दामोदरदास गोवर्धनदास, प्रि. वा. आ. मोडक इ. मंडळी या समाजाच्या संस्थापकांपैकी. या लोकांनी पुकारलेला प्रतिमापूजनाचा त्याग, रविवारची त्यांची सामुदायिक उपासना इत्यादी स्वरूप पाहून जुने, सनातनी लोक त्यांना ख्रिस्ती वळणाचे ठरवून त्यांचा जवळजवळ तिरस्कार, हेटाळणी करीत तर ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केलेल्या सुशिक्षितांना ते ख्रिस्ती धर्मापासून, म्हणजे 'खऱ्या मार्गापासून' दूर राहत आहेत असे वाटून तेही त्यांच्यावर टीका करीत.

प्रार्थनासमाजाचे कार्य मात्र नेटाने, निर्धाराने पुढे चालले होते, फोफावत होते. गिरगावात त्यांचे प्रार्थनामंदिर बांधले गेले. सुबोधपत्रिका* हे समाजाचे इंग्रजी–मराठी

* प्रार्थनासमाजाच्या तत्त्वांचा प्रसार करण्यासाठी १८७३ पासून प्रसिद्ध होऊ लागलेले हे साप्ताहिक १८९९ पर्यंत थीइस्टिक ॲसोसिएशनच्या मालकीचे होते. सुरुवातीस प्रत्येक अंकाची किंमत फक्त एक पैसा ठेवण्यात आली होती.



मुखपत्र प्रसिद्ध होऊ लागले. रात्रीच्या शाळा,* संगतसभा,† बालहत्याप्रतिबंधक गृह, अनाथ बालिकाश्रम इ. नवे नवे उपक्रम हाती घेतले जाऊ लागले. पुणे, अहमदाबाद, अहमदनगर, वाई, इंदूर, हैद्राबाद इ. ठिकाणी प्रार्थनासमाजाच्या शाखाही निघाल्या होत्या. विशेषतः लोकसेवेची भावना त्यावेळच्या प्रार्थना समाजींमध्ये इतकी तीव्र होती, की एक काळ असा होऊन गेला की कोठेही पूर असो, भूकंप असो की दुष्काळ असो, ही मंडळी तिथे मदतीला धावत गेलेली असायचीच ! त्याचप्रमाणे या मंडळींचे हरिजनकार्यही नजरेत भरण्याजोगे होते. त्यामुळे अनेक सुधारणावादी लोक या नव्या पंथाकडे आकृष्ट होत चालले होते.

सदाशिवरावांचे हे लग्न झाले त्यावेळी मुंबईत हा प्रार्थनासमाज स्थापन होऊन ( १८६७ ) अकरा वर्षे होऊन गेली होती. त्याकाळी पुनर्विवाह करणाऱ्या व्यक्तींची व त्यांच्या कुटुंबियांची समाज किती छळणूक व अवहेलना करीत असे ते पाहता आपल्या नियोजित द्वितीय पत्नीच्या निडर, ध्येयवादी वृत्तीची पहिली पावती दुर्गाला ते निग्रहपूर्वक पुनर्विवाह करीत होते यातच मिळाली असेल. त्यांच्या निर्भीडपणाचा, करारीपणाचा दाखला आणखीही एका बाबतीत या लग्नाच्या निमित्ताने तिला व इतर मंडळींना मिळाला.

आपण आता स्वतःला प्रार्थनासमाजाचे सभासद म्हणवितो तर मग ज्या प्रतिमापूजनावर आपला विश्वास नाही त्याचा ज्या विधीत समावेश आहे अशा जुन्या विधीने विवाह लावून घेणे यात त्यांना मोठी विसंगती, अप्रामाणिकपणा, ढोंगीपणा वाटला. 'आपल्या स्वतःच्या विवेकास जे पटेल व जे आपले कर्तव्य होय अशी आपल्या मनाची खात्री होईल ते निःशंकपणे, लोकांच्या टीकेचा विचार मनात न आणता कर्तव्यबुद्धीने करायचे,' ही त्यांची भूमिका.

म्हणून सदाशिवरावांनी डॉ. सर भांडारकरांना विनंती केली आणि प्रार्थनासमाजाच्या

* १८७६ सालापासून गिरण्यांत, कारखान्यांत काम करणाऱ्या लोकांसाठी शिक्षणाची सोय करण्यासाठी थीइस्टिक ॲसोसिएशनने रात्रीच्या शाळा काढल्या. १८९९ साली या सर्व शाळा प्रार्थनासमाजाकडे आल्या. सर्व जाती व धर्मांचे कारकून, शिपाई, मजूर, हमाल, शिंपी, फेरीवाले इ. लोक या शाळेचा लाभ घेत.

† प्रसिद्ध ब्राह्मप्रचारक ब्रह्मानंद केशवचन्द्र सेन हे १८६० सालापासून आपल्या घरी वैचारिक देवघेवीसाठी एक संभाषणात्मक सभा भरवीत, तिचे नाव, संगतसभा. अनेक तरुण एकत्र जमून धर्म, व्यवहार, नीती, समाजसुधारणा इ. विषयांवर ऊहापोह करीत. पुढे १८०० मध्ये पुणे व मुंबई येथेही संगतसभा स्थापन झाल्या. १९०५ मध्ये मुंबईच्या संगतसभेचे रूपांतर यंग थीइस्ट्स ॲसोसिएशनमध्ये झाले.

तत्त्वांवर आधारित असा एक खास विवाहविधी आपल्या लग्नासाठी त्यांच्याकडून तयार करवून घेतला.* विधी तयार नाही, म्हणून ते अडून बसले नाहीत. या विधीत होमहवनाला फाटा दिलेला असल्याने या विवाहाला कायदेशीर मान्यता मिळणार नव्हती. परंतु आपल्या विवाहाला कायद्याचे शिक्कामोर्तब नाही याचे सदाशिवरावांना आणि दुर्गाबाईंनाही काहीच वाटले नाही.

तत्त्वतः जरी प्रार्थनासमाजाच्या संस्थापकांनी व समासदांनी प्रतिमापूजन हा असन्मार्ग आहे, तो ईश्वरोपासनेचा खरा मार्ग नव्हे असा विचार सिद्धान्त म्हणून स्वीकारला होता, आणि दीक्षा घेतानाही ते प्रतिमापूजनाच्या त्यागाची प्रतिज्ञा करीत असत, तरी प्रत्यक्ष व्यवहारात मात्र तत्त्वाला धरून आचरण करणे त्यांच्यापैकी बहुतेकांना अनेक कारणांनी शक्य होत नसे. एक तर घरातल्या इतर मंडळींनी, स्त्रीवर्गाने, नातेवाइकांनी काही प्रार्थनासमाजाची दीक्षा घेतलेली नसे; शिवाय लग्नकार्यासारख्या प्रसंगी व्याहीमंडळीही जुन्या मतांची असत. या सर्वांविरुद्ध, जातीविरुद्ध, एकूणच समाजाविरुद्ध जाण्याची धमक पहिली काही वर्षे तरी या समासदांमध्ये नव्हती. त्यामुळे लग्न, मुंज यांसारखे धार्मिक विधी जुन्या पद्धतीने, अप्रत्यक्षपणे देवदेवक ठेवूनच केले जात. (म्हणजे स्वतः यजमानांऐवजी मामाने देवदेवक ठेवणे, अशा पळवाटा काढीत.) प्रार्थनासमाजाचे कैवारी जरी त्यांच्या या विसंगत वर्तनाकडे सहानुभूतीने थोडीफार डोळेझाक करीत, तरी एकीकडे सर्वसाधारण सनातनी समाजाकडून आणि दुसरीकडे 'इंदुप्रकाश' सारख्या सुधारणावादी वर्तमानपत्रांतून साहजिकच त्यांच्यावर कडक टीका होत असे.

अशा परिस्थितीत १८७० साली म्हणजे प्रार्थनासमाजाची स्थापना झाल्यावर तीन वर्षांनी श्री. वासुदेव बाबाजी नवरंगे हा एक समासद असा निघाला की ज्याने प्रार्थनासमाजाच्या तत्त्वांशी प्रामाणिक राहून ब्राह्मपद्धतीने विवाह – पुनर्विवाह – करण्याचे धाडस केले! नवरंगे सदाशिवरावांप्रमाणेच लग्नापूर्वी प्रार्थनासमाजाचे समासद झाले होते. कृष्णाबाई (वापट) या विधवा स्त्रीशी त्यांचा विवाह निश्चित झाल्यानंतर त्यांच्यापुढेही तो कोणत्या पद्धतीने पार पाडावा असा प्रश्न उभा राहिला. कलकत्यास त्यावेळी मूर्ति-

* हा विधी १३ जानेवारी १८७८ च्या सुबोधपत्रिकेत प्रथम प्रसिद्ध झाला. याआधीचा पहिला ब्राह्मविवाह कलकत्याहून तयार विधी मागवून त्यानुसार लाविण्यात आला होता. सदाशिवरावांच्या लग्नाच्या आमंत्रणपत्रिकेवर श्री. भास्करराव भागवत, सेक्रेटरी प्रार्थनासमाज, अशी सही होती. मात्र पुढे हा विधी प्रार्थनासमाज-मतानुसार मान्य करून घेण्यासाठी, नेमलेल्या कमिटीपुढे ठेवण्यात आला.
सदाशिवराव–दुर्गाबाई यांचे लग्न हा महाराष्ट्रात झालेला दुसरा ब्राह्मविवाह किंवा प्रतिमापूजनविरहित विवाह.



पूजनविरहित विवाह पार पडू लागले होते. मात्र हे ब्राह्मविवाह कायद्याला संमत असतीलच, अशी खात्री नव्हती. त्यामुळे तो विशिष्ट प्रकारचा विधी झाल्यानंतर वधूवरांमध्ये लेखी करारनामे होत असत. वासुदेवरावांनी कलकत्याहून तयार ब्राह्मविवाहविधी मागवून घेऊन त्यानुसार विवाह लावून घेतला आणि पुढे १८७२ चा कायदा (सिव्हिल मॅरेज ॲक्ट) पास झाल्यानंतर त्यांनी आपला विवाह रजिस्टर करून घेतला. मुंबई शहरात रजिस्टर झालेला हा पहिला विवाह.

त्यानंतर मधली सातआठ वर्षे महाराष्ट्रात ब्राह्मविवाह पार पडल्याची नोंद कुठेच नाही. सदाशिवराव–दुर्गाबाई यांचे लग्न हा दुसरा ब्राह्मविवाह. सदाशिवरावांचा विवाह ज्या विधीने लावून देण्यात आला तो सर्व विधी पुढे लौकरच 'सुबोधपत्रिका' या प्रार्थनासमाजाचे मुखपत्र म्हणून चालविल्या जाणाऱ्या साप्ताहिकात प्रसिद्ध करण्यात आला. भांडारकरांनी मूळ हिंदू विवाहविधीचा आराखडा डोळ्यांसमोर ठेवून, त्यातला आक्षेपार्ह भाग वगळून हा नवविधी तयार केला होता. तसेच सर्वांना त्याचा अर्थ समजावा म्हणून त्याचे 'मराठीकरण'ही केले होते. नंतर त्यांत थोडे फेरफार करून त्याच पद्धतीने मुंबईच्या प्रार्थनासमाजात अनेक विवाह लावण्यात आले; अजूनही लावण्यात येतात.

मात्र केळकर जोडप्याने आपला विवाह १८७२ च्या कायद्यान्वये रजिस्टर करून घेतला नाही.

"मला माझी स्वतःची व त्याचप्रमाणे माझ्या कुटुंबाची खात्रीच वाटत होती की आम्हाला ह्या लग्नाचा प्रश्न घेऊन कोर्टात जावयाचा प्रसंग केव्हाच यावयाचा नाही. तेव्हा रजिस्ट्रेशनच्या भानगडीत कशाकरता पडावयाचे?" अशा प्रकारचे उद्‌गार सदाशिवरावांनी या संदर्भात पुढे द्वा. गो. वैद्य यांच्याशी बोलताना काढले.* अर्थात, सदाशिवरावांच्या या उद्‌गारांच्या मुळाशी बुद्धिवादापेक्षा भारतीय, हिंदू मनाची विवाहसंस्थेवरची श्रद्धाच स्पष्ट दिसते. सदाशिवरावांसारख्यांनी आपले विवाह रजिस्टर करून न घेण्यामागे आणखीही एक कारण होते. सिव्हिल मॅरेज ॲक्टखाली लग्ननोंदणी करताना "मी खिश्चनही नाही, मी हिंदूही नाही..." अशा अर्थाचे काही निवेदन उच्चारावे लागे आणि या प्रार्थनासमाजींचा या शब्दांना विरोध असे. वास्तविक हिंदू धर्म त्याज्य समजून लोक इतर धर्मांकडे वळत आहेत, त्याऐवजी आपल्या धर्मात सुधारणा करून तोच टिकवावा या भूमिकेतून प्रार्थनासमाजाची चळवळ निघाली होती. साहजिकच त्यांना ही शब्दरचना मंजूर नव्हती. मुळात विधवाविवाह म्हणजे लोकमताविरुद्ध पोहून जाणे. त्यात सदाशिवरावांनी विवाहसंहिताही नवी आखून घेतलेली. त्यामुळे पुनर्विवाहाला अनुकूल परंतु जुन्या विधीच्या पुरस्कर्त्या अशा आणखी कित्येक हितचिंतकांची सहानुभूती या

* 'प्रार्थनासमाजाचा इतिहास' —द्वा. गो. वैद्य

वधूवरांनी गमावली.

शिवाय सदाशिवराव आता जातिभेद न पाळणाऱ्या प्रार्थनासमाजाचे सदस्य असले तरी मूळचे कोकणस्थ ब्राह्मण; तर दुर्गाचे अळूरकर घराणे देशस्थ. तेव्हा याही दृष्टीने हा विवाह वैशिष्ट्यपूर्ण व काहीसा क्रांतिकारकच होता.

या लग्नात पुरोहिताचे काम डॉ. भांडारकरांनी केले आणि दुर्गाचे कन्यादान खुद्द न्या. रानडे आणि सौ. रमाबाई यांनी केले. स्वतः रमाबाई त्यावेळी सोळा वर्षांच्या दुर्गाएवढ्याच होत्या !

सदाशिवरावांचे एक मित्र मुद्दाम सुरतेहून या विवाहाला आले होते. या लग्नाची हकीकत त्यांनी लिहून ठेवली आहे— "जनरूढीने वैधव्य पावलेली सकेशा, सालंकृता अशी ही अगदी तारुण्यावस्थेत येऊन पोचलेली सुंदर दुर्गा स्वयंवराला तयार झालेली पाहिली तेव्हा जो आनंद झाला तो काय वर्णावा !"*

अळूरकरांची दुर्गा, सौ. उमाबाई केळकर झाली त्यावेळी ती स्वतः सोळा वर्षांची तर सदाशिवराव तीस वर्षांचे होते.

या लग्नाची बातमी खाजगी पत्रांतून, वर्तमानपत्रांतून मिरज, तासगावपर्यंत पोचली तेव्हा दुर्गाच्या माहेरी आणि आजोळघरी मात्र हलकल्लोळ माजला. त्यांच्या घरावर लोकांनी दगडही टाकले.

सदाशिवरावांचे हे लग्न झाले त्यावेळी अनेक नवमतवादी प्रार्थनासमाजाच्या बावट्याखाली एकत्र होत होते. सर्वसाधारणपणे सुशिक्षित, बऱ्यापैकी सधन, कधी सरकारी नोकरी करणारे, स्वतंत्र विचारशक्ती व त्यानुसार कृती करण्याची हिम्मत असलेले असे हे लोक असत. प्रार्थनासमाजाच्या अनुयायांचा हा जो एक गट समाजात निर्माण होत होता, तो विचार व वागणूक या दोन्ही बाबतींत त्या काळच्या इतर सुस्थित, सुशिक्षित हिंदू लोकांपेक्षा भिन्न होता, वेगळा पडलेलाही होता. समाजातील सनातनी मंडळी या लोकांना धर्मबुडवे व म्हणून भ्रष्ट, बहिष्कृत — जवळ जवळ ख्रिस्तीच समजत असत. आणि काही प्रार्थनासमाजींचा ख्रिश्चनधर्माकडे ओढा होताही. कित्येक बाबतींत त्यांचा आदर्श डोळ्यांसमोर ठेवून ही मंडळी आपले बदल करीत होती. विशेषतः मिशनरी स्वरूपाची जी कार्ये त्यांनी अंगीकारली होती त्या बाबतीत ख्रिश्चन मिशनऱ्यांचे कार्यच त्यांच्या डोळ्यांपुढे होते. त्यामुळे त्यांचे आपल्या इतर नातेवाइकांशी असलेले संबंध एकदम तुटल्यासारखे होत. समाजातून वेगळे पडण्याच्या या जाणिवेमुळे, एक प्रकारच्या सहभावातून व गरजेतूनही ही समान विचारधारेची, आचाराची मंडळी मनाने एकमेकांची नातेवाईक बनून जात. प्रार्थनासमाजाचे एक विशाल, बृहत कुटुंबच या पोषक

* 'प्रार्थनासमाजाचा इतिहास'—द्वा. गो. वैद्य



परिस्थितीमुळे आकार घेऊ लागले. गिरगावातील प्रार्थनासमाज हा या कुटुंबाचा केन्द्रबिंदू होता. रानडे, भांडारकर, नवरंगे, माडगावकर, गद्रे, मोडक, पंडित, चंदावरकर, केळकर अशी अनेक घराणी अशा प्रकारे एकत्र आली होती. राहण्याच्या जागांमधील अंतर, कुठे आर्थिक परिस्थितीतील तफावत यांमुळे पडलेले काही स्वाभाविक अंतर्गट सोडल्यास या मंडळींचे आपापसातील संबंध अगदी घरोब्याचे, खेळीमेळीचे असत. कौटुंबिक समारंभ, दुखणीबाणी, अडचणी इत्यादींत नातेवाइकांप्रमाणेच ते सहभागी होत, सहकार्य देत-घेत.

सुधारकांच्या या समूहात आता सदाशिवराव आणि उमाबाई हे एक नवे पुनर्विवाहित जोडपे दाखल झाले. सोळा वर्षांची धीट उमा या वेगळ्या राहणीच्या, विचारसरणीच्या लोकांना समजून घेऊन त्यांच्याशी एकरूप होऊ लागली.

केळकरांच्या घरात उमाला आपल्या पतीशी आपली निवड, आपला विवाह, त्याची पार्श्वभूमी इ. संबंधी मोकळेपणाने बोलण्याची वेळ यायला फार दिवस लागण्याचे कारण नव्हते. सुचवल्या गेलेल्या स्थळांमधून सदाशिवरावांनी दुर्गाचीच निवड का केली, हाही मुद्दा निघाला. सदाशिवरावांनी मोकळेपणाने खुलासा केला की–त्यांना शिक्षणाचे संस्कार झालेली पत्नी हवी होती; दुर्गा चार इयत्ता शिकलेली होती, दुसरी मुलगी मात्र अशिक्षित होती...

आपल्या पतीच्या मनाचा एकूण कल उमासाठी या उत्तरातून आणखीच स्पष्ट झाला असेल. आपल्या या सहचारिणीचे नुसते प्राथमिक शिक्षण झालेले नाही तर तिला स्वतंत्र, विचारी, संस्कारक्षम व्यक्तिमत्त्वही आहे याची सुखद जाणीव सदाशिवरावांना पहिल्या काही दिवसांतच झाली.

केळकरांच्या घरात आल्यावर उमेने घरीच इंग्रजी भाषेचे शिक्षण घेण्यास सुरवात केली. सुइणीचा रीतसर अभ्यासक्रम पूर्ण करून तिने तो पेशा म्हणून पत्करला. याशिवाय ती स्वतः प्रार्थनासमाजाची सभासदही झाली.

सदाशिवरावांबरोबर उमा प्रवचनांना, व्याख्यानांना जात असे. सभांमध्ये भाग घेऊन ती राजकीय, सामाजिक प्रश्नांवर चर्चाही करू लागली. उमा खऱ्या अर्थाने सदाशिवरावांची सहधर्मचारिणी झाली. सदाशिवरावांच्या समाजकार्यात ती प्रत्यक्ष भागही घेऊ लागली. तिच्या अंगी सभाधीटपणा, वक्तृत्व हे गुण उपजतच होते. स्वतंत्र विचारशक्तीही होती. राजकीय बाबतीत उमा टिळकपक्षीय तर सदाशिवराव हे रानडेगटाकडे

झुकणारे. त्याबद्दल दोघांचे वाद-संवादही चालत. आर्यमहिला समाजासारख्या* स्त्री-संस्थांत तर उमा काम करीत असेच परंतु काँग्रेसला जोडून असलेल्या सामाजिक सुधारणा परिषदेतही ( Social Reform Conference ) ती बालविवाह, विधवा-विवाह, स्त्री-शिक्षण अशा प्रश्नांवर धीटपणाने आपले विचार मांडीत असे. सुइणीच्या आपल्या क्षेत्रातसुद्धा उमाने विशेष नैपुण्य मिळविले. राजेरजवाड्यांकडची बोलावणी तिला येऊ लागली. उमाबाईंचे स्वतंत्र व्यक्तिमत्त्व सिद्ध करणारा एक प्रसंग इथे उद्धृत करता येईल. प्रार्थनासमाजी मंडळी सर्वसाधारणपणे टिळकविरोधी, रानडे यांच्या प्रागतिक पक्षाची होती. परंतु १९०८ मध्ये जेव्हा लो. टिळकांना अटक झाली तेव्हा आर्यमहिला समाजातर्फे सहानुभूतीचा ठराव करून तो त्यांच्या पत्नीला पाठविण्याचा मुद्दा पुढे आणला तो उमाबाईंनी. इतरांचे पुरेसे पाठबळ न मिळाल्यामुळे ही त्यांची इच्छा पूर्ण मात्र झाली नाही.

लग्नाच्या वेळी सदाशिवरावांना गिरणीत चांगली नोकरी होती. परंतु लग्नानंतर तीन वर्षांतच त्यांनी ही नोकरी सोडण्याचा निर्णय घेतला. प्रार्थनासमाजकार्याचा प्रचार आणि प्रसार करण्यासाठी ख्रिश्चनांच्या मिशनरींप्रमाणे कुणीतरी पूर्ण वेळ प्रचारकाचे काम करणे जरूर आहे असा एक विचार १८८१ च्या सुमारास न्या. रानडे यांनी मांडला. नंतर वर्षभर यावर चर्चा चालू होती. कुणीतरी त्यासाठी स्वेच्छेने आपला पोटापाण्याचा व्यवसाय सोडून स्वतःला धर्मप्रचाराला वाहून घेणे आवश्यक होते; ते पगारी कारकुनाचे काम नव्हते. निष्ठावंत सदाशिवरावांनी आपल्या दुभत्या नोकरीवर पाणी सोडून हे सत्कार्य करण्याचे ठरविले आणि त्याप्रमाणे १ जाने. १८८२ पासून ते हे काम करू लागले. उमाने त्यांना उत्तेजन तर दिलेच परंतु त्यांच्या धर्मप्रचाराच्या कार्यात ती त्यांना आस्थापूर्वक मदतही करू लागली. मुख्य म्हणजे कुटुंबाचा आर्थिक भार तिने आपल्या खांद्यावर पुष्कळशा प्रमाणात घेतला. सदाशिवरावांचा त्याग लक्षात घेऊन प्रार्थनासमाज त्यांना निर्वाहासाठी म्हणून दरमहा रु. ४० देत असे. ( पुढे काही

* पडद्याची अडचण नसूनही प्रार्थनासमाजींच्या स्त्रिया सभांना उपस्थित नसत. त्यांची ही वृत्ती, अज्ञान घालवले नाही तर हा पुरुषांचाच धर्म होऊन बसेल या भीतीने काही ज्येष्ठ पुरुषांनी स्त्रियांना अभिमुख, ज्ञानाभिमुख करण्यासाठी एक सभा सुरू केली. व्याख्याने, निबंधवाचन, शास्त्रीय माहिती इ. उपक्रमांद्वारा प्रार्थनासमाजाच्या पुरुषांनी जेमतेम चालू ठेवलेले हे साप्ताहिक महिलामंडळ पुढे १८८२ मध्ये पं. रमाबाईंनी काढलेल्या आर्यमहिलासमाजात विलीन करण्यात आले. श्री. रमाबाई रानडे, रमाबाई भांडारकर, डॉ. काशीबाई नवरंगे इत्यादींनी या संस्थेतर्फे अनेक समाजोपयोगी योजना परिश्रमपूर्वक राबविल्या. आजही प्रार्थनासमाजाच्या प्रार्थनामंदिरात हे मंडळ भरते.



वर्षांनी या रकमेत दहा रुपयांची वाढ झाली ) या तुटपुंज्या रकमेत उमा आपल्या कमाईची महत्त्वाची मासिक भर टाकू शकली नसती तर सदाशिवरावांना आपल्या परिवाराची काळजी न करता निर्वेधपणाने, एकचित्ताने प्रार्थनासमाजाचे काम करता आले नसते.

सदाशिवराव हे प्रार्थनासमाजाचे पहिले मिशनरी. सतत दहा वर्षे त्यांनी हे काम केले. हे काम करताना सुबोधपत्रिकेचे संपादन–लेखन–संचालन करणे, ब्राह्मधर्माच्या प्रचारासाठी अनेक ठिकाणी प्रवास करणे, व्याख्याने देणे, ठिकठिकाणच्या समाज-शाखांना, अनाथाश्रमांना भेटी देणे, पंढरपूरच्या ऑर्फनेजच्या* कामावर प्रत्यक्ष जाऊन देखरेख ठेवणे इ. विविध अंगे त्यांनी सांभाळली. धर्मप्रसाराची अस्सल तळमळ व कळकळ, उत्तम वक्तृत्व व परिणामकारक लेखनकला हे आपले सर्व गुण सदाशिवरावांनी निष्ठापूर्वक आपल्या या प्रचारकार्यावर केंद्रित केले. परंतु पुढे काही वर्षांनी त्यांचे आणि समाजाच्या व्यवस्थापक मंडळींचे काही मतभेद झाले आणि सदाशिवरावांनी आपली प्रचारकाची जागा सोडली. मात्र पुढेही काही वर्षे ते स्वतःला ब्राह्मधर्मप्रचारक म्हणवून घेत, स्वतंत्रपणे धर्मप्रचार करीतच राहिले आणि त्यांच्या कार्याचे महत्त्व जाणून प्रार्थनासमाज त्यांना त्याबद्दल दरमहा वीस रुपये मानधनही देत असे.

पूर्ण वेळ प्रचारकाचे काम सोडल्यानंतर सदाशिवरावांनी पुन्हा गिरणीतल्या कामाला सुरुवात केली. त्या कामातही आपल्या स्वभावानुसार त्यांनी आपला जीव ओतला आणि ते एक उत्तम वीव्हिंग मास्टर झाले. मात्र त्यांचा स्पष्टवक्तेपणा, रोखठोक स्वभाव अनेक वेळा आड येई व त्यामुळे व्यवस्थापक किंवा मालक मंडळींशी त्यांचे मतभेद होत. एकाच गिरणीत ओळीने बरीच वर्षे असे ते टिकून राहिले नाहीत.

हे सर्व चालू असताना सदाशिवराव उमाबाईंच्या छोट्या कुटुंबाचा चांगलाच विस्तार होत चालला होता. लग्नानंतर सोलापूरला वास्तव्य असताना त्यांच्या पहिल्या मुलाचा म्हणजेच आत्मारामचा जन्म झाला. उमाबाईंची एकूण नऊ बाळंतपणे झाली; परंतु मुले जगली अशी एकूण सहा. ओळीने ४ मुलगे व नंतर २ मुली. उमाबाईंच्या लग्नानंतर काही

* पंढरपूर या क्षेत्राच्या ठिकाणी फार वर्षांपासून संकटग्रस्त स्त्रिया बाळंतपणासाठी येत व अब्रू वाचवण्यासाठी गर्भपात, बालहत्या इ. करण्यास प्रवृत्त होत. रा. ब. लालशंकर उमियाशंकर ( प्रार्थनासमाजी ) ह्यांनी पंढरपूर येथे मुन्सफ असताना अशा अभागी जिवांसाठी बालहत्याप्रतिबंधक गृहाची स्थापना केली. पुढे १८७७ साली दुष्काळ पडला व अन्नान्नदशा झाली तेव्हा त्यांनी अनाथबालकगृह स्थापन केले. त्याचप्रमाणे अनाथ स्त्रीगृहही स्थापन झाले. प्रार्थनासमाजाने मानवतेच्या दृष्टिकोनातून, देवकार्य समजून चालविलेल्या या संस्था सर्वस्वी लोकाश्रयावर चांगल्याच फोफावल्या.

वर्षांनी उमाबाईंची आई व त्या भावाला त्यांच्या केशवपनाच्या प्रसंगी अलूरकरांचे घर सोडावे लागले होते तो त्यांचा भाऊ रघुनाथ अलूरकर ही दोघेही केळकरांकडे, ते सोलापूरला असतानाच, राहायला आली. पुढे तर उमाबाईंच्या आईचे आईवडील—म्हणजे वयोवृद्ध गर्गे—आजीआजोबाही—त्यांच्याच घरी येऊन राहिले. अनेक वर्षे ही सर्व वडील माणसे सदाशिवरावांच्या घरी होती. सदाशिवरावांनी पुनर्विवाह केला, ते प्रार्थनासमाजाचे सभासद झाले त्यामुळे त्यांचे त्यांच्या नातलगांशी संबंध फारसे टिकले नव्हतेच. परंतु उमाबाईंच्या माहेरच्या प्रेमळ, वृद्ध माणसांनी ही उणीव भरून काढली. घरात ही जुन्या मतांची माणसे आपल्या परीने जुन्या धार्मिक परंपरा, रीतिरिवाज पाळत. सहिष्णू सदाशिवरावांची त्याला आडकाठी नसे. उमाबाईंचा भाऊ रघुनाथ हाही पुढे गिरणीतच काम करू लागला. हे अलूरकरमामासुद्धा आपल्या कुटुंबासकट पुष्कळदा केळकरांच्या या सर्वसमावेशक कुटुंबात रहायला असत. त्यामुळे केळकरांच्या मुलांबरोबरच अलूरकरमामांची सहा मुलेही वाढत होती. एकूण या काळात गर्गे, अलूरकर व केळकर अशी तीन कुटुंबे केळकरांच्या घरात एकत्र नांदत होती.

पुढे मोठा दुष्काळ पडला तेव्हा गोरगरीब लोक आपली मुले विकून टाकू लागले. त्यावेळी या जोडप्याने अशा तीन निराधार मुलींना जवळ केले. सुमारे १८८८ ते १८९२ या काळातली ही हकीकत असावी. लिंबाबाई कानडे (केसकर), आई वाडीकर व रखमाबाई तंजावरकर या त्या तीन मुली. या तीनही मानसकन्या केळकरांच्या मुलांबाळांतच मोठ्या झाल्या. (वयाने त्या केळकरांच्या मुलांपेक्षा मोठ्या होत्या.) सदाशिवराव स्त्री-शिक्षणाचे विशेष पुरस्कर्ते. या तीन मुलींना योग्य ते शिक्षण देऊन मगच त्यांनी लग्ने त्यांनी लावून दिली. तिघींपैकी एकीने वैद्यकीय शिक्षण घेतले तर दुसरीने शिक्षिकेचा व्यवसाय पत्करला.

सदाशिवराव व उमाबाईंना मुलींची फार आवड व झाले चार मुलगेच. आत्माराम, पांडुरंग, केशव व माधव या चार मुलांच्या पाठीवर १९ एप्रिल १८९२ या दिवशी मुंबई येथे केळकरजोडप्याला पहिली मुलगी झाली आणि तिचे नाव मोठ्या कौतुकाने ठेवण्यात आले, तारा! ताराच्या पाठीवर अडीच वर्षांनी त्यांना आणखी एक मुलगी झाली, तिचे नाव ठेवण्यात आले इंदिरा. इंदिरा हे त्यांचे शेवटचे अपत्य. तारा आणि इंदिरा यांच्यामध्ये आणखीही एक कन्या झाली होती. परंतु ती अल्पायुषी ठरली. तिचेही नाव होते, इंदिरा.

ताराचा जन्म झाला त्यावेळी तिचे वडील चव्वेचाळीस वर्षांचे तर तिची आई तीस वर्षांची होती. मुले आईवडलांना बाबा आणि आई म्हणूनच संबोधत. मोठ्या दोन भावांना दादा आणि तात्या ही टोपणनावे लाभली. केशव, माधव यांना नावानेच हाक मारली जाई. धाकट्या दोन बहिणींना वेळोवेळी बदलती टोपण नावे मिळत गेली!



उमाबाई स्वतः कर्तबगार तशाच करारीही होत्या. सदाशिवराव व त्या, दोघेही प्रार्थनासमाजाचे निष्ठावंत अनुयायी होते आणि त्यांच्या घरातले वातावरण प्रार्थनासमाजाच्या तत्त्वांप्रमाणे अत्यंत धार्मिक असे. सर्व कुटुंबीयांनी पहाटे उठून प्रार्थना म्हटलीच पाहिजे, रविवारी सकाळी न चुकता सगळ्यांनी प्रार्थना मंदिरात गेलेच पाहिजे अशी शिस्त व नियम केळकरांच्या घरात होते. घरात दहाबारा तर मुलेच होती. श्री. कोरेगावकर हे सभासद यावेळी सकाळी मुलांसाठी ' सन्डे क्लास ' म्हणून पाठ घेत असत आणि केळकर भावंडे तेथे उपस्थित असत. स्वतः उमाबाई प्रार्थनासमाजाची कोणतीही उपासना चुकवीत नसत. " इंग्रजीतल्या उपासना नीटशा समजल्या नाहीत तरी ईश्वरभक्तीपर पदे तर कानावरून जातात. अशी उमाबाईंची भूमिका असे, " असे वर्णन एके ठिकाणी आले आहे; परंतु ते तितकेसे वास्तवाला धरून नसावे. कारण सदाशिवराव स्वतः उपासना चालवीत तेव्हा त्यांच्या उपासनांचे कानडीमध्ये भाषांतर करण्याचे काम उमाबाई करीत असत. प्रत्येक रविवारी लांब बाह्यांचे पोलके घालून, त्यावर त्या काळच्या पद्धतीप्रमाणे शाल घेऊन उमाबाई उपासनेसाठी सर्वांत आधी बाहेर पडत.

" व्यक्ती सच्छील होतात तेव्हाच राष्ट्राला चांगला काळ येतो, आणि व्यक्ती सच्छील होण्यास त्यांना धर्माचे ज्ञान पाहिजे. आपण प्रत्येक गोष्ट परमेश्वरसाक्ष करीत आहोत याची जाणीव पाहिजे. " अशा प्रकारचे सदाशिवरावांचे विचार होते आणि तशीच त्यांची घरात शिकवण होती. घरात पणजोबा–पणजी–आजी इ. मंडळी होती तोवर जुने सणवार, पूजाअर्चा, व्रतवैकल्ये या मुलांच्या पाहण्यात जी काय पुसटपणे असतील ती. सामाजिक सुधारणा, राजकीय घडामोडी, बदल व त्यांवरील भाष्ये इ. मात्र त्यांच्या कानांवर वरचेवर पडत. (घरात जुने धार्मिक रीतिरिवाज पाळायचे असल्याने उमाबाईंना मात्र स्वतःच्याच घरात, स्वयंपाकघरात येण्याची किंवा स्वयंपाकात भाग घेण्याची बंदी होती. मुले घरात आजीजवळ काहीबाही मागत, हट्ट धरीत आणि आजीने ऐकले नाही तर धाक घालीत, " बघ हां, दुर्गीला सांगीन ! ")

आणखी एक म्हणजे ही मुले लहान असताना सदाशिवरावांचा स्वतःचा प्रेस व साप्ताहिके होती व त्यांचे प्रुफरीडिंगचे काम घरातली मुले करीत. त्यामुळे या मुलांचे शुद्धलेखन तर सुधारलेच परंतु दादा-तात्या या मोठ्या भावंडांना तर कोणतेही पुस्तक वाचताना त्यावर प्रुफरीडरप्रमाणे खुणासुधारणा करत जाण्याची गमतीदार खोडच जडून गेली व ती मोठेपणीही टिकली !

गिरणकामाच्या क्षेत्रातही सदाशिवरावांनी विशेष प्रभुत्व संपादन केले. ते वीव्हिंग मास्टर तर झालेच परंतु त्यांनी काही मौलिक संशोधनही केले. कामगारांची दुःखे व अडचणी समजून घेऊन त्यांच्यात जागृती करण्यासाठी त्यांनी ' कामगार ' व ' हितोपदेश आणि कामगार ' अशी साप्ताहिके अनेक वर्षे चालविली. प्रार्थनासमाजाच्या सुबोध

पत्रिकेचे संपादन त्यांनी बराच काळ केले. ‘ ज्ञानदीप ’ हे मासिकही त्यांनी काढले होते आणि पुष्कळ वर्षे चालविले, ‘ विणकर ’ या टोपणनावाने ते लिहीत असत. ज्या काळात त्यांनी गिरणीतले काम सोडले होते, त्याही काळात त्या क्षेत्रातील घडामोडींकडे व कामगारांच्या चळवळींकडे त्यांचे लक्ष होतेच.

पुढे १९०० साली पॅरिस येथे विणकामाचे मोठे प्रदर्शन भरले. विणकामाच्या क्षेत्रात सुधारणा घडवून आणण्याच्या दृष्टीने आपण हे प्रदर्शन बघितले पाहिजे असे सदाशिवरावांना वाटू लागले. द्रव्य अर्थात नव्हतेच, परंतु आपल्या स्नेहीमंडळींकडून त्यांनी आर्थिक मदत मिळविली आणि ते परदेशी रवाना झाले. निघण्यापूर्वी कित्येक महिनेपर्यंत हिंदुस्थानात जेथे हातमाग होते तेथील मागांची आणि विणकरांच्या परिस्थितीविषयीची तपशीलवार माहिती हा विणकर गोळा करीत होता. पॅरिसचे प्रदर्शन पाहून आल्यावर ते पुढे इंग्लंडला गेले. मँचेस्टर येथे एक वर्षभर राहून त्यांनी विणकामाचा विशेष अभ्यास केला. लंडन येथे शेठ दादाभाई यांच्या मदतीने त्यांनी काही उपयुक्त यंत्रसामग्री खरेदी केली. अर्थात तेथेही हा विणकर केवळ विणकामात मन घालून नव्हता. परदेशात असलेल्या हिंदी तरुणांना एकत्र आणून वसतिगृहासारख्या काही योजनेखाली त्यांना तेथे आपल्या संस्कृतीला धरून कसे राहता येईल याविषयी ते मार्गदर्शन करीत. त्यांच्याकडून धर्माचा अभ्यास करून घेत, त्यांना स्वयंपाकाचे धडे देत...

स्वदेशी परतल्यावर सदाशिवरावांनी स्वतः एक नवीन प्रकारचे यंत्र तयार केले. कापडाला खळ लावण्याची जास्त सोपी आणि परिणामकारक पद्धत त्यांनी शोधून काढली. विणकामाच्या अद्ययावत साधनांचा आपण प्रसार करावा, त्यासाठी आपण अशा यंत्रांचा एखादा कारखाना काढावा असे मनोरथ हा विणकर मनाशी बाळगून होता. परंतु त्यांनी पुष्कळ ठिकाणी जरूर तो आर्थिक पाठिंबा मिळविण्याची खटपट करूनही त्यांना त्यात यश आले नाही. परदेशाहून परतल्यानंतर एकीकडे पुन्हा गिरणीतली नोकरी सांभाळीत पाच वर्षे त्यांचा हा उद्योग चालू होता. मुंबई सोडून थेट इंदोर संस्थानात देखील ते त्यासाठी काही वर्षे जाऊन राहिले होते. या खटपटीत असतानाच त्यांना अकाली मृत्यू आला आणि त्यांची स्वप्ने अपूर्ण राहून गेली. त्यांनी तयार केलेली ती यंत्रे पुढे त्यांच्या मृत्यूनंतर पुष्कळ दिवस केळकरांच्या गिरगावातल्या बिऱ्हाडाच्या गॅलरीत धूळ खात पडली होती. शेवटी ती मातीमोल किमतीने विकावी लागली.

ह्या सर्व खटपटी सांभाळीत एकीकडे सदाशिवराव प्रार्थनासमाजाचे कार्य करीतच होते. १९०६ साली प्रार्थनासमाजाचा ३९ वा उत्सव पार पडला; त्यासाठी सदाशिवरावांनी बरेच परिश्रम घेतले. त्यानंतर उसंत न घेता ते लगोलग पंढरपूरच्या एका प्रदर्शनासाठी गेले आणि तेथूनही बरीच दगदगीची फिरती आटपून ते घरी परतले तेच मुळी आपला जुना मधुमेहाचा विकार बळावून घेऊन. त्यानंतर दहाच दिवसांनी, २०



डिसेंबर १९०६ रोजी रात्री मुंबई येथील डॉ. भाजेकरांच्या रुग्णालयात सदाशिवरावांचे निधन झाले. मृत्युसमयी त्यांचे वय केवळ अठ्ठावन वर्षांचे होते.

सदाशिवरावांच्या मृत्यूपूर्वी फक्त दीड महिना आधी त्यांची आणि कवि ना. वा. टिळकांची पहिली आणि अखेरची भेट झाली होती. सदाशिवरावांच्या आकस्मिक मृत्यूची बातमी कळताच टिळकांनी ‘ ख्रिस्ती नागरिका ’त भारावून लिहिले—

“...अजून पुरते दोन महिने झाले नाहीत. एक साधे, दिसण्यात गंभीर गृहस्थ मुद्दाम आमच्या भेटीस येतात. आम्ही त्यांना नावाने ओळखीत आहोत, ते आम्हाला नावाने ओळखीत आहेत, ह्यापलीकडे दोघांचा परिचय नाही. सुमारे दीड तास दोघांची बैठक होते. त्या दीड तासांत दीड वर्ष एकत्र राहण्याने जितका परिचय व्हावा तितका दोघांचा परिचय होतो. एक ख्रिस्ती व दुसरे प्रार्थनासमाजी. खरे खरे ज्यांचा विचार, उच्चार, आचार एक आहे असे प्रार्थनासमाजी; इतके खरे प्रार्थनासमाजी की त्यांच्या तास दीड-तासाच्या समक्षतेनेच, थोडेसे चुकलेले का असत ना पण प्रार्थनासमाजात नुसते तर्कवितर्कवादातच आनंद मानणारे नव्हत तर परमेश्वराच्या ठायी लीनमति झालेले थोडे तरी लोक आहेत अशी आमची खातरी होते व या गृहस्थांचा परिचय झाला हा अलभ्य लाभ झाला असे समजून आम्ही या गृहस्थांना रजा देतो आणि पुढे महिन्यां-दीड महिन्याच्या आतच त्यांच्या निधनाची वार्ता आमच्या कानी पडते...”

‘ प्रार्थनासमाजाचा इतिहास ’ या ग्रंथामध्ये ग्रंथकार श्री. द्वा. गो. वैद्य या ज्येष्ठ प्रार्थनासमाजींनी सदाशिवरावांच्या अकाली मृत्यूबद्दलची हळहळ खालील शब्दांत व्यक्त केली आहे—

“ सदाशिवराव केळकर गेले म्हणजे प्रार्थनासमाजाचे भीष्माचार्य गेले. असले सत्यप्रतिज्ञ, इतके कार्यक्षम आणि दीर्घोद्योगी बंधु समाजाला मिळतीलही पण आज मात्र सदाशिवरावांची जागा शून्य दिसत आहे...”

सदाशिवरावांच्या मृत्यूनंतर उमाबाईही खचल्या. त्यांचे बंधू श्री. रघुनाथ अलूरकर यांचाही सदाशिवरावांच्या पाठोपाठ १९०७ साली आकस्मिक मृत्यू झाला आणि घरातील दोन्ही कर्ते पुरुष पाठोपाठ नाहीसे झाले. आता घरात उमाबाईंची विधवा भावजय सोडल्यास वडीलधाऱ्या अशा त्या एकट्याच होत्या. त्या वेळपर्यंत त्यांच्या सहा मुलांपैकी मोठे दादा तेवढे शिक्षण आटपून नोकरीला लागले होते. बाकी सारी भावंडे शिकत होती. तारा आणि इंदिरा या दोघी बहिणी अजून शाळेतच होत्या आणि रघुनाथमामांची मुले म्हणजे त्यांची मामेभावंडे तर त्यांच्याहूनही लहान होती.

यानंतर दोन वर्षे उमाबाईंचा आजारच चालू राहिला आणि वयाच्या केवळ सेहेचाळीसाव्या वर्षी, १९०८ साली उमाबाईंचे निधन झाले.

असे सांगतात की उमाबाईंना शेवटच्या काही श्वासांत काळजी लागली होती ती आपल्या स्वतःच्या मुलांची नव्हे, तर आपल्या भावाच्या अल्पवयीन लेकरांची! अखेरीस दादा, तात्या या घरातल्या जाणत्या मुलांनी "आम्ही त्यांची जबाबदारी अंगाबाहेर टाकणारा नाही," असे आश्वासन दिले तेव्हा कुठे त्यांचा जीव स्वस्थ झाला.

आपल्या मुलांकरता फार महत्त्वाचा असा सांस्कृतिक वारसा मागे ठेवून केळकर पतिपत्नी परलोकवासी झाली.

खऱ्या कळकळीने, निष्ठेने देशसेवा, समाजसेवा, व धर्मप्रचार करणाऱ्या सदाशिवरावांच्या मृत्यूनंतर प्रार्थनासमाजाचे त्या वेळचे उपाध्यक्ष शेठ दामोदरदास गोवर्धनदास यांनी सदाशिवरावांचे काही स्मारक व्हावे या हेतूने रु. ५०००/– चा निधी प्रार्थनासमाजाच्या हवाली केला. यातूनच 'सदाशिवराव केळकर स्मारक फंड' सुरू झाला. शेठजींच्या इच्छेनुसार या रकमेच्या व्याजातून ध्येयवादी गृहस्थांना लोकोपयोगी कार्य करीत असताना अकाली मृत्यू आल्यास त्यांच्या निराधार होणाऱ्या कुटुंबियांना आर्थिक सहाय्य केले जाऊ लागले; आजही केले जाते.

एकोणिसाव्या शतकात विधवाविवाहासारख्या क्रांतिकारक सुधारणेला पाठिंबा देऊन त्यासाठी लोकापवादाला सामोरे जाणारे, मोठ्या पगाराची स्वास्थ्यपूर्ण नोकरी मिळविण्याऐवजी स्वदेशीच्या चळवळीत भाग घेऊन ध्येयाकरिता गरिबीला सहजतेने जवळ करणारे, कामगारांची दुःखे समजून घेऊन ती तळमळीने लोकांपुढे मांडणारे, मिशनरी वृत्तीचे, स्वतंत्र विचारसरणीचे, निर्भीड आणि करारी स्वभावाचे असे हे आईवडील ताराबाई मोडकांना लाभले होते.

"नुसते ज्ञान झाले व त्याप्रमाणे क्रिया झाली नाही तर त्या शुष्क ज्ञानाचा काय उपयोग? ...दुसरे काहीही करोत, आपण आपल्या कर्तव्यास जागणार... प्रत्येक मनुष्य जर आपल्या मनुष्यपणाची किंमत ओळखेल व दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याचे सोडून स्वतःच्या कर्तव्यास जागेल तरच कोणत्याही सुधारणेचे पाऊल पुढे पडेल. लोकांस भिऊन जे त्यांच्या मर्जीप्रमाणे वागावयास जातात, त्यांस लोक अधिकाधिक दाबात ठेवावयास जातात. न भिणारांचे कोणी काही करू शकत नाही," अशी शिकवण देणारे आणि त्याप्रमाणे प्रत्यक्ष जीवनात वागणारे वडील आणि आईही ताराबाई मोडकांना लाभली होती.

# २. जडणघडण

सुमारे पन्नास–पंचावन्न वर्षांपूर्वी प्रार्थना समाजातल्या तिसऱ्या पिढीतल्या मुलांना आपल्या घरात मोठा गमतीदार विरोध जाणवत असे. माजघरात गेले की आजी त्यांना सीतेच्या, द्रौपदीच्या कहाण्या रंगवून रंगवून सांगे; मनात भक्तिभाव रुजवी; आणि बाहेर बैठकीच्या खोलीत गेले की पंडिता रमाबाई, रमाबाई रानडे, डॉ. आनंदीबाई जोशी, काशीबाई कानिटकर, शिवाय डॉ. रखमाबाई, डॉ. काशीबाई नवरंगे, कोल्हापूरच्या डॉ. कृष्णाबाई केळवकर, इंदूरच्या अहिल्याश्रमाच्या अहिल्याबाई भांडारकर यांची नावे मोठ्या कौतुकाने उच्चारलेली या मुलांच्या कानी पडत. पुरुषमंडळींमध्ये गौरवपूर्वक चर्चिल्या जाणाऱ्या या विदुषींमध्ये 'केळकरांची तारा' हेही एक ताजे नाव निश्चित असे.

या स्त्रियांपैकी पंडिता रमाबाई, श्री. रमाबाई रानडे, डॉ. आनंदीबाई जोशी वगैरेंचे कर्तृत्व व कार्य सर्वश्रुत आहेच. डॉ. काशीबाई उर्फ माँ नवरंगे यांनी अविवाहित राहून, आपला वैद्यकीय व्यवसाय उत्तमरीत्या सांभाळून केलेले समाजकार्य आणि डॉ. रखमाबाई यांची जीवनकहाणी व कार्यही प्रसिद्ध आहे. या सर्व स्त्रियांनी आपापल्या क्षेत्रात ठळक कामगिरी तर केलीच; परंतु महाराष्ट्रातल्या त्यावेळच्या स्त्री–जीवनावर त्या सांस्कृतिकदृष्ट्या आपले ठसे उमटवून गेल्या.

त्या काळात शिक्षित महाराष्ट्र राजकीय, सामाजिक, धार्मिक अशा सर्व प्रकारच्या परिवर्तनातून जात होता. स्त्री–शिक्षण, स्त्री–पुरुष समानता, पुनर्विवाह, प्रौढविवाह इ. समाजसुधारणांची तीव्र जाणीव त्या काळात समाजाचे कमीअधिकपणे नेतृत्व करणाऱ्या लोकांना झालेली होती.

अशा काळात सुधारक, प्रार्थनासमाजी, विशेष प्रगत अशा कुटुंबांमध्ये जन्म घेतलेल्या मुलींपुढे जे आदर्श ठेविले जात होते, जे स्वातंत्र्य आणि शिकवण त्यांना दिली जात होती त्यात निश्चितपणाने बदल झाला होता. स्त्रियांनी शिक्षण, उच्चशिक्षण घेतले पाहिजे, सभा गाजविल्या पाहिजेत, आपल्याला मिळालेल्या स्वातंत्र्याचा, शिक्षणाचा, प्रोत्साहनाचा उपयोग त्यांनी पुढल्या जीवनात लोकहितासाठी, देशहितासाठी करून दाखवावा अशा काही अपेक्षा समाज या मुलींच्या बाबतीत बाळगून होता. समाजकार्याची आवड त्यांच्या मनात प्रत्यक्ष उदाहरणे पाहून रुजत होती. जुने पायंडे, परंपरा जेथे वृत्तीला, प्रज्ञेला, मनाला रुचणार नाहीत तेथे त्यांना समर्थपणाने ठोकरून देण्याचे आव्हान या मुलींच्या मनात पेरले जात होते. घरातली मोठी माणसे तेच करताना त्यांना दिसत होती. काही प्रार्थनासमाजिस्ट कुटुंबांत तर या सर्वांचा दृश्य परिणाम असा झाला

की मुलांच्या शिक्षणापेक्षा भवितव्यापेक्षासुद्धा मुलींच्या शिक्षणाकडे, पदवीप्राप्तीकडे जास्त जागरूकतेने लक्ष दिले गेले.

पण ज्या लोकांनी नवी, प्रार्थनासमाजाची विचारसरणी स्वीकारली होती, पुनर्विवाहा-सारख्या सुधारणांना टेकू दिला होता, स्वतः घडाडीने त्यात उड्या घेतल्या होत्या त्यांच्या मनांत या गोष्टी आपल्या मुलामुलींच्या लग्नाच्या आड येतील अशी काळजीही होती आणि त्या सुरुवातीच्या काळात अशा अडचणी या कर्त्या सुधारकांच्या मार्गात आल्याही.

या सर्वांचा एक परिणाम म्हणजे लग्न करून आपल्या आयुष्याची महत्त्वाची वर्षे पारंपरिक पद्धतीने संसार करण्यात खर्च न करता त्याऐवजी देशसेवा, समाजसेवा करून वेगळ्या तऱ्हेने दर्जेदार व उपयुक्त आयुष्य जगावे अशा एका धीट विचाराला काही प्रार्थनासमाजी घरातून प्रोत्साहन दिले जात होते. केळकर पतिपत्नी दोघेही प्रार्थना-समाजाचे निष्ठावंत अनुयायी असल्यामुळे आणि आपल्या मुलांच्या शिक्षणाच्या, विका-साच्या बाबतीत विशेष जागरूक असल्यामुळे केळकरांच्या सहाही मुलांना साहजिकच हे सर्व विशिष्ट वातावरण व संस्कार लाभले. त्या काळी प्रार्थनासमाजाची सभासदमंडळी विशेष सुविद्य, स्वतंत्र विचारसरणीची, क्रियाशील होती. सर्वसामान्यांपेक्षा या मंडळींचे विचार व आचार बहुतेक बाबतींत पुढारलेले होते. त्यामुळे ताराबाईंच्या आईवडिलांचे विचार व वागणूक तर प्रगत होतीच परंतु तशाच सुविद्य, नामवंत मंडळींचे येणे–जाणेही त्यांच्या घरी असे. त्यातून सदाशिवराव धर्मप्रचारक व सुबोधपत्रिकेचे संपादक असल्या-मुळे इतरांपेक्षा त्यांच्या घरी हा राबता काकणभर अधिकच असावा. त्यामुळे प्रार्थना-समाजाच्या अनेक पुढाऱ्यांचा सहवास केळकर भावंडांना लहानपणीच लाभला. डा. गो. वैद्य, श्री. रा. भांडारकर बा. अ. सुखटणकर, कर्मवीर शिंदे, डॉ. काशीबाई नवरंगे वगैरेंशी या मुलांचा वारंवार संबंध येई. उपासना, व्याख्याने आणि प्रत्यक्ष संभाषण यातच या विचारवंत व ध्येयवादी मंडळींचे विचार ही लहान मंडळी आपोआप आत्मसात करीत. पंडिता रमाबाई, डॉ. रखमाबाई यांसारख्या ध्येयवादी आणि कार्यरत विदुषी तर उमाबाईंच्या मैत्रिणीच होत्या.

साहजिकच केळकर भावंडांवर लहानपणी जे संस्कार झाले त्यांत या सर्व मंडळींचा वाटा मोलाचा असला पाहिजे.

योगायोग असा की सदाशिवरावांचे बहुतेक आयुष्य मुंबई–पुणे परिसरात गेले असले आणि ताराचा जन्मही मुंबईचा असला तरी ताराचे बालपण मात्र मध्यप्रदेशातील इंदूर संस्थानात गेले; तिचे चौथीपर्यंतचे शिक्षण त्यामुळे इंदूर येथील कॅम्पमधल्या मिशनच्या शाळेत, हिंदी माध्यमातून झाले.

सदाशिवराव त्यावेळी आपल्या यंत्राचा प्रसार करण्याच्या, त्याकरता कारखाना काढण्या-साठी आर्थिक पाठिंबा मिळविण्याच्या खटपटीत होते. इंदूर येथील पोलिटिकल एजंटच्या मध्यस्थीने संस्थानातून अशा प्रकारचे काही सहाय्य मिळविता येईल अशा उमेदीने ते इंदूरला येऊन राहिले होते. समस्त कुटुंबही त्यांच्याबरोबर होतेच. १८९५ साली सदाशिव-राव परदेशाहून परतले. आणि त्यानंतर काही महिन्यांतच मंडळी इंदूरला आली.*

इंदूर येथे ताराचे शिक्षणाचे माध्यम हिंदी होते तरी मराठी लेखन–वाचनाची उणीव घरी शिकवणी देऊन भरून काढण्यात येत होती. ताराला मराठी व्याकरण शिकवायचे काम तिचा मोठा भाऊ माधव याच्याकडे होते. शाळा सकाळी भरत असे, दुपारच्या वेळी आईच्या फावल्या वेळात तिला मराठी वर्तमानपत्रे, पुस्तके इ. वाचून दाखविणे हे ताराबाईंचे काम.

इंदिरा तारापेक्षा अडीच वर्षांनी लहान. ती त्या वेळी नुकतीच बोलायला लागली होती. आणि तिचे उच्चार बोबडे होते. आपल्या धाकट्या बहिणीच्या बोबडेपणाचे विवेचन करताना ही ' प्रतिपाणिनी ' एक दिवस म्हणाली,

" आमची इंदिरा का बोबडी आहे, ठाऊक आहे का ? ती मुळी ' क ' वर्ग आणि ' ट ' वर्गाच्या ऐवजी ' त ' वर्गाचा वापर करते ! "

उमाबाई माजघरात पडल्या पडल्या ओटीवर चाललेले लेकीचे भाष्य ऐकीत होत्या. त्यांनी मनातल्या मनात तिला ' अ ' वर्ग देऊन टाकला !

लहान वयात ताराला काही दिवस फिट्स येत असत. हिस्टेरियासारखा हा विकार असावा. तरुण वयापर्यंत हा त्रास टिकला. पुढे मात्र पुन्हा कधी त्याने आपले डोके वर काढले नाही.

मात्र लौकरच सदाशिवरावांना इंदूर येथील आपले वास्तव्य आवरते घेणे भाग पडले. संस्थानातील राजकीय हवामान पालटले होते. त्यांच्या प्रयोगांना आर्थिक साहाय्य मिळ-ण्याची आशाही त्यामुळे मावळली होती. त्यानंतर आता तेथे राहण्यात अर्थही नव्हता.

१९०२ साली, म्हणजे तारा दहा वर्षांची असताना केळकर मंडळी इंदूरचे बिऱ्हाड मोडून मुंबईला परतली. सदाशिवरावांनी पुन्हा तेथल्या एका गिरणीत नोकरी मिळवली.

इंदूरच्या वास्तव्यातच, उन्हाळ्यात एके दिवशी छोट्या ताराला उकाड्याने हैराण केले. तिच्या मनात आले; आपणही आपल्या भावासारखे केस कापून टाकावे. झाले; मनात आले तशी तारा बाहेर पडली आणि कोपऱ्यावर जाऊन पत्र टाकून यावे तशी आपण आपली जाऊन केस कापूनसुद्धा आली. " हे काय विपरीत बाई ! " मोठ्या माणसांनी जाब विचारला.

* इंदूरलाही प्रार्थनासमाज स्थापन झाला होता व इंदूरच्या वास्तव्यात सदाशिवराव या शाखेच्या प्रमुख कार्यकर्त्यांपैकी एक समजले जात. इंदूरच्या वास्तव्यातच उमाबाईंच्या आईंना प्लेगने मृत्यू आला.

" मग ! केस कापायचा हक्क काय फक्त पुरुषांचाच आहे ? मुलींनी का कापू नयेत केस ? "

मोकळ्या, पोषक वातावरणात वाढणाऱ्या एका तेजस्वी व्यक्तिमत्त्वाचा तो पहिला धीट ' उं: 'कार होता !

केळकरमंडळी पुन्हा मुंबईला स्थायिक झाली. आपल्या दोन्ही मुलींना मात्र आता त्यांनी पुणे येथे हुजुरपागा या सुप्रसिद्ध कन्याशाळेत शिकायला ठेवायचे योजिले होते. याच संस्थेत त्यांनी यापूर्वी लिंबाबाई कानडे या आपल्या मानसकन्येलाही घातले होते, आणि त्यांचा त्या वेळचा या शाळेविषयीचा अनुभव फार चांगला होता. प्रत्यक्षात मात्र ताराला थोडे आधी एकटीलाच हुजुरपागेत दाखल केले असावे व इंदिराची नंतर काही दिवसांनी पाठवणी केली असावी.

इंदूरच्या त्यांच्या ओळखीच्या एका ज्यू कुटुंबातल्या दोन बहिणीही त्यावेळी हुजुरपागेत राहत होत्या. त्या मुली ताराहून वयाने मोठ्या होत्या. तारा प्रथमच घर सोडून एकटी राहणार होती. या ज्यू मुलींपैकी मोठीवर – एझिकेल पेनीनावर – ताराला सांभाळण्याचे काम उमाबाईंनी सोपविले होते. हुजुरपागेत असताना तारा या ज्यू मुलींबरोबर ख्रिश्चन मुलींसाठी असलेल्या स्वतंत्र वसतिगृहात राहत असे, व जेवण तेवढे ती हिंदू बोर्डिंगातले घेई.

याच शाळेत आल्यानंतर श्रीमती रमाबाई रानड्यांची व ताराची पहिली भेट झाली. रमाबाईंनी ताराच्या आईचे लग्नात कन्यादान केले होते ! तारा कोणाची मुलगी हे कळल्यावर तिला कौतुकाने जवळ घेऊन रमाबाई म्हणाल्या,

" काय ग, मी कोण आहे ठाऊक आहे का ऽ ऽ ऽ ? अग, मी तुझी आजी आहे, आजी ! "

हुजुरपागेत त्यावेळी शंभरसव्वाशे मुलींपैकी आठदहा जणी प्रार्थनासमाजी कुटुंबांतल्या आणि सुधारकांच्या असत. या मुलींना तेथे निश्चितपणाने निराळी वागणूक दिली जात असे. हिंदू बोर्डिंगात या मुलींची पंगत वेगळी असे. पदार्थ वाढण्याचे काम त्यांना दिले जात नसे. एवढेच नव्हे तर प्यायचे पाणीही त्यांना हाताने घेता येत नसे. ब्राह्मण मुलींकडून ते मागून घ्यावे लागे.

इतर मुली आवारातल्या फुलांचे हार गुंफून ते मनोभावे दत्ताच्या तसबिरीला चढवीत तेव्हा मुठीतल्या फुलांचा मनसोक्त वास हुंगीत तारा ते कुतूहलाने पाही, तर तारा केळकरसाठी फराळाचा डबा घेऊन येणारे तिचे मामा हे अळूरकर या देशस्थ आडनावाचे कसे, याचा त्या मुलींना अचंबा वाटे आणि त्यांच्यात कुजबूज सुरू होई. तारा ' पुनर्विवाहितेची कन्या ' आहे हे शाळेतल्या मोठ्या मुलींनी नव्या मुलींना सांगितले म्हणजे तर त्यांतल्या निम्म्या ताराकडे दचकून, चमत्कारिक नजरेने पाहू लागत !

मोकळ्या स्वभावाच्या ताराला त्याचे विशेष काही वाटत नसे. ती आपली पारावर



बसून ' पांडवप्रताप ' वाचणाऱ्या आणखी एखाद्या मैत्रिणीकडे जाई आणि तिच्या गळ्यात हात घालून तिच्याइतकीच वाचनात रंगून जाई.

त्याकाळी सबंध हिंदू समाजापुढे धार्मिक आणि सामाजिक सुधारणा हव्यात की नकोत, त्या कोणत्या स्वरूपात असाव्यात आणि कोणत्या मार्गाने केल्या जाव्यात हे प्रश्न महत्त्वाचे होते. सभांमधून, वर्तमानपत्रांमधून या मुद्यांवर चर्चा झडत. हुजुरपागेच्या छोट्या जगातल्या या अर्ध्यामुर्ध्या विदुषींमध्येही या मुद्यांवर तावातावाने मतप्रदर्शन होई. ताराच्या घरी तर या बाबतीत सक्रिय मतप्रदर्शन केले जात होते. दहाबारा वर्षांची तारादेखील जातिभेद, शिवाशिव, सोवळेओवळे, विधवाविवाह अशा विषयांवर खणखणीत आवाजात भाष्य करी. स्वतःला ' सुधारक ' म्हणवून घेण्यात तिला मोठा अभिमान वाटे. ती सरळ म्हणे, " आम्ही ब्राह्मोसमाजी आहोत. जातपात वगैरे जुने रिवाज आम्ही पाळत नाही... "

परंतु त्याच ठिकाणी ताराची प्रचलित हिंदू धर्मातल्या विचारसंस्कारांशी, धार्मिक रीतिरिवाजांशी, कल्पनांशी खरी ओळख झाली. आतापर्यंतच्या तिच्या मुंबईच्या आणि इंदूरच्या वास्तव्यात ती जुन्या वळणाच्या माणसांना फारशी भेटलीसुद्धा नव्हती. आता हुजुरपागेतल्या मैत्रिणींच्या सहवासात तिने हरिविजय, रामकथासार वगैरे पोथ्या व इतर संतचरित्रे वाचून काढली. त्यांच्या बोर्डिंगमध्ये एक वयाने मोठी मुसलमान विद्यार्थिनी होती. मुसलमान असूनही तिला हिंदू धर्माचे विलक्षण आकर्षण होते. ती अशी सगळी पोथ्या–पुराणे जमवीत असे. तारालाही तिच्या या संग्रहाचा फायदा मिळे. या ठिकाणी ताराच्या मनात हिंदू तीर्थस्थानांबद्दल आदरभाव नव्याने रुजला. उपास करणे, व्रतवैकल्ये, देवाला जाणे, सणवार इत्यादी गोष्टींची माहिती होऊन त्यात मनाला कुठेतरी गोडी वाटू लागली.

दर रविवारी घरी खुशालीचे पत्र टाकावयाचे असे. ताराचे आपल्या बाबांशी मोठे हितगूज असे. इकडल्या हकीकती पत्रातून त्यांना कळविताना धिटुकली तारा बाबांशी या विषयांवर चर्चा करी, " संतांनी नामस्मरणाचा महिमा खूप गायिला आहे; तर आपणही नामस्मरण करण्यास काय हरकत आहे ? तेही परमेश्वराचेच स्मरण होत नाही का ? " अशासारख्या शंका ताराच्या पत्रांत असत आणि बाबाही तिच्या प्रश्नांना आवर्जून, खुलासेवार उत्तरे लिहीत.

गावातले पालक या नात्याने डॉ. रामकृष्णपंत भांडारकर या मुलींची देखभाल करीत. भांडारकरांचे घर, पसारा मोठा. शनिवार–रविवारी तारा आणि इंदिरा त्यांच्याकडे राहायला जात. त्यांच्या लेकी–सुनांत मिसळत, नातवंडांना खेळवीत. प्लेगच्या दिवसांत दोन तीन महिने शाळा बंद असत. अशा वेळीही या बहिणी भांडारकरांच्या घरीच राहत. पुण्याच्या ' संगमाश्रम ' या भांडारकरांच्या निवासस्थानात त्यांच्या सर्व मुलामुलींनी वेग-

वेगळ्या खोल्या व मध्यभागी सर्व कुटुंबियांना एकत्र येण्याकरता एक स्वतंत्र हॉल अशी रचना होती. रोजचा चहा, जेवणे तेथे होत. शिवाय रोजची उपासना असेच. लहानथोर, स्त्रीपुरुष सारे त्यावेळी एकत्र येत. हरिबन वारकरीही तेथे येऊन प्रवचने करीत व घरातली सर्व माणसे त्यांच्या पाया पडत. भांडारकरांच्या घरात रोजच्या प्रार्थनेला फार महत्त्व असे. प्रार्थना करायची ती दुःखातून, संकटातून सुटण्यासाठी नव्हे; त्यासाठी आपले मानवी प्रयत्न चालूच ठेवायचे. ते आघात सोसायचे, त्यांतून पार पाडण्याचे आत्मिक बळ वाढावे, त्या कसोटीच्या क्षणी परमेश्वराचे सान्निध्य लाभावे, म्हणून प्रार्थना. भांडारकरांकडे रोज सकाळी स्नानानंतर भजनाचा कार्यक्रम असे. याशिवाय चहा–फराळ, जेवणाच्या वेळीही या मुलींना रामकृष्णपंतांचा सहवास लाभे. त्यांच्या ग्रंथालयातील मुलांकरता योग्य अशा पुस्तकांचा दुपारी आस्वाद घेता येई. रामकृष्णपंतांच्या थोर व्यक्तिमत्त्वाची छाप या काळात ताराच्या मनावर ठसली, ती कायमची.

हुजुरपागेत त्यावेळी ताराप्रमाणे योग्य वयात योग्य इयत्तेचे शिक्षण घेणाऱ्या मुली फार थोड्या. परित्यक्त्यांचा, विधवांचा भरणा मोठा. त्यामुळे ताराच्या वर्गात नेहमी तिच्यापेक्षा मोठ्या वयाच्या विद्यार्थिनी असत. बोर्डिंगमध्ये राहत असल्यामुळे तेथेही मोठ्या मुलींशी मैत्री होई. मधल्या सुट्टीत व इतर वेळी मात्र सवड सापडताच तारा खालच्या वर्गातल्या जास्त बरोबरीच्या मैत्रिणींकडे धाव घेई. त्यामुळे लहान–मोठ्या मैत्रिणींच्या तांड्यात तारा दिसत असे. अभ्यासापेक्षा खेळाकडे ओढा जास्त! गणित हा मात्र तिचा खरा आवडीचा विषय होता. तिच्या वडलांचाही आवडता विषय तोच होता. सुट्टीच्या दिवशी निरनिराळ्या प्रकारची गणिते सोडवून पाहण्याचा ताराचा छंद.

एकदा हुजुरपागेतल्या वाचनालयाच्या संचालिकाबाईंची ताराने मजाच केली. सुटीच्या दिवशी अवांतर वाचनासाठी या मुली तेथून पुस्तके आणीत असत. त्या दिवशी बाई नव्या पुस्तकांच्या नोंदी करण्यात गर्क असताना टेबलापलीकडून आवाज आला,

" बाई, ' लीलावती ' आहे ? "

बाईंनी चमकून वर पाहिले. भवनवृंदात नव्याने घेतलेली ही केळकर आडनावाची लहानशी मुलगी.

" लीलावती ? कुणाचे ग ? "

लीलावती हे एखाद्या कादंबरीचे नाव तर ही मुलगी समजली नाही ?

" भास्कराचार्यांचे लीलावती आहे ना, ते पाहिजे आहे. "

" भास्कराचार्यांचे ? "

बाईंना नवल वाटले, ज्या वयात लहान मुलेमुली गोष्टींच्या पुस्तकांची, कादंबऱ्यांची मागणी करतात त्या वयात ही ' लीलावती ' मागते आहे! आपल्याकडे ' लीलावती ' नाही म्हणून बाईंना कबूल करावे लागले.



पुण्याच्या या शाळेत केळकरभगिनींची ही दुक्कल चांगली रमली होती. परंतु चार वर्षांपेक्षा जास्त काळ त्यांना त्या शाळेत राहता आले नाही. १९०६ च्या सुमारास तारा खूप आजारी पडली. ( बहुधा तिचा जुना फिट्‌सचा विकारच बळावला असावा. ) तिकडे सदाशिवरावांची प्रकृती ढासळत चालली होती. तेव्हा दोघी बहिणी मुंबईला परतल्या. या आजारामुळे ताराच्या शिक्षणात खंड पडला. एक वर्षभर ती घरीच होती. याच वर्षी डिसेंबर महिन्यात सदाशिवरावांचा अकाली देहान्त झाला. वडिलांचा सहवास ताराला फार मोजका आणि तोही तुकड्यातुकड्याने मिळाला होता. वडील गेले त्यावेळी ती फक्त चौदा वर्षांची होती आणि पुढे आई वारली तेव्हा तिला सोळावे वर्ष चालू होते!

पुढे, १९७२ साली, आपल्या ८० व्या वाढदिवसाच्या दिवशी केलेल्या भाषणात ताराबाईंनी आपल्या आईवडिलांचा मोठा आदरपूर्वक उल्लेख करून म्हटले,

" ...आईवडिलांच्या विचारांचा संपूर्ण पगडा माझ्या मनावर लहानपणापासून होता. डॉ. काशीबाई नवरंगे यांचा आदर्श आमच्यापुढे असे. ' त्यांच्यासारखी शीक आणि समाजसेवा कर ' असे उद्‌गार न कळत्या वयात कानी पडत व न समजता डोक्यात उतरत. त्यामुळे शाळा–कॉलेजात शिक्षणाच्या वेळीही अनेक जबाबदाऱ्या व्याख्याशा वाटत... "*

नवरंगे कुटुंबाशी केळकरांचा स्नेह, घरोबा सदाशिवरावांच्या वेळेपासून होता. बाहेरगावी वास्तव्य असताना जेव्हा जेव्हा सदाशिवराव मुंबईस येत तेव्हा तेव्हा ते नवरंग्यांकडेच उतरत. पुढल्या पिढीतही हा घरोबा वाढतच गेला. वासुदेवराव नवरंग्यांच्या तिसऱ्या कन्येचे श्री. जनार्दनपंत गद्रे यांच्याशी लग्न झाले, तर गद्र्यांच्या धाकट्या भावाने पुढे केळकरांच्या इंदिरेशी लग्न केले. अशा प्रकारे मग नवरंगे–गद्रे–केळकर ही कुटुंबे नात्यानेही जोडली गेली.

वडिलांच्या मृत्यूनंतर मुलींना मुंबईत आपल्याजवळ ठेवायचे उमाबाईंनी ठरवले आणि त्याप्रमाणे पुढल्या वर्षी त्यांनी त्या दोघींसाठी मुंबईतल्या शाळा शोधल्या. मात्र इथे त्यांनी दोन्ही मुलींना वेगवेगळ्या शाळांत घातले. ताराला त्यांनी ज्या शाळेत घातले त्या शाळेचे नाव होते, अलेक्झांड्रा गर्ल्स हायस्कूल. इंदिरेसाठी निवडली गिरगावातली कमलाबाईंची शाळा. उमाबाईंच्या या कृतीमागे त्यांचा काय विचार होता याविषयी तर्क करता येतो. ताराची हुशारी व तडफ पाहून तिला त्यांनी जास्त चांगल्या, जास्त खर्चाच्या शाळेत घातले असावे. तेथे ताराला जास्त पोषक वातावरण मिळेल, ती जास्त चमकेल व धाकटी इंदिराही ' ताईवेगळी ' केल्यामुळे अधिक स्वतंत्र, धीट होईल असा उमाबाईंचा विचार असला पाहिजे.

आईने आपल्यासाठी निवडलेल्या शाळांबद्दल दोन्ही बहिणींच्या प्रतिक्रिया मजेशीर

* ' माझ्या जीवनाची जडणघडण ' ( १९७२ )

झाल्या. जाताना दोघीही नाखूषच होत्या. इंदिरेचे तोंड तर उतरलेच होते. येताना मात्र ती हसतमुखाने परतली. आपली नवी शाळा तिला आवडली होती. तारा मात्र नाराज मनानेच परतली. उमाबाईंना तिची समजूत काढावी लागली.

ताराला इंदिरेप्रमाणे हिंदू मुलींच्याच शाळेत जावेसे वाटत होते. हुजुरपागेतल्या देशी, ब्राह्मणी, हिंदू वातावरणाला ती रुळलेली, तर अलेक्झांड्रा हायस्कूलमध्ये पाश्चात्य रीति-रिवाज पाळावे लागत. दिवसभर बूटमोज्यांनी मढवलेले पाय घेऊन वावरणे हेसुद्धा तिला प्रारंभी मोठे संकट वाटे! शिवाय या शाळेत खालच्या वर्गात शिक्षणाचे माध्यम गुजराती तर मोठ्या वर्गातील माध्यम इंग्रजी असे. संस्कृतऐवजी दुसरी भाषा म्हणून फ्रेंच घ्यावी लागे. गुजराती, पारशी मुली; तसेच अध्यापकही. एकूण वातावरणच आंतर-भारतीय होते. ताराचे नाव कुणाच्या जिभेला वळ जाण्यासारखे नव्हते. परंतु अहिल्या भांडारकर त्याच शाळेत शिकत असे; तिला तर ॲंग्लोइंडियन, पारशी पोरी ‘एलिया’ ‘अलिया’ असे काय वाटेल ते संबोधीत!

परंतु तारा लौकरच ह्या नव्या वातावरणाला रुळली. आपल्या बिट्टकलेपणामुळे आणि खेळकर स्वभावामुळे ती या शाळेतसुद्धा लोकप्रिय झाली. तिला तिथे अहिल्या भांडारकर, सीताबाई दळवी (पुढे मडगावकर), सुमती कोठारे, कामाक्षी नटराजन इ. मैत्रिणी मिळाल्या. याच शाळेतून १९०९ मध्ये तारा उत्तम रीतीने मॅट्रिकची परीक्षा पास झाली. तिची मैत्रीण अहिल्या ही तर युनिव्हर्सिटीतील सर्व मुलींत पहिली आली, तिने चॅटफील्ड पारितोषिक मिळविले!

मॅट्रिकची परीक्षा पास झाल्यानंतर ताराने पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्ये नाव घालावे अशी तिच्या आप्तांची इच्छा होती. परंतु ताराने एलफिन्स्टन कॉलेजची निवड केली. तिची मैत्रीण अहिल्याही याच कॉलेजात जाणार होती. (अहिल्या भांडारकर म्हणजे डॉ. सर रामकृष्णपंत भांडारकरांची नात. तिचे वडील श्री. रा. भांडारकर याच कॉलेजमध्ये संस्कृतचे प्राध्यापक होते.) सीताबाईंखेरीज ताराच्या इतर मैत्रिणीही याच कॉलेजकडे वळल्या. तारा प्रा. श्री. रा. भांडारकरांच्या बरोबर त्यांच्या घरच्या घोडागाडी-तून त्यांची मुलगी अहिल्या आणि मुलगा अच्युत यांच्या कॉलेजात जाऊ लागली. तिचे प्रीव्हियसचे वर्ष तिथेच पार पडले.

तारा आपल्या विद्यार्थी-जीवनातले हे महत्त्वाचे टप्पे पार करीत असताना तिच्या घरगुती जीवनात बऱ्याच घडामोडी चालू होत्या.

सदाशिवराव मृत्यूपूर्वी परळ येथील एका गिरणीत काम करीत होते. त्यामुळे तेथील एका बंगल्यात राहत असत. सदाशिवराव गेल्यानंतर साहजिकच त्यांच्या कुटुंबाला तो बंगला सोडावा लागला. तेथून ही मंडळी मग प्रार्थनासमाजाच्या रामकृष्ण आश्रमात राहायला आली. तेथे काही महिने राहिल्यानंतर त्यांनी गिरगावात जावजी बिल्डिंगमध्ये



माळ्याची जागा मिळविली. या इमारतीमध्ये प्रार्थनासमाजाचे आणखी एक निष्ठावंत कार्यकर्ते श्री. द्वा. गो. वैद्य त्याचप्रमाणे श्री. भास्करराव पंडित, श्रीमती लिंबाबाई केसकर ही मंडळीसुद्धा राहत होती.

उमाबाईंची प्रकृती मात्र दिवसेंदिवस खालावत चालली होती. शेवटी मुंबईला राहून गुण येईना तेव्हा त्या प्रकृतीवर इलाज करण्यासाठी इंदूरला डॉ. प्रभाकरपंत भांडार-करांकडे गेल्या. मुलांना मात्र शिक्षणासाठी मुंबईतच ठेवणे भाग होते. यावेळी उमाबाईंनी आपल्या दोन्ही मुलींना आपले कुटुंबस्नेही श्री. जनार्दनपंत गद्रे यांच्या घरी ठेवले. या गद्रे कुटुंबात राहत असताना ताराचे मॅट्रिकचे वर्ष आणि प्रीव्हियसचे वर्ष पार पडले. केळकर पतिपत्नी दोघेही प्रागतिक पक्षाची होती आणि ती कॉंग्रेसच्या अधिवेशनाला जात असत. १९०७ सालच्या सुरतेच्या कॉंग्रेसला सदाशिवरावांच्या निधनामुळे उमाबाई स्वतः हजर राहू शकल्या नाहीत. परंतु आपल्याऐवजी त्यांनी ताराला तेथे पाठविले. आपल्या मुलामुलींना वाढवताना, संधी देताना, मुलगा-मुलगी हा फरक करायचा नाही, असा ताराच्या पालकांचा कटाक्ष होता. त्या काळात या पतिपत्नींनी आपल्या कोणत्याच मुलाचे किंवा मुलीचे कान टोचले नाहीत.

गद्र्यांच्या घरी गद्र्यांचा भाऊ बळवंतराव, त्यांचा भाचा बाबूराव श्रीखंडे आणि तारा आणि इंदिरा अशी तरुण विद्यार्थीचौकडी एकत्र वाढत होती. प्रार्थनासमाजात किंवा इतर कुठे प्रार्थनासमाजाच्या नवरंगे, वैद्य इ. सभासदांकडेच मदतीला तत्पर असा-यची. घरातही दळण दळणे, पाणी भरणे, लहान मुलांना सांभाळणे इ. कामात ती उत्साहाने सहभागी होत.

गद्र्यांच्या घरी तारा राहत असताना गद्र्यांची मुलगी विमल हिला आकड्या येत असत. ताराने रात्र-रात्र जागून तिला कडेखांद्यावर टाकून हिंडवावे, जोजवावे. तारा चाळीत असावे आणि विमलने हट्ट धरावा, ‘हिनेच मला झोपवायचे. ही माझी शिक्षयाशी ताई!—’ म्हणजे हक्काची ताई.

पुढे केळकरभावंडे बदामवाडीत स्वतंत्र बिऱ्हाड करून राहू लागली तरी तारा जेव्हा जेव्हा गद्र्यांकडे भेटायला जाई तेव्हा तेव्हा हा गोड हक्क बजावला जाई!

उमाबाईंच्या निधनानंतर केळकर कुटुंबाने जावजी बिल्डिंगमधली जागाही सोडली. गिरगावातच केनेडी ब्रिजसमोर असलेल्या बदामवाडीतल्या मारवाड्याच्या चाळीत तिसऱ्या मजल्यावरच्या दोन खोल्या घेऊन ती राहू लागली.

ह्या वेळपर्यंत ताराचे सर्वांत मोठे भाऊ दादा (आत्माराम) हे शिक्षकाचा पेशा पत्करून इंदूरला स्थायिक झाले होते. दुसऱ्या क्रमांकाचे बंधू तात्या (पांडुरंग) वडिलां-प्रमाणेच टेक्स्टाइल्समध्ये शिरले. तेही पुढे वीव्हिंग मास्टर झाले. सदाशिवरावांचे बंधू वामनरावही टेक्स्टाइल्समध्ये होते व त्यांनीच तात्यांना मार्गदर्शन केले व मदत

केली. तात्यांची सांपत्तिक स्थिती चांगली होती. आपला अर्धा पगार स्वतःकडे ठेवून अर्धा पगार ते नियमितपणाने मुंबईला आपल्या भावंडांकडे पाठवून देत. वडिलांच्या मृत्यूनंतर तात्यांनीच मुख्यतः आपल्या भावंडांच्या शिक्षणाची जबाबदारी स्वीकारली. त्यांनी सढळ हाताने आणि सातत्याने मदत केल्यामुळेच त्यांची बाकीची भावंडे मुंबईला सुखानें शिकत राहिली होती. त्याशिवाय सदाशिवरावांच्या स्मरणार्थ जो स्मारक फंड निघाला त्याचा लाभ खुद्द त्यांच्या कुटुंबाने– उमाबाईंनीच काही थोडे महिने घेतला. नोकरीच्या निमित्ताने अकोला, गुलबर्गा, इंदूर असे ठिकठिकाणी तात्यांचे वास्तव्य झाले. सुटीच्या दिवसात तारा–इंदिरा तात्यांकडे जात.

उमाबाईंच्या मृत्यूनंतर केळकरांच्या मुख्य घरातली मंडळी अशी ठिकठिकाणी पांगली त्यावेळी ताराची दोन तीन मामेभावंडे ( अळूरकर ) वयाने लहान होती. ही अळूरकर भावंडेसुद्धा केळकर भावंडांप्रमाणेच संख्येने सहा. सुमती, इंदिरा, सीताराम, त्र्यंबक, शांता आणि सर्वांत धाकटी दोन-अडीच वर्षांची गंगू! अळूरकरांची ही मुले मग घरातल्या कर्त्या झालेल्या भावंडांनी वाटून घेतली. मामी अळूरकर धाकट्या गंगूसह आपल्या विवाहित लेकीकडे गेल्या. त्र्यंबकला तात्यांनी आपल्याकडे नेले आणि शांता नावाची एक छोटी मामेबहीण बदामवाडीतल्या घरात ताराकडे राहायला आली.

येथे राहायला आल्यानंतर या मुलांनी आपल्या बिऱ्हाडाच्या पुढल्या खोलीत आपल्या आईवडलांचे मोठाले फोटो शेजारी शेजारी असे लावले. सर्वच जण विद्यार्थी-दशेत, तेव्हा ' सखुबाईच्या खानावळी 'चा डबा लावून जेवणाखाणाचा प्रश्न सोडविला आणि शाळा-कॉलेजात दाखल झाले. माधवराव मेडिकल कॉलेजात दाखल झाले. तारा विल्सन कॉलेजात जाऊ लागली. १९१३ साली इंदिरा मॅट्रिक झाली आणि मग तीही विल्सन कॉलेजात जाऊ लागली. शेजारीच गांधर्व महाविद्यालयाची पाटी होती. ताराचा आवाज चांगला होता, ती तेथे गाणे शिकायला जाऊ लागली.

बदामवाडीतल्या घरात आल्यावर हळूहळू ताराला सर्व मोठी माणसे ' ताराबाई ' म्हणू लागली आणि लहान मुले ' ताई ' म्हणू लागली. तारा आणि इंदिरा या दोघीही बहिणी विशेषतः पाठमोऱ्या बऱ्याच सारख्या. रंगाने गोरटेल्या. तारा जरा उंच आणि आडव्या बांध्याची होती. ती विशेष बुद्धिमान, उत्साही, चुणचुणीत आणि खिलाडू-वृत्तीची होती. त्यामुळे ताराबाईंचे पालक-भाऊ तिच्याविषयी विशेष अपेक्षा ठेवून होते.

ताराबाईंची वृत्ती प्रथमपासूनच काहीशी स्वतंत्र, बंडखोर, पटेल तेच बेधडकपणे करण्याची होती. आणि स्नेह्यांना ते जाणवे. याउलट इंदिराताईंचे व्यक्तिमत्त्व सौम्य, शांत, संथ असे होते. इंदिरा मोजके आणि मऊ बोलणारी. तिला गमतीने ' बर्फ ' ही उपमा मिळे. ताराला ' मोठी ' आणि इंदिरेला ' धाकटी ' म्हणत असत. एरवी, खेळकर, विनोदी आणि सूर्यासारख्या तेजस्वी असलेल्या ताराबाई क्वचित भडकायच्या त्या इतक्या



की माध्यान्हीच्या सूर्याची आठवण यावी! तर इंदिराताई कुणी तापवायचे ठरवले तरी आपली शीतल वृत्ती सोडणार नाहीत. त्यामुळे ' सूर्य ' आणि ' चंद्र ' अशी दोन गमतीची टोपणनावेही या दोघींना देण्यात आली होती! दोघींमधले हे सर्व फरक आयुष्यभर कायम राहिले. दोन्ही बहिणी निरनिराळ्या कारणांनी स्नेहीमंडळींना आवडत. मात्र तारा भावांची विशेष लाडकी होती! रूपाच्या बाबतीत उजव्या होत्या इंदिराताई.

बदामवाडीत नव्याने आकाराला आलेले केळकरभावंडांचे हे बिऱ्हाड म्हणजे एक वसतिगृहच होते! सगळीच तरुण, विद्यार्थीदशेतली. येणारी मंडळीही तशीच असत. वैद्य, गोवंडे, सहस्रबुद्धे अशी काही हुशार आणि चांगल्या घरातली मित्रमंडळी नेहमी या मुलांकडे येत-जात. केळकर राहत असत त्याच चाळीत, त्याच मजल्यावर, पुढे महात्माजींबरोबर कार्य करून प्रसिद्ध झालेले स्वामी आनंदही राहत असत. नळावर पाणी भरताना त्यांची या मुलांशी गाठ पडे. स्वामी आनंद* एकटेच राहत होते आणि सार्वजनिक कार्यात भाग घेत होते. त्यांच्याकडे वीर वामनराव जोशी, गंगाधरपंत देशपांडे वगैरे पाहुणेमंडळी आली की केळकरबहिणी बहिणीच्या आपलेपणाने स्वामी आनंदांकडे जाऊन चहा, चिवडा करून देत. आणि पाहुण्यांचे आदरातिथ्य सांभाळत.

मारवाड्याच्या चाळीपासून जवळच सोमणांची चाळ म्हणून इमारत होती. तेथे श्री. गो. म. चिपळूणकर नावाचे एल्फिन्स्टन हायस्कूलमधले एक शिक्षक राहत. तेही प्रार्थना समाजाचे सदस्य झाले होते. आपल्या नूतनपरिणीत पत्नीला ( सौ. अक्का ) घेऊन ते रविवारच्या उपासनेला प्रार्थनासमाजात येत. याच ठिकाणी त्यांची माधवराव, तारा आणि इंदिरा या तीन केळकरभावंडांशी ओळख झाली. ताराबाईंचे तिसऱ्या क्रमांकाचे भाऊ केशवराव मात्र आपल्या तऱ्हेवाईक वागण्यामुळे इतर कुटुंबियांपासून वेगळे पडले होते. ते सलगपणे त्यांच्यात राहतही नसत.

प्रार्थनासमाजी म्हणजे देवधर्म, रूढी, श्रद्धा — सर्व धाब्यावर बसवणारे लोक, अशी सर्वसामान्य लोकांची कल्पना असली तरी प्रार्थनासमाजात सर चंदावरकर, डॉ. भांडारकर, डॉ. नवरंगे, कर्मवीर शिंदे इत्यादी विद्वानांची प्रवचने इतकी मनोज्ञ आणि रसाळ होत की अशा वेळी हॉल अगदी दुथडी भरून वाहत असे. या गर्दीत सुधारक प्रार्थनासमाजी लोकांप्रमाणेच इतरही लोक असत. अशा प्रसंगी जी भजने, भक्तिपर पदे गायची असत ती श्री. द्वा. गो. वैद्यांच्या पत्नी सौ. गुलाबबाई या अतिशय गोड आवाजात म्हणत व तारा आणि इंदिरा या केळकरबहिणी त्यांना सुरेल आणि भावपूर्ण आवाजात साथ करत.

* ह्या स्वामी आनंदांनी पुढे नवजीवन प्रेसद्वारा गांधीजींचे बरेच साहित्य प्रकाशित केले. गांधीजींना ' My Experiments in Truth ' हा आत्मचरित्रपर ग्रंथ लिहिण्यास उद्युक्त करण्यात त्यांचा मोठा वाटा होता.

या गुलाबबाई आणि ताराबाई हुजुरपागेत एकाच वेळी शिकावयास होत्या. त्या काळी जुन्या मताची मंडळी तरुण मुलींनी अशी व्यासपीठावरून उघडपणे गाणी म्हणणे गैर समजत व त्यावर टीकाही होई. तरुण आणि स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाच्या या कॉलेजकन्यांनी म्हटलेली ही गोड चालीची भजने ऐकणे हेही श्रोत्यांच्या आकर्षणांपैकी एक असे !

श्री. बापूसाहेब चिपळूणकरांशी ओळख झाल्यानंतर एक दिवस केळकरभावंडांनी या नवीन जोडप्याला आपल्या घरी चहाला बोलावले. बोलता बोलता सौ. अक्का चिपळूणकरांच्या शिक्षणाचा प्रश्न निघाला आणि बापूसाहेबांनी आपली अडचण सांगितली.

वास्तविक अक्कांना त्यांनीच लग्नानंतर चौथीपर्यंत शिकवले होते आणि त्यांना पुढे शिकवायचे होते म्हणूनच त्यांनी मुंबईला आपली बदली करून घेतली होती. परंतु मुंबईला आल्यावर एक नवीनच समस्या उद्‌भवली. मुंबईसारख्या ठिकाणी बिऱ्हाड म्हणजे रोज कोणी ना कोणी तरी पाहुणा ठेवलेलाच. मुंबईला येऊन दोन वर्षे झाली तरी अक्कांच्या शिक्षणाला मुहूर्त काही लागेना.

—या अडचणीवर केळकरभावंडांनी उत्साहाने तोडगा सुचवला. त्यांच्या चाळीत त्यांच्या शेजारच्याच दोन खोल्या पुढच्या महिन्यात रिकाम्या व्हावयच्या होत्या त्या चिपळूणकरांनी घ्याव्यात व या मंडळींप्रमाणे सखुबाईच्या खानावळीचे डबे आणून जेवावे; चहापाणी तेवढे घरी करावे. या पद्धतीने अक्कांच्या मागचे घरकाम बरेच कमी होऊन त्यांना घर व शाळा दोन्ही सांभाळणे शक्य होणार होते.

बापूसाहेबांना ही कल्पना पसंत पडली. त्याप्रमाणे मारवाड्याच्या चाळीतली ती जागा मोकळी झाल्याबरोबर त्यांनी आपले बिऱ्हाड तेथे हलविले. आपली धाकटी शाळकरी मेहुणी गंगू हिलाही बापूसाहेबांनी आपल्या घरी शिकायला आणून ठेवले. ही गंगू ओक साधारणतः शांता अळूरकरच्या बरोबरीची निघाली !

—स्वभाव, मने जुळण्यासारखी होती. पाहता पाहता या दोन्ही कुटुंबांची इतकी गट्टी झाली की ही दोन बिऱ्हाडे मग वेगळी राहिलीच नाहीत. चार खोल्यांचे एक संयुक्त घर निर्माण झाले. एक विद्यार्थी-क्लब तयार झाला.

केळकरांची पुढली खोली ही 'रिक्रिएशन रूम' ठरली. चर्चा, खेळ, गायन, वादन, प्रार्थना, गप्पा इथे चालत. मागची खोली केळकरभावंडांची अभ्यासिका. चिपळूणकरांच्या पुढच्या खोलीचा हॉल ही चिपळूणकरांची अभ्यासाची खोली ठरली तर मागच्या खोलीचे स्वयंपाकघर ठरले. केळकर-चिपळूणकरांचा सर्व पाहुणी या संयुक्त घरात उतरत. सखुबाईच्याच कृपेने त्यांच्या घरी जेवणाखाणाचा प्रश्न सोडवला जायचा.

या विद्यार्थीगृहाचा मोठा आकर्षक असा दिनक्रम आखला गेला.

पहाटे पाच वाजता सर्वांनी उठायचे. प्रातर्विधी आटपून फिरायला बाहेर पडायचे. फ्रेंच ब्रिजखालून चालत जाऊन बाबुलनाथ रस्त्याने हँगिंग-गार्डन गाठायची. जाताना खूप चर्चा, हास्य-विनोद होत. तेथे बागेभोवती चार चकरा मारून बाकांवर जरा टेकायचे आणि पळत पळत टेकडी उतरून थेट घर गाठायचे. आल्यावर मग कॉफी, ब्रेड अशी न्याहारी करायची. चहावर मात्र बहिष्कार होता. शांता आणि गंगू दोघी सर्वांत लहान. कपबशा मांडणे यांसारखी किरकोळ कामे त्यांच्या वाट्याला येत. कॉफी बनविण्याचे काम मोठी सगळी आळीपाळीने करीत. आंघोळी, कपडे धुणे हे आटोपले की प्रत्येकाने अभ्यासाला बसायचे. अक्का, गंगू व शांता हे तीन विद्यार्थी पहिली-दुसरीतले; तारा, इंदिरा कॉलेजातल्या तर माधवराव एम्. बी. बी. एस्. च्या वर्गात — असे विविध इयत्तांचे विद्यार्थी यात असत. त्यांच्यात मोठे आणि शिक्षकाचा पेशा पत्करलेले असे फक्त बापूसाहेब होते. पाणी भरणे, सर्वांना उठवणे, दूध तापविणे अशी काही कामे त्यांनी स्वतःकडे घेतली होती.

दहा वाजता जेवणाचे डबे आणायचे. भात तेवढा घरी टाकीत असत. आपापले पाट-पाणी करून सर्वांनी गोल बसायचे. वाढण्याच्या कामाच्या पाळ्या ठरविल्या होत्या. प्रत्येकाने आपापली ताटवाटी घासायची की आपापल्या शाळा-कॉलेजाची वाट धरायची. अक्कांची शाळा ( रॉबर्ट मनी गर्ल्स स्कूल ) जवळ होती. तिला थोडे उशिरा निघून चालत असे. तेव्हा तिने मागले आवरून सर्वांत शेवटी कुलूप लावून बाहेर पडायचे. पहाटे उठून दूध आणण्यापासून सर्व कामे वेळच्यावेळी, नेमून दिलेल्या व्यक्तींनी व्यवस्थितपणाने पार पाडली पाहिजेत, अशी या संयुक्त कुटुंबात शिस्त होती. या कामांच्या बाबतीत स्त्री-पुरुष भेदभाव नसावा असा या मंडळींचा कटाक्ष होता आणि तो कृतीत दिसे. घरात सर्वांत लहान शांता. तेव्हा तिची देखभाल तारा ही वडील बहिणीच्या मायेने, घरातल्या कर्त्या स्त्रीप्रमाणे करी. तिचा अभ्यास, तिची वेणी, न्हाणे—उवा काढणे सुद्धा. शांताला ताप आला की तिचे तोंड उतरलेले सर्वांत आधी लक्षात येई ताराच्या !

संध्याकाळी सर्वजण प्रार्थना म्हणत. तारा आणि इंदिरा भजने म्हणत. बापूसाहेब किंवा माधवराव काही उत्तम विचार वाचून दाखवीत. नंतर जेवण आणि अभ्यास आटोपून रात्री दहा वाजता झोप.

—आठवडा असा जायचा.

रविवारी आणि सुटीच्या दिवशी ह्या दिनक्रमात बदल व्हायचा. म्हणजे तो आणखी रंगीत-संगीत व्हायचा. ताराबाईंना सायकल चालवणे, गाणे, टेनिस खेळणे इ. छंद होते. अशा वैयक्तिक छंदांना सुटीच्या दिवशी वाव मिळे. तारा आणि अक्का वयाने बरोबरीच्या. त्यांची विशेष गट्टी होती. रविवारी पहाटे उठून त्या जवळच असलेल्या टेनिसकोर्टावर टेनिस खेळायला जात.

नऊवारी, बिनओच्याची लुगडी, लांब हाताची पोलकी, पायात बूटमोजे असा त्यावेळी या शिक्षित, सुधारक स्त्रियांचा पोशाख असे. कधीतरी त्यावर शाल घेत. रविवारी पायात

टेनिसशूज, हातात टेनिसची रॅकेट अशा वेषात या तरुण मुली बाहेर पडत. रविवारी संध्याकाळी प्रार्थनासमाजात होणाऱ्या उपासनेला जायचा एक कार्यक्रम असे. या उपासनेच्या वेळी जी पदे म्हणायची असत त्यांची आधी उपासनेच्या विषयानुसार निवड होई आणि मग ती पदे सायक्लोस्टाइल करून वाटली जात. या छपाईचे कामही दर रविवारी केळकरांच्या या बिऱ्हाडात होई. सर्वजण त्यात भाग घेत.

सणवार आला की स्वयंपाक घरी करण्यात येई. सखुबाईला त्या दिवशी रजा मिळे. याही उपक्रमात सगळे हिरीरीने भाग घेत. कधी पुरणपोळ्या तर कधी जिलब्या असे स्वादिष्ट प्रयोग मोठ्या प्रमाणावर होत. यात पाककुशल अक्कांचे नेतृत्व असे. ताराबाई आणि इंदिराताई यांना त्यात शिकायची हौस व गती होती. पुरुषमंडळीदेखील मनापासून लुडबूड करीत. या प्रयोगशाळेत माधवरावसुद्धा तयार झाले. पुरणाच्या पोळ्या, बेसनाचे लाडू, केक, बिस्किटे या गोष्टी बनविण्यात ताराबाईंच्या या हरहुन्नरी भावाचा हातखंडा होता.

बाहेरच्या मित्रमंडळींना जेवायला आमंत्रणे दिली जात. जेवताना शर्यती लागत. चाळीस चाळीस जिलब्या, नऊ नऊ पुरणपोळ्या आनंदराव श्रीखंड्यासारखी मुले फस्त करीत.

—जेवणानंतर मग ब्रिज !

विद्यार्थी-क्लबाच्या स्थायिक आणि स्थानिक समासदांखेरीज बाहेरचे अनेक हंगामी समासद-स्नेही आणि नात्यातले क्लबच्या या उपक्रमात वेळोवेळी सामील होत असत. पेणचे पी. एच्. मनोहर, अक्का चिपळूणकरांचा चुलत भाऊ यशवंत ओक, त्र्यंबक अल्रूरकर ( शांताचा मोठा भाऊ ) हेही येऊन जाऊन असत. पुढे काही दिवसांनी आनंदराव श्रीखंडे यांनीही याच चाळीत एक खोली भाड्याने घेतली. क्लबमध्ये आणखी एका उमद्या, आनंदी समासदाची भर पडली. स्नेह-वर्तुळ रुंदावले, हास्यविनोद वाढले.

चांदणी रात्र असली की क्लबच्या उत्साहाला उधाण येई. मग रात्री जेवण आटोपून सगळी हँगिंग गार्डनवर जात. पलीकडच्या चौकात लहान-मोठे, स्त्री-पुरुष सगळे मिळून छप्पा-पाणी, खो-खो असे खेळ खेळत.

त्यावेळच्या इतर महाराष्ट्रीय, मध्यमवर्गीय लोकांच्या मानाने या मंडळीचे वागणे जरा जास्तच पुढारलेले आणि खेळीमेळीचे — जुन्या दृष्टिकोनातून अगोचर, उच्छृंखलही असले पाहिजे. अर्थात ' सुधारक ' म्हणून शिक्का घेतलेल्या या मंडळींना त्याची फारशी क्षिती नव्हती. अत्यंत आकर्षक, निरोगी, तरुण मनांना साजेसा असा तेथला हा जीवन-क्रम होता...भजने म्हणायची, वाद्ये शिकायची, पत्ते खेळायचे, सहली काढायच्या, सायकलिंग, वाचन, व्यायाम, खेळ-कधी गाण्याच्या बैठ्या लावायच्या. कधी शिवण तर कधी कशिदा.

त्या काळातल्या इतर जुन्या मंडळींचा ताराबाई केळकरांसारख्या सुधारक तरुणीकडे पाहण्याचा दृष्टिकोन कसा होता त्याची एका लहानशा प्रसंगावरून कल्पना येते—



ताराबाई या जनार्दनपंत गद्र्यांच्या घरी राहत असतानाची ही गोष्ट.

एकदा ताराबाई श्री. बापूराव श्रीखंडे यांच्याबरोबर रस्त्याने जात असताना एकाएकी एक मोटर भर वेगाने त्यांच्या अंगावरच आली. ताराबाई इतक्या घाबरल्या की त्यांनी पटकन बापूरावांचा आसरा घेतला.

प्रसंग सगळा मिळून मिनिटभराचा. तो लहानसा अपघात घडता घडता राहिला आणि ताराबाई आपल्या ' छातीत कसं धस्सं झालं ' याचे वर्णन करीत करीत, हसत रस्त्यालाही लागल्या.

परंतु ताराबाईंचे हे भर रस्त्यात एका तरुणाला ' मिठ्या मारणे ' परिचयातल्या एका व्यक्तीने पाहिले आणि ताराबाई घरी पोचायच्या आत बातमी धावत पळत घरी पोचली-सुद्धा !

ताराबाईंच्या कृतीचे रसभरित वर्णन करून त्या बाईने श्री. शांताबाई गद्र्यांना धोक्याचा इशारा दिला.

" शांताबाईऽ ! आपल्या घरात मारे ठेवून घेतल्या आहेत दुसऱ्याच्या तरुण मुली; पण त्यांच्यावर तुमचं धडपणी लक्ष आहे ना ? "

मंडळींनी अर्थातच हा प्रसंग आपल्या विनोदखात्यावर जमा करून टाकला, परंतु...

पुढे एकदा तात्या केळकरांच्या पत्नी, सौ. आनंदीवहिनी बदामवाडीतल्या विद्यार्थी क्लबमध्ये राहायला आल्या. ताराबाईंच्या या भावजयीचा पुनर्विवाह झाला असला तरी तशा त्या माहेरून जुन्याच होत्या. मुंबईच्या या मंडळीचे ते खानावळीचे डबे आणून जेवणे, सायकलिंग, गाणे-बजावणे, तरुण मुला-मुलींची एकत्र ऊठबस, हसणे-खिदळणे, रात्री चांदण्यात फिरायला जाणे, खेळणे, हे सर्व पाहून ताराबाईंची ही बाळ-बोध वळणाची भावजय बिचारी हबकलीच ! त्यात शेजारी तो गाण्याचा क्लास, यांच्या पुढच्या खोलीतला तो राक्षस तंबोरा...हे सर्व दृश्य पाहून वहिनींच्या सनातनी मनाला कसेसेच वाटले आणि त्यांनी ही मुले बहकली, असा भलताच समज करून घेऊन तात्यांना तसे पत्र देखील लिहून टाकले !

ताराबाईंच्या जेव्हा हे सारे लक्षात आले तेव्हा त्यांनी आपल्या रसिक राहणीचा, गाणे शिकण्याचा आणि मनमोकळ्या वागण्याचा दुसरा-तिसरा काही अर्थ नसल्याचे पटवून दिले. नंतर तो तंबोरा घेऊन ताराबाईंनी ' जय जगदीश हरे ' हे भजन वहिनींना इतक्या तन्मयतेने म्हणून दाखवले की त्या गोड स्वरांनी त्यांच्या भावजयीच्या मनातल्या सर्व कुशंका फिटल्या.

सर्वच केळकरभावंडांना भजनाचा, गायनाचा विशेष छंद होता. मोठ्या तात्यांना तबला वाजविता येत असे. ते मुंबईला आले की वरचेवर इतर भजनप्रेमी लोकांना गोळा

करून विद्यार्थी क्लबाच्या जागेत भजनाचे कार्यक्रम घडवून आणत. ताराबाई व इंदिराबाई दोघीही शेजारच्या क्लासमध्ये व्होकल शिकत. अक्का पेटी शिकत होत्या. ही सर्व मंडळी उत्साहाने मैफिलीत रंग भरीत. ताराबाईंचा गळा फार गोड होता. आणि त्यांची स्वतःची अशी एक गाण्याची भावपूर्ण शैलीही होती. 'वंदे मातरम्' हे गीत त्या इतके भाव ओतून आणि अनुपम गोडव्याने म्हणत की ऐकणारा ते सूर बरोबर घेऊन घरी जाई! अभ्यास, कला, खेळ या सर्वच बाबतीत ताराबाईंचा पाय नेहमी पुढे असे. या सर्वांच्या जोडीला खेळकर, विनोदप्रिय स्वभाव, मृदु पण मार्मिक बोलणे... यामुळे ताराबाईंचा सहवास सर्वांना नेहमी हवाहवासा वाटे.

स्वदेशीची चळवळ तेव्हा जोरात होती. केळकरांच्या घरीही तेच वारे होते. साखर खायची नाही, चहा, विलायती कापड, लोकर इत्यादि वर्ज्य.

—आनंदी स्वभावाच्या ताराबाईंना आपल्या कॉलेज जीवनात कधी कधी आपल्या आर्थिक असमर्थतेबद्दल मात्र खलखल वाटे. तात्या जरी अव्याहतपणे अर्धा पगार मुंबईला पाठवीत असत, तरी इतक्या माणसांना तो जेमतेमच पुरत असे. नेहमीच नव्हे परंतु केव्हातरी ताराबाईंना त्या रंगीत स्वप्ने पाहण्याच्या वयात ही पैशाची कमतरता जाणवे. मिस् अहिल्या भांडारकरांसारख्या संपन्न मैत्रिणींच्या घरी त्यांचे येणे-जाणे होते. त्यांचे शिक्षण आधी अलेक्झांड्रा स्कूलमध्ये आणि नंतर विल्सन कॉलेजात झालेले असल्यामुळे हिंदू, महाराष्ट्रीय मुलींबरोबरच पारशी, ज्यू, खिश्चन धर्मांच्या पुढारलेल्या आणि श्रीमंत घरांतल्या मुलीही त्यांच्या मैत्रिणी होत्या. ताराबाईंचे बरेच शिक्षक आणि प्राध्यापकही युरोपियन, पारशी इ. होते. साहजिकच, केव्हा तरी आपल्या 'एक पातळ अंगावर एका पातळ दांडीवर' राहणीतला आणि या मंडळींच्या राहणीतला फरक त्यांना जाणवल्याशिवाय राहत नसे. अर्थात अशा गोष्टींसाठी कुढत राहण्याचा त्यांचा स्वभाव नव्हताच.

पैशाची ही चणचण सौम्य करण्यासाठी त्या कॉलेज सांभाळून सकाळच्या वेळात दोन शिकवण्याही करीत असत.

या काळात ताराबाईंना थोडा फार 'सासुरवास' असेल तर तो माधवरावांचा! ताराबाईंचे हे भाऊ जेवढे बुद्धिमान तेवढेच विक्षिप्त असे होते, नादिष्ट होते. एकेक नवा छंद ते डोक्यात घेत आणि वाईट म्हणजे त्यात गतीही साधत! त्या दिवसांत त्यांना नेचरोपर्थीच्या थिअरीने झपाटलेले होते. मग बहिणींच्या खाण्यापिण्यावर या होऊ घातलेल्या निसर्गोपचार-तज्ज्ञांचे नियंत्रण. घरातल्या माणसांवर त्यांचे प्रयोग चालत. मैलोमैल चालायला लाव, उपास घाल, नारळावरच ठेव, अंड्यावरच ठेव असे त्यांचे प्रयोग असत. एकदा ताराबाई, अक्का आणि गंगू अशा तिघींना त्यांनी उपास घातले होते. ताराबाईंनी स्थूलपणा कमी करण्यासाठी ह्या प्रयोगात भाग घेतला. परंतु दोन दिवसांच्या वर त्यांच्याच्याने धीर धरविला नाही!



या माधवरावांना फोटोग्राफीचा देखील नाद होता. त्यांचा तो प्रचंड कॅमेराही तेथेच. डेव्हलपिंगची जागा तीच. त्यांचा आणखी एक कुत्रे पाळण्याचा. पैकी याच खोल्यांतून पोसला जाई...पुढे तर त्यांनी एक वाघाचे पिल्लू सुद्धा पाळले!

माधवरावांच्या खिशात कायम पत्त्यांचे जोड असत. जरा वेळ मिळाला की म्हणत, "चल तारे, दोन डाव टाकू या!"

—की मंडळी लगेच चाव्या-गध्या (भिकार-सावकारासारखा एक प्रकार) खेळायला बसत! ताराबाईंचे हे बंधू आपले कपडे आपण शिवून घालत तर त्यांचे एक तसेच नादिष्ट मित्र त्याच चाळीत राहणारे — रात्री एक मोठी कापडाची पिशवी शिवून त्यात झोपत! त्यांना उठवायला कोणी जावे! हा एक विनोदाचा विषय होता!

माधवराव केळकर हे पुढे त्यांच्या निसर्गोपचारांच्या पद्धतीमुळे प्रसिद्ध झाले. महात्माजींवरही त्यांनी या पद्धतीने इलाज केले होते. सर्वांगाला बर्फ चोळण्याच्या त्यांच्या आवडत्या उपचारावरून गांधीजी आणि त्यांचा परिवार या डॉक्टरांना 'डॉ. आइस' म्हणून ओळखत असे! गांधीजींनी पुढे आपल्या आत्मचरित्रात माधवरावांचा उल्लेख करून 'माझ्याइतकाच विक्षिप्त असा हा माझा डॉक्टर' असे त्यांचे वर्णन केले.* अर्थात बर्फोपचार या बाह्य प्रयोगानंतर 'अंड्याचा रस' सेवन करण्यास गांधीजींनी निक्षून नकार दिल्यामुळे डॉ. आइस यांचे उपचार अर्ध्यावर थांबले.

परंतु माधवराव स्वतः झुकतील त्या दिशेने आपल्या घरच्या मंडळींना झुकवत असत. तरी या झुकानेवाल्याची आपल्या बहिणींवर तेवढीच मायाही होती. बहिणींनी सायकल चालवावी, वक्तृत्वात भाग घ्यावा, यात पुढाकार त्यांचाच असे. ताराबाई क्वचित कोणत्या गोष्टीला बिचकू लागल्या तर माधवरावांनी म्हणावे,

* महात्माजींचे सत्याचे प्रयोग, द्वितीय खंड. मृत्युशय्या या प्रकरणातला अंश—
"अशा तऱ्हेने मृत्यूची वाट पाहत बसलो होतो इतक्यात डॉ. तळवलकर एका विचित्र प्राण्याला घेऊन आले. ते प्राणी महाराष्ट्राकडचे आहेत. हिंदुस्थान त्यांना ओळखीत नाही. पण ते माझ्यासारखेच 'चक्रम' आहेत. त्यामुळे प्रथमदर्शनीच मला त्यांची ओळख पटली. ते स्वतःचे उपचार माझ्यावर करून पाहण्यासाठी आले होते— स्वभावाने फार स्वतंत्र वृत्तीचे—तेव्हापासून आम्ही त्यांना 'आइस डॉक्टर' या टोपण नावानेच ओळखीत असतो. डिग्रीवाल्या डॉक्टरांपेक्षाही आपण अधिक महत्त्वाचे असे कित्येक शोध लाविलेले आहेत असा त्यांना आत्मविश्वास वाटतो. एवढे खरे की त्यांना मी माझ्या शरीरावर उपचार करू दिले. त्यांची समजूत आहे तितका परिणाम घडून आला नाही, तरीही मी रोज जो मरणाची वाट पाहत असे त्याऐवजी मला जगण्याची आशा वाटू लागली..."

" चल तारे ! हो पुढे ! अग त्याला काय होतंय ? "

—आणि ताराबाईंनी पुढे व्हावे.

पुष्कळ पुढे ताराबाई मुंबईला असताना त्यांचा हा पन्नाशी ओलांडलेला भाऊ एके दिवशी अचानक पुण्याहून सायकलीने त्यांना भेटायला आला. " हे काय माधव, असा अचानक ? " ताराबाईंनी विचारले.

" अग, आज तुझा वाढदिवस ना ! म्हणून तुझ्यासाठी लाडू घेऊन आलो ! "

आणि सायकलला लावलेल्या झोळीतला तो ११४ मैल वाहून आणलेला, स्वतः केलेला रव्याचा लाडू माधवरावांनी बहिणीच्या हातावर ठेवला...!

त्यापूर्वी, मधली काही वर्षे ताराबाईंशी त्यांनी अबोला धरला होता; त्या पार्श्वभूमीवर हे बंधुप्रेम अधिकच उठून दिसले !

...अर्थात् हे सर्व पुष्कळ पुढे...

—कॉलेजात असतानाच केव्हातरी माधवरावांना एका मित्राच्या नादाने ज्योतिषशास्त्रात रस उत्पन्न झाला. लगेच त्यांचा त्या दिशेने अभ्यासही सुरू झाला. ताराबाईंचा आणि इतर मंडळींचा ज्योतिषावर विश्वास नसल्यामुळे ती नेहमीच या दोन कुडमुड्या ज्योतिष्यांची थट्टा करीत.

—एकदा त्यांची कुत्री व्याली व तिला झाली तीन पिल्ले. ताराबाईंना भावाची फजिती करायची लहर आली. त्यांनी भराभर एका कागदावर एकेका पिलाचे वर्णन आणि जन्मवेळ असे लिहून घेतले. आणि एके दिवशी तो कागद या दोन मित्रांपुढे टाकून म्हटले, " हं, ह्या घ्या जन्मवेळा...जरा कुंडल्या वगैरे मांडून सांगा बरं यांचं थोडं भविष्य ! वर्णन...भावंडंच आहेत- जुळी ...नव्हेत, पाठोपाठची ! "

त्या दोघांनी बापड्यांनी लगेच उत्साहाने कुंडल्या मांडल्या. ग्रहांच्या जागा निश्चित केल्या आणि सुरू झाली बिचाऱ्यांची कुत्र्यांच्या भवितव्याशी झटापट—

" ...वर्ण उजळ ..."

" काय हो, विद्याभ्यासात प्रगती होईल ना पण बऱ्यापैकी ? "

अखेर ताराबाईंच्या कंपूतल्या कोणाला तरी हसू दाबणे अशक्य झाले. ताराबाईंचे बिंग फुटले !

" ...नाही, म्हणजे शेपटीची लांबी साधारण किती इंच...! आपली पुच्छप्रगती हो ! ! "

माधवरावांना मात्र आपली टिंगल झाली हे कळल्यावर राग आला.

" वा ! ते श्वानकुलोत्पन्न आहेत हे तुम्हाला त्यांच्या कुंडल्यांवरून कळायला पाहिजे होतं ! "

"—तुम्ही खुशाल असं थट्टेवारी न्या ! पण अखेर हे शास्त्र आहे ! ! " म्हणत



माधवराव रागारागाने निघून गेले.

या ज्योतिषाच्या कसरतीत एक दिवस ताराबाईंची पत्रिकाही परतून-पडताळून पाहण्यात आली. ताराबाईंच्या पत्रिकेत राजयोग आहे असा राजेशाही शोध या मंडळींना लागला.

—ताराबाई सायकल शिकत असतानाची ही गोष्ट.

ताराबाई आणि इंदिराबाई दोघीही सायकल शिकत होत्या. स्वतः माधवराव त्यांना शिकवत असत. विल्सन कॉलेजाच्या मागच्या बाजूला मोकळे मैदान होते, तेथे जाऊन सायकल शिकणे–शिकवणे चालायचे. त्यावेळी स्त्रियांनी सायकलवर बसणे हे अपवादात्मक सुद्धा नव्हते. मग यांना लेडीज सायकली कुठल्या मिळणार ? नऊवारी लुगडी नेसणाऱ्या या विशीतल्या मुली जेंट्स सायकलींवरच बसत; मुलींनी सायकली चालवणे हे त्यावेळी इतके अपूर्वाईचे होते की टांगेवाले, भाजीवालेही या दोघी दिसल्या की टोमणे मारीत. अर्थात ताराबाईंना आणि इंदिराताईंना त्याची पर्वा नव्हती. त्यावेळच्या 'नवा काळ' मध्ये त्या दोघींचे फोटोसुद्धा नावासकट प्रसिद्ध झाले होते, आणि " ...भर काळबादेवीतून या दोन तरुण स्त्रिया सायकल चालवीत असतात..." अशा प्रकारचे वर्णन केले होते !

—एका रविवारी सकाळी ताराबाईंनी सायकल काढली आणि त्या एकट्याच बाहेर पडल्या. त्यावेळी मुंबईतले रस्ते दररोज पहाटे पाण्याने धुतले जात असत. त्यामुळे रस्ते ओले होते.

सायकलचे चाक घसरले आणि ताराबाईंनी सरळ एका परीटघडीचे, पांढरेशुभ्र कपडे घालून पुढे चाललेल्या पारशी गृहस्थाला धडक दिली. म्हणजे ताराबाईंच्या सायकलने आपल्या स्वारासकट त्या बापड्याच्या दोन पायांमधून बाहेर पडण्याचा प्रयत्न केला—अर्थातच तो अयशस्वी झाला !

त्या पादचारी पारशाने घडपडून मग रागारागाने मागे वळून पाहिले. परंतु 'Sorry, Sorry' करणाऱ्या त्या तरुण कॉलेजकन्येच्या चेहऱ्याकडे पाहून त्याचा राग निवळला असावा.

" हरकत नाही, हरकत नाही " करत तो पुढे चालू लागला. तो पाठमोरा चालू लागला तेव्हा ताराबाईंना मात्र त्याची 'हरकत' पाठीमागून दिसली. बिचाऱ्याची पांढरीशुभ्र पाटलोण चिखलाने पार माखली होती. सायकलवर अत्यंत सफाईने टांग टाकून ताराबाई ठाकुरद्वार/चदामवाडीच्या दिशेने पसार झाल्या !

घरी येऊन ताराबाई कितीतरी वेळ एकीकडे हसत, काळजी करीत होत्या, तो पारशी आता घरी गेल्यावर आपली पॅन्ट काढून पाहील तेव्हा त्याला काय वाटेल ? घरी जाऊन तो सगळ्यांना सांगत सुटेल,

" अरे, पाछळथी एक बायडी आवी अने सिद्धी मारा पगमाज..."

त्यानंतर आणखीही एकदा या सायकलभगिनींनी मजा केली—

एका रविवारी पहाटे पुन्हा तारा आणि इंदिरा दोघी सायकली घेऊन बाहेर पडल्या. माधवरावांनी पाहिले. त्यांना वाटले, ग्राउंडवर जात असतील प्रॅक्टिस करायला. लॅबर्नम रोड व अलेक्झांड्रा रोड हा भाग त्यावेळी ओसाड होता, तेथे एकही बंगला नव्हता. ब्रूजेस रोड आणि गवालिया टँक रोड यांच्यामध्ये तेव्हा चांगले पटांगण होते. या मुलींची सायकल शिकण्याची तीच जागा होती. तासाभराने माधवराव तेथे गेले तर काय तेथे दोघींचाही पत्ता नाही ! या दोघी गेल्या तरी कुठे ? माधवरावांच्या अंतःचक्षूंसमोर एकाहून अधिक—मूळच्या पांढऱ्या पाटलोणीतले—धडपडणारे पारशी गृहस्थ दिसू लागले...!

आता या हातीपायी धड येतात का पुन्हा एकदा मैदान गाजवून येतात असे माधवरावांना झाले. घरी जाऊन त्यांनी बापूसाहेब आणि आनंदराव श्रीखंड्यांना बरोबर घेतले आणि तिघे तीन निरनिराळ्या दिशांनी आपल्या बेपत्ता भगिनींना शोधायला निघाले.

साडेनऊच्या सुमाराला माधवरावांना क्वीन्स रोडवरून दोन बहादुर स्त्रिया सायकलवरून येताना दिसल्या. तारा आणि इंदिराच होत्या त्या. एकीकडे आपापसात गप्पा मारीत, लीलया सायकल चालवत त्या वेगाने चर्नीरोड स्टेशनच्या दिशेने येत होत्या—त्या दिवशी थेट कुलाब्यापर्यंत सख्यांनी रपेट मारली होती !

घरी आल्यावर त्यांच्या या धाडसाबद्दल त्यांना सगळ्यांचीच खावी लागली. या दोघींना मात्र आपले काही विशेष चुकले आहे असे वाटेना.

"...पण आम्ही गेलो तशाच सुखरूप परतलो ना ?..." शेवटी ताराबाई म्हणाल्या, " तुम्ही जर एकएकटे जाता तर मग आम्हाला विश्वास आल्यावर आम्ही ' दोघी एकट्या ' गेलो तर त्यात एवढे रागवायला कशाला हवे ? स्त्री आणि पुरुष समान आहेत असं तुम्हीच नेहमी म्हणता ना ! "

बापूसाहेब आणि माधवराव हे दोघेही नेहमीच स्त्री–पुरुष समानतेविषयी ठासून बोलणारे—कृतीने तसा आग्रह धरणारे ! बहिणीने एकाच वाक्यात त्यांना चीत केले.

—कुणालाच मग हसू आवरेना !

" ' दोघी एकट्या ' काय ! " म्हणत माधवरावांनी कोपरापासून हात जोडले.

पुष्कळ पुढे एका सुट्टीत अकोल्याला तात्यांकडे ही मंडळी गेली असताना एका सायकल सहलीत मात्र इंदिराबाई खरोखरच जोरात आपटल्या ! त्यांचा पाय मुरगळला, सुजला व त्याचे वाळंतपण पुढे पंधरवडाभर पुरवले ! तेव्हा मग हा पराक्रम शेवटचा म्हणून त्या दोघींनी सायकल सोडली, ती कायमची.

मधून मधून प्रार्थनासमाजातर्फे सभासदांकरता सहली योजल्या जात. सर्व सभासद



सहकुटुंब, अशा समारंभात सामील होत. एक सहल अशीच तानसा तलावावर गेली गेली होती. नवरंगे, पद्रे, भांडारकर इ. सर्व कुटुंबे या सहलीला गेली होती.

या सहलीत जेवणामध्ये तळलेल्या अंड्यांचा रस्सा ठेवला होता. गंगूला त्याचा उग्र वास आवडेना तेव्हा ताराबाई चटकन म्हणाल्या,

" अग, पांढऱ्या बटाट्याची भाजी ती."

" कुठे मिळतात हे बटाटे ? "

गंगूने विचारले.

तशी ताराबाईंनी गंभीरपणे उत्तर दिले,

" मुंबईत कुठेही ! "

आणि तिथून पुढे ' पांढऱ्या बटाट्याची भाजी ' हा शब्दप्रयोग त्या टोळक्यात रूढच झाला.

विद्यार्थी–क्लबाच्या खाजगी लहानमोठ्या सहलीही पुष्कळ वेळा निघाल्या. नेतृत्व अर्थात बापूसाहेबांचे आणि माधवरावांचे.

१९१३ च्या मे महिन्यात अशीच एक खांडपा–लोणावळा सहल माधवरावांनी आखली. कर्जतपासून जवळच खांडपे म्हणून एक लहानसे खेडे आहे. तिन्ही बाजूंना डोंगर, डोक्यावर राजमाची किल्ला, आणि पायथ्याशी वस्ती असे या खेड्याचे स्वरूप. माधवरावांच्या एका मित्राचे तेथे घर होते. त्यांच्याकडे मुक्काम ठोकून आजूबाजूचे सर्व डोंगर पालथे घालायचे, आणि शेवटच्या दिवशी राजमाची किल्ल्याचे दर्शन घेऊन खंडाळ्याची खिंड पार करून लोणावळ्याला उतरायचे, असा बेत होता. बापूसाहेब चिपळूणकरांचे वडील त्यावेळी टाटा कंपनीत ऑफिसर होते आणि पंधराव्या बोगद्याच्या कामावर होते. तेथे त्यांना मोठा बंगला मिळाला होता. तेथे १–२ दिवस राहून, आजूबाजूची स्थळे पाहून केळकरमंडळी मुंबईला परतणार होती आणि चिपळूणकर मंडळी तेथेच उरलेली सुटी घालविणार होती.

त्याप्रमाणे सुटी सुरू होताच सर्व मंडळी कर्जतहून बैलगाडीने खांडप्याला पोचली. तेथे रोज एक नवा डोंगर पादाक्रांत करायचा, जवळ जी वस्ती दिसेल तेथे जाऊन दूध, चहा, जे मिळेल ते प्यायचे आणि परतायचे असा उपक्रम सुरू झाला. बहुधा दूधच मिळायचे. एके दिवशी रेल्वेच्या डोंगरावर एक–दोन बोगदेही पाहिले. शेवटच्या दिवशी पहाटे पाचला उठून राजमाचीचे डोंगर चढायला सुरुवात केली. बरोबर मनुका, खडीसाखर, किसमिस असा पौष्टिक खुराक घेतला होता. एका वाटाड्याला राजमाचीपर्यंत बरोबर घेतले होते. किल्ल्यावरून पलीकडे उतरण्याची वाट दाखवून त्याने परत जायचे होते. राजमाचीचे जुळे डोंगर पाहून झाले. तेथल्या टाक्यातील थंडगार पाणी पिऊन थोडा वेळ वनश्री पाहिली व मंडळींनी खंडाळ्याचा मार्ग धरला.

दऱ्या, डोंगर ओलांडीत मंडळी दिवसभर पायात बूट, हातात काठ्या अशी चालत होती. वाटेत थंड झऱ्याचे पाणी प्यावे, मुकामेव्याच्या फक्क्या माराव्यात. अक्का व ताई जरा दमल्या की वाटेत दगडावर विसावा घेत. आजूबाजूची निसर्गशोभा पाहत, मनुका चघळत गप्पा मारायच्या की पुढे चालू लागायचे. संध्याकाळी सहाच्या सुमाराला अखेर खंडाळ्याचा चिपळूणकरांचा बंगला मंडळींनी गाठला. मग मात्र थंड पाण्याने आंघोळ करून सर्वांनी जी ताणून दिली ती सकाळपर्यंत. दुसऱ्या दिवशी सकाळी उठून पुन्हा 'ड्यूक्स नोज' 'टायगर्स लीप' इ. जवळची ठिकाणे पाहायची उमेद होतीच !

अशीच एकदा मंडळी माथेरानला गेली होती. त्यावेळी स्त्रियांच्या फर्स्टक्लासच्या डब्यावर 'Ladies' अशी इंग्रजी अक्षरे असत व तिसऱ्या वर्गाच्या स्त्रियांच्या डब्यावर मात्र मराठीत 'स्त्रियांकरिता' असा शब्द असे. हा फरक ताराबाईंच्या लक्षात आला. त्या गुरकावून म्हणाल्या, "वा ! थर्डमध्ये बसलो म्हणून काय झालं ? आम्ही काय सभ्य स्त्रिया नाही वाटतं ?"— लगेच त्यांनी 'स्त्रियांकरता' शब्द खोडून तेथेही 'Ladies' अशी अक्षरे ठोकून दिली !

अशीच महाड–रायगडची आणखी एक सहल दिवाळीच्या सुट्टीत झाली.* सगळी मंडळी मुंबईहून आगबोटीने हरिहरेश्वरला उतरून, पुळण तुडवून बाणकोटच्या अलीकडच्या तीरावर पोचली. तेथून लहान नावेत बसून महाडला. दुसऱ्या दिवशी रात्री बैलगाडीने पाचाड गाठले. आणि पहाटे गड चढायला सुरुवात केली. चार तासांनी माथ्यावर पोचून हिरकणी बुरुज, बाजारपेठ, टकमक टोक इ. पाहून परत खाली आली.

उमाबाईंच्या निधनामुळे केळकरभावंडे तरुण वयातच पोरकी झाली तेव्हा नवरंगे मंडळींनी त्यांना विशेष कळकळीने आधार दिला होता. केळकरभावंडांना तर डॉ. काशीबाईंबद्दल फार भक्ती व आदर वाटत असे. त्यांच्या आईवडिलांनी काशीबाईंचा आदर्श लहानपणापासून त्यांच्यापुढे ठेवला होताच. डॉ. काशीबाईंनी अलिबागजवळ किहीम येथे 'आनंदकुटिर' नावाचा एक सुंदर बंगला समुद्रकाठी बांधला होता. किहीम सागरतीरावरले रमणीय गाव 'ब्रायटन ऑफ बॉम्बे' म्हणून ओळखले जात असे. येथेही ही मंडळी सहलीला जात. एकदा तर अहिल्या भांडारकर, ताराबाई अशा सर्व मैत्रिणी–मैत्रिणीच किहीमला गेल्या होत्या. स्वयंपाकाच्या भांड्यांपासून औषधपाण्याच्या व्यवस्थेपर्यंत सारे काही या बंगल्यात तयार असे. कपड्यांशिवाय काही न्यावे लागत नसे. भोवती सुंदर बगीचा होता. क्रोटन, गुलाब, मोगऱ्यांनी तो सदा बहरलेला असे. कलमी व गावठी आंब्यांची, नारळ–केळींचीही झाडे होती.

विद्यार्थी-क्लबचा जमलेला कंपू दोन वर्षे टिकला ( १९१२ ते १९१४ ) पुढे हळू

* 'चाकोरीबाहेर' —श्रीमती गंगूताई पटवर्धन.



हळू मंडळी पांगली. बापूसाहेब चिपळूणकर जून १९१४ मध्ये एम. ए. करण्यासाठी अमेरिकेला गेले. जाण्यापूर्वी त्यांनी अक्का व गंपू यांना पुण्याला आपल्या वडिलांकडे ठेवून हुजुरपागेत त्यांना पुढील शिक्षण देण्याची व्यवस्था केली. इकडे ताराबाईही १९१४ सालच्या नोव्हेंबरात फिलॉसॉफी हा विषय घेऊन बी. ए. ( ऑनर्स ) उत्तीर्ण झाल्या. एम.ए.चा थोडाफार अभ्यास केल्यानंतर त्यांनी मुंबई सोडली. बळवंतराव गद्रे म्हणजे जनार्दनपंतांचा धाकटा भाऊ याच कंपूतला. त्याला सारे 'बाळू' म्हणत असत. इंदिराताई एकाएकी त्याचे हे बाळनाव सोडून त्यांचा 'बळवंतराव' म्हणून उल्लेख करू लागली, आणि इतरांना तसेच करण्यास सुचवू लागली. तेव्हा दोघांचा विवाह जाहीर झाला आणि लौकरच पार पडला. माधवराव एम्. बी. बी. एस्.च्या शेवटच्या परीक्षेत दोनदा नापास झाले. ह्या वेळपर्यंत त्यांचे त्या शिक्षणावरचे मन उडाल्यासारखे झाले होते. निसर्गोपचाराच्या तत्त्वांवर त्यांचा सखोल अभ्यास आणि प्रयोग चालू होते. अखेर त्यांनी मेडिकलचा नाद सोडला आणि विद्यार्थी-क्लबाच्या जागेतच विद्यार्थ्यांसाठी एक वसतिगृह काही दिवस चालवले. आनंदराव श्रीखंडे याच वसतिगृहात राहून पुढे शिकत राहिले. . . .

संयुक्त विद्यार्थी-क्लब अशा रीतीने विसर्जित झाला.

अनिर्बंध, तरीही संस्कारक्षम, ध्येयवादी, निरोगी आणि उद्योगप्रिय अशा वातावरणात ताराबाईंच्या व्यक्तिमत्त्वाची जडणघडण झाली.

अर्थात, एका हाताची सगळी बोटे सारखी तर नसतातच. त्यात केळकरांच्या अपत्यांमध्ये तर विचित्र वाटेल इतके वैचित्र्य होते. त्यांच्यातला प्रत्येक जण एकेक ठळक व्यक्ती आणि वल्लीही होती ! त्यामुळे या सगळ्या भावंडांना मिळालेले वातावरण, संस्कारधन ढोबळमानाने सारखे असले तरी त्यांच्यापैकी प्रत्येकाने आपापल्या पद्धतीने निरनिराळ्या प्रकारचे आयुष्य व्यतीत केले.

या सहा भावंडांपैकी चौघे विवाहबद्ध झाले. मात्र ताराबाईंच्या दोन्ही वडील भावांनी आपले जीवनसाथी आपल्या वडिलांच्या परंपरेला अनुसरून निवडले. दादा इंदूरमध्ये प्रथम शिक्षकाचे व नंतर त्याच खात्यात कारकुनाचे कामकरत होते. १९१२ मध्ये त्यांनी डॉ. काशीबाई नवरंगे यांच्या सूचनेवरून बुटियाबाई रामदीन नावाच्या पुरभैया जातीच्या मुलीशी विवाह केला. ही मुलगी लहानपणी आपल्या आईवडिलांबरोबर उत्तर भारतातून पुण्याला आली व तेथे अचानक तिचे पालक प्लेगने वारले. अनाथ बुटियाचे लालनपालन मग हुजुरपागा या संस्थेनेच केले. सुट्टीत ती आळीपाळीने वेगवेगळ्या प्रार्थनासमाजी यांच्या घरी जाई. नर्सिंगचा अभ्यासक्रम तिने पूर्ण केला होता. लग्नानंतर ताराबाईंच्या या सुशील वहिनीने संसार आणि पुढे व्यवसायही नीटनेटका सांभाळला.

दाद्यांनी गुलबर्गा येथे नोकरी करीत असताना १९०९ मध्ये जबलपूरला जाऊन

अचानक आनंदीबाई ( माहेरच्या, तांबे ) या तरुण विधवा स्त्रीशी लग्न केले आणि आपण बंगाली मुलीशी लग्न ठरविले आहे अशी हूल उठवून गुलबर्गा मुक्कामी उगाचच थोडी खळबळ उडवून दिली ! ताराबाईंच्या या दोन्ही भावजया ताराबाईंबरोबर, थोड्या पुढे–मागे हुजुरपागेतच शिकल्या होत्या ! या आनंदीबाईंचे पुढे अपघाती निधन झाल्यावर तात्यांनी दुसरे लग्न केले व त्या पत्नीचे नावही आनंदीबाईच ठेविले.

केशवरावांचा मार्ग प्रथमपासून वेगळा; त्यांनी लग्न केले नाही, एवढेच ! माधवराव तेवढे एकटे वृत्तीने खरे ब्रह्मचारी होते व ते शेवटपर्यंत अविवाहित राहिले !

केळकरांच्या या सहा अपत्यांमध्ये मुलांपैकी कोणीच पदवी प्राप्त केली नाही. दोन्ही मुली मात्र योग्य वेळी विश्वविद्यालयाच्या पदवीधर झाल्या. त्यावर केशवरावांचा शेरा असे, " अरे, पदव्या मिळवणं ते काय, बायकांचं काम ! "

ही सर्व भावंडे वडलांप्रमाणे संशोधक वृत्तीची व थोडीफार ध्येयवादी निघाली. सदाशिवरावांची आवडही सर्वांमध्ये उतरली; सहाही भावंडे लिहिती झाली. सर्वांनी विविध विषयांवर संशोधनपर, आध्यात्मिक किंवा थोडेफार ललित लेखनही केले.

ताराबाईंचे थोरले बंधू दादा यांनी पायथॅगोरसच्या सिद्धांतावर बराच अभ्यास व मूलगामी संशोधन केले. त्यांनी ' स्त्री-शिक्षण ' हे एक नियतकालिक काढले होते व तरुणपणीच बालशिक्षण या विषयात रस उत्पन्न होऊन लग्नाआधी व नंतरही काही दिवस किंडरगार्टनपद्धतीची बालशाळाही चालविली ! तात्यांनी आपल्या विणकामाच्या क्षेत्रात आपली संशोधक वृत्ती खर्ची घातली व सिद्ध केली. ज्ञानकोशात त्यांचा एक विणकामविषयक लेख समाविष्ट झालेला आहे. केशवराव हायकोर्टात वकील होते. त्यांनी तुकारामावर दोनतीन पुस्तके लिहिली. याशिवाय काही आरोग्यविषयक व ललित लेखनही केले. तुकारामावरच्या त्यांच्या संशोधनपर पुस्तकास तर देवासच्या महाराजांकडून रु. ८०० चे बक्षीसही मिळाले. माधवरावांचाही ' तुकाराम ' हा आवडीचा अभ्यासविषय होता. त्यांनीही वेगळाच दृष्टिकोन पकडून तुकारामाचे आध्यात्मिक चरित्र लिहिले. मात्र त्यांनी खरी मजल मारली निसर्गोपचाराच्या क्षेत्रात. त्या शाखेचे डॉक्टर आणि संशोधक म्हणून त्यांना बरीच मान्यता लाभली. इंदिरेनेही आपल्या तडफदार जोडीदाराच्या मदतीने शिक्षणक्षेत्रात बरीच प्रगती साधली, व सुमारे अकरा वर्षे नोकरी केली. राजकोट येथील बार्टन फीमेल कॉलेजच्या प्रिन्सिपल म्हणून ( ताराबाईंनंतर ) त्यांनी काही दिवस काम केले व कारणपरत्वे सुबोधपत्रिकेत आणि इतर ठिकाणी लेख लिहिले. ' जिच्या हाती पाळण्याची दोरी ' अशासारखे लेख त्यांनी मासिक मनोरंजनात लिहिले.

सर्वांत टोलेजंग कार्य करून वैशिष्ट्यपूर्ण आयुष्य जगल्या अर्थात ताराबाई मोडक ! थोरले दादा यांना साधुपुरुष हे विशेषण देता यावे. पैसा या अल्पोपलब्ध वस्तुमात्राबद्दल ते नेहमी म्हणत, " कशाला जमवायचे ? अरे दगड आहेत ते ! " आणि खरोखरच रात्री दोन दोन वाजेपर्यंत कारकुनी करून मिळतील तेवढ्या ' दगडांत ' दादा पूर्ण समाधानी असत. कोणी लाख शिव्या दिल्या तरी प्रत्युत्तर द्यायचे नाही परंतु आपला मुद्दा मात्र सोडायचा नाही, हे धोरण ! एकेकाळी विशेष टापटिपीने राहणाऱ्या दादांची राहणी पुढे परिस्थितीने असेल किंवा विक्षिप्तपणामुळे असेल, इतकी पराकोटीची गबाळी झाली की अव्यवस्थित पोशाख, दाढीदीक्षित चर्या व बरोबर कोणी आहे, नाही, याची पर्वा न करता अचाट घाईने तरातरा चालणे, अशी ही मूर्ती पाहताना बायकोमुलांनाही लाजल्यासारखे होई. आपल्या परिचारिका–पत्नीला केसवर पोचवायला ते निघाले की लोकांनी बुटियाबाईंना विचारावे, " पुढे चाललाय तो प्यून वाटतं, तुमचा ? " आणि त्या ' प्यून 'ने मात्र त्याबद्दल खेद वा खंत न मानता त्याच धेरात, आवेशात थेट सावरकरांनाही भेटायला जावे, नाटके लिहावीत, कविता कराव्यात आणि त्यांच्या संपन्न, सुविद्य स्नेह्यांनी आपल्या या मित्राकडे विनकामाची कपर्दिकही नाही याचे काही वाटून न घेता त्यांचा स्नेह जपावा. ताराबाईंचे हे भाऊ बुटियाबाईंना ' रावसाहेब ' अशी हाक मारीत आणि तीही लांबून, दणदणीत आवाजात !

गिरणीत मोठ्या हुद्द्यावर असलेले तात्यासुद्धा परक्यांशी अत्यंत सौजन्यपूर्ण वागतील परंतु नातेवाईकांत ' तऱ्हेवाईक ' म्हणूनच प्रसिद्ध ! त्यांनी चांगला पैसा मिळविला आणि मित्रमंडळींबरोबर चांगलेचुंगले खातपीत मनःपूर्वक संपविला !

केशवरावांचा नमुना आणखीच और. यांच्या तऱ्हेवाईकपणाने स्वच्छंदीपणाचे टोक गाठले. एकीकडे वैद्यकी असो वा अध्यात्म, ज्या विषयात रस उत्पन्न होईल त्यात खोल जाण्याचा, तळाला हात घालण्याचा कल, तरुणपणीही अध्यात्माकडे सक्रिय ओढा; आणि त्याच वेळी दुसऱ्यांच्या टोप्या उडवणे किंवा घालणे, बनवाबनवी ही कारकीर्दही चालू होती. एकीकडे पंढरपूरची यात्रा पायी करतील,- तुकारामावर पुस्तक लिहितील ते इतके खोल जाऊन की एकेका ओळीचा एकेक स्वतंत्र कागद !... अन् त्याच वेळी कुणाला हातोहात बनवितील !

ताराबाईंच्या साठीला या भरकटल्या भावाकडून ताराबाईंना अभिनंदनपर तार आली. आभाराच्या पत्रात ताराबाईंनी लिहिले की मी माझे आयुष्य यथाशक्ती कारणी लावले. तू मात्र तुझे जीवन अगदी वाऱ्यावर—

विक्षिप्त बंधुराजांचा उलटपाली व निःसंदिग्ध जबाब आला, " ही तुझी समजूत अगदी चुकीची आहे ! मी माझे आयुष्य योग्य रीतीनेच जगलो आहे— एवढेच नव्हे, पुन्हा एक जन्म मिळाला तरीही, मी ते याच पद्धतीने घालवीन ! "

असे हे केशवराव. त्यांना मृत्यूही शेवटी ' बेगर्स होम ' मध्ये आला.

आणि सर्वांत विक्षिप्त होते ते धाकटे, माधवराव. हे तोतरे होते. कपडे मळले की

धुतले पाहिजेत हे त्यांच्या विचारसरणीत बसत नसे, कारण मातीला त्यांची हरकत नसेच, ते कडक उन्हात वाळवले की निर्जंतुक व 'स्वच्छ' होतात ही दृढ समजूत! त्यामुळे ते जेथे जातील तेथे त्यांचे कपडे उन्हात, हिरवळीवर 'निर्जंतुक' होत पडलेले असत. या निसर्गोपचारतज्ज्ञाला बापड्याला पेशंट मिळवावे लागत! आणि एकीकडे गांधीजी-पासून भल्या-भल्यांचा त्यांच्यावर विश्वास. इतरांवर ते मोफत उपचार करीत परंतु सख्ख्या भावाला – तात्यांना मात्र त्यांनी अर्ध्या आजारातच औषधोपचार बंद केले तेव्हा 'रु. ५,००/– व येण्याजाण्याचे भाडे' असे बिल लावले!

इंदिराबाईंचा वेगळेपणा त्यांच्या संथपणात व्यक्त होई. आणि त्यांना साथ मिळाली ती तडफदार बळवंतरावांची. त्यामुळे दोघांचे सहजीवन काहीशा तिरकस चालीने पुढे सरकले, आणि ती एक जोडीसुद्धा संबंधितांच्या लक्षात राहिली.

सदाशिवराव केळकरांच्या या सहा अपत्यांपैकी चौघे पुढे प्रार्थना समाजाचे सदस्य झाले. केशवरावांनी दीक्षा घेतली की नाही, हे नक्की माहीत नसले तरी वृत्तीने तेही प्रार्थना समाजीच होते. चारही मुलगे धार्मिक कार्यात रस घेत व इंदिराताईसुद्धा सारे उपासना चालवत असत. ज्या ठिकाणी नोकरीधंद्याच्या निमित्ताने जात त्या ठिकाणी प्रार्थना समाजाची शाखा व कार्य चालू असेल तर त्यात ही भावंडे सामील होत. ताराबाईही प्रार्थनासमाजी होत्या. त्यांनी कधी मूर्तिपूजा केली नाही. मानसिक त्रास होई तेव्हा 'प्रार्थना संगीता'चा, त्यातल्या पदांचा, भजनांचा आधार घेत. एरवीही त्यात रमत. प्रार्थना समाजाची दीक्षा मात्र त्यांनी घेतली नाही,* किंवा प्रार्थना समाजाचे प्रत्यक्ष कार्यही केले नाही.*

* पाहा : 'प्रार्थनासमाजाने मला काय दिले?' – ताराबाई मोडक, परिशिष्ट

# ३. के. व्ही.

सुधारक, प्रार्थनासमाजी मंडळींना बहिष्कृत समजण्याचा तो काळ असल्यामुळे सुरुवातीच्या या सुधारकांना आपल्या मुलामुलींचे विवाह होणे, त्या सोयरिकी सुखाच्या ठरणे जड जाईल याची कल्पना होती आणि त्यांना तसे अनुभवही येत.

या बाबतीत खुद्द सदाशिवरावांच्या धाकट्या बंधूंचे, वामनरावांचे उदाहरण पुरेसे बोलके ठरेल. या वामनरावांनी सुद्धा प्रथम प्रार्थनासमाजाची दीक्षा घेतली होती हे मध्ये आले आहेच. परंतु या त्यांच्या 'धर्मलंडपणा'चा दुष्परिणाम त्यांच्या सर्वांत मोठ्या मुलीच्या वैवाहिक जीवनावर झाला. अशा घरातली मुलगी आम्ही आपल्या घरात नांदवून घेणार नाही अशी तंबी वामनरावांच्या व्याह्यांकडून त्यांना मिळाली. त्यामुळे ते माघार घेऊन परत 'जुन्यात' गेले. तरीसुद्धा त्यांना व्हावयाची असलेली कठोर सामाजिक शिक्षा मात्र चुकली नाही. त्यांची विवाहित कन्या कृष्णा, कायमची माहेरी परतली! तेथून पुढे त्यांच्या या केळकरशाखेने धसकाच घेतल्यासारखे झाले आणि पुढे ताराबाईंच्या पिढीतसुद्धा सदाशिवरावांच्या कुटुंबाशी त्यांचे संबंध दुरावलेलेच राहिले. अगदी अलीकडच्या काळातसुद्धा माधवराव पुण्याला आपल्या चुलत बहिणीच्या घरी कधी गेले तर त्यांना आपले उष्टेशेण स्वहस्ते करावे लागे आणि आपल्या या चुलतभावाचा इतिहास शेजाऱ्यापाजाऱ्यांना कळला तर नसेल ना, या कल्पनेने बहीण धास्तावलेली असे.

या सर्व परिस्थितीमुळे प्रार्थनासमाजाच्या सदस्यांकडून आपल्या तरुण मुलामुलींना एकत्र येण्यास उत्तेजन दिले जात असे. सहली, वनभोजन व इतर मेळावे, उत्सवप्रसंग तर होतेच पण उपवर तरुणतरुणींचे खास परिचयसमारंभही घडवून आणले जात आणि ताराबाईंचे आईवडील आपल्या मुलींना अशा कार्यक्रमांना पाठवीतही असत. अशा स्थितीत या तरुण मुलामुलींनी परस्पर आपापसात किंवा कुणाच्या तरी मध्यस्थीने लग्ने ठरविणे अटळ आणि स्वाभाविकच होते. विद्यार्थी वर्गातल्या तरुण रहिवाशांपैकी प्रथम ताराबाईंच कळत न कळत या सुखाची वाट चालू लागल्या. विल्सन कॉलेजमध्ये शिकत असतानाच वडील भावांच्या न कळत, म्हटले तर देखत, त्यांचे मन आपली निवड करून चुकले! तारा व इंदिरा या दोन बहिणी आपल्या आईच्या अखेरच्या आजारात शिक्षणासाठी सुमारे दीड वर्ष श्री. जनार्दनपंत गद्रे यांच्या घरी राहत होत्या, त्या काळातली ही हकीकत. प्रार्थनासमाजाच्या मूळ संस्थापकांपैकी एक, प. वा. प्रि. वामन आबाजी मोडक, यांचे दोन मुलगे जनार्दनपंतांचे स्नेही होते. त्यापैकी डॉक्टर झालेले नारायणराव

मोडक तर मॅजेस्टिक सिनेमासमोर असलेल्या महाराजांच्या चाळीतल्या गद्र्यांच्या बिऱ्हाडी वरचेवर येत. खेळकर स्वभावाच्या, प्रसन्न व्यक्तिमत्त्वाच्या मोडकबंधूंबरोबर त्यांचा सर्वांत धाकटा भाऊ कृष्णाजी हाही गद्र्यांकडे केव्हातरी येत असे. कृष्णाजीला घरची मंडळी 'बेट्या' म्हणत, आणि मित्रमंडळी त्यांच्या नावातील के.व्ही. या आद्याक्षरांमुळे त्यांना 'केव्ही' म्हणून संबोधीत असत. ताराबाईही त्यांना केव्ही या नावानेच संबोधू लागल्या.

के.व्ही. मोडक पुण्याच्या डेक्कन कॉलेजातून प्रथम श्रेणीने पदवी मिळवून आता एल्एल्. बी. च्या टर्मसे भरीत होते. पुढे केळकरमंडळी बदामवाडीत, मारवाड्याच्या चाळीत स्वतंत्र बिऱ्हाड थाटून राहू लागल्यानंतर श्री. कृ. वा. मोडक स्वतंत्रपणाने तेथे येऊ जाऊ लागले. तरुण, बुद्धिमान आणि मोकळ्या स्वभावाच्या ताराबाईंच्या सहवासाचे आकर्षण वाटून केव्हींची विद्यार्थी क्रमातली ये–जा वाढते आहे ही गोष्ट हळूहळू सर्वांच्या लक्षात आली.

के.व्ही. ताराबाईंपेक्षा सहा वर्षांनी मोठे होते. केव्ही आणि ताराबाई ह्या दोघांची सांस्कृतिक पार्श्वभूमी बरीच सारखी होती. कुमारवयातच दोघे पोरकी झाली होती. दोघांच्या आवडीनिवडीत बरेच साधर्म्य होते. खेळ, गायन, साहित्य असे अनेक छंद समान होते. केव्हींचे आकर्षक व्यक्तिमत्त्व, उमदा स्वभाव आणि दिलखुलास वागणे यांमुळे ताराबाईंसारखी तरुण मुलगी त्यांच्याकडे आकर्षित झाली यात काही नवल नव्हते. घरी तर ते येतच, बाहेरही प्रार्थनासमाजातल्या उत्सवप्रसंगी, इतर समारंभांच्या ठिकाणी ते दोघे एकत्र येऊ लागले. ताराबाईंची भेट घेण्यासाठी केव्ही त्यांच्या कॉलेज-मध्येही जाऊ लागले. पाहता पाहता ताराबाईंची मर्जी, मैत्री केव्हींनी संपादन केली.

उंच नव्हे परंतु सडपातळपणामुळे उंचेली वाटणारी अशी शरीरयष्टी, सतेज, गुलाबी रंग, उमदा चेहरा, पाठ आणि नाक, या दोन्हीत नजरेला जाणवेल न जाणवेल इतका बाक आणि डोळ्यांवर काळ्या फ्रेमचा चष्मा असूनही विलक्षण चलाख, तरतरीत अशी नजर असे ताराबाईंना १९१० च्या सुमारास भेटलेले केव्ही होते. केव्हींचे नुसते बाह्यरूप रुबाबदार नव्हते तर त्यांचे एकूण व्यक्तिमत्त्वसुद्धा अतिशय संपन्न, उत्तम रीतीने जोपासलेले होते. अत्यंत काटेकोर, पाश्चात्त्य पद्धतीचा पांढराशुभ्र किंवा क्रीम कलरचा पोशाख ते करीत असत. तोंडात चिरूट, पायाशी एखादा उत्तम जातीचा कुत्रा आणि हातात चालताना सपासप लवणारी छडी. त्यांचा ग्रंथसंग्रह आणि वाचन दोन्ही दांडगे होते. टेनिस, क्रिकेट अशा साहेबी खेळांमध्ये त्यांना चांगली गती, आणि सरावही होता. संगीताचे, नाटकांचे ते दर्दी होते. अतिशय फर्डे इंग्रजी ते बोलत आणि तेदेखील विनोदरम्य, चुरचुरीत अशा संभाषणशैलीत.

छायाचित्रात पूर्णपणाने नमूद न होऊ शकणारे परंतु लहानांपासून वृद्धांपर्यंत सर्वांना आकर्षित करणारे असे काहीतरी केव्हींच्या प्रभावी व्यक्तिमत्त्वात होते आणि बऱ्याच



लोकांना त्यांची भुरळ पडे.

वयोवृद्ध माणसे केव्हींचा तडफदारपणा पाहून संतोषाने माना डोलावीत "यांना पाहिलं की आमच्या वामनरावांची ( मोडक ) आठवण येते हां बाकी !"

बॅरिस्टर मुकुंदराव जयकरांसारख्यांनी त्यांच्याविषयी उद्गार काढले होते, "मोड-कांच्या सगळ्या मुलांमध्ये धाकटा त्यांचं नाव काढील."

— परंतु अशा श्रीमान, विद्यालंकृत कुटुंबातल्या, राजबिंड्या रूपाच्या होतकरू तरुणाची ताराबाईंनी केलेली निवड त्यांच्या आप्तमंडळींना मात्र बिलकुल पसंत नव्हती. ताराबाईंच्या वडील भावांचेच नव्हे तर ज्या ज्यांना आईच्या, मावशीच्या ठिकाणी मानत त्या मांचे, म्हणजे डॉ. काशीबाई नवरंग्यांचे मतसुद्धा केव्हींबद्दल दूषितच होते. केव्ही आणि ताराबाई यांच्या वाढत्या सलगीकडे ती सगळीच प्रतिकूल नजरेने पाहत होती.

या साऱ्या प्रतिक्रियांच्या मुळाशी अनेक कारणे होती. ताराबाईंच्या परिवारातल्या मंडळींना, विशेषतः तात्यांना ताराबाईंनी लग्न करू ( च ) नये, मांसारखे तिने काहीतरी विधायक, समाजोपयोगी कार्य करावे व आपण तिच्या शिक्षणावर केलेला खर्च कारणी लावावा असे वाटत असे. अशा स्थितीत ताराबाईंनी कॉलेजशिक्षण पूर्ण करण्यापूर्वीच नक्की करत आणलेल्या या विवाहसंबंधाला त्यांच्याकडून तीव्र विरोध झाला. त्यातून ताराबाईंना लग्न करायचेच तर त्यांनी ते केव्हींसारख्या विलासी, रंगील्या वृत्तीच्या, खाण्यापिण्याचा फारसा विधिनिषेध न पाळणाऱ्या तरुणाशी करावे हे त्यांना आणखीच गैर वाटत होते. केव्हींबद्दल या मंडळींचे मत चांगले नव्हते, त्याच्या मुळाशी नुसते केव्हींचे ख्याली खुशालीकडे झुकणारे वर्तन नसून मोडक कुटुंबाचा समाजात जो चमत्कारिक, मिश्र लौकिक होता तोही बराचसा कारणीभूत होता.

ताराबाईंच्या बालपणी किंवा एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातच मोडकांचे सुधारक, प्रार्थनासमाजिस्ट घराणे नावारूपाला आलेले होते. प्रिन्सिपल वामन आबाजी मोडकांनी आपल्या हयातीत साठविलेला लौकिक त्या कोकणस्थ ब्राह्मण आडनावामागे उभा होता; परंतु त्याबरोबरच त्यांच्या पुढच्या पिढीच्या बदलौकिकाने, केवळ नियतीच खुलासा करू शकली असती अशा व्यसनाधीनतेने, आता ते घराणे डागळल्यासारखे झाले होते. मोडक मंडळींचा सांपत्तिक दर्जा, मोठेपणा, पुरोगामीपणा मान्य करूनही सुधारकांमधली पापभीरू, ध्येयवादी व मूल्ये जपणारी माणसे या भावांपासून चार पावले दूर राहणे पसंत करीत असत.

— कोकणात दापोलीजवळच्या जालगाव या आडगावात श्री. मोरेश्वर मोडक नावाचे एक दरिद्री ब्राह्मण गृहस्थ राहत असत. हे मोडक वृत्तीने अर्धवैरागी होते. त्यामुळे आर्थिक परिस्थिती नेहमीच बेतासबात असे. प्रपंचात त्यांचे लक्ष सुमारच असे. या मोरेश्वरांना १८३५ साली एक मुलगा झाला; त्याचे नाव वामन. हा मुलगा अवघा आठ वर्षांचा

झाला, त्याची मुंज करण्यात आली आणि पाठोपाठ मोरेश्वर मोडकांना देवाज्ञा झाली.

छोटा वामन मोडक एकीकडे आपल्या माथ्यावरचे आईच्या मायेचे अर्धछत्र आणि दुसरीकडे गरिबी या दोन गोष्टींसह एकट्यानेच आयुष्यातून वाट काढू लागला. काही नातेवाईक त्याला थोडीफार पैशाची मदत करीत असत. लाडघर येथे राहून, माधुकरी मागून वामन आपली शाळा करू लागला. शिक्षणासाठी लाडघर, दापोली, आडे, हर्णै असे गावोगाव भटकत अखेर सोळाव्या वर्षी, वामनने मराठी शिक्षण पूर्ण केले— तेव्हा झाले एवढे विद्यार्जन पुष्कळ झाले असे नातलगांनी ठरविले आणि मुलगा हर्णैच्या कोर्टात उमेदवारी करू लागला. वामनची शिक्षणाची भूक मात्र शमली नव्हती.

आता त्याने जालगाव ते दापोली अशा फेऱ्या करत दापोलीच्या मिशनरी गुरूंकडून इंग्रजी शिकण्यास सुरुवात केली. वर्ष दीड वर्ष हे शिक्षण घेतल्यानंतर पुन्हा गाडी थांबली. घरात आता वामनच्या इच्छेविरुद्धच त्याच्या लग्नाचे बेत घाटू लागले होते. " अरे, तुझी आई आता थकली. तिने किती दिवस सुनेची वाट पाहावी ? लग्न तर कर. शिक्षणाची काहीतरी सोय मग पुढे करता येईल. "— असे म्हणून नातेवाईक त्याला बोहल्याकडे चालवीत होते तर " लग्नासाठी जो खर्च करायला तयार आहात तो खर्च माझ्या शाळेवर करा, माझ्या शिक्षणाची काहीतरी सोय लावून द्या, " म्हणून वामन अखेरपर्यंत त्यांना विनवीत होता ! पण त्यात यश न येऊन शेवटी पालघर येथील मनकर्णिका ( रत्नमाबाई ) दीक्षित नावाच्या मुलीशी वामन मोडकचा वयाच्या १७ व्या वर्षी विवाह झाला.

—अभ्यासाची सोय मात्र झाली नाही.

परंतु हा मुलगा तसा स्वस्थ बसणारा नव्हता ! आईचे मन वळवून, हितचिंतकांकडून रुपया–पैसा मदत मिळवून वामनने थेट मुंबई गाठली.

१८५५ सालची ही गोष्ट; त्या काळी कोकणातल्या एका दरिद्री ब्राह्मण मुलाने एकटे मुंबईला येणे ही मोठ्या धाडसाची, खडतर प्रवासाची बाब ! वरखर्चासाठी म्हणून वामनच्या आईने दहा रुपयांची पुंजी त्याच्या हवाली केली होती.

मुंबईत आल्यावर वामनने कुणाच्या तरी ओसरीवर, सांदीकोपऱ्यात राहण्याची सोय लावून घेतली. काही शिकवण्या मिळविल्या आणि एलफिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्ये नाव घातले. रस्त्यावरच्या दिव्याच्या उजेडात अभ्यास करीत, एका पारशी विद्यार्थी फंडातून मोठी शिष्यवृत्ती मिळवून अखेर १८५९ साली वामन मॅट्रिक्युलेशनची परीक्षा उत्तीर्ण झाला. मुंबईत घेतली गेलेली ही पहिली मॅट्रिकची परीक्षा.

पुढच्या वर्षी लगेच वामनने एलफिन्स्टन कॉलेजात नाव घातले. आदल्याच वर्षी मुंबई विश्वविद्यालयाची स्थापना झाली होती आणि लगेच १८५९ साली युनिव्हर्सिटीची पहिली प्रवेशपरीक्षा झाली. त्या परीक्षेला वामन बसला. कृष्णाजीपंत बाळ, महादेव



गोविंद रानडे, रा. भांडारकर हे सर्व वामनरावांचे सहाध्यायी.

गिरगावात एक खोली भाड्याने घेऊन आता कृष्णाजी बाळ, केशव बाळ, वामन मोडक असे तिघेचौघे विद्यार्थी एकत्र राहू लागले. जेवणासाठी रोज खाणावळीत जाण्याची कुणाचीच ऐपत नव्हती. तेव्हा स्वहस्तेच पाणी भरायचे, धोतरे धुवायची, बाजारहाट करायची आणि स्वयंपाकही करायचा. स्वयंपाक करायची तऱ्हा अशी की एकेकाने पाळीपाळीने चुलीशी बसून रांधायचे आणि इतरांनी त्याला लहानसहान कामे करून मदत करीत एकीकडे सर्वांना सारखे असे जे विषय असतील ते पाळीपाळीने, मोठ्याने वाचायचे. चरितार्थ चालवण्यासाठी अभ्यास सांभाळून उरलेल्या वेळात शिकवण्या करायच्या.

असेच कमीअधिक कष्ट उपसून १८६२ साली जी मुंबई विश्वविद्यालयाची पहिली बी.ए.ची परीक्षा झाली तीत वामनराव उत्तीर्ण झाले. त्यांच्याबरोबरच बाळ मंगेश वागळे, रामकृष्णपंत भांडारकर, माधवराव रानडे ही सर्व मंडळी पदवीधर होऊन बाहेर पडली. पुण्याच्या कॉलेजात वामनरावांना फेलोशिप मिळाली. वामनराव त्यानंतर इंग्रजी आणि संस्कृत हे दोन विषय घेऊन एम.ए.ही झाले आणि हा त्यांचा विद्याव्यासंग हयातभर चालू राहिला. संस्कृत, मराठी व इंग्रजी ग्रंथांचा मोठा संग्रह त्यांनी केला होता. मराठी भाषेवर त्यांचे विशेष प्रेम. व्युत्पत्ती, न्याय, साहित्य, वेदान्त इत्यादी शास्त्रे ते संस्कृत पंडितांजवळ जुन्या पद्धतीने शिकले. शारीरभाष्य, उपनिषदे आणि इंग्रजी गद्य–पद्य यांचा त्यांचा विशेष अभ्यास होता. इंग्लंड, ग्रीस, इटली इ. देशांवरचे सर्व ऐतिहासिक ग्रंथ तसेच ख्रिस्ती, बौद्ध, यहुदी, पारशी या सर्व धर्मांचे मुख्य ग्रंथ त्यांनी वाचून काढले होते. गुजराती, बंगाली आणि सिंधी या देशी भाषांवर त्यांनी प्रभुत्व मिळविले होते. गुजरातीतून तर ते कीर्तने करीत. शिवाय आपल्या कवित्वशक्तीचा उपयोग करून अनेक मराठी प्रार्थनापर, उपदेशपर गीते त्यांनी रचली. रत्नागिरी येथे एक खास गवई ठेवून गायनकलेचा अभ्यास केला. हा प्रार्थनासमाजी ' हरदास ' उत्तम प्रवचने करी, उपासना चालवी. भगवद्‌गीता, उपनिषदे यांचे त्यांनी बरेचसे मराठी भाषांतर केले. शिवाय इतर स्फुट लेखन पुष्कळ केले. ( पुढे १९०८ साली ' वामन आबाजी मोडक यांची धर्मपर व नीतिपर व्याख्याने ' हा त्यांच्या लेखांचा भजनांचा व व्याख्यानांचा संग्रह के. रा. भि. जोशी यांनी प्रसिद्ध केला. )

उपजीविकेसाठी वामनरावांनी शिक्षकाचा पेशा स्वीकारला होता. त्यात झपाट्याने चढत जाऊन ठिकठिकाणच्या सरकारी हायस्कूलांमधून हेडमास्तरचे काम करीत १८८२ साली ते मुंबईच्या एल्फिन्स्टन हायस्कूलचे प्रिन्सिपल झाले. हे हायस्कूल त्यावेळी आदर्श समजले जाणारे होते. त्यामुळे तवढेच लायक प्रिन्सिपलही तेथे नेमले जात. इतकी मोठी

जागा आता प्रथमच एका ' नेटिव्हा 'ने भूषविली होती. बऱ्याच युरोपियन व पारशी लोकांनी आणि अँग्लोइंडियन वृत्तपत्रांनी या नेमणुकीबद्दल तीव्र निषेध व्यक्त केला. परंतु मोडकांनी नोकरीतले हे आव्हान आणि सन्मान समर्थपणाने पेलले. युरोपियन प्रिन्सिपलांइतकेच कर्तबगार आणि शिस्तीचे एक मुख्याध्यापक असे नाव कमावून त्यानंतर दहा वर्षे नोकरी करून वामनराव सरकारी नोकरीतून निवृत्त झाले (१८९३).

१८७२ साली वामनरावांची मुंबई युनिव्हर्सिटीचे सदस्य म्हणून नेमणूक झाली. आठ वर्षे ते सिंडीक होते.* या काळात मुंबई विश्वविद्यालयात मराठीला योग्य स्थान मिळावे म्हणून त्यांनी पुष्कळ प्रयत्न केले. १९८३ मध्ये त्यांना जे. पी. करण्यात आले. निवृत्तीनंतर तीन वर्षांनी सरकारने त्यांना सी. आय्. ई. हे गौरवपद देऊन (१८९६) त्यांचा सन्मान केला. P

वामनराव मोडक हे प्रार्थनासमाजाच्या मूळ संस्थापकांपैकी एक. बदलीच्या नोकरीमुळे त्यांचे वास्तव्य निरनिराळ्या गावी होई; परंतु या नव्या धर्मप्रणालीचा प्रचार आणि प्रसार व्हावा म्हणून त्यांनी सतत प्रयत्न केले. स्त्रीशिक्षण, विधवाविवाह, जातिभेद-निर्मूलन, बालविवाहप्रतिबंध इ. सुधारणांच्या बाबतीतही त्यांचे प्रयत्न अखंड चालू असत. पुनर्विवाहाच्या चळवळीचे तर ते महत्त्वाचा आधारस्तंभ होते.

रत्नागिरीसारख्या ब्राह्मणनगरीत, सनातनी लोकांपुढे त्यांनी एका व्याख्यानात पुनर्विवाहाला जाहीरपणे, ठामपणे पाठिंबा व्यक्त केला आणि त्यामुळे त्यांच्यावर रत्नागिरीकरांनी बहिष्कारही घातला.

वामनरावांनी मारुतीच्या देवळात आपल्या पुराणमताभिमानी बांधवांना उद्देशून भाषण करताना म्हटले,†

" मला जी शिक्षा दिली आहे ती फाशीच्या शिक्षेहूनही जास्त आहे. मी आपले लेकरू आहे. माझा अपराध काय व त्याचे प्रायश्चित्त काय ते कळवा. मग काय करणे असेल ते करा... बांधवहो, तुम्ही मला सोडले याचे मला विशेष वाईट वाटत नाही. परंतु आपली कृतघ्नता पाहून मला फार वाईट वाटते. केवळ परोपकारबुद्धीने, आपला काडीमात्र स्वार्थ न पाहता, लोकोपयोगी कृत्यास मी झटत असून तिकडे लक्ष न देता तुम्ही मजवर इतक्या लोकांमध्ये असला प्रसंग आणलात; असो. तुम्हास माहीतच आहे

---

* सिंडीक : Member of special committee the Senate.

P सी. आय्. ई. म्हणजे ' कंपॅनियन ऑफ दी इंडियन एम्पायर ' ही बहुमानाची पदवी इंग्लंडच्या बादशहाकडून दिली जात असे.

† ' वामन आबाजी मोडक यांची धर्मपर व नीतिपर व्याख्याने '—ले. रा. मि. जोशी



की माझी कोणी आप्त वगैरे विधवा असून तिचा पुनर्विवाह करणे आहे, त्याकरिता मी झटतो असे नाही; व यात माझा काही एक फायदा नाही. तुम्ही जरी मला टाकले तरी मनापासून तुम्हांस सांगतो की तुमच्या कल्याणाकरिता माझ्या हातून जेवढे होईल तेवढे मी मरेपर्यंत करण्यास कमी करणार नाही. मला तुम्ही मान्य व पूज्य आहा. परंतु तुमच्यापेक्षा परमेश्वर व माझे अंतःकरण मला अधिक मान्य व अधिक पूज्य आहे... विधवाविवाह कायदेशीर व उपयुक्त आहे अशी माझी पूर्ण खात्री आहे. तुम्ही चालवलेल्या छळास मी हार जाणार नाही..." (६ सप्टेंबर १८६९)

दहा वर्षांच्या या बहिष्कारकाळात वामनराव आणि त्यांच्या कुटुंबाला पुष्कळ हाल काढावे लागले. परंतु भले भले खचले तरी वामनरावांनी कच खाल्ली नाही आणि रखमाबाईंनीही त्यांना साथ दिली.

सरकारी नोकरी मिळाल्यानंतर मूळच्या दरिद्री वामनरावांची सांपत्तिक स्थिती मात्र कायमची सुधारली. त्या काळी सरकारी हायस्कूलच्या प्रिन्सिपलला रुपये चारशे किंवा त्याहून अधिक मासिक प्राप्ती असे. त्यामुळे मोडक कुटुंबाचे राहणीमान, खाणेपिणे, कपडेलत्ते गर्भश्रीमंतांप्रमाणे झाले. आश्रित मंडळीही पुष्कळ असे. पुष्कळशा धार्मिक, सामाजिक संस्थांना वामनरावांनी देणग्या दिल्या.

वामनरावांची वागणूक निष्कलंक, वृत्ती साधूची. शाळेत तशीच घरात शिस्त; धार्मिक शिस्त कडक. मूर्तिपूजा त्यांना मान्य नव्हती. परंतु ईश्वरोपासना अखंड चालू असे. त्यांची एकूण वृत्ती सहिष्णू आणि सौम्य. राजकीय बाबतीतही मते नेमस्त. राजकीय सुधारणा होणे आवश्यक आहे परंतु त्यापूर्वी सामाजिक आणि धार्मिक बाबतीत प्रगती, सुधारणा करून भारतीयांनी आपली पातळी वाढवली पाहिजे, अशा मतांचे ते होते. युरोपियन लोकांमध्ये त्यांच्या शब्दाला मोठा मान असे आणि देशी लोकांच्या हितासाठी त्यांनी आपले हे वजन अनेकवेळा उपयोगात आणले. कधी काळी केलेल्या विडीकाडीच्या छंदाखेरीज त्यांचा स्वभाव निर्व्यसनी होता. दुसऱ्याला मदत करायची एक प्रकारची तत्परता त्यांच्या स्वभावातच होती.

" अहो, साऱ्या सुधारणा आटोपल्या आणि आता तुम्ही ××××× ची लग्ने लावीत सुटलात ? " अशा उपहासाला वामनरावांनी न रागावता उत्तर द्यावे,

" महाराज, तुम्ही ज्यांना ××× म्हटलेत त्या कोणाच्या तरी आयाबहिणीच आहेत आणि आपल्यापैकी प्रत्येकाचीच आई, बहीण, बायको त्या स्थितीला जाण्याचा संभव आहे, तेव्हा हे लक्षात ठेवून प्रत्येकाने बोलावे हे बरे ! "

जरी स्वतः त्यांच्या तोंडातून ' मूर्ख ' या शब्दाहून उच्च प्रतीची शिवी कधी निघाली नाही तरी दुसऱ्याच्या अक्षम्य वर्तनाला, अपशब्दाला त्यांनी कधी क्षमा केली नाही. धार्मिक आणि गंभीर वृत्तीच्या या गृहस्थांना ' टवाळा आवडणारा ' विनोद मात्र रुचत नसे.

निवृत्तीनंतर सामाजिक आणि धार्मिक उन्नतीच्या कार्याला वाहून घेण्याची वामनरावांची मनीषा पूर्ण होऊ शकली नाही. १८९७ साली आपले जवळचे मित्र न्यायमूर्ती रानडे यांच्या घरी मुंबई येथे त्यांचा मृत्यू झाला.

वामनराव आणि रखमाबाईंचा सहा मुलगे व तीन मुली असा परिवार होता. ह्यातली बहुतेक मुले पुढे चांगली शिकली; व्यासंग आणि विद्वत्ता या बाबतीत वडलांची परंपरा त्यांनी पुढे चालविली.

मात्र वामन आबाजी मोडक या साधुपुरुषाच्या पुढच्याच पिढीत– सर्वांमध्येच नव्हे परंतु बऱ्याच टक्क्यांनी, एक आश्चर्यकारक आणि दुर्दैवी बदल झाला ! त्यांच्या चिरंजीवांपैकी बहुतेकांच्या वृत्तीत सुखलोलुपता शिरली, अतिरिक्त मदिरापानासारखे दुर्धर व्यसन त्यांच्या घरात शिरले आणि सहापैकी चार मुलगे या व्यसनाच्या आहारी गेले ! 'सुधारकी' ह्या वाईट अर्थाचा शिक्का त्यांच्या घराला लागला. मोडक मंडळींबवळ असलेले बुद्धिमत्तेचे लेणे त्यामुळे डागाळल्यासारखे झाले.

वामनरावांच्या शिस्तीत, धार्मिक घडीत वाढलेली मुले अशी निघावीत, म्हणून जुनी मंडळी आश्चर्य करीत राहिली.

"वामनरावांची अतिशिस्तच मुलांच्या वाहवण्याला कारणीभूत झाली," असाही निष्कर्ष कुणी कुणी काढला. "अहो, त्या 'वामन आबाजी' पासून सारे असेच !" असे मूळच्या कर्मठ वृत्तीच्या वामनरावजींवरही शिंतोडे उडायचे बाकी राहिले नाहीत !

सदाशिवराव केळकरांच्या सर्व मुलांमध्ये चक्रमपणाच्या आसपास पोचावा इतक्या विक्षिप्तपणाचा धागा आला कसा व कोठून, हा जसा एक मानसशास्त्रीय अभ्यासाचा विषय होऊ शकेल त्याचप्रमाणे वामनरावांसारख्या सत्शील, पुरोगामी, ध्येयवादी व व्यासंगी गृहस्थांच्या मुलांमध्ये ही जी स्वैरचाराची छटा उतरली तिला अतिश्रीमंतीच्या वातावरणात त्यांची अतिशिस्तीने करण्यात आलेली वाढवणूक, भोवतालची परिस्थिती, त्यावेळी बालमनाला सहज न पेलणारी वातावरणातील सामाजिक क्रांतीची गती यापैकी किंवा इतर कोणती कारणे लागू ठरतील हाही एक संशोधनाचा वेधक विषय होऊ शकतो.

केव्हींचे वडील वि. मोडक हे ताराबाईंचे वडील श्री. स. पां. केळकर यांच्यापेक्षा सुमारे पंधरा वर्षांनी मोठे; म्हणजे अर्ध्याअधिक पिढीने वडील. दोघेही वयाच्या अठ्ठावनाव्या वर्षी निधन पावले. म्हणजे त्यांच्या मृत्यूंमध्येही पंधरा वर्षांचे अंतर होते. प्रार्थनासमाजाच्या चळवळीच्या संदर्भात पाहिले तरी वामनराव मूळ संस्थापकांपैकी एक, तर सदाशिवराव प्रार्थनासमाजाचे प्रथम प्रचारक. म्हणजे सदाशिवरावांपेक्षा वामनराव सर्वार्थाने वडील, तरीही कार्यकर्ते म्हणून समकालीन असे होते. सदाशिवरावांना आपल्या या ज्येष्ठ समाजबंधूंच्या विद्वत्तेविषयी धार्मिक ज्ञानाविषयी नितान्त आदर वाटत असे व वामनरावांशी त्यांचा प्रत्यक्ष संबंधही वारंवार येत असे.



१८८२ साली सदाशिवराव प्रचारक झाल्यानंतर पहिल्या वर्षी त्यांनी आपल्या कामाचा जो अहवाल सादर केला त्यात सदाशिवरावांनी लिहिले,

"गेल्या वर्षी सहासात महिने मी पुण्यास राहिलो होतो, त्याचा मुख्य उद्देश स्वतःची माहिती वाढविण्याकरता प्रो. रामकृष्णपंत भांडारकर व रा. रा. वामनरावजी मोडक ह्यांचा सहवास करावा हा होता... त्यांजपाशी मी काही ग्रंथांचा भाग वाचिला व धर्मसंबंधी विषयांवर संभाषण केले. त्यांपासून मला फार लाभ झाला. ह्यांसारख्या गृहस्थांचा सहवास होईल तितका चांगलाच. हल्ली वामनरावजींचे राहणे मुंबईस झाले आहे. ही एक आनंदाची गोष्ट आहे..."*

प्रार्थनासमाजाचे मुंबईत जे सामुदायिक कुटुंब निर्माण झाले होते त्यात मोडक आणि केळकर ही दोन्ही घरे समाविष्ट होतीच. त्यामुळे त्यांच्या मंडळींचा परस्परांशी चांगला परिचय होता. १९०६ साली सदाशिवरावांच्या मृत्यूनंतर उमाबाई आजारपणामुळे अंथरुणाला खिळल्या तेव्हा श्री. रखमाबाई मोडक अधूनमधून त्यांच्या समाचाराला जात असत. आपल्या दोघींच्या मृत्यूनंतर आपल्यात केव्ही–ताराबाई संबंधांमुळे विहिणींचे नाते निर्माण होणार आहे हे या दोन थोर व निष्ठावंत प्रार्थनासमाजिस्टांच्या वा सहचारिणींच्या कल्पनेतही आलेले असणे अर्थातच संभवनीय नाही !

केव्ही ( जन्म १८८७ ) अकरा वर्षांचे असताना त्यांचे वडील परलोकवासी झाले आणि १९०७ साली म्हणजे ते विशीत असताना रखमाबाई वारल्या. ताराबाईंचे पालकही याच क्रमाने त्या तारुण्यात पदार्पण करीत असताना निधन पावले होते.

केव्हींचे पदवीपर्यंतचे शिक्षण पुण्याच्या डेक्कन कॉलेजात झाले आणि नंतर वकिलीचा अभ्यासक्रम त्यांनी मुंबईला पूर्ण केला. "खूप खाणे, खूप खेळणे आणि खूप अभ्यास" अशा शब्दांत केव्हींनी स्वतःच्या कॉलेजजीवनाचे वर्णन केले आहे. त्यांच्या दिलखुलास स्वभावामुळे त्यांना विद्यार्थीदशेपासून अमाप लोकप्रियता लाभली होती. किंबहुना आपल्या विस्तृत स्नेहवर्तुळाचा केंद्रबिंदू होऊन वावरण्याची विशेष कला व आवड त्यांच्या ठिकाणी होती. हे केंद्रबिंदूपण मिळण्यामागे सहजता असे त्याचप्रमाणे खुब्या, प्रयत्नही असत ! त्यामुळे विद्यार्थीजीवनात व नंतरसुद्धा नेहमीच त्यांच्याभोवती मित्रमंडळींचा गराडा पडलेला दिसे. या स्नेहीमंडळीत अभ्यासूंपासून ते खेळाडू किंवा खुशालचेंडूंपर्यंत सर्व प्रकारची विविधता असायची. 'एक बुद्धिमान विद्यार्थी' म्हणून ते गुरुजनांकडूनही पावती मिळवून होते. अशीच मौजमजा आणि अभ्यासही करीत, आपल्या प्रमाणपत्रावर बुद्धिमत्तेचा शिक्का उमटवून घेऊन केव्हींनी शिक्षण संपविले. इंग्लंडला जाऊन बॅरिस्टर होऊन येण्याची कल्पनाही त्यांच्या डोक्यात घोळत होती; परंतु काही कारणाने ते बारगळले.

* 'प्रार्थना समाजाचा इतिहास'

एलएल्. बी. झाल्यावर कोठेतरी स्वतंत्र वकिली करायची असा त्यांचा बेत होता. वऱ्हाडात वकिली उत्तम चालते असा सल्ला त्यांना त्यांच्या क्षेत्रातल्या हितचिंतकांनी दिला आणि त्याप्रमाणे या तरुण वकिलाने मध्यप्रदेशातले अमरावती हे टुमदार गाव निवडले व प्रॅक्टिस सुरू केली. १९१३ सालची ही हकीकत. या वेळपर्यंत केव्हींचे तिघे भाऊ मुंबईत वेगवेगळ्या खात्यात नोकरी करीत होते, आणि डॉक्टर झालेले दोघे बंधू सैन्यात दाखल होऊन कॅप्टन झाले होते.

आता मोडकांचे एकछत्री कुटुंब असे राहिलेच नव्हते. मोडक कुटुंबाचा आणखी एक विशेष म्हणजे या सर्व भावांचे आपापसात सलोख्याचे संबंध होते; पत्रव्यवहार, येणे-जाणे, वडिलांच्या कर्तृत्वाचा अभिमान हे सारे होते; तरी त्या काळच्या मानाने त्यांचे आपापसातले संबंध काहीसे तुटक, किंवा पाश्चात्य पद्धतीचे कमी घनिष्ठ असे होते. ‘ एकमेकांच्या फंदात न पडणे ’ अशा प्रकारचा वैशिष्ट्यपूर्ण आधुनिकपणा त्यांच्यात उत्पन्न झाला होता, तो त्यांच्या पाश्चात्य राहणी-विचारसरणीचाही परिपाक असावा.

अमरावतीला जाऊन वकिलीला आरंभ केल्यानंतर अल्पावधीतच केव्हींनी Criminal law च्या क्षेत्रात आपल्या तीक्ष्ण बुद्धीच्या व भाषाप्रभुत्वाच्या जोरावर विशेष लौकिक संपादन केला. वऱ्हाडातले एक बिनीचे वकील, अशी त्यांची कीर्ती वऱ्हाडातच नव्हे तर मुंबई-पुण्यापर्यंत पसरू लागली.

त्यापूर्वीच केव्हातरी केव्ही आणि ताराबाई यांच्या स्नेहाचे रूपांतर प्रेमात झाले होते आणि ताराबाईंच्या कंपूतून त्याबद्दल निषेध नोंदविला गेला होता. अर्थात तोपर्यंत ताराबाईंची स्वतःला जे पटेल तेच करण्याची वृत्ती सर्वांना माहीत झाली होतीच. ताराबाईंनी केव्हींच्या प्रेमात पडताना कुणाच्याच मंजुरीची, परवानगीची वाट पाहिली नव्हती !

एका रम्य सायंकाळी मलबार हिलवर, हँगिंग गार्डनच्या परिसरात मुंबईच्या पल्लेदार दिव्यांच्या आणि आकाशात उमटू लागलेल्या चांदण्यांच्या साक्षीने, सागरतीराचे वरून दर्शन घेत केव्ही आणि ताराबाईंनी एकमेकांना प्रीतीचा गोड कबुलीजबाब दिला-घेतला.

लोणावळा येथे मुंबई-पुणे रस्त्यावर न्या. रानडे, वागळे, जस्टिस तेलंग, वा. आ. मोडक इ. सुधारकमित्रांनी ओळीने बंगले बांधले होते. एका लहानशा सुट्टीत केव्हींनी केळकरभावंडांना तेथे नेले. मोडकांच्या बंगल्याभोवती मोठे आवार व सुंदर बगीचा पाहण्यास आला होता. बंगल्याच्या पुढ्यात एक पुष्करिणी आणि मागे तुळशीवृंदावन, नकुलीची झाडे होती. पुढला व्हरांडाही फुलवेलींनी सुशोभित केलेला होता. वामन आबाजींच्या ऐश्वर्याच्या खुणा बंगलाभर विखुरल्या होत्या. दिवाणखान्यात मध्यभागी त्यांचे मोठे थोरले छायाचित्र लावले होते. ताराबाईंनी सादर, कुतूहलपूर्वक केव्हींच्या दिवंगत वडिलांच्या चेहऱ्याकडे नजर लावली. “ स्त्रियांचा सामाजिक दर्जा वाढावा, व त्यांनी योग्य शिक्षण घेऊन आपल्या देशाच्या उन्नतीचे काम करण्यास हातभार लावावा, त्यात देशाचे फार हित आहे ” अशा प्रकारचे विचार केव्हींच्या या सुधारक तीर्थरूपांनी वेळोवेळी व्यक्त केले होते. ( त्यांचा मृत्यू होऊन आता सोळा सतरा वर्षे लोटली होती. ) मिशीपाशी जरब परंतु डोळ्यांत स्नेहार्द्रता, अशी वामन आबाजींची पागोटेधारी चर्या, लांब काळा कोट, मानेवरून पुढे आलेले सरळ उपरणे, हातात एक ग्रंथराज. खुर्चीत घातलेली खास, मुख्याध्यापकी बैठक ... प्रि. मोडकांच्या प्रतिमेला पदवीच्या दिशेने वाटचाल करत असलेल्या त्यांच्या या ( भावी ) सुनेने नमस्कार केला.



केव्हीही आपल्या कर्तृत्ववान पित्याच्या तसबिरीकडे अभिमानाने पाहत होते. तसबिरीवरून दृष्टी न काढता त्यांनी ताराबाईंना सांगितले,

“ आमच्या वडिलांच्या कीर्तीला, नावाला काळिमा फासणारे वर्तन कधीही करायचे नाही, असा आम्ही सर्व भावांनी निश्चय केला आहे. विष्णूच्या वागण्याची आम्हा सर्वांना फार चीड आहे. आमच्या वडिलांचे सी. आय. ई. सुवर्णपदकसुद्धा त्याने दारूपायी ...”

केव्हींचा स्वर विलक्षण उत्तेजित झाला होता.

मोडकबंधूमधील दुसऱ्या क्रमांकाचे बंधू विष्णुपंत हे दुर्दैवाने व्यसनी, मदिराभक्त निघाले होते. एकीकडे ‘ इंदुप्रकाश ’सारख्या वर्तमानपत्रांमध्ये आपली संपादन-लेखनशक्ती व भाषाप्रभुत्व सिद्ध करीत, टिळकांवर ‘ ब्रेव्हेस्ट ऑफ द ब्रेव्ह ’ हे ( नंतर सरकारजमा करण्यात आलेले ) प्रभावी काव्य लिहिणारे केव्हींचे हे अविवाहित भाऊ उत्तम खेळाडूही होते. ताराबाईंना आपला निश्चय ऐकवताना या विष्णुपंतांचाच उल्लेख केव्हींनी केला होता.

केव्हींच्या रंगेल वर्तनाविषयी थोडेफार किल्मिष ताराबाईंच्या मनात रेंगाळत असलेच तर ते त्यांच्या या वक्तव्यामुळे समूळ उपटले गेले. धूम्रपानासारखे नाद सौम्य स्वरूपात तेव्हाही केव्हींना होते, परंतु असे गुंते आपण हलक्या, हळुवार हाताने सोडवू शकू, असा ताराबाईंना विश्वास वाटला असावा.

याच मुक्कामात आकाशातल्या चंद्राच्या आणि धाकट्या इंदिरेच्या साक्षीने त्या दोघांनी एकमेकांशी विवाहबद्ध होण्याचा निर्णय घेतला. आपल्या प्रीतीच्या संदर्भात नवा आत्मविश्वास घेऊन ताराबाई मुंबईला परतल्या. त्यांच्या केव्हींबद्दलच्या आकर्षणाचे आता हट्टात, निग्रहात रूपांतर झाले होते.

ताराबाई कॉलेजच्या दुसऱ्या अथवा तिसऱ्या वर्षात असताना त्यांचे हे लग्न ठरले. १९१३ साली, केव्ही अमरावतीला निघून गेले. इकडे ताराबाईंनी पदवीचा अभ्यास पूर्ण करावा आणि तोवर तिकडे केव्हींनी वकिलीचा जम बसवावा अशी त्यांची आपापसात योजना असावी. त्याप्रमाणे योग्य वेळी म्हणजे १९१४ साली ताराबाई बी. ए. उत्तीर्ण झाल्या. अहिल्याबाई भांडारकर यांनीही फ्रेंच हा विषय घेऊन उत्तम रीतीने पदवी प्राप्त केली. निकालानंतर थोड्याच दिवसांनी ताराने आपल्या घरी

आपल्या मैत्रिणींना बोलावून त्यांना खास ' पार्टी 'ही दिली. आणि ही उत्सवी पार्टीच निरोपाची पार्टीही ठरली ! अहिल्या पुढे एम. ए. झाली आणि शिक्षणक्षेत्रात तिने नाव कमावले. मात्र काही कौटुंबिक कारणामुळे ती डॉ. काशीबाईंप्रमाणे आजन्म अविवाहित राहिली. तारा एम. ए. होईपर्यंत थांबली नाही. केव्हींचे अमरावतीत चांगले बस्तान बसले हे जाणून त्या दोघांनीही शेवटचे पाऊल टाकण्याचे ठरवले असावे. एका सुट्टीत ताराबाई नागपूरला गेल्या त्या मग परतल्याच नाहीत. त्यांच्या या लग्नासंबंधी त्यांच्या भावंडांकडून होणाऱ्या विरोधात काही फरक पडला नव्हताच. इंदूरला स्थायिक झालेल्या आपल्या वडील भावाला त्यांनी परस्पर पत्र लिहिले आणि आपण अमरावतीला जाऊन केव्हींशी रजिस्टर पद्धतीने विवाहबद्ध होत असल्याचा बेत कळवून त्यांचे आशीर्वाद मागितले. तसेच लग्नाचे स्थळ, तारीख वगैरे तपशील कळवून त्यांनी तरी आपल्या बाजूने लग्नाला हजर राहावे, अशी फार आग्रहाची विनंती त्यांना केली.

तात्यांनी बहिणीला उत्तर लिहिले की, " आपल्या आईवडिलांची लोकोपयोगी जीवन जगण्याची शिकवण तुला ठाऊक आहेच. तू या लग्नसंबंधामुळे वडिलांनी दाखवलेल्या मार्गापासून दूर जात आहेस असे आम्हा सर्वांनाच वाटते. त्यातून या मोडकमंडळींचा लौकिक चांगला नाही. त्यांच्यापैकी एकाचे बहकलेले वागणे तर तुझ्याही कानावर आहेच; स्वतः केव्ही मोडकांचे वागणेही याबाबतीत थोडेफार सैल व रंगेलपणाचेच आहे, अशी माझी कल्पना आहे. तेव्हा हा तुझा निर्णय खरे पाहता आम्हा कुणालाच आवडणे शक्य नाही. त्यातून—"

अखेर या लग्नाला ताराबाईंच्या भावंडांपैकी फक्त हे तात्याच इंदूरहून गेले होते, " अरे, काहीतरी यस् फस् केलं नि लागलं लग्न झालं ! " म्हणत नाराजीने लग्नाला गेलेले तात्या नाराजीनेच तेथून परतले. ताराबाईंनी त्या सर्वांचाच फार मोठा अपेक्षाभंग केला होता.

१९१५ च्या फेब्रुवारीत नागपूर येथे नोंदणी पद्धतीने हा विवाह पार पडला. तिकडे ताराबाईंचे लग्न लागत असताना इकडे केळकरांच्या मुंबईच्या घरात मोठे चमत्कारिक वातावरण होते. सर्व मोठी माणसे घुसमटलेल्या मनाने आपले उद्योग उरकीत होती. घरातल्या वडील स्त्रिया कोपऱ्यात जाऊन मधूनच डोळे पुसत होत्या. छोट्या शांताला ( अळूरकर ) काही कळेना की लग्नासारख्या आनंदाचा आणि मंगल प्रसंग, आणि ही सारी अशी हिरमुसलेली, हुंदके दाबत असलेली का ?

डॉ. काशीबाईंना तर ताराबाईंबद्दल मोठीच हळहळ वाटत होती. पुढे बऱ्याच वर्षांनी त्यांनी यासंबंधी उद्‌गार काढले, " ताराबाईंनी के. व्हीं. शी लग्न करू नये असे माझे स्पष्ट मत मी त्यांना सांगितले होते. माणूस फार चंचल. स्त्रीमोह त्यांना सुटत नाही. थोडे दिवस ते ताराबाईंभोवती नाचले. त्याला त्या भाळल्या. त्यांची बुद्धी, त्यांचे इंग्रजी, गोंडा



घोळणे—"

पण एकटीच्या हिमतीवर एवढा धाडसी, सबंध आयुष्याची दिशा ठरवणारा निर्णय घेणाऱ्या ताराबाई स्वतः तरी पूर्णपणे निःशंक होत्या का ?

याही संबंधात निराळाच तपशील मिळतो. असे सांगतात की केव्हींशी लग्न करण्यासाठी ताराबाई अमरावतीला आल्या तेव्हा केव्हींच्या स्वच्छंदपणाचे ( बाटल्या, पत्रे इ. ) पुरावे त्यांना त्यांच्या खोलीतच सापडले होते ! मुंबईला त्यांना दिसलेले, भेटणारे केव्ही आणि अमरावतीचे, भोवती मुलहौशी लोकांचे कडे गोळा करून त्यात रंगलेले केव्ही यांच्यात बराच फरक होता आणि हा फरक धक्का देणारा होता. त्यामुळे ताराबाई हबकल्याच होत्या. लग्नाचा दिवस उजाडेपर्यंत ताराबाईंचे हितचिंतक त्यांना हे लग्न मोडण्याचा सल्ला देत होते. आणि ताराबाई विलक्षण बेचैन दिसत होत्या. लग्नाच्या आदल्या दिवशीसुद्धा ताराबाईंचे एक ज्येष्ठ स्नेही हरिभाऊ हर्पे त्यांना बजावत होते, " अजून विचार करा, नकार द्या ! तुम्हाला आईवडील नाहीत, मी तुम्हाला पाठीशी घालतो, सगळा वाईटपणा मी घेतो ! "

लग्नाआधीची ती शेवटची रात्र ताराबाईंनी रडून आणि जागून काढली. केव्हींना आपण दिलेला शब्द आपण पाळला पाहिजे, नंतर आपण त्यांना सुधारू शकू, अशा भूमिकेतून, जिद्दीने— कदाचित निरुपायाने— त्या लग्नाला उभ्या राहिल्या.

अशा रीतीने साठ वर्षांपूर्वीच्या काळात, माहेरच्या सर्व माणसांच्या मर्जीविरुद्ध घराबाहेर पडून, केव्हींशी प्रेमविवाह करून तारा केळकर ही आईवडिलांचा आधार नसलेली मुलगी ( सौ. ) ताराबाई मोडक झाली !

केव्हींनी मात्र आपल्या मनाजोगती सहचरी जिंकून आणली होती. त्यांच्या चेहऱ्यावर शंका नव्हती. ताराबाईंकरता तेथे आश्वासक हसू होते. नेहमीप्रमाणे मित्रमंडळींचा गराडा त्यांच्याभोवती होताच ! त्यांच्यापैकी कोणीतरी स्नेहादराने, कौतुकाने ताराबाई व केव्हींकडे पाहत विनोद केला, " आता मात्र केव्हींना टी. बी. झाला ! "

ताराबाईंना हसू आले, ते निरभ्र होते.

# ४. अमरावती

वऱ्हाडातल्या त्या हुमदार आडगावाने ॲडव्होकेट के. व्ही. मोडकांच्या सुशिक्षित पत्नीचे स्वागत एका विशिष्ट शैलीने केले,

" अमरावतीमें ताराबाई आ गई है ! "

या लहानशा वाक्यातील प्रत्येक शब्दामागे एक खास गर्भितार्थ आणि उद्गार दडलेला होता. आणखी एक वाक्यच्या वाक्यच उद्धृत करायचे तर, " ताराबाईंच्या रूपाने अमरावतीने पहिली जिवंत ( हाडामासाची ) पदवीधर स्त्री पाहिली ! "

स्त्रियाही पदवीधर असू शकतात ही गोष्ट वऱ्हाडातल्या या लहानशा नगरीने आजवर केवळ ऐकली, वाचली होती आणि म्हणून मानली होती. आता ताराबाई मोडकांच्या रूपाने हा दैवी चमत्कार खुद्द त्यांच्या गावातच राहावयास आला होता. अनेकजणांच्या सुधारणांच्या कल्पनांना त्यामुळे जोर चढल्यासारखा झाला, त्यांची उमेद वाढली.

केव्हींनी बरोबर आणलेल्या या मुंबईच्या सुविद्य सहचारिणीकडे, त्या दोघांच्या सहजीवनाकडे अमरावती गाव कुतूहलाने टक लावून, चमत्कारिक अपेक्षा ठेवून आणि तरीही काहीशा कुशंकेने पाहू लागले. केव्हींच्या मित्रपरिवाराला मात्र हा मोठा समसमा संयोग वाटला.

त्या काळी कॉलेज शिक्षण घेतलेली स्त्री म्हणजे एक मोठी अपूर्वाईची, चीज, अशा दृष्टीने समाज या मुलींकडे पाहत असे. आणि या मुलींनाही आपण म्हणजे विशेष कोणी-तरी, याची जाणीव असे. डॉ. काशीबाई नवरंग्यांसारख्यांचे तर म्हणणे असे, " ग्रॅज्युएट मुलींचं वागणं प्रत्येक बाबतीत, लहानसहान क्रियेतसुद्धा वैशिष्ट्यपूर्ण ठरलं पाहिजे, उठून दिसलं पाहिजे. साधा बिछाना घालणं किंवा तत्सम कृतीतही तिचा निराळेपणा सिद्ध व्हायला हवा. "

परंतु या कौतुकादराबरोबरच लोकांच्या मनात पदवीधर स्त्रीसंबंधी काही पूर्वग्रह, गैरसमजही होते. त्या काळी महाराष्ट्रात एकूण भारतातच पदवी प्राप्त केलेल्या स्त्रिया हाताच्या बोटांवर मोजण्याइतक्याच होत्या. या स्त्रिया जुन्या बायकांप्रमाणे गृहकृत्यात रमत नाहीत, त्यांना नुसते पाटावरून ताटावर आणि ताटावरून पाटावर करायला हवे असते, अशा प्रकारचे लोकांचे समज होते. सुशिक्षित स्त्रियांची छायाचित्रे, मुलाखती, मते, त्यावेळच्या वर्तमानपत्रांतून आवर्जून प्रसिद्ध केली जात. कु. कृष्णाबाई ठाकूर



एम्. ए., श्री. तापीबाई हर्डीकर एम्. ए., बी. एस्सी. अशा मुलींचे फोटो, पदव्यांसहित चित्रमयजगत, मासिक मनोरंजन, इत्यादींमधून प्रसिद्ध होत. आणि कु. ठाकुरांसारख्या विदुषी ' स्त्रियांचे हक्क ' किंवा तत्सम विषयांवर आपला स्वतंत्र विचार, मते मांडीत असत. पदवीधर स्त्रियांना सामाजिक संस्थांमधून, सभा-संमेलनातून भाषणासाठी आमंत्रणे येत. अमरावतीला आल्यानंतर ताराबाईंनासुद्धा अशा प्रकारची बोलावणी येऊ लागली आणि त्या सभांना जाऊ लागल्या.

ताराबाई अमरावतीला येऊन दाखल होतात तो तेथील विद्यामंदिरात ' स्त्री-शिक्षण ' या विषयावर त्यांचे एक व्याख्यान ठेवण्यात आले. टिळकांचे अनुयायी आणि अमरावती येथले एक लोकप्रिय सामाजिक पुढारी श्री. बाबासाहेब खापर्डे हे या सभेचे अध्यक्ष होते.

ताराबाईंनी आपल्या व्याख्यानातून श्रोत्यांना मुळात धक्का दिला. " स्त्रियांना शिक्षण हवे ते स्वोन्नतीकरता. सुशिक्षित स्त्रियाही अखेर स्त्रियाच असतात व त्यांना घर, संसार हे बंध जरूर हवेसे वाटतात.... संसार नेटका करण्याची हौस, सुशिक्षित स्त्रियांनाही असते. परंतु त्या शिकल्याच नाहीत तर त्या सामाजिक, राजकीय चळवळीत भाग कसा घेणार ? म्हणून स्त्री-शिक्षण हवे ... " अशा प्रकारचे विचार त्यांनी आपल्या भाषणात प्रकट केले.

शिकलेली बाई म्हणजे जगावेगळी फॅशन करत असेल, त्यातून या तर प्रार्थनासमाजी. तेव्हा राहणी जवळ जवळ खिस्ती असेल अशी लोकांनी आपल्या मनाची तयारी करून ठेवलेली ! ब्राह्मणी पद्धतीचे नऊवारी लुगडे नेसून त्यांच्यासमोर धीट तरीही शालीन पद्धतीने उभ्या राहिलेल्या ताराबाईंचा नीटनेटका, साधा पोशाख अमरावतीकरांच्या मनास आला.

ताराबाईंचे मृदू , मार्मिक बोलणे, संसार दक्षतेने, रसिकतेने करण्याची पद्धत, त्यांचे आकर्षक व्यक्तिमत्त्व हे सारे पाहून अमरावतीकरांना ' सुशिक्षित ' स्त्री या अभिनव प्राणिमात्राविषयी दिलासा मिळाल्यासारखे झाले.

ताराबाई लौकरच अमरावतीकरांच्या लाडक्या झाल्या. श्री. जयवंत वकिलांच्या पत्नी सौ. माई या तर त्यांची जिवाभावाची मैत्रीणच बनल्या.

ताराबाईंनी स्वतः आपल्या आयुष्यातील या व्याख्यानकाळावर पुढे उत्तर आयुष्यात जी मल्लिनाथी केली ती वाचण्यासारखी आहे—

" ...ते सर्व फार वरवरचे आणि खरे दर्शन न घडलेल्या अवस्थेतील होते, असे आता वाटते. त्या वेळी बी. ए. झालेल्या स्त्रिया फार कमी, म्हणून आम्ही फार सुशि-क्षित समजल्या जात होतो. त्यामुळे लेख लिहिणे, भाषणे करणे, हे आमच्या वाट्याला येई. थोडीफार वाहवाही होई. पण आता तो साराच काळ अनवड व उथळ वाटतो. "

मात्र ताराबाईंनी मिळविलेल्या पावतीमुळे केव्हींभोवती असलेले लोकप्रियतेचे, प्रसिद्धीचे

वलय आणखीच रुंदावले. त्यांनीही असेच आल्या आल्या अमरावतीचे लक्ष वेधून घेतले होते.

एव्हाना केव्हींना अमरावतीत प्रॅक्टिस करायला लागून तीन वर्षे झाली होती. वऱ्हाडातले नामांकित वकील सर मोरोपंत जोशी यांनी केव्हींना हाताशी धरले. मोरोपंतांचे मोडक आणि जयवंत हे दोन चेले. त्यांपैकी जयवंत दिवाणी खटले चालवीत व मोडक फौजदारी. त्या काळात वकिलीचा धंदा चांगला किफायतशीर असे. वऱ्हाडातले शेतकरी खूप श्रीमंत; आपापसात त्यांचे तंटे खूप. कित्येकदा या अशीलांकडे रोख पैसा नसे. मग ते सुवर्णरूपानेही फी देत ! फौजदारी खटल्यात केव्हींना कमालीचे यश मिळू लागले. त्यांच्या वकिली विजयांचे किस्से आख्यायिका बनून इतर वकिलांमार्फत, अशीलांच्या तोंडून बाहेर पसरू लागले. केव्हींचे वकिली नैपुण्य, त्यांची श्रीमंती, त्यांची रसिक राहणी यामुळे ते अविवाहितावस्थेपासूनच अमरावतीतले एक बडे प्रस्थ होऊन बसले होते ! बॅरिस्टर नसूनही केव्ही इंग्लंडला जाऊन बॅरिस्टर होऊन आले आहेत अशी एक वदंता सर्वत्र पसरली होती. ते एक साधे ॲडव्होकेट असतील यावर कुणाचा विश्वासही बसत नसे.

रोज सायंकाळी ऐटबाज पोशाख करून आपल्या जातिवंत कुत्र्याबरोबर केव्ही आपल्या त्या गमतीदार, तातडीच्या चालीने फिरायला निघाले की लोक एकमेकांना खुणा करीत, " ते पाहा, बॅरिस्टर मोडक चाललेत ! "

अशा या उमद्या वकीलसाहेबांनी आता मुंबईहून एक अनुरूप, तडफदार, सुशिक्षित तरुणी प्रेमविवाह करून जिंकून आणली होती !

अर्थात, लग्नाच्या वेळेस काही केव्हींचे वैभव कळसापर्यंत पोचले नव्हते, परंतु व्यवसायाची सुरुवात त्यांनी मोठी देखणी केली होती. साक्षात यशस्वितेनेच जणू ताराबाईंच्या पायगुणांची वाट न पाहताच केव्हींच्या दिशेने वाटचाल सुरू केली होती.

लग्नाआधी केव्ही गावातच अंबा गेट रोडवर एका माडीवरल्या जागेत राहत होते. काही काळ रावबहादूर खरेही त्यांच्या शेजारी राहत असत. लग्नानंतर काही महिने नूतन जोडपे तेथे राहिले. नंतर ऐपत व वैभव वाढत चालले तसतसे ते आरली शान सामावून घेतील अशी घरे, कौलारू बंगले, आधी गावात, मग गावाबाहेर, मालटेकडी रोडवर, भाड्याने घेत गेले.

त्यांचा हा सारा लवाजमा ताराबाई समर्थपणाने, समरसून सांभाळू लागल्या.

मालटेकडी रोडच्या त्यांच्या बंगल्याच्या पुढच्या बाजूला पोर्च, मागे व्हरांडा, गॅरेज होते. सभोवती चांगले आवार होते, विहीर होती. आंब्याचे झाड आणि गोठाही होता. गोठ्यात म्हैस होती आणि कुत्रा हे जनावर तर अनेकवचनात पाळलेले ! मागच्या बाजूला नोकरचाकरांसाठी स्वतंत्र खोल्या काढलेल्या होत्या.



बंगल्याच्या पुढच्या भागात मोडकदंपतीने सुंदर हिरवळ ठेवली होती व माळ्याच्या मदतीने उत्तम बगीचा फुलविला होता. मागच्या अंगणात बॅडमिंटनचे कोर्ट आखले. तेथे सकाळसंध्याकाळ खेळगडी, स्नेही जमू लागले.

बंगल्याच्या पायऱ्या मोसमी फुलांच्या, क्रोटनच्या कुंड्या ठेवून सुशोभित केलेल्या असत. हिरवळीवर वेताच्या खुर्च्या मांडल्या जात. अमरावतीतली ' क्रीम ऑफ सोसायटी ' म्हणता येईल अशा सुविद्य, रसिक सुखवस्तू मंडळींचे त्यांच्याकडे येणे-जाणे असे. अनेक युरोपियन अधिकाऱ्यांचाही यात समावेश असे. या पाहुणे मंडळींमध्ये एक आदबशीर बटलर चांदीच्या नक्षीदार ट्रेमधून चहा, फळे व फराळाचे फिरविताना दिसे. याखेरीज स्वयंपाकी, चपराशी, माळी, कारकून...आणि डावीकडे असलेले ऑफिस सदा पक्षकारांनी भरलेले. केव्हींचे असे निवासस्थान अमरावतीकरांच्या स्मृतीत कालपरवापर्यंत होते.

भल्या पहाटे उठून घरापाठीमागच्या कोर्टात एक–दोन बॅडमिंटनचे दमदार गेम्स, किंवा कुत्र्यांना बरोबर घेऊन थेट समोरची मालटेकडी धावत चढून पळत उतरणे अशा शाही पद्धतीने केव्हींच्या दिवसाची सुरुवात व्हायची. मग व्हरांड्यातल्या टेबलावर बसून ब्रेकफास्ट, आंघोळ, पक्षकारांच्या झटपट भेटी व जेवण आटोपले की कोर्टाची वेळ होत आलीच. काटेकोर पाश्चात्य पोशाख करून ' बॅरिस्टर ' मोडक घराबाहेर पडत. हात हलवून केव्ही कॅम्परोडच्या दिशेने निघाले की कुणी खुशाल घड्याळाचा ठोका झाल्याप्रमाणे घड्याळ जुळवून घ्यावे. वाटेने कुणाचे ' हॅलो ! ' स्वीकारीत, कुणाला संध्याकाळी बंगल्यावर यायचे आमंत्रण देत, किंवा क्लबमध्ये भेटण्याचे आश्वासन देत, केव्ही कोर्टात पोचत आणि इकडे ताराबाई त्यांच्या आलिशान राहणीची पार्श्वभूमी सांभाळायला अंतर्भागात वळत.

बराचसा स्वयंपाक स्वतःच उरकून टाकण्याकडे ताराबाईंचा कल असे. खानसामाही होता, सामिष बाजू मुख्यतः तो सांभाळत असे. दोनच माणसांचे हे घर सदैव भरलेले असे, कारण घरात सतत पाहुण्यांची वर्दळ— या जोडप्याने मनापासून ओढवून घेतलेली. दुपारच्या जेवणाला रोज एखादी तरी बाहेरची व्यक्ती असे. कुणाला हवापालट, विश्रांतीसाठी बोलाव, कुणाला शिक्षणासाठी जवळ आणून ठेव, अशी हौस ताराबाईंना त्या वेळी देखील होती. शांता अल्लुरकर, बाबा गद्रे, शारू गद्रे, विमल गद्रे, वसंत मोडक अशी कितीतरी नात्यातली बालक मंडळी त्यांच्याकडे अधून–मधून शिकायला असत. शांता अल्लुरकर हिला त्यांनी मुद्दाम बोलावून घेऊन अमरावतीच्या शाळेत घातले आणि मेहनत घेऊन तिला स्कॉलरशिपच्या परीक्षेला बसवले. केव्हींकडे उत्तमोत्तम इंग्रजी व मराठी ग्रंथांचा संग्रह होता. त्यांच्या त्या खाजगी लायब्ररीत त्यांचे ग्रंथप्रेमी स्नेही, गावातले गरीब, गरजू, होतकरू विद्यार्थी यांची नेहमी वर्दळ असे.

लग्नानंतर, लग्नाच्या आधी अर्धवट सोडलेला एम्. ए. चा अभ्यासक्रम ताराबाईंनी पुन्हा हाती घेतला होता. आता खाजगीरीत्या अभ्यास पूर्ण करून एम्. ए. ला बसायचा त्यांचा विचार होता. आणि केव्हींचाही त्यांच्या बेताला पूर्ण पाठिंबा आणि सहकार्य होते. समाजकार्याची आवडही ताराबाईंच्या स्वभावाला चिकटून होती. ताराबाईंच्या अशा सर्व उपक्रमांना केव्हींची मनःपूर्वक व सक्रिय साथ होती. पत्नीच्या कर्तृत्वाचे त्यांना मनापासून कौतुक होते.

संध्याकाळी परत आल्यावर थोडे कामकाज, मग श्रमपरिहार, अल्पोपाहार झाला की केव्ही ताराबाईंसह क्लबमध्ये जात किंवा त्यांच्या बंगल्यावरच हळू हळू क्लब आकार घेत जाई. कोणी रॅकेट्स घेऊन खेळासाठी हजर होत, आणखी कुणी नवीन गंधर्वपद गुणगुणत बैठकीत सामील होई. कोणी केवळ काव्यशास्त्रविनोदाकरिता, गप्पांसाठी मोडकांच्या बंगल्याकडे पावले वळवीत! नवीन, नवीन ओळखी करून घ्यायचा, त्या जोपासायचा जोडछंदच या जोडप्याला होता.

मग खेळणे, खाणी, गप्पा, गाणी, नाटक, साहित्यासंबंधी रसील्या चर्चा, अशा अनाहून मैफिली नेहमी रंगत. यातूनच कधी सहली ठरत, वनभोजने घाटत, मेजवान्या पक्क्या होत. थोडक्यात, केव्ही जेथे असतील तेथे त्यांच्या भोवती क्लबची हवा निर्माण होई!

केव्हींच्या वागण्या-बोलण्यात, बसण्या-उठण्यात कमावलेले युरोपियन शिष्टाचार असत. त्याबरोबर घरगुती जिव्हाळा, निरागस आपलेपणाही असे. त्यामुळे संकोची माणसालाही एक-दोन भेटींतच ते आपल्या बैठकीत सामावून घेत. लाघवी, मार्मिक, दिलखुलास असे त्यांचे बोलणे असे व ताराबाईही हौशी होत्या; घुमेणपणात कमी नव्हत्या.

त्या जोडप्याचे ते आपापसातले फार प्रेमाचे वागणे, ताराबाईंना मान देऊन, बरोबरीने वागवूनही एकीकडे त्यांची हळुवारपणे जपणूक करण्याची केव्हींची विशिष्ट शैली. चर्चा करताना, खेळताना कधीही ते ताराबाईंचे अस्तित्व, त्यांच्या सोयी, मते गृहीत धरीत नसत. पत्नीच्या लहानसहान सुखसोयींकडेही जातीने लक्ष पुरविताना केव्हींच्या मनात वसत असलेला आपल्या या विद्यालंकृत कर्तृत्ववान पत्नीविषयीचा प्रेमादर नकळत व्यक्त होई. त्यावेळच्या सुशिक्षित समाजातसुद्धा अभावानेच आढळणारी खऱ्या अर्थाची स्त्री-पुरुष समानता त्यांच्या घरी सहजतेने नांदताना दिसे.

असेच सुखाचे घोट घेत योग्य वेळी, म्हणजे १९१६ मध्ये ताराबाई एम्. ए. ची परीक्षा देण्याकरता मुंबईला निघाल्या. केव्ही स्वतः जातीने त्यांना या परीक्षेकरिता घेऊन गेले. ताराबाईंची परीक्षा चालू असताना त्यांना परीक्षागृहात आणणे-पोचविणे, त्यांना हवे-नको पाहणे, खाद्यपेये पुरविणे, हे केव्हींनी इतक्या उत्साहाने केले की हे जोडपे त्यामुळे दीर्घ काळपर्यंत इतर परीक्षार्थींच्या आणि त्यांच्या संबंधितांच्या लक्षात राहिले.



मात्र एकदम दोन आघाड्या ताराबाईंना झेपल्या नसाव्यात. ताराबाई एम्. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाल्या नाहीत. पुन्हा त्यांनी परीक्षेला बसायचा प्रयत्नही केला नाही.

१९१५ सालीच अमरावतीमध्ये मुलींचे सरकारी हायस्कूल सुरू झाले होते. शाळेला ताराबाईंसारख्या पदवीधर शिक्षिकेची गरज होतीच. १९१६ च्या जून किंवा जुलैमध्ये ताराबाईंची या शाळेत 'फर्स्ट असिस्टंट' म्हणून नेमणूक झाली. आपले घर, ही नोकरी आणि फावल्या वेळात थोडेफार समाजकार्य अशा कामात ताराबाई गुंतून राहू लागल्या.

ताराबाईंना स्वतःला मांसाहारी भोजन-प्रकारांची सवय किंवा आवड बिलकुल नव्हती. परंतु केव्हींखातर त्या ते चांगल्या प्रकारे शिजवू लागल्या, लागल्या. ताराबाईसुद्धा रसिक होत्या, पदार्थ करायचा तर उत्तम, वस्तू आणायची, वापरायची ती दर्जेदारच; परंतु केव्हींसारखी छानछोकी, भपका त्यांच्या वृत्तीत नव्हता. तरी केव्हींना सर्व बाबतीत साथ देण्याचा, त्यांच्या कल्पनांना पोषक असे वातावरण घरात हसते खेळते राखण्याचा त्यांचा प्रयत्न असे. आणि गृहिणीची भूमिका आणि व्याप नेकीने सांभाळताना केव्हींच्या स्वभावात जे एक विशिष्ट राजेशाहीपण होते, त्यांच्या स्वतःच्या म्हणून ज्या खास स्वभावाच्या लकबी होत्या त्या ओळखून, त्यांना पूरक वागण्याचा त्यांचा दृष्टिकोन असे.

केव्हींना लहान मुले, कोणतेही प्राणी वगैरेंचा अतोनात लळा होता. त्यांच्याकडे एक म्हैस होती. ही म्हैस केव्हींची फार लाडकी. संध्याकाळी केव्हींच्या गाडीचा हॉर्न वाजला की या चतुर म्हशीला आपला मालक आल्याची वर्दी लागे. मग ती असेल तेथून धावत येई. आणि एखाद्या कुत्र्या-मांजरासारखे आपले लाड करून घेतल्याशिवाय त्यांना घराच्या पायऱ्या काही ती चढू देत नसे! मग केव्हीही जेवणघरात जात आणि हाताला लागेल ती भाजी, फळे टेबलावर दिसेल तो ताजा फराळाचा किंवा रात्रीच्या जेवणाकरता तयार केलेला खाद्यपदार्थसुद्धा जसाच्या तसा उचलून त्या लाडूबाईला भरवायला नेत. पोळ्यांची चवड, अंडे, भरल्या वांग्याची भाजीसुद्धा! ताराबाई हे जगावेगळे नाते पाहिले आणि योजकतेने, कौतुकाने त्यातूनही मार्ग काढला. केव्ही जे समोर दिसेल ते म्हशीपुढे ठेवतात हे ठाऊक झाल्यावर त्या केव्हींच्या फराळाबरोबरच त्यांच्या या म्हशीच्या अल्पोपाहाराचीही तजवीज करीत! ते यायच्या सुमारास व्हरांड्याच्या कोपऱ्यात म्हशीच्या खाण्याची कुंडी तयार ठेवली जाई!

त्याचप्रमाणे, केव्हींचे श्वानप्रेम. केव्हींचा कुत्र्यांच्या शौक गावभर, परिवारभर, जाहीर होता. फिरायला जाताना, क्लबमध्ये जाताना, कुणाकडे गप्पा मारायला जाताना, अगदी गावाला जातानासुद्धा त्यांना कुत्रा बरोबर हवा असे. आणि केव्हींचे हे कुत्रे त्यांच्या घरात वास्तव्य करीत तेही मोठ्या इतमामाने!

एके दिवशी दुपारी दोनच्या अवेळी काही मंडळी त्यांना भेटायला त्यांच्या बंगल्यावर गेली. कोर्टाला सुट्टी होती.

अमरावती–नागपूरकडला उन्हाळा. दरवाज्यात वाळ्याच्या लसलसत्या ताटल्या होत्या. एक नोकर त्यांच्यावर पाणी मारीत होता, चपराशी अदबीने खोलीबाहेर उभा राहून पंख्याची दोरी हलवीत होता. मालक आत दुपारची विश्रांती घेत असावेत अशी सामसूम, खावधगिरी बंगल्यात नांदत होती.

"बॅरिस्टरसाहेब आहेत ?" स्वतःच्या श्वासोच्छ्वासही नकळत मोजकाच करत पाहुण्यांनी विचारले.

"नाहीत. महाबळेश्वरला गेले आहेत, सोमवारी येतील."

"नाहीत ? मग आत कोण आहे ?"

नोकराने शांतपणे उत्तर दिले,

"आत साहेबांचे कुत्रे झोपले आहेत, साहेब."

—असे हे श्वानप्रेम !

एकदा के. व्ही. एका स्नेह्यांकडे गेले. त्यांचा कुत्रा दिसायला धिप्पाड, उमदा परंतु जरा मडकोजीराव होता. त्याने केव्हींशी प्रथम चांगला लडिवाळपणा केला, त्यांचे हात चाटले, अंगाशी झोंबला आणि जरा वेळाने केव्हींनी सहज बोलता बोलता उठून टेबलावरचा पाण्याचा ग्लास उचलला मात्र, तो जो त्यांच्या अंगावर आला, त्याने केव्हींची पोटरीच पकडली ! केव्हींनी तावडतोब ते मडक डोक्याचे आव्हान त्याच्या मालकाकडून मागून घेतले. "XXX च्या अंगात फार रग आहे, थोडा सुधारून पाठवतो ! कमॉन यू—"

असे कुत्रे जमत.

पैशांचा हिशेब केव्हींना कधीच आवडला नाही; जमला नाही. त्यांची प्रॅक्टिस पुढे-पुढे तर महिना तीन चार हजारांवर पोचली होती. आणि तेवढाच जवळजवळ त्यांचा खर्चही– त्या काळात– होता. आणि हे पैसे स्वतःवर, मित्रांवर, मौजमजेत घालवायचे, उधळायचे, तसेच हाताला येतील तसे गरजूंना वाटूनही टाकायचे. या गरजवंतांमध्ये विद्यार्थी असत, नडलेले स्नेही, परिचित असत. कधी अनोळखी, कफल्लक, रिक्षावाले, टांगेवालेही असत. कधीही कुणीही हात पसरावा आणि ह्यांनी हातातले पत्ते सांभाळत एकीकडे खिशाच्या खिसा त्याच्या हातावर रिकामा करावा. घेणारा बिचकला, तर त्याची पाठ थोपटून म्हणावे, "अरे भय्या, ले लो ! लागतील पुढेमागे !" आणि ज्यांना एकदा मित्र मानले त्यांच्या बाबतीत तर कधीच कोणते मोजमाप वा हिशेब नसे. खर्चाचा, कष्टाचा, वेळाचा ! "वेळ आली तर अंगावरचा कपडासुद्धा समोरच्या माणसाला उतरवून देत आणि स्वतः कुडकुडत घरी येत." असे केव्हींच्या स्वभावाचे वर्णन स्वतः ताराबाईंनी केले आहे.

केव्हींच्या स्वभावाचे हे सगळे कंगोरे, त्यांच्या मनाची उमदी बाजू तसा तऱ्हेवाईक-



पणा, लहरीसुद्धा ताराबाई सुखाने सोसत असत. त्या जोडप्यातला तो सुसंवाद पाहून अगदी रोजच्या बैठकीतल्या ज्येष्ठ आणि अनुभवी स्नेह्यांच्या मनातसुद्धा त्यांचा संसार, सहजीवन यशस्वी असल्याबद्दल संदेह नव्हता. सर्वांना आदर्श वाटणारी, हवीहवीशी वाटणारी ती जोडी होती.

"काय दृष्ट लागण्यासारखा संसार आहे हो यांचा !" शेजारीपाजारी, स्नेही, पाहुणे मनापासून म्हणत.

पण तरीही कुठेतरी विसंवाद आकार घेत होता, आवाज न करता बेबनाव घरात शिरत होता.

केव्हींचे रंगेल, आलिशान राहणे, वागणे आणि ताराबाईंचे उदात्त विचार यांची सांगड घालणे या जोडप्याला आवश्यक तेवढ्या टक्क्यांनी जमत नसावे. केव्हींच्या भोवती सतत गुलहौशी मित्रमंडळींचे कडे असे. मुंबईपुण्याकडे राहिलेल्या, ध्येयवादी; त्यागी कुटुंबात संस्कारित झालेल्या ताराबाईंना केव्हींची अतिरसिकता, रंगेलपणा, मध्यप्रदेशातली भोगप्रियता, ढिलेपण भावत नसेल ? पूर्णपणे समजून घेता येत नसेल ? काही अतिरेक त्यांना रुचत नसत. मग त्या लगाम घालण्याचा प्रयत्न करीत; केव्हींना हे लगाम सोसत नसत ! केव्हींच्या स्वभावात हळुवारपणा, संवेदनाक्षमतेबरोबरच हटवादीपणाचा एक मजबूत धागा होता. तो छेडला छेडला गेला की तेही हेकटपणाने वागत.

एकदा तेथील पारशी स्टोअर्सवाला ऑफ बिल घेऊन आला. हे केव्हींचे बाटल्या खरीदण्याचे ठिकाण होते. केव्ही त्यावेळी क्लबमध्ये गेले होते. ताराबाई काही पाहुण्यांसमवेत लॉनवर गप्पा मारीत बसल्या होत्या. उठून हातातले विणकाम खुर्चीवर ठेवीत ताराबाई म्हणाल्या,

"किती बिल आहे ? मी देऊन टाकते तुमचे पैसे."

परंतु बिलाची रक्कम ऐकताच ताराबाई थबकल्या, दचकल्या. तो आकडा त्यांच्या अपेक्षेपेक्षा कितीतरी फुगलेला होता.

"एकदम एवढं बिल कसं होईल ?" त्यांनी छेडले.

"बाईसाहेब, वकीलसाहेब परस्पर क्लबवर कितीतरी बाटल्या मागवतात."

"असं होय !" ताराबाईंना राग आला. म्हणजे ताराबाईंना पत्ता लागू न देण्याची खबरदारी घेत केव्ही तिकडे दुप्पट मद्यपान कित्येक दिवस करीत होते ! असा दुटप्पीपणा, छक्केपंजे ताराबाईंच्या स्वभावात, कल्पनेतसुद्धा नव्हते. आणि त्यामुळे त्यांना ते सहनदेखील झाले नाही.

"हे बघा !" त्यांनी कठोर स्वरात बजावले, "आत्ताचं बिल मी चुकतं करते. पण पुन्हा अशी बिलं घरात आणलीत तर मी बिल देणार नाही, तिकडे साहेब ड्रिंक्स् मागा-

यला आले, तर त्यांना साफ सांगा, बाई असं असं म्हणत होत्या, म्हणून !"

केव्हींना दुकानदाराकडून ताराबाईंनी दिलेली ही तंबी कळली. त्याबरोबर तेही तडकले. त्यानी खिशात होते तेवढे सगळे रोख पैसे काउंटरवर आपटले, तेवढ्या किमतीच्या बाटल्या घेतल्या आणि घरी येऊन मद्यपान सुरू केले ते सकाळपर्यंत !

केव्हींच्या धूम्रपानाचा प्रकारही तोच.

पुढे पुढे ते ताराबाईंना उघड उघड जुमानेनासे झाले.

ताराबाईंचा स्वतःवर, स्वतःच्या प्रेमावर फार विश्वास होता. केव्हींनी आपले ऐकावे, ते ऐकतील, अशी त्यांची भूमिका. तर केव्ही त्यांच्याहून जिद्दी. पडते, नमते, मिळते कुणी घ्यावे, किती प्रमाणात, कितीदा आणि कोणत्या बाबतीत ? कलहाचे, विरोधाचे बीज यातच जन्मले, वाढले असावे...

परंतु हे बीज सूक्ष्म होते. सुखाचे पारडे निश्चितपणाने अधिक जड होते. तेव्हा तेवढ्याने परिस्थिती निकराला येण्याचे कारण नव्हते. मोडक दांपत्याच्या संसारात सतत ये-जा करणाऱ्या, त्यांचे सहजीवन अगदी जवळून, शेजारून, सतत पाहणाऱ्यांनासुद्धा या बेबनावाची जाणीव नव्हती. कुठेही बोट ठेवता येणार नाही असाच त्यांचा संसार सर्वांना भासत असे. केव्हींचे आणि ताराबाईंचे बरेच नातेवाईक, स्नेही या काळात त्यांच्याकडे येऊन राहून, पाहुणचार घेऊन गेले, दिवाळ्या साजऱ्या करून गेले ! ताराबाईंच्या सर्व पाहुण्यांशी केव्ही विशेष आपुलकीने वागत, विशेष सन्मानपूर्वक आणि तपशिलात जाऊन त्यांना हवे, नको पाहत. कोणी मांसाहार घेणारे नसेल तर आचारी डाव-चमचे वेगळे ठेवतो ना, यावर जातीने लक्ष ठेवणे, कुणाचे मूल रात्री रडले असेल तर दुपारी त्यांना विश्रांती, झोप मिळते का नाही हे पाहणे अशा गोष्टी ते सहज आत्मीयतेने करीत. ताराबाईंचेही केव्हींच्या नातेवाईकांशी केव्हाच जिव्हाळ्याचे, आपुलकीचे संबंध निर्माण झाले होते. जावा त्यांच्या मैत्रिणी झाल्या होत्या. पुतणे-पुतण्यांची 'भाचरे' झाली होती ! एवढेच नव्हे, तर केव्हींच्या मित्रमंडळींमध्येही ताराबाईंना विशेष प्रेमाने, आदराने वागवले जात असे. आणि हे स्नेहसंबंध अखेरपर्यंत दृढावतच गेले. रावबहादूर खरे, बॅ. देशमुख, सरंजामे वकील अशा काही केव्हींच्या दोस्तमंडळींशी ताराबाईंचेसुद्धा स्नेहसंबंध जुळले; ते कायमचे टिकलेही.

अशीच एकदा सर्व चिपळूणकर मंडळी अमरावतीला ताराबाईंकडे सुटी साजरी करून गेली. एका दिवाळीत डॉ. काशीबाई नवरंगेही ताराबाईंकडे जाऊन पाहुणचार घेऊन आल्या. 'मां' ना ताराबाई काशीताई म्हणत. काशीताईंचाही ताराबाईंवर विशेष लोभ. अमरावतीच्या या मुक्कामात केव्हींनी काशीबाईंचा खूप व जातीने आदरसत्कार केला. आपल्या ताराबाईंचा सुखी संसार पाहून माँ समाधानाने मुंबईला परतल्या. केव्हींबाबतचा आपला अंदाज चुकला याचा त्यांना आनंदच झाला होता.



केव्हींच्या भावांपैकी दुसऱ्या क्रमांकाचे बंधू श्री. विष्णुपंत या सुमारास केव्हींकडेच असत. त्यांना मृत्यूही त्यांच्याच घरी —१९१८ च्या सुमारास आला. केव्हींचे हे बंधू उमेदीत असताना केव्हींसारखेच लोकप्रिय आणि हुशार होते. घोड्यावर बसण्यात, इतर खेळांत पटाईत. शिवाय केव्हींप्रमाणेच इंग्रजी वरच्या प्रभुत्वामुळे संभाषणचातुर्यामुळे अमरावतीच्या युरोपियन व उच्चभ्रू वर्तुळातून विशेषतः पार्टीच्या वेळी, त्यांना पाचारण केले जाई... परंतु हे विष्णुपंत झपाट्याने व्यसनांच्या आहारी गेले आणि अखेर व्यसनांचाच बळी ठरले.

"Women, wine and wealth are his weaknesses. He is a victim to his own follies." असे केव्ही त्यांच्याबद्दल स्नेह्यांना खेदपूर्वक सांगत असत.

...इकडे अमरावतीच्या गव्हर्नमेंट हायस्कूलमध्ये ताराबाई काम करू लागल्या त्याला आता दीड वर्ष लोटले होते. त्यांची विद्यादानाची, समाजसेवेची आवड या नोकरीतून पुरी होत होती. पालकांमध्ये त्या लोकप्रिय झाल्या होत्या. तरुण, उत्साही, कर्तृत्ववान अशा ताराबाई मोडक आपल्या विद्यार्थिनींच्याही आवडत्या होत्या... परंतु या सर्वांना लौकरच ताराबाईंच्या बाणेदारपणाची पावती मिळायची होती.

श्रीमती थॉम्सन या नावाची एक इंग्रज बाई ताराबाईंची वरिष्ठ होती. ताराबाईंच्या चोख कामाबद्दल त्यांना आक्षेप घेता येण्याजोगा नव्हता. परंतु ताराबाईंची वृत्ती राष्ट्रीय होती. आणि त्यांचा हा कल त्यांच्या वागण्याबोलण्यातून स्पष्ट होत असे त्यामुळे ताराबाईंचे नाव थॉम्सन बाईंच्या 'नावडत्यांमध्ये जमा' होते. पुढे जेव्हा ताराबाईंना वरची जागा मिळण्याची वेळ आली तेव्हा थॉम्सन बाईंने सूत्रे हालविली आणि ताराबाईंऐवजी कलकत्त्याच्या मिस् पास्कल नावाच्या एका केवळ मॅट्रिक उत्तीर्ण झालेल्या ॲंग्लो-इंडियन स्त्रीची नेमणूक त्या जागेवर केली गेली ! ताराबाईंनी या अन्यायाविरुद्ध झगडायचे ठरविले. ही बाई पात्रता, अनुभव, शिक्षण सर्वच बाबतीत उणी असून तिला वरची जागा देण्यात आली होती. हा अन्याय निमूटपणे गिळून, स्वाभिमानाला मुरड घालून दुय्यम जागेवर काम करीत राहणे ताराबाईंना शक्य नव्हतेच ! ताराबाईंनी रीतसर तक्रार करून सरकारला या अन्यायाबद्दल खुलासा विचारला. स्थानिक वर्तमानपत्रांतूनही या गोष्टीची जाहीर चर्चा झाली. त्यांनी ताराबाईंची बाजू उचलून धरली. त्या वेळच्या लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्ये या प्रकरणाबाबत प्रश्नही विचारले गेले. परंतु इंग्रज सरकारने ताराबाईंना सरळ उत्तर दिले नाही.

'ॲंग्लो-इंडियन नोकरांच्या नेमणुकींना लावण्याचे निकष निराळे आहेत त्यामुळे मिस् पास्कलच्या नेमणुकीच्या संदर्भात ताराबाईंनी उपस्थित केलेली पात्रता, सीनिऑरिटी इ. मुद्दे गैरलागू आहेत' असा जबाब खात्याकडून ताराबाईंना देण्यात आला.

ताराबाईंनी आपल्या जागेचा राजीनामा देऊनच या अन्यायाला उत्तर दिले. गावातल्या

सुशिक्षित पालकांचा ताराबाईंना पूर्ण पाठिंबा होता. श्रीमती कृष्णाबाई जव्हेरी, श्री. भोळे इ. अमरावतीकरांच्या मदतीने आणि प्रोत्साहनाने मग ताराबाईंनी स्वतःच एक मुलींची शाळा काढली.

ताराबाईंच्या या पहिल्यावहिल्या आणि चिटुकल्या शिक्षणसंस्थेचे नाव होते, ' नमुनेदार शाळा ' ही शाळा इंग्रजी माध्यमाची व तीन इयत्तांची असून ' नमुना ' या भागामध्ये खापर्डे वकिलांच्या घराच्या मागच्या रस्त्यावर काणे वकिलांच्या घरात भरीत असे. ही नमुनेदार शाळा तीन वर्षांपर्यंत व्यवस्थित चालू होती. विमल गद्रे या काळात ताराबाईंच्या घरात राहून त्यांच्याच शाळेत शिकत असे. एका वर्षी ताराबाईंनी आपल्या मुलींना एका आंतरशालेय शिवणकाम–हस्तव्यवसायाच्या स्पर्धेत, प्रदर्शनात भाग घेण्यासाठी नागपूरला नेले होते. पाचसहा दिवस तेथे मुक्काम करून विद्यार्थिनींना त्यांनी आजूबाजूचा परिसरही दाखवला ... ताराबाईंनी स्वतःची शाळा काढल्यावर कित्येक पालकांनी त्यांना पाठिंबा व्यक्त करण्यासाठी आपल्या मुलींना सरकारी हायस्कूलमधून काढून ताराबाईंच्या शाळेत दाखल केले.

१९२० च्या सुमारास ताराबाई आणि केव्हींच्या सहजीवनातला एक महत्त्वाचा आणि—जरासा लांबलेला—स्वल्पविराम जवळ आला. केव्हींचा निरोप घेऊन ताराबाई बाळंतपणाकरिता मुंबईला रवाना झाल्या.

डॉ. काशीबाई नवरंग्यांनी मोठ्या आग्रहाने आणि प्रेमपूर्वक त्यांना बाळंतपणासाठी आपल्याकडे बोलाविले होते. दादाची आर्थिक परिस्थिती बेतासबात आणि तात्याच्या पत्नींना यापूर्वीच अपघाती मृत्यू आला होता, शिवाय काशीबाईंचे घर म्हणजेही ताराबाईंचे माहेरच ! काशीबाईंच्या या मुंबईच्या निवासस्थानाची नेहमीच नात्याच्या, घरोब्याच्या लहानमोठ्या रहिवाशांमुळे गोकुळावस्था झालेली असे. त्यांच्या या भरल्या घरात ताराबाईंच्या बाळाच्या स्वागताची तयारी मोठ्या उत्साहाने सुरू झाली. ताराबाईंना स्वतःला विणकाम—शिवणकामात चांगली गती व आवड होती. घरात बालवस्त्रनिर्मितीची एक चिमुकली आघाडीच उघडली गेली. ताराबाईंचे कोडकौतुक करायला त्यांना आई नव्हती. परंतु ताराबाईंवर अतिशय लोभ करणाऱ्या माँ आपल्या वैद्यकीय व्यापांतून व इतर सामाजिक कार्यांतून सवड काढून ताराबाईंना हवे–नको पाहत होत्या, त्यांच्या प्रकृतीला जपत होत्या, त्यांचे डोहाळे पुरवीत होत्या ...

—याच घरात १९ जून १९२० रोजी ताराबाईंना कन्याप्राप्ती झाली.

ताराबाई प्रसूत झाल्याची, त्यांना मुलगी झाल्याची तार अमरावतीला पोचली आणि आपल्या स्वभावाला शोभेल्या उतावीळपणे केव्ही लगेच मुंबईला येऊन हजर झाले. ताराबाईही वाट पाहत होत्याच. मुलगी झाली या बातमीने केव्ही आधी थोडे नाखूष झाले होते. परंतु ही नाखुषी फार वेळ टिकली नव्हती. प्रत्यक्षात आपली सावळी सुंदर



कन्या हातात घेऊन पाहताना ते मनातल्या मनात पुन्हा एकदा जरासे खट्टू झाले. केव्ही आणि ताराबाईंची ही ' संयोगिता ' त्यांचा अस्सल कोकणस्थी रंग न घेताच आली होती. बाळाचा रंग सावळेपणाकडे झुकणारा दिसत होता ! केव्हींनी अर्थात आपल्या आनंदाला असलेला निराशेचा कोपरा ताराबाईंना दिसू दिला नाही. अपत्यप्राप्तीबद्दल नजरेनेच ताराबाईंचा सन्मान करत, धन्यवाद देत ते हसून म्हणाले, "ताराबाई, मी आपल्या या चिमणाबाईसाठी एक छानदार नाव ठरवून आलो आहे बरं का. आपण हिचं नाव प्रभा ठेवायचं !"

आपल्या ताराची ही प्रभा अशा अर्थाने केव्हींनी या नावाची निवड केली होती. आपल्या दोन दिवसांच्या अल्प मुक्कामात केव्ही आपली किंचितशी नाराजी पारच विसरून गेले. त्यांना मुळातच लहान मुलांची फार आवड होती, छोट्या प्रभाने आपल्या वडलांकडून पूर्ण पसंती वसूल केली. प्रभाला घेऊन लौकरच परतण्याची ताराबाईंना वारंवार बजावणी करीत केव्ही अमरावतीला परतले. आपल्या मित्रपरिवाराचे तोंड गोड करण्यासाठी त्यांनी ताराबाईंच्या परतण्याची वाट पाहिली नाही. अमरावतीच्या ' स्पेशल क्लब 'मध्ये त्यांनी त्यांना एक जंगी पार्टी दिली आणि प्रत्येक पत्रात ताराबाईंना लौकर परतण्याची घाई करण्याचा सपाटा लावला...

ताराबाईंना अर्थात तत्काळ परत निघणे शक्य नव्हते. बाळंतपण आटपल्यावर काही दिवस माहेरी तात्यांकडे राहून मग त्या परतणार होत्या.

इकडे हातात भरपूर पैसा आणि वेळ, नोकरचाकर, भवताली गुलहौशी वातावरण उपभोगाच्या कामी यथेच्छ रंगीत साथ पुरविणाऱ्या मित्रांचा कंपू आणि मुख्य म्हणजे फार काळ ताब्यात न राहणारे मन, प्रवृत्ती... केव्हींचे पिणे तर बेसुमार वाढलेच पण काही मोजक्या महिन्यांच्या त्या अनुपस्थितीत ताराबाईंच्या संसारसुखालाच तडा जायची वेळ आली. ताराबाईंच्या मनात अशा प्रकारची काही सूक्ष्म धाकधूक यापूर्वी असलीच तर ती केव्हींनी पूर्णपणे खरी ठरविली. सरळ स्वभावाच्या ताराबाई आपल्या रंगेल, रसिक, चंचल पतीच्या संदर्भात धोरणीपणाने वागू शकल्या नव्हत्या. वयाने तरुण, आकर्षक स्त्रिया आपल्या या रंगेल पतीच्या सहवासात फार वेळा येऊ देऊ नयेत हा स्त्रीसुलभ कावा त्यांच्या मनाला सुचला नव्हताच. केव्हींच्या बाबतीत अशी दक्षता, सावधगिरी डावपेच खेळणे त्यांच्या कोष्टकात बसले नव्हते. ताराबाई गेल्यावर केव्ही आपल्या वृत्तीला आवर घालू शकले नाहीत. ताराबाई मुंबईहून परतण्यापूर्वीच त्यांच्या सुखातला एक मोठा हिस्सा मागणारा वाटेकरी निर्माण झाला होता.

—डॉ. मिस् सुलोचना जावळे या मोडक मंडळींच्या वर्तुळात दाखल झाल्या त्या वास्तविक ताराबाईंच्या ओळखीमुळे, त्यांनी स्नेहाचा हात पुढे केल्यामुळे. या डॉक्टरीणबाई यवतमाळहून अमरावतीला प्रॅक्टिस करण्यासाठी आल्या होत्या. थोडेफार आकर्षक

व्यक्तिमत्त्व, आयर्लंडमधील रोटंडा हॉस्पिटलची प्रसूतिशास्त्रातील पदविका हे वैद्यकीतले चांगल्यापैकी क्वालिफिकेशन आणि सोबतीला म्हणून बरोबर आपली एक मोठी बहीण घेऊन डॉ. जावळे अमरावतीला दाखल झाल्या. या सुलोचनाबाई जावळ्यांशी गाठ पडताच ताराबाईंनी त्यांना ओळखले. ताराबाईंचा त्यांच्याशी पूर्वपरिचय होता. ताराबाईंपेक्षा त्या वयाने बऱ्याच लहान होत्या. एके काळी बहुधा गिरगावात राहत असताना ताराबाईंनी या चुणचुणीत छोकरीचे लाडही केले होते! आता एकाच गावात आल्यावर ताराबाईंनीच तिला आपुलकी दाखवली; तिच्याशी संबंध वाढवले. डॉक्टरीणबाई बॅडमिंटन खेळायला आणि एरवीही मोडकांच्या घरी येऊ लागल्या.

केव्हींचा आणि डॉक्टरीणबाईंचा प्रत्यक्ष संबंध असा एका व्यावसायिक बाबतीत आला. डॉक्टरीणबाईंनी एकट्याने गावात राहायला येऊन आपला व्यवसाय सुरू केला तेव्हा गावातल्या काही उपद्रवी गुंड मंडळींनी त्यांना त्रास देण्यास सुरुवात केली. या लोकांच्या गुंडगिरीविरुद्ध काही कायदेशीर कारवाई करता येईल का याबाबत सल्ला घेण्यासाठी प्रथम डॉ. सुलोचनाबाईंनी ॲड. मोडकांची गाठ घेतली. केव्हींनी साहजिकच त्यांना योग्य तो सल्ला व सहाय्य दिले.

डॉ. जावळे गावात आल्या आणि त्यांच्याकडे गावातल्या अनेक सुशिक्षित तरुण मंडळींचे जाणेयेणे सुरू झाले. आरंभी केव्ही त्यांच्यापैकीच एक होते.

परंतु अशा अनौपचारिक भेटींतून हळूहळू या दोघांच्या मैत्रीला निराळा अर्थ प्राप्त होऊ लागला. केव्ही आणि डॉक्टर यांना एकमेकांबद्दल आकर्षण वाटू लागले आणि हे आकर्षण वाढविण्याचा दोघांचा राजरोस प्रयत्न दिसत होता. सहवास, भेटी वाढत गेल्या, केव्हींनी पुन्हा एकदा प्रेमाचा डाव रंगविला...

मोडकांच्या बंगल्याच्याच ओळीत जरा पुढे सुलोचनाबाईंचे पहिले बिऱ्हाड होते. काही दिवसांनी केव्हींच्याच कंपाऊंडात जरा मागच्या बाजूला असलेल्या एका स्वतंत्र दुमजली घरात त्यांनी आपले घर आणि दवाखानाही थाटला. त्यांची प्रॅक्टिसही चांगली चालू लागली.

सुलोचनाबाईंना सौंदर्यवती म्हणता आले नसते पण त्या नाजूक आणि रेखीव होत्या. मोहक व्यक्तिमत्त्व त्यांना लाभले होते. कपाळावर केसांची किंचित कुरळी महिरप, मृदुमधुर आवाज आणि बोलण्याचालण्यात एक प्रकारचा सहज डौल अशा काही देणग्या त्यांना लाभल्या होत्या. सोनेरी काड्यांचा चष्मा या डॉक्टरीणबाई वापरीत असत आणि तो त्यांना मोठा शोभून दिसत असे.

प्रभाला घेऊन ताराबाई येताहेत म्हटल्यावर केव्हींची धांदल उडाली. त्या दोघी येताहेत याचा त्यांना खरोखरच आनंद झाला होता. त्यांनी स्वागताची जय्यत तयारी सुरू केली. नोकरचाकरांकरवी, जातीने लक्ष घालून घरातील सामानाची त्यांनी पुनर्मांडणी



करायला घेतली. तान्ह्या प्रभाला बाहेरच्या वर्दळीचा त्रास होऊ नये अशा दृष्टीने एक कडेची हवेशीर खोली तिच्यासाठी सज्ज करून ठेवण्यात आली. फळांच्या करंड्या येऊन पडल्या. धान्यापासून दुधापर्यंत केव्हींची नजर फिरली. फ्लॉवर पॉट्स् फुलांनी सजले. प्रभाच्या तैनातीसाठी रामूबाई नावाची एक दाई आणि तिला परकरी खेळगडी म्हणून रामूबाईंचीच छोटी पोर सुभा अशा नव्या नेमणुकाही झाल्या... मालकांच्या उत्साहाचा संसर्ग अर्थात नोकरमाणसांनाही झाला. केव्हींचा हा लहान मुलासारखा आनंद पाहून त्यांची मित्रमंडळी गालातल्या गालात हसत होती. घरची गाडी घेऊन बडनेरा स्टेशनवर अखेर केव्ही ताराबाईंना आणायला रवाना झाले!

पहिल्या चार दिवसांतच केव्हींनी प्रभासाठी इतकी खेळणी आणली की ताराबाईंना हसूच आले! केव्हींच्या वेळापत्रकातला, दिनक्रमातला प्रभा हा एक महत्त्वाचा आणि आवडता विषय बनला. कोर्टात जाण्यापूर्वी प्रभा उठली नाही, भेटली नाही की केव्ही हिरमुसले होत. एखाद्या पक्षकारासारखे आत-बाहेर खेटे घालीत राहत! ताराबाई दिवसभर प्रभाची व्यवस्था लावण्यात, घरातली व्यवस्था नव्याने लावण्यात गुंतलेल्या असत. काही दिवसांनी त्यांची नोकरी सुरू होणार होतीच.

परंतु केव्हींनी मांडलेली प्रेमाची सार्वजनिक वाटणी लौकरच त्यांच्या लक्षात आल्याशिवाय राहिली नाही. मागील दारी, शेजारघरीच त्यांच्या सुखात वाटेकरी निर्माण झाला होता... सगळे दर्शनी सुख तसेच असूनही ताराबाईंना घास गोड लागेना. कोर्टाची वेळ सोडली तर येताजाता केव्हींच्या सुलोचनाबाईंकडे फेऱ्या सुरू असत. पुढे पुढे तर दिवसातला बहुतेक वेळ ते तिकडेच असत. कुणी गप्पा मारायला आले, भेटायला आले की ताराबाईंनीच पुढे होऊन त्याचे स्वागत, आदरातिथ्य करावे. हळूहळू गावात सगळीकडे पोरासोरांनाही ठाऊक होत चालले की ताराबाईंचा संसार आतून पोकळ होतो आहे...

ताराबाई वरकरणी शांत होत्या. परंतु आतून साहजिकच त्या विलक्षण बेचैन असत. रात्र रात्र त्यांना झोप नसे. एखादे दिवशी केव्ही मागच्या घरी गेले नाहीत की तेथून हालचाल ऐकू येई. कुणीतरी जोरजोराने खाकरण्याचा खोकण्याचा आवाज काढू लागे! खबरच मोडकांच्या घरापर्यंत पोचावी अशीच योजना त्या आवाजात असे केव्हीही मग अस्वस्थ होत. ताराबाई मागली आवरासावरी किंवा प्रभाची व्यवस्था लावण्यात गुंतल्या आहेत असे पाहून ते काहीतरी सांगितल्यासारखे करीत आणि ताराबाईंच्या प्रतिक्रियेला अवसर न राहू देता पायऱ्या उतरून मागच्या अंगणात निसटत.

“ जरा जाऊन येतो हो! काय होतंय बघून येतो... बिचाऱ्या एकट्या आहेत. डोंट वरी, पाच मिनिटात येतो...”

ही पाच मिनिटे संपायला मग मध्यरात्र सुद्धा उलटून जाई. ताराबाई आपल्या सुन्न

मनाने, मंदपणाने रात्रीची झाकपाक करीत आणि प्रभाला कुशीत घेऊन कॉटवर पडून राहत. दिवसभर चेहऱ्यावर उमटू न दिलेली अशांती, क्षोभ रात्री डोळ्यांतून निसटत राही. त्रागा न करण्याचा, विचार न करण्याचा प्रयत्न करीत त्या तळमळत राहात. विचार करकरून त्यांचे डोके फुटायची वेळ येई! अंधारातच केव्हातरी केव्ही चोरट्यासारखे परत येऊन आपली जागा घेत... व घोरू लागत. ताराबाईंना डोळा लागेपर्यंत मात्र कधी कधी उजाडायचीही वेळ येई.

ताराबाईंची परिस्थिती मोठी विचित्र झाली होती, त्यांच्या मनाची विलक्षण कोंडी झाली असली पाहिजे. कुणाजवळ मन मोकळे करावे तर आप्तजन सारे दूर आणि ताराबाईंचा स्वभाव मानी, जिद्दी ओठ घट्ट मिटून त्या सगळे सहन करीत राहिल्या होत्या. चहूबाजूंना घातले गेलेले मोडते, दिले गेलेले इशारे डावलून केवळ स्वतःच्या जबाबदारीवर, व इतरांची मने दुखवून, विरोध पत्करून त्यांनी गृहत्याग केला होता! आता ज्याच्या जिवावर उडी घेतली तो मोहराच हातचा निसटल्यावर त्या कुणाच्या तोंडाकडे पाहणार? स्वतःशिवाय कुणाला दोष देणार? आणि पस्तावा तरी कुणाजवळ व्यक्त करणार? माहेरची मंडळी अलिप्त, नाराज होतीच; माधवरावांनी तर अजून अबोला सोडला नव्हता! अंतर्मनावरचे घाव व्यक्त करण्याजोगी एकच जागा अमरावतीत त्यांच्यासाठी होती; जयवंत वकिलांच्या पत्नी सौ. माई. त्याही निराळ्या प्रकारे मानसिक कळा सोशीतच होत्या... चार आठ दिवसांनी केव्हातरी ताराबाई जयवंतांच्या घरी जात. हळव्या स्वरात माईंशी कुजबूज करून, काही बोलून मने हलकी झाली की डोळे पुसून पुन्हा घरी येत. माईंची आणि केव्हींची वास्तविक अधिक जवळीक. केव्हींनी माई जयवंतांना बहीण मानले होते, भाऊबीजेची ओवाळणी घातली–घेतली जाई; परंतु या बेबनावात माईंची साथ आणि सहानुभूती मात्र ताराबाईंना होती.

एरवी, संध्याकाळचा बॅडमिंटन कोर्टातला खेळ, गप्पा, गाणी – सारे चालूच होते. ताराबाई त्यात भागही घेत होत्या. बाहेरच्यांनाच नव्हे तर जवळच्यांना, रोज येणाऱ्या स्नेह्यांनाही मनातल्या वणव्याची चाहूल लागू न देता वावरत होत्या.

बाळासाहेब व माई जयवंत, त्यांची मुलगी कुसुम, वासुदेवराव भोळे त्यांचे कॉलेजात शिकत असलेले बाबा व केशव हे दोन बंधू असे काही खेळगडी आपण होऊन जमत. ताराबाई कधी खेळत, कधी प्रभाला घेऊन विणकाम सांभाळीत कोर्टाकडेला खेळ पाहात बसून राहत. पाहुण्यांसाठी आतून वेताच्या खुर्च्या आणीत. स्वतः झारी घेऊन कोर्टावर पाणी मारीत... गाण्यात, गप्पात रस घेत... कधी कधी अंधार झाल्यावरही एकाएकी अंतर्मुख होऊन अनैसर्गिक गतीने हातातल्या विणकामाचे टाके घालतच राहत...

अंधार झाल्यावर खेळ थांबे. हवेत गारवा येई. मग गप्पागोष्टींना रंग चढे, गाण्याचे सूर जुळत. केव्हींचे वाचन चांगले. शॉ, इब्सेन यांच्या नाटकांमधले, फ्लॉरेन्स बार्कलेंच्या 'रोझरी'तले उताऱ्यांच्या उतारे त्यांना मुखोद्गत असत. ताराबाईंनी थॉमस हार्डी, हॉल केन यांच्या कादंबऱ्या विशेष आवडीने वाचलेल्या. हरिभाऊ आपट्यांच्या, वामन मल्हार जोश्यांच्या कादंबऱ्यांची तर त्यांनी पारायणे केली होती. आणि गद्याबरोबर पद्याचादेखील त्यांना षौक होता. त्यामुळे या गप्पा, चर्चा, तोंडी रसग्रहणांमध्ये आंग्ल साहित्यिकांबरोबरच केशवसुत, बालकवी, गोविंदाग्रज हेही हजेरी लावून जात. भोळे कुटुंब मूळचे अमरावतीचेच. या भावांचा उमदा सहवास ताराबाईंना आवडे. अशांच्या सहवासात केव्ही राहिले तर त्यांचे वागणे जरा निवळेल, व्यसने थोडी सौम्य होतील म्हणून त्यांनी आपण होऊन भोळे कुटुंबाशी परिचय, स्नेह वाढवला होता. त्यांच्या आईकडे दुपारच्या वेळी ताराबाई गप्पा मारायला जात. "दोनच माणसांचा तर स्वयंपाक, मीच करते, केव्हाच होऊन जातो." भोळ्यांच्या आईच्या पुढ्यातल्या निवडणात सामील होत त्या सहजतेने म्हणत. वासुदेवराव भोळ्यांशी ताराबाईंची विशेष मैत्री होती. केशवराव भोळे जरा लहान पडत. ते त्यावेळी मेडिकल कॉलेजचे शिक्षण घेत होते आणि गंधर्वांच्या पदांची सही न सही नक्कल करण्यात पटाईत होते. कॉलेजला सुट्टी लागली की तेही मोडकांच्या मैफिलीत सामील होत. काव्यगायनाचे खाते मग या 'केशव'च्या गळ्यात अडकविले जाई. तुतारी, झपूर्झा, सतारीचे बोल, नवा शिपाई – अशा काही कविता ताराबाईंना विलक्षण आवडत; त्याचप्रमाणे बालकवींची 'श्रावणमास' आणि 'फुलराणी', गोविंदाग्रजांची 'राजहंस माझा निजला'. ताराबाई पुन्हा पुन्हा आग्रह करून केशवरावांकडून या कविता गाऊन घेत. कोणीतरी पेटीवादन करी, ताराबाई स्वतःसुद्धा दिलरुबा वाजवीत असत.

> "कीजे नाथ हमारे हृदयकुंजमें विहार।
> बैठे प्रेमतटिनी तीरे
> आनंदअश्रु नयन भरे, तुम्हारे चरन धोये
> ऐसे भाग कहाँ हमार?"

हे साध्या पण गोड चालीतले आपले आवडते भजन दिलरुब्याच्या साथीवर त्या म्हणत. आणि कधी कधी नुसती शीर्षकेच चघळली जात. पिंपळपान, गुलाबी कोडे, विराम चिन्हे...

मध्येच केव्ही म्हणत,

"अरे केशव! ते स्वयंवरातलं जमाखर्चाचं गाणं म्हण रे!...ते?—मम सुखाची ठेव देवा, तुम्हापाशी ठेवा...मी स्मृतिमंदिरी लिहावे...जनकनाथा!"

रंग जमत जाई. केव्ही आणि ताराबाई त्या मुबुद्ध प्रसन्नतेत रमून जात.

केव्ही टीकाकार म्हणून परखड. एकदा गावात गणेश थिएटरमध्ये बलवंत मंडळीचे 'भावबंधन' लागले होते. ही मंडळी पहिलाच प्रयोग पाहून आली होती. अर्थात दुसऱ्या

दिवशी लतिका, धुंडिराज, कामण्णा हे हिरवळीवरचे विषय म्हणून हजर !

" Humour in riot *ad nausium*.* Except for that lovable Dhundiraj, the rest are pygmies ! "

अगदी हायकोर्टातल्या निकालासारखा केव्हींचा नेटक्या शब्दात अभिप्राय !

सहमत न होणारी मंडळीसुद्धा मनापासून दाद देऊन गेली. केव्हींचा हा मार्मिकपणा, दिलखुलास स्वभाव सर्वांनाच आवडत असे.

त्यांच्या अशा एखाद्या चलाख वाक्याला किंवा कोटीला इतरांबरोबरच हसून साथ आणि दाद देता देता ताराबाई एकाएकी खिन्न होत. काहीशा शोधक नजरेने त्या पतीच्या त्या हर्षनिर्भर चेहऱ्याकडे पाहत राहत. इतकी सुंदर पुस्तके, काव्ये, इतक्या जाणीवपूर्वक वाचणारा, त्यांचे रसग्रहण करणारा हा आपला जोडीदार त्याच्या इतर वागणुकीशी या सर्वांचा मेळ कसा घालायचा ? वकिलीतली, खेळातली गप्पांतली ही स्थिरता कितपत टिकणार ? पुढे काय होणार ? असे विचार मनात येऊन त्या बेचैन होत.

एकीकडे कॉफीचे कप मैफिलीत फिरत आणि केशवराव गाता गाता आपल्या या ज्येष्ठ मैत्रिणीकडे कौतुकाने बघत... पुढे बऱ्याच वर्षांनी श्री. केशवराव भोळ्यांनी आपल्या आत्मचरित्रपर ग्रंथात आपले मोडकजोडप्याविषयीचे स्मृतिचित्र शब्दात मांडले,

"... कानात कुडी नाही, हातात बांगडी नाही, गळ्यात मंगळसूत्र नाही ! नऊवारी लुगडे, पांढरास्वच्छ पोलका आणि हातात रिस्टवॉच. चेहरा सुंदर नाही परंतु भावनेने बोलू लागल्या की आकर्षक भाव धारण करणारा. घर स्वच्छ ठेवतील, फुलझाडे फुलवतील. पटकेल कामालाही लागतील ... आणि केव्ही ! निरनिराळ्या वेळचे पोशाख काटेकोरपणे करणारे !

... नकळत ताराबाई आपल्या भवतालच्या माणसांना काव्यास्वादाचा नाद लावून त्यांची मने समृद्ध करीत होत्या ... "

केशवराव भोसल्यांच्या ' संगीत भावबंधन ' ला या ताराबाई मोडकांची निराळीच गंध स्मृती आहे.

चिंतामणराव कोल्हटकरांनी आपल्या ' बहुरूपी ' या पुस्तकात हा प्रसंग आवर्जून दिला आहे—

कंपनी डबघाईला आलेली. १९१८ व १९१९ ही दोन वर्षे इन्फ्लुएंझाच्या तडाख्यात सापडली होती. घरोघर अंथरूणे घरून माणसे पडली होती. खुद्द केशवराव भोसल्यांच्या पत्नीचाही नुकताच साथीने बळी घेतला होता. परंतु त्याच स्थितीत त्यांनी हिमतीने नाटक लावले होते. कसाबसा प्रयोग उभा केला होता. नेपथ्य, वेषभूषा—सारेच तोकडे; कसेबसे वेळ मारून नेणारे होते.

दुसऱ्या अंकात—थंडीचे दिवस, रात्रीची वेळ, ' लतिका ' कोट घालून बागेत फिरते आहे—असा प्रवेश होता. परंतु तोंडाने हे सर्व उल्लेख झाले तरी प्रत्यक्षात लतिकेच्या अंगावर कोट मात्र नव्हता. ' संगीत भावबंधना 'ला तो परवडलाच नव्हता.

प्रेक्षकातल्या एका स्त्रीने पटकन् उठून आपल्या अंगावरचा गरम कोट काढला आणि लतिकेसाठी तो विंगेत पाठवून दिला.

त्या ताराबाई मोडक होत्या ! नजरेला खुपणारी उणीव त्यांनी चटकन् आपल्या गर्भश्रीमंतीला शोभेशा दातृत्वाने भरून काढली होती.

भावबंधन नाटक एका कोटाच्या देणगीने श्रीमंत होऊन अमरावतीबाहेर पडले.

...परंतु असे सगळे दर्शनी सुख, आराम असूनही आतून ताराबाईंचा संसार पोखरला जात होता. केव्हींचे पिणे, सारेच छंद हाताबाहेर गेले होते. इतर सर्व ताराबाईंनी चालवून घेतले असते, घेतही होत्या. परंतु केव्हींचे प्रेमच आता दुभागले गेले होते. ताराबाईंनी केव्हींच्या हृदयातले स्थान गमावले होते. गावात सर्व ठिकाणी केव्हींच्या वागण्याची, ताराबाईंच्या दुर्दैवाची चर्चा चालू होती. ताराबाईंनी मुलींची शाळा काढली, चालवली होती. लोकांची तोंडे कोण धरणार ? गावगप्पांमधला एक अश्लील शिंतोडा ताराबाईंच्या शिक्षणकार्यावरही येऊन पडला. कुणीतरी त्या प्रकरणाची चव घेत घेत शेरा मारला होता, " म्हणजे या बाईंनी ' शाळा ' काढली आहे ती मुलींच्या कल्याणासाठी की आपल्या नवऱ्याची सोय ? "

ताराबाईंची सहनशक्ती संपत आली होती. कोंडमारा असह्य होत चालला होता. कोणतीच बाजू धड नव्हती. आपल्या घरात मानाने जगणे आता त्यांना अशक्य होत चालले होते...

एका रात्री केव्ही असेच सुलोचनाबाईंकडे गेले असावेत. मध्यरात्रीपर्यंत ताराबाईंच्या डोळ्याला डोळा लागला नव्हता. त्या सारख्या विचार विचार विचार करीत होत्या. अखेर त्यांना ते रात्रीचे जीवघेणे वाट पाहणे इतके असह्य झाले की तेवढ्या रात्री भ्रमिष्टाप्रमाणे दार उघडून त्या घराबाहेर पडल्या आणि सरळ मालटेकडी रोडने चालू लागल्या. टेकडी चढून उतरणीपाशी बसून राहिल्या. हळू हळू उत्तररात्रीचा गारवा हवेमध्ये जाणवू लागला तेव्हा त्या भानावर आल्या. भोवती पाहताच तो त्यांना आपले त्या भयाण रात्रीतले कृत्य, आपले एकाकीपण जाणवले. घराची, प्रभाची तीव्र काळजी वाटून त्या जवळजवळ धावतच घरी आल्या. प्रभा तशीच गाढ झोपली होती. तिची आयाही पलीकडच्या खोलीत तशीच झोपली होती. सगळे दिवे जळत होते; दार सताड उघडे होते !

ताराबाईंनी आधी धावत जाऊन आपल्या तान्ह्या लेकीला जवळ घेतले.

या प्रसंगानंतर लौकरच त्यांनी घर सोडण्याचा निर्णय घेतला. आता याउपर आपण

* नको नको होईतोवर.

स्वाभिमानाचा सुंभ जाळत राहिलो तर आपल्याला वेडच लागेल अशी त्यांची खात्री झाली होती.

—पावसाळा सुरू झाला. ताराबाईंनी प्रभाला, तिच्या दाईला बरोबर घेतले. ताराबाईंना रोखण्याची नैतिक ताकद आता केव्हींमध्ये उरली नव्हती. त्या जाताहेत असे पाहून त्यांनी आपले कुटुंबस्नेही श्री. वासुदेवराव भोळे यांना ताराबाईंनी सोबतीला न्यावे अशी सूचना केली. ताराबाई ज्या अमरावतीहून निघाल्या त्या मुंबईत थबकून उसंत न घेता थेट पुण्याला पोचल्या. विवाहपूर्व काळातले त्यांचे व केळकर कुटुंबाचे ज्येष्ठ स्नेही, श्री. बापूसाहेब चिपळूणकर* त्यावेळी हिंगणे येथे अण्णासाहेब कर्व्यांच्या संस्थेत काम करीत होते. ताराबाई त्यांना फार मानीत असत. आयुष्यातल्या त्या फार निर्णायक अशा वेळी त्यांच्याशी विचारविनिमय करून त्यांचा सल्ला घ्यावा अशा हेतूने त्या पुण्यात दाखल झाल्या. वाटेत मुंबईला त्यांनी मेडिकल कॉलेजमध्ये शिकत असलेल्या तरुण केशवराव भोळ्यांनाही बरोबर घेतले.†

१९२१ साल होते ते. मंडळी पुणे स्टेशनवर उतरून, दोन टांगे करून हिंगण्याच्या दिशेने निघाली. पाऊस लागून राहिला होता. अरुंद रस्त्याने चिखल तुडवीत टांगे पुढे चालले होते. वाटेत तुरळक रहदारी होती. पहाट होऊन गेली होती. भाजीचे ठेले घेऊन शहराकडे निघालेले भाजीवाले वाटेत दिसत होते. लकडीपुलावरून टांगे हिंगण्याच्या दिशेने वळले. कोणी कोणाशी बोलत नव्हते. ताराबाई गंभीर दिसत होत्या. प्रभाची काय चळवळ असेल तेवढी, नंतर तीही पेंगुळल्यासारखी झाली. आपण पुण्याला नक्की कशाला आलो आहोत, हिंगण्याला कोणत्या कामासाठी चाललो आहोत याची केशवरावांना धड काहीच कल्पना नव्हती. वडील भाऊ व ताराबाई केशवरावांना "अभ्यास फार बुडणार नाही ना!—मग चला, थोडे काम आहे," असे म्हणाले होते. म्हणून ते निघाले होते. वासुदेवराव व ताराबाई दोघेही वयाने वडील. आपण होऊन काही चौकशा करणे केशवरावांना योग्य वाटले नाही.

मंडळी आश्रमात पोचली तेव्हा बापूसाहेब व अक्का त्यांची वाटच पाहत होते. बापूसाहेबांच्या सहज, विनोदी बोलण्यामुळे वातावरण थोडे निवळले. सगळी हसू-बोलू लागली. अक्कांनी आल्या आल्या गरम न्याहारी व जेवण तयार ठेवून न बोलता आपली कामगिरी केली, सहानुभूती पुरविली.

दुपारी माजघरात थोडी विश्रांती घेऊन झाल्यावर मोठी माणसे सगळी बाहेरच्या

* या कर्तबगार गृहस्थांना पुढे अकाली मृत्यू आला.

† या प्रसंगाचा वृत्तान्त श्री. केशवराव भोळ्यांनी 'जे आठवते ते' या आपल्या आत्मचरित्रपर पुस्तकात सादंत दिला आहे.



पडवीत बसून चर्चा करू लागली. मुख्य समस्येचा ऊहापोह झाला. ताराबाई आपले दुःख सांगताना थोड्या गहिवरत होत्या, मधून मधून थांबतही होत्या.

"You should give him another chance. There should be no undue haste on taking a decision on this vital issue." बापूसाहेबांनी इशारा दिला.

"ते आता सुधारण्याच्या पलीकडे पोचले आहेत..." ताराबाईंनी उत्तर दिले.

हळू हळू चहाची वेळ झाली. प्रभाही जागी झाली होती. एक मोठा सुस्कारा टाकून ताराबाई तिच्याकडे वळल्या.

तेवढ्यात वामन मल्हार जोशी, प्रो. दिवेकर, आठवले इ. मंडळी जमली. संध्याकाळी पाहुणेमंडळींनी सगळीकडे हिंडून आश्रम पाहिला. बापूसाहेबांनी कर्व्यांची पहिली झोपडीही दाखविली.

हवेत थंडावा उत्पन्न झाला होता. लौकर जेवणे आटोपून नाट्यवाचनाला बसायचे ठरले. वासुदेवरावांनी 'अरुणोदय' हे रूपांतरित, आधारित नाटक लिहिले होते ते ऐकण्यासाठी जोशी व इतर मंडळी येणार होती.

नऊ वाजता वासुदेवराव वाचू लागले. ताराबाईही ऐकायला बसल्या होत्या. 'अरे वा!' 'छान!' म्हणून प्रतिसाद देत होत्या. विनोदांना दाद देताना ताराबाईंच्या खिन्न चेहऱ्यावर स्मित उमटत होते. वाचनानंतर नाटकाच्या गुणावगुणावर चर्चा झाली तेव्हा ताराबाईंनी आपलेही मत दिले.

मग पुन्हा काही प्रवेशांचे वाचन झाले. काव्य-शास्त्र-विनोद चालू राहिला. हळूहळू केशवरावांची नाट्यगीते वातावरणात सूर पसरू लागली.

'धिक्कार मन साहिना ऽ'

पाऊस बाहेर ओकसाबोक्शी कोसळत होता. ताराबाई मात्र मलूल पण शांत, सावरलेल्या होत्या.

दुसऱ्याच दिवशी मंडळी मुंबईला परतली. एक दिवस तेथे काढून ताराबाई वासुदेवरावांबरोबर तडक अमरावतीला परतल्या. स्नेहीमंडळींच्या सल्ल्यावरून त्यांनी थोडे सबुरीने घेण्याचे धोरण स्वीकारले होते. ठिगळ टिकेल अशी फारशी उमेद त्यांना नसावी. परंतु घायकुतीने निर्णय न घेण्याचा त्यांच्या हितचिंतकांचा सल्ला ताराबाईंनी मानला होता. ताराबाईंनी घर सोडू नये असे त्यांच्या व केव्हींच्या सर्वच हितचिंतकांना वाटत होते. इतकी सुंदर साथ तुटत असलेली पाहून कुणाला बरे वाटणार होते? पण ती अभंग राहणे आता वास्तविक केव्ही आणि ताराबाईंच्यासुद्धा हातात नव्हते.

फार थोडे दिवस हा प्रयोग चालला. केव्हींच्या वागण्यात काही फरक, सुधारणा नव्हती. ताराबाई त्यांना अतिशय हव्या असूनदेखील त्यांच्यासाठी आपले वागणे

बदलणे त्यांना शक्य होत नव्हते; ते दुबळे ठरत होते. मध्ये काही दिवस ताराबाई त्या वातावरणाला कंटाळून प्रभाला घेऊन किहीमला जाऊन काशीबाईंच्या बंगल्यात राहून आल्या. भोळे, जयवंत इ. मित्रमंडळीही सुटीला तेथे आली होती. परंतु परत आल्यावर ताराबाईंना पुन्हा एकदा अमरावतीची परिस्थिती असह्य झाली आणि रडून भेकून, केव्हींशी भांडून नव्हे तर त्यांच्याशी नीट चर्चा करून, ताराबाईंनी पुन्हा एकदा सखेद परंतु दृढपणाने पहिलाच कटू निर्णय घेतला.

केव्ही आणि ताराबाई दोघांनाही एकमेकांबद्दल आदर आणि आकर्षण वाटत होते ते कमी झाले नव्हते. दोघेही एकमेकांना हवीच होती. परंतु दोघेही असहाय्य होती. केव्ही आपले वागणे सुधारू शकत नव्हते, ताराबाई तेथे राहून ते सहन करू शकत नव्हत्या. त्यांचे मानी मन आड येत होते. अशा परिस्थितीत एकच पर्याय ताराबाईंपुढे होता. गृहत्याग करणे ! केव्हीही त्यांना थांबवू शकत नव्हते. त्यांना दुसरा मार्ग सुचत नव्हता. मात्र ताराबाईंनी ठरविलेला गृहत्याग म्हणजे घटस्फोटाची पूर्वतयारी, पहिली पायरी नव्हती. केव्हींची साथ कायमची सोडणे त्यांच्या आणि केव्हींच्याही ध्यानीमनी नव्हते. प्राप्त परिस्थितीतून, असहाय्यतेतून त्यांना समोर दिसत असलेला एकमेव मार्ग म्हणून त्यांनी आपल्या प्रिय पतीचा –प्रिय घराचा– तात्पुरता तरी त्याग करायचा ठरविला होता.

ज्यांना काही करता, बोलता येणे शक्य होते ती मित्रमंडळी थोडीफार मध्ये पडली. परंतु प्रश्न मित्रांच्या समजावणीचा, आणि ताराबाईंच्या भावुकतेपणाचा नव्हता.

"जरा दमाने घ्या, प्रभाकडे तरी पाहा !" याशिवाय त्यांच्याकडेही काही युक्तिवाद नव्हता. या वेळच्या ताराबाईंच्या निर्णयातला निर्धार सर्वांनाच जाणवला. केव्हीही शेवटपर्यंत विनवण्या करीत होते. परंतु आता ताराबाईंना जणू त्या स्वतःसुद्धा अडवू शकत नव्हत्या.

अन्यायाची वागणूक मिळताच ताराबाईंनी मागे सरकारी नोकरीवर पाणी सोडले होते. आता पुन्हा स्वमानाचा प्रश्न येताच याही 'पेशा'चा राजिनामा देऊन ही सुशिक्षित हिंदू स्त्री ऐन तारुण्यात घर सोडून निघाली होती. तिच्या या जगावेगळ्या, समाजमनाला सवयीच्या नसलेल्या कृतीला कुणाचेही पाठबळ असणे असंभवनीय होते. आईवडिलांचा आधार नव्हताच, भावंडेही अलिप्त होती. आपली दीड वर्षांची कन्या, मानी मन आणि पदवी तेवढी बरोबर घेऊन ताराबाई घर सोडीत होत्या. मात्र त्यांच्या त्या कृतीला 'अंगावरच्या वस्त्रानिशी' या थाटाचा आक्रस्ताळा आवेशाचा पदर नव्हता. स्वतः केव्ही त्यांना प्रेमाने पोचवायला येणार होते. मित्रमंडळींपैकी पुन्हा वासुदेवराव भोळेच त्या शोकाकुल जोडप्याला सोबत करायला निघाले होते.

ताराबाईंची ही करणी, कृती सर्व स्त्रियांमध्ये गडकऱ्यांच्या सिंधूचेच प्रतिबिंब पाहू



इच्छिणाऱ्या त्या काळच्या समाजाला मात्र फार फार धक्कादायक, क्रांतिकारक वाटली.

"बघितलंत, काय होतं शिकलेल्या मुलींच्या संसाराचं शेवटी ? म्हणून म्हणतोऽ" असे म्हणत हे सारे नाट्य पाहणाऱ्या, गावातल्या जुन्या पिढीने परस्पर आपल्याच घरातल्या शिकत्या मुलींपुढे – पिढीकडे डोळे वटारून बघत कडाकडा बोटे मोडली.

केव्ही आणि ताराबाई यांच्या या ताटातुटीबद्दल कळवळून बोलताना रावबहादूर खरे या त्यांच्या ज्येष्ठ स्नेह्यांनी उद्गार काढले—

"ताराबाई फार चांगली मुलगी होती हो ! केव्हींचं बेताल वागणं तिनं कसं काय सहन करावं ?...ती दोघंही माणसं मोठी होती. तरुण वयात माणसाचे विचार, वागणं भडक असतं. ही तर दोघेही स्वतंत्र बाण्याची, लगाम न सोसणारी. त्यावेळी नात्यातल्या किंवा इतर कुणा वडीलधाऱ्या, अधिकारी व्यक्तीने मध्यस्थी करून हलक्या हाताने हा गुंता सोडवायचा प्रयत्न केला असता तर कदाचित ती शोकांतिका टळली असती. दुर्दैवाने मी तेव्हा तेवढा मोठा नव्हतो, त्यांच्यापासून दूर, बाहेरगावी होतो आणि दुसरी कोणी जबाबदार व्यक्ती हे काम करू शकली नाही."

अर्थात या हळहळीतला जिव्हाळा मान्य करूनही मध्यस्थीचा उपाय या मामल्यात कितपत उपयुक्त ठरला असता हा प्रश्न राहतोच !

—ताराबाई दुःखाकुल मनाने परतीच्या वाटेला लागल्या. प्रवास लांबचा होता, वेळ रात्रीची होती. वासुदेवराव सुज्ञपणे थर्ड क्लासमध्ये, निराळ्या डब्यात बसले होते. मोडक कुटुंब 'फर्स्ट' मध्ये होते. मध्ये एका स्टेशनावर गाडी जास्त वेळ थांबली तेव्हा सारे ठाकठीक आहे की नाही, त्या दुःखी जोडप्याला काही हवे, नको आहे का पाहावे म्हणून वासुदेवराव या दोघांच्या डब्यापाशी आले. त्या निर्णायक सहप्रवासातले त्या प्रेमविव्हल जोडप्याचे त्या वेळचे सलगीने आणि अखेर चाललेले शेवटचे हितगुज... एकमेकांच्या बाहुपाशात विसावणे... वासुदेवरावांना ते दृश्य मोठे हृदयद्रावक वाटले. त्यांचे डोळेही पाणावले.

एकमेकांवर इतके प्रेम असताना इतकी परस्पर ओढ असताना एकमेकांपासून दूर होणाऱ्या या जोडप्याचे मानसशास्त्र वासुदेवरावांना समजून घेता येईना !

दुसऱ्या दिवशी ताराबाईंजवळ वासुदेवरावांनी याबद्दल आश्चर्योद्गारही काढले. तेव्हा ताराबाई नुसत्या मलूल हसल्या. त्यांच्या त्या हसण्यात अभिमान, कारुण्य आणि "वासुदेवराव, तुम्हाला काऽऽही समजत नाही !" या सर्वांचे प्रच्छन्न मिश्रण होते.

मुंबईला पोचल्यावर ताराबाई प्रभाला घेऊन डॉ. काशीबाई नवरंग्यांकडे उतरल्या. त्यांना तेथे पोचवून केव्ही आपल्या एका मित्राकडे उतरायला गेले. दोघे दोन दिवस मुंबईतच होती. या लहानशा मुक्कामात दोघांनी जोडीने मुंबईतल्या काही निकट स्नेह्यांच्या गाठीभेटीही घेतल्या. सर चंदावरकरांचा पुतण्या प्रभाकर केव्हींचा खास मित्र.

पेडररोडवरच्या चंदावरकरांच्या बंगल्यात, गच्चीवर बसून ही सर्व बरोबरीची मंडळी गप्पा मारीत होती. हास्यविनोदही होत होता. ताराबाईंची मुद्रा थोडी म्लान तरीही शांत दिसत होती. नेहमीच्या खेळकरपणाने त्या केव्हींना संभाषणात मृदू साथ पुरवीत होत्या. खेळकरपणाने थट्टेत सामीलही होत होत्या. मोडक पतिपत्नींनी घेतलेला निर्णय त्या घरी सर्वांना ठाऊक झाला होता. ताराबाईंचे ते प्रेमळ, संयत, जबाबदार वागणे पाहून चंदावरकर मंडळी भारावून गेली. "किती धीराची बाई आहे, एवढा खडतर निर्णय घेतलेला असून चेहऱ्यावर त्याचा मागमूसही नाही..." ताराबाईंच्या व्यक्तिमत्त्वाविषयी त्यांना सर्वांना वाटत असलेला मुळातला आदर या घटनेने द्विगुणित झाला. दीर्घ काळ तो प्रसंग घरातल्या मंडळींच्या लक्षात राहिला.

यानंतर दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशी मोडक दांपत्याने मुंबई सोडली. प्रभासह ते लोणावळ्याला गेले. ही लोणावळ्याची सफर करण्यामागेही एक विशिष्ट हेतू होता. याच लोणावळ्याला केव्हींच्या वडिलांनी बांधलेल्या बंगल्यात या दोघांनी जोडीने जीवन जगण्याचा, एकमेकांशी विवाहबद्ध होण्याचा निर्णय घेतला होता. त्या गोष्टीला आता सात-आठ वर्षे होऊन गेली होती. त्या वेळी मनात असलेले ते कोवळे सह-जीवन प्रत्यक्ष वैवाहिक जीवनात, संयुक्त प्रयत्न करूनही ते यशस्वी करू शकले नव्हते. परंतु त्यांच्या नात्यातले माधुर्य अगदीच संपले नव्हते, फक्त साहचर्य संपवायचे ठरले होते.

तेव्हा ज्या प्रेमाने ते एकमेकांच्या सन्निध आले होते त्या प्रेमानेच, मनावर कोणतेही डाग राहू न देता फक्त गोड स्मृतीच बरोबर ठेवून घेत– तितक्याच रोमँटिक तऱ्हेने ते आता एकमेकांचा निरोप घेणार होते. शेवटचे काही सुवर्णक्षण एकमेकांच्या सहवासात भोगून, तो सुवास मनात भरून घेत ते आपले वैवाहिक अद्वैत संपविणार होते... !

त्याप्रमाणे चार दिवस लोणावळ्याला राहून मंडळी मुंबईला परतली. केव्ही लगेच पुढे अमरावतीला जाणार होते.

प्रभाचा केव्हींना विलक्षण लळा होता. त्यामुळे तिला दूर करणे त्यांना फार जड गेले. ताराबाईंनाही बापलेकीची ती ताटातूट बघवत नव्हती. प्रभाला वारंवार भेटविण्याचे आश्वासन देत अखेर त्यांनी आपल्याला हरवलेल्या प्रियकराला – पतीला निरोप दिला. अत्यंत क्लेशमय स्थितीत केव्ही अमरावतीच्या गाडीत बसले आणि ताराबाई प्रभाला कडेवर घेऊन माहेरी माँच्या निवासस्थानी परतल्या. प्रभा त्यावेळी केवळ सव्वादीड वर्षांची होती. या स्थानबदलाचा, ताटातुटीचा अर्थ त्या बालमनाला लागणे शक्य नव्हते, पण वडिलांच्या सहवासाची तिला सवय झाली होती. "अप्पा? अप्पा !" करून ती आपल्याला चुकल्याचुकल्यासारखे वाटत होते ते प्रकट करीत होती. "निदान प्रभाकडे तरी पाहा आणि विचार बदला." अमरावतीकर स्नेह्यांचे बोल आठवून ताराबाई पुन्हा पुन्हा अस्वस्थ होत होत्या.



माँच्या घरी आधारासाठी, आसऱ्यासाठी परतलेल्या ताराबाई मात्र उध्वस्त, मोडलेल्या मनाच्या झाल्या होत्या. एखाद्या प्रसंगाला धैर्याने तोंड दिल्यानंतर, ते संकट टळल्यानंतर मात्र एकाएकी सारे अवसान गळावे, गलितगात्र व्हावे, तशा त्या अगदी गळून गेल्यासारख्या झाल्या होत्या. वरकरणी शांत चेहरा राखून जो क्षोभ, जी प्रतारणा जी निराशा आणि जो अपमान आतल्या आत त्यांनी इतके महिने सोसला होता त्यासाठी मोजलेली सारी मानसिक किंमत आता ते सारे संपवून परतल्यानंतर मायेच्या घरी उघड झाली होती. त्यांच्या चित्ताची आणि देहाचीही नुसती दुर्दशा झालेली माँना दिसली. आपण केवढी कठिण परीक्षा दिली, त्यात केवढी जीवनशक्ती खर्ची घातली याचा हिशेब देताना आपल्या आईच्या ठिकाणी असलेल्या या 'मावशी'च्या घरी ताराबाईंना कसल्याही मुखवट्याची जरूर वाटली नाही. नवरंग्यांच्या घरातली सारी माणसेही त्यांना या धक्क्यातून सावरायला समजून आणि मूक मदत करत राहिली. माँ तर सतत ताराबाईंचे दुःख हलके करण्याच्या प्रयत्नात असत. ताराबाई बाळंतपणानंतर एका पाठोपाठ एक आघात सोसून फार अशक्त झाल्या होत्या. मानसिक ताणाची किंमत त्यांच्या प्रकृतीने दिली होती. प्रभाही सारखी किरकिरत असे; तिला दातांचा त्रास बराच होत होता.

ताराबाईंनी गृहत्यागाचा निर्णय खंबीरपणानेच घेतला होता तरी त्यांच्या देहामनाने तो पचवायला पुष्कळ दिवस घेतले. एखादा सडलेला अवयव निरुपयोगी लोढणे म्हणून बरोबर बाळगण्यापेक्षा वेदना झाल्या तरी शस्त्रक्रियेने कापून काढावा लागतो. आयुष्यातले वैवाहिक सुखाचे पान फाडून टाकताना, 'आयुष्यातले एक पर्व संपले' असे म्हणताना त्यांना पश्चात्ताप होत नसला तरी मानसिक अर्थाने बराच क्षोभ त्यांना सोसावा लागला. पुन्हा त्यांच्या मनाने के. व्हीं. शी फारकत घेतली नव्हतीच ! त्यामुळे दिवसभर ताराबाई रडून काढत. त्यांना सारखी केव्हींची आठवण येत असे. प्रभाला मांडीवर घेऊन, कधी त्या हुंदके देत; कधी ते दाबून टाकत. शरीरावर आणखी परिणाम होऊ नये म्हणून माँ त्या दिवसांत बदामाच्या खिरीसारखे पौष्टिक पदार्थ करून ताराबाईंना आईच्या मायेने भरवीत. ताराबाईंना विश्रांती मिळावी म्हणून घरातले सारेजण आळी-पाळीने प्रभाला सांभाळण्याचे, फिरवून आणण्याचे काम करीत.

छोट्या प्रभाला त्या बाळवयातही आईच्या यातना कुठेतरी जाणवत असाव्यात. खेळता खेळता मधूनच कुठूनतरी ती कावरीबावरी होऊन आईला शोधीत येई. ताराबाईंच्या मांडीवर चढून त्यांच्या चेहऱ्याकडे निरखून बघे. आईचे डोळे कोरडे असले तरी ते आपल्या चिमुकल्या हाताने किंवा आईच्या पदराच्या टोकाने पुसायचा प्रयत्न करी. प्रभाच्या त्या निष्पाप कृतीमुळे पोळलेल्या मनाच्या ताराबाई आणखीच सद्गदित होत.

अखेर, अशी बरीच तडफड सोसल्यानंतर ताराबाईंचे सरलेले बळ परत आले. पुढ्यात पसरलेले लांबलचक एकलेपण सोसण्याची शक्ती आली. त्या सावरल्या. उदास परंतु ताळ्यावर आलेल्या मनाने त्यांनी आता उपजीविकेसाठी एखाद्या नोकरीची शोधाशोध सुरू केली. ताराबाईंच्या सर्व नातलगांची त्यांच्या या दुःखात त्यांना पूर्ण सहानुभूती होती परंतु तिचा तिनेच आता मार्ग काढावा अशा अपेक्षेने काहीशा हताशपणाने आणि सहानुभूतीपूर्ण अलिप्ततेने ही सारी मंडळी, ताराबाईंची आयुष्याचा काठ शोधण्याची धडपड काठावरून पाहत होती. हे सारे घडले त्यावेळी मोडकांच्या बाजूने वडीलकीच्या नात्याने कुणी या वेबनावात लक्ष घालील अशी परिस्थिती नव्हती व तसे मोडकमंडळींचे धोरणही नसावे. केव्हींच्या तीन मोठ्या बहिणींपैकी सर्वांत मोठ्या यमुनाबाई (सौ. आपटे, धुळे) केव्हींचे लग्न झाले त्या वर्षीच दिवंगत झाल्या होत्या. सौ. माणिक रानडे या दुसऱ्या भगिनीही १९१६ साली निवर्तल्या व सौ. चंद्रभागा करंदीकर या तिसऱ्या क्रमांकाच्या भगिनी तर १९०७ सालीच निधन पावल्या होत्या. बंधूंपैकी विष्णुपंतांना १९१८ साली वयाच्या पन्नासाव्या वर्षी केव्हींच्या घरीच मृत्यू आला व गोविंदराव हे त्यांच्या पाठचे बंधूही त्याच वर्षी दिवंगत झाले. नारायणराव व यशवंतराव हे दोघे डॉक्टर झालेले बंधू या सुमारास मेडिकल सर्व्हिसमध्ये कमिशन घेऊन महायुद्धावर गेलेले होते. कॅप्टनचा हुद्दा व विविध पदके (war medals) मिळवून ते परतले, तोवर ताराबाई आणि केव्ही यांचे वैमनस्य उघड झाले होते. ताराबाईंना त्यांची सक्रिय मदत, मार्गदर्शन लाभले की नाही कुणास ठाऊक. परंतु एकूण मोडकमंडळींची सहानुभूतीही केव्हींपेक्षा ताराबाईंनाच जास्त मिळाली.

नोकऱ्या मिळणे सहजसुलभ नसण्याचा तो काळ होता. त्यामुळे ताराबाईंच्या पात्रतेला योग्य अशी नोकरी काही लगेच उपलब्ध नव्हती. माँ कुठे कुठे प्रयत्न करत होत्या. शक्यतो मुंबईतच कोठेतरी नोकरी बघावी अशी ताराबाईंची इच्छा होती. त्याप्रमाणे त्यांनी म्युनिसिपल कॉर्पोरेशनचे श्री. पाध्ये म्हणून शिक्षणाधिकारी होते त्यांच्याशी संपर्क साधला होता. "तुमच्यासाठी योग्य अशी जागा रिकामी झाली की कळवतो, तोवर थोडी वाट पाहा." असा त्यांचा जबाब आला होता. Schools Committee of the Bombay Municipality मध्ये त्यांना नोकरी मिळू शकणार होती.

ज्यांना ताराबाईंची आणखी एक मानलेली मावशी म्हणता येईल, अशा डॉ. रखमाबाई या त्यावेळी राजकोट संस्थानात नोकरी करीत होत्या. एकीकडे ताराबाईंनी त्यांनाही आपण नोकरीच्या शोधात असल्याचे कळवून ठेवले.

रखमाबाईंचे तेथून त्यांना उलटटपाली उत्तर आले! ताराबाईंना योग्य अशी नोकरी तेथे जणू त्यांची वाट पाहत होती! राजकोट येथील बार्टन फीमेल ट्रेनिंग कॉलेजच्या प्रिन्सिपलची जागा उपलब्ध होती. या जागेला लायक व्यक्ती न मिळाल्यामुळे ती जागा



दीड वर्षे रिकामीच होती. डॉ. रखमाबाईंनी ताबडतोब ताराबाईंना अर्ज लिहून पाठवण्यास सांगितले होते.

कर्तव्य म्हणून ताराबाईंनी अर्ज पाठवून दिला खरा; परंतु शक्यतो 'मुंबईत राहून तेथेच नोकरी करण्याची आपली मनीषा असल्याचे व तशी नोकरी आपल्याला आज ना उद्या मिळण्याची शक्यता असल्याचे' त्यांनी रखमाबाईंना कळवून टाकले. राजकोटच्या नोकरीबद्दल त्यांच्या मनाने लगेच उचल काही खाल्ली नाही. कदाचित अशा अशांत मनःस्थितीत एवढी मोठी, आव्हानाची नोकरी स्वीकारण्याइतकी उमेद त्यांना त्या वेळी वाटत नसावी. अणि त्या नोकरीत अव्हान निश्चित होते.

परंतु बार्टन फीमेल कॉलेजचे प्रिन्सिपलपद आता ताराबाईंकडून नकार घेणार नव्हते. ताराबाईंना तारेनेच तेथले बोलावणे आले. रु. २५० मासिक पगारावर त्यांची तेथे नेमणूक करण्यात आली होती. डॉ. रखमाबाईंची एकाहून अधिक आग्रहाची पत्रे आली. इकडे माँही त्यांना जाण्याचा, ही संधी सोडू नये असा सल्ला देत होत्या.

...अखेर ताराबाईंनी राजकोटची जबाबदारी पत्करण्याचा निर्णय घेतला. प्रभाची देखभाल, सांभाळ करण्यासाठी त्यांनी केव्हींना पत्र लिहून तिची दाई रामूबाई आणि तिची पोर सुभा या दोघींना बोलावून घेतले. आणि १९२१ च्या हिवाळ्याअखेरीस ताराबाईंनी प्रभासह राजकोटच्या दिशेने प्रयाण केले. डॉ. रखमाबाईंकडे पहिले चार दिवस मुक्काम करून मग ट्रेनिंग कॉलेजच्या आवारात असलेला प्रिन्सिपलचा बंगल ताराबाईंनी ताब्यात घेतला, आपल्या नव्या नोकरीची सूत्रे हातात घेतली.

ताराबाई मोडक –वयाच्या एकोणतिसाव्या वर्षी– फीमेल ट्रेनिंग कॉलेजच्या पहिल्या भारतीय स्त्री प्रिन्सिपल झाल्या!

बरोबर एकोणचाळीस वर्षांपूर्वी ताराबाईंचे सासरे कै. वामन आबाजी मोडक हे मुंबईच्या एल्फिन्स्टन हायस्कूलचे पहिले हिंदी प्रिन्सिपल झाले होते.

❁

# ५. भावनगर

**रा**जकोट येथील फीमेल ट्रेनिंग कॉलेजच्या प्रिन्सिपलपदासारखी जागा आपल्याला मिळाली कशी याबद्दल खुद्द ताराबाईंनासुद्धा आश्चर्यच वाटले. त्यांच्याच शब्दांत सांगायचे तर, " ...जेमतेम तीन वर्षांचा अनुभव आणि एक पदवी ! मी जर सिलेक्शन कमिटीत असते तर माझ्यासारख्या व्यक्तीची नेमणूक मी कधीच केली नसती ! "

ताराबाईंनी राजकोटला येऊन आपल्या सरकारी नोकरीची सूत्रे हातात घेतली ती काहीशा चकित आणि विकल मनःस्थितीत. पण त्या राजकोटला पोचल्या आणि महिना-भरातच बार्टन फीमेल ट्रेनिंग कॉलेज दिवाळीच्या सुटीनिमित्त बंद झाले.

अतिशय योग्य वेळी मिळालेल्या या सुटीचा ताराबाईंनी भरपूर उपयोग करून घ्यायचे ठरविले. ताराबाई पदवीधर असल्या, शिक्षिकेच्या, शाळासंचालिकेच्या कामाचा त्यांना अनुभव असला तरी या नव्या नोकरीत त्यांच्यासाठी बरेच आव्हान होते. शिक्षणशास्त्राचा विषय म्हणून त्यांनी अभ्यास केला नव्हता आणि ट्रेनिंग कॉलेजच्या संचालनाविषयी त्यांना पुरेशी माहितीदेखील नव्हती. प्रदेश अपरिचित, माणसे नवी आणि स्थानिक भाषा तरी ताराबाईंना कुठे अवगत होती ?

या सुटीत ताराबाईंनी कसून अभ्यास करायचे ठरविले. प्रथम गुजराती भाषा आत्म-सात करण्यासाठी त्यांनी एक शिक्षक नेमून घेऊन घरीच शिकवणी सुरू केली. लौकरच त्यांना गुजराती भाषेत बऱ्यापैकी लेखन वाचन करता येऊ लागले. आता त्यांना ट्रेनिंग कॉलेजमध्ये जी अध्यापनपद्धती चालू होती तिची माहिती करून घ्यायची होती. या विषयावर राजकोट येथील लायब्ररीत जेवढी पुस्तके उपलब्ध होती ती त्यांनी प्रथम वाचून काढली. त्यावेळी प्राथमिक ट्रेनिंग कॉलेजात किंडरगार्टन पद्धत व फ्रॉबेलच्या देणग्यांचा ( गिफ्ट्स )* अभ्यास केला जाई म्हणून ताराबाईंनी प्रथम ही शैक्षणिक तत्त्वे समजून घेतली.

ट्रेनिंग कॉलेजमधल्या कार्यपद्धतीचा त्यांना काही पूर्वानुभव नव्हता, म्हणून या सुटीत

* पूर्वप्राथमिक शिक्षणाचा शास्त्रीय दृष्टीने विचार करणारा पहिला शिक्षणतज्ज्ञ म्हणजे फ्रॉबेल होय. १८३७ साली त्याने एक बालमंदिर काढले व आपल्या पद्धतीला बालोद्यान हे नाव दिले. त्याने जी शैक्षणिक साधने तयार केली त्यांना तो 'देणग्या' म्हणत असे.



त्यांनी बडोदा व अहमदाबाद येथील ट्रेनिंग कॉलेजांना भेटी देऊन तेथे हे ज्ञान, अनुभव मिळविण्याचे ठरवले. या दोन्ही कॉलेजांना दिवाळीची सुटी नव्हती. सुदैवाने दोन्ही ठिकाणी असलेले संस्थाप्रमुख त्यांच्या पूर्वपरिचयाचेच निघाले.

बडोदा येथील संस्थाप्रमुख त्यांची तरुणपणीची बालसखी, विद्यार्थीदशेत राहून गेलेला गंगूताई ओक हीच होती ! या दोन्ही संस्थाप्रमुखांनी त्यांना सर्व प्रकारचे सहाय्य व मार्गदर्शन मनापासून केले.

दिवाळीची सुटी संपून कामावर रुजू झालेल्या ताराबाई ट्रेनिंग कॉलेजच्या कामात अनभिज्ञ राहिल्या नव्हत्या. सुटीत मिळविलेली माहिती, केलेली पूर्वतयारी, आणि अशा प्रकारच्या कामातला आपला उपजत ठरक या सर्वांच्या जोरावर ताराबाई मोडक ट्रेनिंग कॉलेजच्या कामाचा पसारा व्यवस्थित सांभाळू लागल्या. ट्रेनिंग कॉलेजच्या सर्व प्रकारच्या कामात त्या लौकरच रुळल्या.

त्या काळात ट्रेनिंग कॉलेजच्या प्रिन्सिपलपदावर बहुधा युरोपियन किंवा ॲंग्लोइंडियन स्त्रियांचीच नेमणूक केली जात असे, कारण या कामाला पात्र अशा देशी स्त्रिया फार कमी मिळत असत. परंतु ताराबाईंनी आपले कार्य चोख बजावून मोठा लौकिक संपादन केला. सरकारी खात्यात आणि बाहेरही राजकोटच्या सुशिक्षित समाजस्तरात त्यांना मोठे मानाने वागविले जाऊ लागले.

राजकोटच्या ट्रेनिंग कॉलेजमध्ये त्या काम करीत असताना एक लहानसा परंतु वेधक प्रसंग घडला. त्या भागातले शिक्षणाधिकारी एकदा वार्षिक तपासणी करण्यासाठी तेथे आले. Staff Meeting मध्ये या अधिकाऱ्यांनी काही दुय्यम मंडळींना विचारले की प्रिन्सिपलबाई रोज वक्तशीरपणाने कामावर हजर राहतात की नाही ? त्यांनी असा प्रश्न विचारताच ताराबाई ताडकन् जागच्या उठल्या आणि त्या वरिष्ठ अधिकाऱ्याला त्यांनी भर सभेत सुनावले की " आपले हे विचारणे व विचारण्याची पद्धत गैर आहे, आपले प्रश्न अयोग्य व खोडसाळ स्वरूपाचे ( ill conceived ) आहेत. मी माझे कर्तव्य कसे काय पार पाडते हे पडताळून पाहण्याचा अधिकार आपल्याला अवश्य आहे; परंतु त्यासाठी या मार्गाचा अवलंब करणे बरोबर नाही. अशा प्रकारचे मानहानिकारक प्रश्न माझ्यासंबंधी माझ्या हाताखालच्या लोकांना विचारण्यात आले तर त्यांना आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांबद्दल खऱ्याखोट्या कागाळ्या करण्यास उत्तेजन मिळाल्यासारखे होईल हे एक; आणि दुसरे म्हणजे ज्या मंडळींकडून इथे मला काम करून घ्यावयाचे आहे ती मंडळी आपल्या या अशा फूस देण्यामुळे मला जुमानेनाशी होतील..."

वरिष्ठासकट सारे चपापले ! नव्यानेच नोकरीवर हजर झालेल्या स्त्री प्रिन्सिपलचा हा स्पष्टवक्तेपणा, ही रोखठोक भाषा पाहून हे पाणी काही वेगळेच आहे याची त्यांना खात्री पटली. वरवर सौम्य, अबोल दिसणारी, मृदू आवाजात संभाषण करणारी ही बाई मनाने

लेच्यापेच्या तर नाहीच, उलट चांगली करारी आणि कडक आहे, असा सर्वांना वचक वाटू लागला.

ताराबाईंची ही सरकारी नोकरी मोठ्या पगाराची आणि रुबाबाची होती. कॉलेजच्या आवारात प्रिन्सिपलसाठी असलेला, इंग्रजी बांधणीचा मोठा बंगला त्यांना मिळाला होता. सभोवती मोठे आवार, हिरवळ, बगीचा, शेजारी नोकरवर्गासाठी स्वतंत्र निवासस्थान, दिमतीला अर्धा डझन नोकरांचा ताफा होता. वाहनसौख्य होते. कॉलेजच्या जगात व बाहेर समाजातही ताराबाईंना मानमरातब मिळत होता. रामूबाईला बरोबर आणल्यामुळे प्रभाच्या देखभालीचाही तसा प्रश्न नव्हता.

शिवाय गावातच ताराबाईंच्या मावशी डॉ. रखमाबाई व इतर काही स्नेहीमंडळी होती. या सर्व मंडळींचा मोठाच विरंगुळा ताराबाईंना होता. रखमाबाईंचे घर म्हणजे तर गावातले त्यांचे माहेर किंवा प्रभाचे आजोळ! पुष्कळदा शनिवार-रविवारी त्या रखमाबाईंकडे राहायला जात. राजकोटमध्ये डॉ. बाम यांच्या घरी अनधिकृत 'महाराष्ट्र मंडळ' भरत असे. तेथेही त्या जाऊ लागल्या. आणखीही काही मंडळी तेथे त्यांच्या ओळखीची निघाली. काहींशी लौकरच स्नेह जुळला. बॅ. मथुरेकर, मणिभाई पारेख, डिस्कळकर, बाम इ. कुटुंबांशी त्यांचे चांगले घरोब्याचे संबंध निर्माण झाले.

पदवीधर स्त्री ही चीज अमरावतीत जशी नवीन होती त्याहूनही राजकोटसारख्या ठिकाणी ती नवलाईची होती. त्याहून फीमेल ट्रेनिंग कॉलेजच्या प्रिन्सिपल म्हणजे वेगळाच दिमाख! एक तरुण, महाराष्ट्रीय पदवीधर स्त्री एकटी एवढ्या लांब घर सोडून येते आणि विदर्भातून सौराष्ट्रात येऊन असे जबाबदारीचे पद समर्थपणाने सांभाळू लागते, भाषेपासून सर्व गोष्टी नव्याने शिकून ते पद भूषवू लागते... सारेच लोकांना स्तिमित करण्याजोगे होते.

एवढे सारे वैभव दाराशी हात जोडून उभे असून वृत्तीने मितभाषी, काहीशा गंभीर आणि मलूल असलेल्या या प्रिन्सिपलबाईंची त्यांचे निर्मळ चारित्र्य व वागणूक या सर्वांमुळे सगळीकडे फार कदर केली जाई. त्यांच्या एकुलत्या एका लेकीला फार लाडाने वागविले जाई.

मात्र असे सारे बाह्यसुख असूनही राजकोटचे वास्तव्य व वैभव ताराबाईंच्या अंगी लागत नव्हते; या नोकरीत त्या सुखी नव्हत्या. त्यांच्या मनाला, आयुष्याला झालेली जखम अजून ओली होती. त्यामुळे त्यांच्या तेथल्या साऱ्या रुबाबावर औदासीन्याची, निराशेची छटा असे. राजकोटचे काम त्यांच्या बुद्धीला, कर्तृत्वशक्तीला आव्हान देणारे होते. दिवसातला बराच काळ त्यांना गुंतवून ठेवणारे होते तरी त्या साऱ्या व्यावसायिक धामधुमीत ताराबाईंना आपले खाजगी दुःख विसरता येत नव्हते. त्या एकाकी होत्या. त्यामुळे त्यांच्या घरातले वातावरणही मलूल, मंद असे. अजूनही रात्र रात्र त्या रडून



काढत. ताराबाईंना पूर्वीपासूनच डोकेदुखीची व्याधी होती मग ती या साऱ्या मनस्तापामुळे चांगलीच बळावे. दिवसच्या दिवस त्यांचे डोके ठणकत राही. राजकोटला आल्यावर आपल्याला थोडा विरंगुळा व छोट्या प्रभालाही सोबत म्हणून ताराबाईंनी आपल्या भावाची, तात्यांची मुलगी आपल्याजवळ शिकायला आणून ठेवली होती. ताराबाईंच्या भाचीचे नाव होते मनोरमा. तिला सारे बबन, बबनताई म्हणत. या बारा-तेरा वर्षांच्या मुलीचा सहवास त्या मायलेकींच्या दृष्टीने मोठा मोलाचा व पूरक ठरला होता. ही बबनताई आपल्या दुःखी, झुरणाऱ्या आत्याला हळुवार, निरागस संगत पुरवी. तिचे डोके दुखत असले की नसत्या चौकशा न करता तिचे डोके चेपून देई आणि इकडे प्रभाला खेळवताना तिचीही खेळगडी बने.

ताराबाईंना राजकोटला येऊन दोन वर्षे होत आली होती. या अवधीत त्या एकेकदा मुंबईला, अमरावतीला जाऊन आल्या होत्या. केव्हीही एकदा एका सुटीत राजकोटला येऊन, राहून गेले होते. पत्रव्यवहार तर अखंड चालू होता. ताराबाईंची बरीचशी लहानमोठी आप्तमंडळी त्यांच्या या राजकोटच्या मुक्कामात त्यांच्या घरी येऊन गेली.

याच दिवसांत एके दिवशी, प्रभाला सडकून ताप भरला आणि औषधांनी तो आवरेना. हा आजार पुढे कांजिण्यांचा ठरला, परंतु ताराबाईंना शंका आली देवीची. साहजिकच त्यांचा धीर सुटला आणि त्यांनी घाबरून केव्हींना तार केली,

"प्रभा आजारी, असाल तसे या!"

केव्हींना तातडीने निघून येणे कोणत्या कारणाने अशक्य झाले कुणास ठाऊक; परंतु त्यांनी स्वतः जाण्याऐवजी परस्पर मुंबई येथे मेडिकल कॉलेजमध्ये शिकत असलेल्या आपल्या एका तरुण पुतण्याला तशीच तार करून टाकली,

"प्रभा आजारी, असशील तसा जा!"

'या' चा 'जा'!

ताराबाईंचा हा पुतण्या मात्र खरोखरच मिळेल त्या गाडीने तडक राजकोटला निघाला. त्याच्या मनात अजून न पाहिलेल्या आपल्या काकूविषयी मोठाच प्रेमादर होता आणि त्याला तसेच कारण होते.

ताराबाईंचा हा पुतण्या म्हणजे केव्हींच्या तिसऱ्या क्रमांकाच्या भावाचा – गोविंदरावांचा सर्वात मोठा मुलगा. वडलांच्या मृत्यूनंतर आईचा व धाकट्या सहा भावंडांचा सांभाळ करून तो कसातरी जिद्दीने, एकट्याच्या हिंमतीवर मेडिकलचा कोर्स करीत होता. शिक्षणासाठी आपल्याला आर्थिक सहाय्य मिळावे म्हणून त्याने इतर चुलत्यांबरोबर केव्हींनाही पत्र लिहिले होते. परंतु केव्हींच्या तऱ्हेवाईकपणाचा – लहरीपणाचा एक नमुना म्हणा, पुतण्याला साहाय्य करण्याची त्यांना इच्छा नव्हती. ते काहीच हालचाल करेनात. ताराबाईंच्या मनाला ते बरे वाटले नाही. आपल्याला पैशाची कमतरता नसताना

सरल्या पुतण्याच्या शिक्षणाच्या बाबतीत केव्हींनी अशी खळखळ करावी... त्यावेळी केव्हींशी निष्फळ वाद घालण्याखेरीज त्या काही करू शकल्या नव्हत्या.

परंतु आता राजकोटची ही मोठ्या पगाराची, स्वतंत्र नोकरी मिळताच त्यांना पुतण्याची आठवण झाली. या कधीही न पाहिलेल्या पुतण्याला त्यांनी मुद्दाम पत्र लिहिले. पत्रातूनच त्याच्या प्रयत्नांबद्दल त्याची पाठ थोपटली आणि " तुझ्या या herioc effort ला माझी अंशतः मदत " म्हणून त्या त्याला दरमहा रु. २० आठवणीने पाठवू लागल्या. " Let me be kinsmanlike " हे त्यांच्या पत्रातले शब्द पुतण्याच्या चांगलेच लक्षात राहिले. ताराबाई राजकोटच्या नोकरीत असेपर्यंत ही मनीऑर्डर न चुकता रवाना होत असे.

परंतु ताराबाईंचे राजकोटचे वास्तव्य उण्यापुऱ्या दोन वर्षांतच संपुष्टात आले आणि त्याला कारण झाली त्यांची छोटीशी कन्या, प्रभा.

१९२२ च्या दिवाळीच्या सुटीमध्ये भावनगरचे एक गुजराती जोडपे ताराबाईंना भेटायला आले. ही मंडळी नुकतीच भावनगरजवळ असलेली ' दक्षिणामूर्ति 'ही शिक्षण-संस्था पाहून आली होती आणि तेथे श्री. गिरिजाशंकर उर्फ गिजुभाई बधेका यांच्या नेतृत्वाखाली चाललेले बालशिक्षणकार्य पाहून ती प्रभावित झाली होती. संभाषणात साहजिकच तो विषय निघाला. ताराबाईंचे कुतूहल जागृत झाले आणि त्यांनी दक्षिणा-मूर्ति येथील बालमंदिराची अधिक माहिती या जोडप्याला विचारली. लहान मुलांच्या शाळेला ' बालमंदिर ' म्हणायची कल्पना त्यांना फार आवडली होती. त्या गुजराती जोडप्याने गिजुभाई बधेकांच्या कार्याची मुक्तकंठाने प्रशंसा केली आणि ताराबाईंनी स्वतः जाऊन प्रत्यक्ष डोळ्यांनीच तेथले कार्य पाहावे असा त्यांना आग्रह केला.

' दक्षिणामूर्ति संस्था ' आणि तेथे चाललेले कार्य यांविषयी ताराबाईंनी त्यापूर्वीही ऐकले होते. राजकोटपासून दीडशे मैलांवरील भावनगरजवळच्या एका टेकडीवर असलेली ही शिक्षणसंस्था त्यावेळी चांगलीच नावारूपाला आली होती. या संस्थेची रचना डाल्टन प्लॅनवर* करण्यात आली होती. आणि विद्यार्थ्यांच्या राष्ट्रीय शिक्षणावर व चारित्र्य-

* डाल्टन ( अमेरिका ) येथील हेलन पार्कहर्स्ट या स्त्रीने १९१९ मध्ये ही योजना तयार केली. या योजनेत ८ ते १८ वर्षांच्या मुलांचा समावेश होता. मॉन्टेसोरी पद्धतीशी या योजनेचे बरेच साधर्म्य आहे. व्यक्तिस्वातंत्र्य, स्वयंशिक्षण व त्याबरोबर येणारी वैयक्तिक जबाबदारी यांचा पुरस्कार करणाऱ्या डाल्टन योजनेत वर्गशिक्षणाला स्थान नाही; प्रयोगशाळेतील व्यक्तिशिक्षण असे त्याचे स्वरूप असते. स्वयंशिस्त, शिक्षकाची भूमिका मार्गदर्शकाची आणि अभ्यासासाठी ठराविक कालमर्यादा असली तरी आपले आपण वेळापत्रक ठरविण्याचे स्वातंत्र्य हे या पद्धतीचे विशेष.



घडणीवर या संस्थेत विशेष भर दिला जात असे.

या संस्थेत गिजुभाई बधेका बालशिक्षणाचा जो प्रयोग करीत होते तो मॉन्टेसोरी शिक्षणपद्धतीतील सिद्धांतांवर आधारलेला होता. इटली येथील डॉ. मॉन्टेसोरींनी या क्षेत्रात कार्य सुरू केले ते १९०७ च्या सुमारास. १९१२ मध्ये मॉन्टेसोरी पद्धतीबद्दल माहिती देणारी त्यांची पुस्तके इंग्रजीत प्रसिद्ध झाली. ही इंग्रजी भाषांतरे ताराबाईंच्या वाचनात आली होती. दक्षिणामूर्तीमध्ये गिजुभाईंनी जो बालशिक्षणाचा प्रयोग चालविला होता तेथे, स्वातंत्र्य व स्वयंस्फूर्ती ही जी मॉन्टेसोरी शिक्षण पद्धतीतली तत्त्वे होती, त्यांना व्यावहारिक स्वरूप कसे द्यावे, याविषयी अत्यंत बारकाईने ते अभ्यास करीत होते.

हा शिक्षणप्रेमी फार मन लावून, अभ्यासपूर्वक आपले बालमंदिर चालवत होता, तेथे मुलांना घडताना पाहून स्वतःही घडत होता आणि आपले यासंबंधीचे अनुभव, विचार, निष्कर्ष लेखांद्वारा तो लोकांपुढे, पालकांपुढे, शिक्षणतज्ज्ञांपुढे कळकळीने मांडीत होता. मोठमोठी विचारवंत मंडळी गिजुभाईंचा हा नमुनेदार प्रयोग पाहण्यासाठी दक्षिणामूर्तीची टेकडी चढून जात होती. शिक्षणक्षेत्रात व भोवतालच्या परिसरात दक्षिणामूर्तीत चाल-लेल्या बालकार्याविषयी अपेक्षा व अचंबा व्यक्त केला जात होता. गिजुभाई बधेका मॉन्टेसोरी पद्धतीतली आकर्षक व आदर्श वाटणारी शिक्षणतत्त्वे प्रत्यक्षात कशी काय उतरवीत आहेत हे जाणून घेण्याच्या इच्छेने ताराबाईंच्याही मनाने उचल घेतली आणि त्यांनी भावनगरला जाऊन गिजुभाईंचे बालमंदिर बघायचे ठरविले.

गिजुभाईंच्या बालशिक्षणकार्यात ताराबाईंनी एवढा रस घेतला त्याला आणखीही एक कारण होते. त्यावेळी ताराबाईंच्या मनात प्रभाच्या शिक्षणाचा, विकासाचा प्रश्न प्रधान होता. ती एक मोठीच जबाबदारी, चिंतेची बाब त्यांना वाटत होती.

राजकोटमध्ये तशी प्रभा अजून अल्पवयीनच होती; परंतु तेथे प्रभाचे बाल्य ज्या तऱ्हेने जात होते त्याविषयी ताराबाई अंतर्मुख होऊन विचार करीत होत्या.

प्रिन्सिपलसाहेबांची ही चिमखडी लेक सुंदर सुंदर फ्रॉक घालून लॉनवर सुखाबरोबर खेळे. ताराबाई जवळच खुर्ची टाकून चहापाणी घेत कारकुनाच्या मदतीने टपालाचा समाचार घेत. संध्याकाळी दोघी घरच्या घोडागाडीत बसून फिरायला, गावात कुणाकडे तरी बसायला जात. ' प्रिन्सिपलबेन 'ची मुलगी म्हणून बगीदारी — बार्टन फीमेल कॉलेजच्या परिसरात व बाहेरही प्रभाचे चिंत्र लाड होत.

परंतु तिच्या भवितव्याविषयी विचार करताना ताराबाई मात्र सचिंत होत. अत्यंत अनैसर्गिक, कृत्रिम वातावरणात प्रभा मोठी होते आहे असे त्यांना वाटत होते. घरात दुसरे भावंड नाही, आईचा सहवास मर्यादित, वडिलांची माया आठवत असून त्यांच्या सहवासाला पोर पारखी झालेली आणि भोवतालची बाकीची माणसे तिच्याच तालावर नाचणारी. प्रभासाठी तेथे पोषक वातावरण नव्हते, की धड शिक्षणाचीही सोय नव्हती.

१९२३ च्या मार्चमध्ये होळीच्या सुटीत ताराबाई प्रभाला घेऊन भावनगरला गेल्या. त्याआधी त्यांनी दक्षिणामूर्तीच्या संचालकांशी, गिजुभाईंशी पत्रव्यवहार करून आपण येत असल्याचे कळविले होतेच. ताराबाईंसारखी एम्. ए. पर्यंत पोचलेली, अनुभवी व उच्चपदस्थ व्यक्ती आपल्या कार्यात एवढा रस घेत आहे ही बाब त्या मंडळींना अर्थातच मोलाची वाटली. ताराबाईंची त्यांनी संस्थेतच एका बाजूच्या दुखोलीत उतरण्याची व्यवस्था केली. ताराबाई तिथे दोन-तीन दिवस राहिल्या; त्या संस्थेतील वातावरण, कामाची पद्धत, स्वरूप, विशेषतः बालमंदिरात चाललेले कार्य त्यांनी लक्षपूर्वक पाहिले आणि ते सारे त्यांच्या पसंतीस उतरले. गिजुभाईंच्या बालमंदिरात त्यांना आपल्या एकट्या पडलेल्या प्रभाच्या शिक्षणसमस्येवर उत्तर तर सापडलेच परंतु आपली 'करियर'ही त्यांना तिथे सापडली!

भावनगरहून ताराबाई परतल्या त्या राजकोटची नोकरी सोडून प्रभासाठी येथे येऊन राहावे, आणि स्वतःही कार्यकर्ती म्हणून संस्थेत दाखल होऊन गिजुभाईंच्या अभिनव कार्याला हातभार लावावा अशा उत्कट विचाराने प्रेरित होऊनच.

राजकोटची मानाची, सरकारी नोकरी सोडून दक्षिणामूर्तीत जाण्याचा निर्णय त्यांनी घेतला. ताराबाईंचा हा बंडखोर विचार त्यांच्या संबंधितांना समजला तेव्हा साहजिकच त्यांच्या अवतीभवती वादळ निर्माण झाले. ताराबाईंचे बंधू तात्या केळकर, डॉ. रखमाबाई, डॉ. काशीबाई नवरंगे यांच्या आयुष्यातील कोणत्याच वडीलधाऱ्या व्यक्तीला ताराबाईंचा हा निर्णय आवडला नाही. त्यांना हे सगळे वागणे भरकटल्यासारखेच वाटत होते.

ताराबाईंचे एकूण सारेच निर्णय त्यांना बेलगाम, बंडखोर वाटत होते, यात शंका नव्हती. आधी केव्हींसारख्या गुलहौशी व्यक्तीशी त्यांनी विवाहबद्ध होऊ नये असे सर्वांचे मत असताना त्यांनी त्या सर्वांचा हिरमोड करून, त्यांना धाब्यावर बसवून केव्हींशी प्रेमविवाह केला होता. एकदा लग्न केल्यावर ते तरी निकराने निभवावे अशी ताराबाईंच्या आप्तांची अपेक्षा असणे साहजिक होते. परंतु अपमान, अवहेलना वाट्याला येताच तेथेही ताराबाईंचा स्वाभिमान आड आला होता व त्यांनी गृहत्याग केला होता. आणि आता मुंबई सोडून एवढ्या दूरच्या या नोकरीत जरा स्थिरस्थावर होताहेत, तोच ही सुरक्षित, मोठ्या पगाराची, रुबाबाची नोकरी सोडून कुठल्यातरी टेकडीवर काही ध्येयवेड्या गुजराती माणसांनी काढलेल्या खाजगी शिक्षणप्रयोगात उडी घ्यायचे नवे खूळ त्यांच्या डोक्यात आले होते!

एकूण दर तीनचार वर्षांनी एखादा क्रांतिकारक निर्णय घेऊन ताराबाई आपल्या सुहृदांना, आप्तेष्टांना धक्के देत होत्या. ताराबाईंचे वागणे त्या सर्वांना 'ना आगा ना पीछा' सारखे वाटत होते यात नवल नाही.

डॉ. काशीबाई नवरंग्यांना एक पत्र लिहून ताराबाईंनी त्यांना या बाबतीत सल्ला



विचारला होता. काशीबाईंनी त्यांना राजकोटची नोकरी न सोडण्याचाच कळकळीचा सल्ला दिला. डॉ. रखमाबाईंनीही ताराबाईंना त्यांच्या या विचारापासून परावृत्त करण्याचा यथाशक्ती प्रयत्न केला. ताराबाईंना बालशिक्षणकार्यच करायचे असेल तर त्यासाठी भावनगरला कशाला जायला पाहिजे, राजकोटातच त्यांना फावल्या वेळात एखादे बालमंदिर काढता येईल, असे रखमाबाईंचे मत होते.

परंतु ताराबाईंनी मात्र पुन्हा एकदा फक्त आपल्या आतल्या आवाजाला प्रतिसाद देण्याचे ठरविले. आपल्या मुलीला एक सुंदर शाळा मिळाली हेच त्यांना त्यावेळी फार आनंदाचे आणि महत्त्वाचे वाटत होते. आपल्याला स्वतःलाही खरे मनपसंत कार्यक्षेत्र, काम तेथे लाभेल आणि राजकोटच्या ऐश्वर्यपूर्ण नोकरीत न लाभलेली मनःशांती, स्वास्थ्य दक्षिणामूर्ती येथील आपल्या खऱ्या आवडीच्या कामात लाभेल असा त्यांना विश्वास वाटत होता; आणि एखाद्या ध्येयासाठी सुखाचा जीव कष्टात ढकलणे, भरपूर पगारावर पाणी सोडणे ही परंपरा तर ताराबाईंना व भावंडांना खुद्द त्यांच्या वडलांनीच घालून दिली नव्हती का? ध्येयप्राप्तीसाठी आयुष्यभर झगडून, निष्कांचन अवस्थेत समाधानाने मृत्यूला सामोरे गेलेले स्वतःचे वडील ताराबाईंच्या चांगले लक्षात होते.

मात्र ताराबाईंनी हा निर्णय एकदम भावनेच्या आहारी जाऊन किंवा तडकाफडकी घेतला नाही. विचारपूर्वक, अगदी गणिते मांडून त्यांनी हिशेब केला.

गणित सोपे तर नव्हतेच! राजकोटच्या नोकरीचा राजीनामा म्हणजे आयुष्यातल्या बऱ्याचशा वैभवाला, सुखवस्तूपणाला निश्चितपणे मुकणे. बंगला, नोकरवर्ग, वाहन, पट्टेवाला, मासिक प्राप्ती या सर्वांची आयुष्यातून एकदम वजाबाकी व्हायची होती. ताराबाईंच्या मनाचा कल ध्येयवादाकडे असला तरी कष्टाळू, खडतर आयुष्य ही काही त्यांच्या आवडीची वाट नव्हती. अमुक एका मर्यादेपर्यंत आरामशीर आयुष्य जगण्याची त्यांना सवय झाली होती. अमरावती, राजकोटच्या वास्तव्यात वैभव त्यांच्या अंगवळणी पडले होते. आयुष्याचा आस्वाद रसिकतेने घेण्याची, चांगलेचुंगले खाण्या-करण्याची, पाहुण्यांचे आदरातिथ्य सढळ हाताने करण्याची त्यांना सवय लागलेली होती.

एके काळी केव्हींना साथ देताना, त्यांच्या मोबतालच्या भपक्यात सामील होताना पाच बोटांत पाच अंगठ्या घालण्यापर्यंत त्यांनी ऐश्वर्य उपभोगले होते. त्या काळात त्यांच्या दाराशी मोटर उभी होती. गालिच्यांखेरीज, सपातांखेरीज त्यांचे पाऊल जमिनीला लागत नसे. इतरांच्या घरात मुलांची ठेवली जात नसे एवढी बडदास्त त्यांच्या घरी कुत्र्यांची आणि त्यांच्या पिलांची ठेवली जात असे.

आता दक्षिणामूर्तीतल्या, गांधीवादाचा पूर्ण प्रभाव असलेल्या जीवनपद्धतीचा अंगीकार करणे म्हणजे देहा-मनाच्या या सर्व हौशींची क्रूरपणे काटछाट करणे. प्रभाची देखभाल करणाऱ्या रानूबाईलाच मुळी त्या काळात दरमहा साठ रुपये पगार त्या देत असत!

आता भावनगरला त्यांना स्वतःलाच रु. ९०।– पगार मिळणार होता. ताराबाईंनी स्वतःच्या 'गरजा' ही एक फूटपट्टी लावून आपले व आपल्या लेकीचे पुढचे आयुष्य बेतून पाहिले. बऱ्याचशा झाली–झालरी यात कापून काढल्या गेल्या. दक्षिणामूर्तीत मिळू शकणाऱ्या तुटपुंज्या पगारात समाधानाने राहणे त्यांना सवयीचे नसले तरी जड जाणार नव्हते,— अशक्य तर नव्हतेच !

प्रभाच्या दाईला त्यांनी एकूण परिस्थितीची कल्पना दिली. रामूबाईला अर्थात अर्ध्या पगारात ताराबाईंची नोकरी करीत राहणे परवडणार नव्हते. राजकोटचा पसारा आवरून ताराबाई भावनगरला गेल्या तेव्हा रामूबाई–सुभा ही जोडगोळी त्यांच्याबरोबर होती. दक्षिणामूर्तीत ताराबाईंचे बिऱ्हाड मांडून देऊन मग काही दिवसांनी रामूबाईने त्यांचा निरोप घेतला. मायलेकींच्या या जोडीने ताराबाईंना अमरावती, मुंबई, राजकोट, भावनगर अशी गावोगाव साथ दिली होती. इथून पुढे ती साथ संपली, चौकडी फुटली.

येथे आपल्या लेकीचे, आणि आपले भले होईल अशा विश्वासाने ताराबाई दक्षिणामूर्तीची टेकडी चढत होत्या. त्यांच्या कडेवरच्या जिवाला त्यांचा हा निर्णय मंजूर होता की नाही कुणास ठाऊक ! ताराबाईंना स्वतःला मात्र तेथले वातावरण, माणसे सर्वच एकदम आवडले होते.

दक्षिणामूर्तीतल्या नानाभाई भट्ट, चिमणभाई भट्ट, गिजुभाई बधेका वगैरे ज्येष्ठ कार्यकर्त्यांना ताराबाईंसारखी अधिकारी, अभ्यासू वृत्तीची आणि ध्येयनिष्ठ व्यक्ती आपल्या संस्थेकडे, कामाकडे आकृष्ट झाली आहे, आपल्याला येऊन मिळाली आहे या गोष्टीची मोठी अपूर्वाई वाटत होती. त्यांच्या कार्याला त्यामुळे एकदम उठाव मिळणार होता. शिक्षणक्षेत्रातल्या या अनुभवी, मान्यवर स्त्रीचा त्यांना बराच उपयोग होण्यासारखा होता.

ताराबाईंचे आणि त्यांच्या कन्येचे तेथे मोठ्या आपुलकीने स्वागत करण्यात आले. वसतिगृहाजवळची एक दुखोली त्यांना तात्पुरत्या निवासासाठी देण्यात आली. दक्षिणामूर्तीच्या टेकडीवर रस्त्याच्या दोन्ही कडांना सर्व कार्यकर्त्यांची स्वतंत्र घरे होती. याच रांगेत ताराबाईंकरता एक घर बांधले जाऊ लागले हे घर पुढे आजही 'ताराबेननुं घर' म्हणूनच ओळखले जाते. असे याच ओळीत जरा पुढे बालमंदिराचे संचालक श्री. गिजुभाई बधेका यांचेही घर होते. घरांची ही ओळ संपली की एका टेकडावर जरा एकीकडे गिजुभाईंच्या बालमंदिराची दुमजली इमारत होती.

ज्यावेळी ताराबाईंनी बार्टन फीमेल ट्रेनिंग कॉलेज सोडून भावनगरला येण्याचा निर्णय घेतला त्याच वेळी त्यांनी आपल्या अत्यावश्यक गरजा नेमक्या किती व कोणत्या आणि त्या कमीतकमी किती पैशांमध्ये भागविता येतील याचा एक आराखडा मनात आखला होता.

ताराबाई तिथे गेल्या होत्या त्या काहीशा 'जेसुइट' प्रेरणेने, भावनेने. त्यांनी संस्थेच्या



चालकांना सुचविले की अशा ध्येयवादाला वाहून घेतलेल्या संस्थेत सर्व कार्यकर्त्यांचा दर्जा समान समजला जावा परंतु पगार मात्र त्यांच्या कुटुंबांची गरज, आकार लक्षात घेऊन त्याप्रमाणे कमी–जास्त दिला जावा. ताराबाईंचे कुटुंब दीड माणसांचे, त्यांच्या गरजा तुलनेने इतर कार्यकर्त्यांपेक्षा कमी होत्या. तेव्हा आपल्याला या तत्त्वानुसार ठरल्यापेक्षा कमी पगार दिला जावा अशी त्यांनी सूचना केली. संस्थेच्या इतर कार्यकर्त्यांना त्यांचा हा विचार पटला नाही आणि त्यामुळे त्यांना इतर कार्यकर्त्यांच्या बरोबरीनेच पगार देण्याचे नक्की करण्यात आले. मात्र अशा उच्च विचारसरणीची व निःस्पृह वृत्तीची बाई आपल्या कार्याकडे वळली आहे याचे महत्त्व संस्थेला जाणविल्याशिवाय राहिले नाही.

दक्षिणामूर्ती संस्थेतल्या जीवनपद्धतीवर गांधीवादाची दाट छाया पडली होती. या संस्थेची स्थापनाच काही विशिष्ट भूमिकेतून करण्यात आली होती. त्याकाळी गावोगाव शाळा निघाल्या नव्हत्या. शिक्षणासाठी लहान वयात मुलांना आपले गाव, घर सोडून जावे लागे. त्यामुळे शालेय शिक्षण मिळाले तरी त्यांची परवड होई आणि वरच्या वातावरणाला, संस्कारांना ती मुकत. मुलांच्या आयुष्यातला चारित्र्यघडणीच्या दृष्टीने महत्त्वाचा असा हा काळ असा वाया जातो हे भावनगर येथील श्री. हरगोविंदभाई पंड्या उर्फ मोटाभाई या निवृत्त स्टेशनमास्तरांना फार खटकत असे. तेव्हा अशा शाळकरी विद्यार्थ्यांसाठी एक आदर्श वसतिगृह–संस्कारगृह काढावे या कल्पनेतून त्यांनी ही संस्था सुरू केली. मुले दक्षिणामूर्तीत राहत आणि गावातील स्टेट हायस्कूलमध्ये शिक्षण घेत. दक्षिणामूर्तीत त्यांच्या राष्ट्रीय, नैतिक, सांस्कृतिक शिक्षणावर भर दिला जात असे. पुढे संस्थेला चांगले कार्यकर्ते व पाठबळ मिळत गेले आणि संस्थेच्या कार्याचा सगळीकडे बोलबाला होऊ लागला. या संस्थेच्या प्रमुख कार्यकर्त्यांपैकी एक म्हणजे श्री. गिजुभाई बधेका. मोटाभाई हे गिजुभाईंचे मामा. गिजुभाई खरे पेशाने वकील. त्यांनी त्यांच्या वडिलांप्रमाणे गुजरातमधील वढवाण येथे वकिली करायला सुरुवात केली, ते साल होते १९१३. लौकरच वकिलीच्या धंद्यात गिजुभाई यशस्वी झाले. परंतु वकिलीसारख्या पत्थरदिल पेशाशी न जुळणारे संवेदनाक्षम व कोमल मन या तरुण वकिलाला लाभले होते. या धंद्यात अनेकदा माणुसकी गुंडाळून ठेवावी लागे. त्यामुळे गिजुभाईंना मनापासून आपला व्यवसाय आवडत नसे.

"गिजुभाई, वकीलातमां तो बधुं चाले–" त्यांचे सहकारी त्यांना समजावीत; पण ही विचारसरणी गिजुभाईंना मानवेना.

त्यांचे आपले फावल्या वेळात शेजारच्या मुलांच्या, मित्राच्या मुलांच्या शिक्षणात लक्ष. कधी ते मुलांना धडे समजावून देत, कधी आपल्या नोकराला मुळाक्षरे काढायला बसवत. गिजुभाईंचे हे उद्योग बघून त्यांचे मित्र म्हणत,

" गिजुभाई, तुम्ही चुकीचं क्षेत्र निवडलंत ! तुमची खरी जागा केळवणीत ( शिक्षणक्षेत्रात ) आहे ! "

अखेर गिजुभाई शिक्षणक्षेत्रात पडले; बालशिक्षणाकडे वळले ते—ताराबाईंप्रमाणेच. आपल्या छोट्या मुलाच्या शिक्षणसमस्येवर उत्तर शोधण्यासाठी.

गिजुभाईंच्या स्वतःच्या शालेय जीवनाविषयीच्या आठवणी फार कटू होत्या. धाकदपटशा, मारझोड, कुचंबणा, सक्ती, अवहेलना, शिक्षा यांवर त्यावेळी सर्वत्र भर असे. आता त्यांचा मुलगा नरेंद्र ( बच्चू ) अडीच वर्षांचा झाला तेव्हा त्यांनी चालू शिक्षणपद्धतीचे बारकाईने अवलोकन केले आणि त्यांच्या लक्षात आले की अजूनही विद्यार्थ्यांची स्थिती फारशी बदललेली नाही. अद्यापही लाच, धाक, मार, भीती यावर शिक्षकांची भिस्त असते. मुलांची अभिमुखता, प्रसन्नता इच्छा–अनिच्छा, आवड–निवड, विषयांची उपयुक्तता यांकडे संपूर्णपणे कानाडोळा करून ही शिक्षणाची पद्धत आखली गेली आहे. तेव्हा या शिक्षणव्यवस्थेत मुळापासून क्रांती व्हायला हवी.

गिजुभाई आपले हे विचार लोकांना बोलून दाखवू लागले. गोष्ट शंभर टक्के खरी होती; ऐकणाऱ्यांना ती पटतसुद्धा असे. परंतु मुळापासून सगळा शिक्षणक्रम, शिक्षणव्यवस्था परत आखण्याच्या या अवाढव्य कामात आपला जीव ओतायला, आयुष्य ओतायला कोणी तयार होत नव्हते.

बच्चूभाईंच्या शिक्षणाचा, विकासाचा विचार चालू असतानाच गिजुभाईंना कोणीतरी जवळच्या शहरातल्या वाचनालयात असलेली, डॉ. मॉन्टेसोरी बाईंची मॉन्टेसोरी शिक्षणपद्धतीबद्दलची पुस्तके वाचण्याची शिफारस केली. गिजुभाईंनी ती पुस्तके मिळवून, वाचून काढली. त्यात मांडलेले सिध्दान्त त्यांना अद्‌भुतच वाटले !

बालविकासाची कल्पना, बालकाचे स्वतंत्र व्यक्तित्व, त्याच्या कृतींच्या मुळाशी असलेली स्वयंप्रेरणा, ती पूर्ण होण्यासाठी कल्पकतेने बनविलेली शैक्षणिक साधने, बालकाला स्वयंशिक्षण घेण्यासाठी देण्यात येणारी संधी, शिक्षकाची मार्गदर्शकाची भूमिका या सर्वच कल्पना त्यावेळी पौर्वात्य तसेच पाश्चात्य शिक्षणक्षेत्रात क्रांतिकारक अशाच होत्या.

गिजुभाईंनी ती पुस्तके पुन्हा पुन्हा वाचून काढली. त्यांच्यावर चिंतन–मनन केले आणि त्यांची त्या सिध्दान्तावर श्रद्धाच बसली. मॉन्टेसोरीची साधने विकत आणून त्यांनी घरातल्या घरात बच्चूभाईंसाठी बालमंदिर थाटले.

गिजुभाईंचा हा शिक्षणकार्यातला वाढता रस पाहून मोटाभाईंनी आपल्या भाच्याला दक्षिणामूर्तीत येऊन आपल्या शिक्षणप्रयत्नात सामील होण्याचे आमंत्रण दिले; व त्याप्रमाणे गिजुभाई वकिली सोडून भावनगरला आले आणि तेथल्या वसतिगृहाचे प्राचार्य झाले.

इथून पुढे त्यांच्या जीवनाचे वळण बदलले. दक्षिणामूर्तीतील तीन प्रमुख चालकांपैकी एक ते झाले. वसतिगृहातील मुलांच्या अभ्यासात लक्ष घातल्यानंतर गिजुभाईंना पुन्हा



एकदा तीव्रतेने जाणवले की शिक्षणाची ही पद्धत मुळातच सदोष आहे आणि जोवर तिच्यात आमूलाग्र बदल होत नाही तोवर आपले हे सारे प्रयत्न तोकडे ठरणार.

मग १९१८ साली गिजुभाईंनी दक्षिणामूर्तीत ' विनयमंदिर ' म्हणून प्राथमिक शाळा सुरू केली. पुढे ' किशोरमंदिर ' म्हणून माध्यमिक शाळाही काढली.

गिजुभाई या शाळांमधले वातावरण बदलण्यात बरेच यशस्वी झाले. शिक्षणप्रणालीत त्यांनी फेरफार केला. विद्यार्थ्यांच्या मनाची उमेद इथे महत्त्वाची धरली जाऊ लागली. शिक्षक–मुलाचे नाते बदलले, गुरु विद्यार्थ्यांचा मित्र बनला, मार्गदर्शक झाला.

तरीही गिजुभाईंचे समाधान होईना. त्यांना रुखरुख वाटत राहिली.

" शिक्षणातली जी बांधील चाकोरी आहे ती आपण मोडू शकत नाही. त्यामुळे हा आपला प्रयत्न म्हणजे कच्च्या पायावर पक्की इमारत बांधण्यासारखे होत आहे. अशाने वरचे बांधकाम ठिसूळच होणार. नाही, नवे शिक्षण याही आधी शिशुअवस्थेत सुरू व्हायला हवे.— "

गिजुभाईंनी मग बालशिक्षणाचे क्रांतिकारक काम हाती घेतले—नानाभाई, मोटाभाई यांना बरोबर घेऊन ते स्वतः बाजारात गेले आणि विचारपूर्वक त्यांनी खेळण्यांची खरेदी केली. काही महिन्यांनंतर गिजुभाईंच्या एका दानशूर स्नेह्याने त्यांना बालमंदिराची इमारत बांधण्यासाठी रु. ३०००० ची देणगी दिली आणि १९२१ मध्ये कस्तुरबा गांधींच्या हस्ते दक्षिणामूर्तीमध्ये एका शिशुशाळेचे उद्‌घाटन झाले. दक्षिणामूर्तीतल्या या चिमणशाळेचे नाव गिजुभाईंनी ठेवले, " बालमंदिर ".

( प्रत्यक्ष बालमंदिराचे कार्य व प्रयोग मात्र त्याआधी सुमारे वर्षभर चालू झाले होते. पुढे बालमंदिराच्या इमारतीचे अधिकृतरीत्या उद्‌घाटन झाल्यावर काही काळाने ताराबाई त्यांना येऊन मिळाल्या. )

यापुढची पाचसहा वर्षे गिजुभाईंनी आपल्या या बालमंदिरात अविरत साधना, तपश्चर्या केली. आपल्या या प्रयोगशाळेत मॉन्टेसोरींचा प्रत्येक सिध्दान्त ते प्रत्यक्ष प्रयोगाने, निरीक्षणाने पडताळून पाहत होते; पुन्हा पुन्हा अभ्यास, चिंतन करून एकेका निष्कर्षाप्रत पोचत होते. आणि हे सर्व करताना एकीकडे जगातल्या सर्व प्रचलित शिक्षणपद्धतींशी ते मॉन्टेसोरी पद्धतीची तुलना करून पाहत होते. गिजुभाईंनी काढलेले हे बालमंदिर थोड्याच दिवसांत नावारूपाला आले. दूरदूरचे लोक ही संस्था, तेथे चाललेले हे विशिष्ट बालकार्य पाहायला येत. इतकी आनंदी, नीटनेटकी, प्रसन्न मुले आम्ही इतरत्र कुठे पाहिली नाहीत असा निर्वाळा ही मंडळी देत.

आणि गिजुभाई स्वतः ? –ते तर बालशिक्षणाच्या या नव्या शास्त्राने झपाटलेच गेले होते. ताराबाईंनी गिजुभाईंना प्रथम पाहिले ते त्या स्थितीत आणि या स्थितीतच ते शेवटपर्यंत राहिले...

राजकोट सोडून प्रत्यक्ष दक्षिणामूर्तीत दाखल होण्यापूर्वी ताराबाईंचा आणि गिजुभाईंचा जो पत्रव्यवहार झाला त्यात गिजुभाईंनी आपल्या झपाटलेपणाचे वर्णन करणारे एक वाक्य लिहिले होते, " I am fired with Dr. Montessori's principles. "

दक्षिणामूर्तीत आल्यावर गिजुभाईंमधली ही ज्योत ताराबाईंना तिच्या निरनिराळ्या पैलूंसकट दिसली. गिजुभाईंच्या बालमंदिराची इमारत इतर इमारतींपासून जरा एकीकडे टेकडीवर होती. हा तपस्वी एकदा ही टेकडी चढून वर गेला की आपले घर, संसार, कुटुंब, सारे व्याप, भोवतालचे सारे जगच विसरून जात असे. दक्षिणामूर्तीत गिजुभाईंना मुळी ' मूँछाली बा'च म्हणत– म्हणजे मिशीवाली आई! दिवसातला सारा वेळ ही ' गिजुभाई ' आपल्या बालमंदिरात घालवीत असे. ती इथला केर काढीत असे. सतरंज्या अंथरीत असे. मुलांना नास्ता वाढीत असे. गळ्यात ढोलके अडकवून मुलांबरोबर नाचत, गात नाटकेही करीत असे. अगदी मध्यरात्री झोपताना आणि पहाटे उठतानाही त्यांच्या डोक्यात दुसरा विषय नसे. आणि कोणी त्यांच्या या भगीरथ प्रयत्नांचे, चिकाटीचे कौतुक केले की आपल्या अकाली पिकलेल्या, पांढऱ्या मिशांमधून प्रेमळ हास्य करीत गिजुभाई म्हणत,

" अहो, त्याच्या दोऱ्या नानाभाई ओढताहेत, म्हणून माझी ही सगळी शान. "

खरोखरच गिजुभाईंच्या सर्व उपक्रमांना, प्रयोगांना दक्षिणामूर्तीचे चालक सढळ हाताने आर्थिक सहाय्य करीत असत, सहकार्य देत असत.

ताराबाई दक्षिणामूर्तीत आल्यावर वसतिगृहातल्या मुलांना ताराबाईंच्या रूपाने एक सामुदायिक आईच लाभल्यासारखी झाली. कुणाची काही अडचण असो, ताराबाई त्यात आपलेपणाने लक्ष घालू लागल्या. त्यांना एखादा खास पदार्थ शिजवायचा असला की वसतिगृहाच्या मुलांचा वाटा गृहीत धरून त्याचे प्रमाण ठरविले जाई. कुणी आजारी असले, ताप आला की हॉस्पिटलातल्याप्रमाणे दर ठराविक तासांनी त्याच्या तापाचे चढउतार टिपून ठेवणे ही पद्धत या वसतिगृहात सुरू केली ती ताराबाईंनी.

मात्र ताराबाईंचे मुख्य लक्ष होते गिजुभाईंच्या बालशिक्षण कार्याकडे. त्यांनी प्रभाला बालमंदिरात दाखल केले होते. त्यांची भाची बबन इथेही त्यांच्याबरोबर आली होती. (१९१८ च्या सुमारास बबनची आई, ताराबाईंची आनंदीवहिनी मृत्यू पावली होती. बबनताईला ताराबाईंजवळ ठेवण्याचे एक कारण तिचे हे अर्धपोरकेपणही असावे.) तिला त्यांनी तेथल्या किशोरमंदिरात घातले आणि त्यांनी स्वतः गिजुभाईंकडून बालशिक्षण-कार्याची संथा घेण्यास सुरुवात केली. एकीकडे गिजुभाईंना जरूर ती मदत करीत त्या त्यांच्या प्रयोगाचे बारकाईने निरीक्षण करू लागल्या. त्यांच्याशी चर्चा करून, स्वतः प्रयोग करून मते बनवु लागल्या. उरलेल्या वेळात त्या विषयावरचे व त्या प्रयोगांना पूरक असे अभ्यासग्रंथ वाचून त्या आपल्या ज्ञानात भर टाकीत. गिजुभाईंसारखे आदर्श



बालमंदिर आपल्याला चालविता यावे म्हणून काही दिवसांनी त्यांनी स्वतःच एक स्वतंत्र वर्ग मागून घेतला आणि तो चालवीत असताना गिजुभाईंच्या पावलावर पाऊल ठेवून, त्यांचे मार्गदर्शन घेत, बारकाईने प्रत्येक तपशील अभ्यासून पाहत त्या झपाट्याने प्रगती करू लागल्या.

Montessori Teacher's Handbook या पुस्तकाचे गुजराती भाषांतरही या काळात त्यांनी केले.

त्या वेळी दक्षिणामूर्तीच्या अभ्यासक्रमात डॉ. सिगमंड फ्रॉइड व त्याच्या सहकाऱ्यांच्या मनोविश्लेषणात्मक ग्रंथांचा समावेश होता. ए. एस्. नील या मानसशास्त्रज्ञाची पुस्तकेही नेमलेली होती. ताराबाईंनी या सर्वांचा अभ्यास सुरू केला. पहाटे लौकर उठून त्या वाचायला बसत. त्यांना एका बैठकीत भरभर आणि पुष्कळ वाचता येत नसे. रोज थोडा थोडा भाग त्या वाचून संपवीत. मग त्यावर त्यांचे मनन, चिंतन, चर्चा चालू राही. तेवढा मजकूर संपूर्णपणे समजला, ग्रहण केला की मग त्यांचे वाचन पुढे सुरू होई.

गिजुभाईंची स्वतःची मॉन्टेसोरी पद्धतीवर अगाध श्रद्धा होती, त्यांनी जाहीरपणे तो गंडाच बांधला होता, असे म्हटले तरी चालेल. या शिक्षणपद्धतीचा योग्य वापर व अवलंब केला तर माणूस नव्याने घडविता येईल, असा त्यांचा विश्वास होता. त्यांच्या मते मॉन्टेसोरी पद्धती ही केवळ एक शिकविण्याची तांत्रिक पद्धती नसून ती एक आगळी जीवनदृष्टी होती.

ताराबाईंनाही मॉन्टेसोरी शिक्षणपद्धतीचे आकर्षण व महत्त्व वाटत होते परंतु गिजुभाईंइतक्या त्या त्याने भारावल्या नव्हत्या. ताराबाईंच्याच शब्दात त्यांचा " नाठाळ महाराष्ट्रीय भेजा " टकरा दिल्याशिवाय काही स्वीकारीना !* गिजुभाई पुन्हा पुन्हा चिकाटीने त्यांचे मुद्दे सोडवायला घेत, पुन्हा पुन्हा शब्द, उदाहरणे पिसली जात. अनेक वेळा गुरू आणि शिष्या चर्चा करून करून दमून जात. भोवती जणू शब्दांचा केवढा तरी भुसा तयार होई ! पण कोणतीही गोष्ट पूर्णपणे व आतून कण न् कण पटेपर्यंत ' हो ' म्हणायचे नाही, हा शिष्येचा खाक्या ! अखेर गिजुभाई त्यांचा नाद सोडीत आणि एवढेसे तोंड करून उठून जात. ताराबाईंनाही वाटे की इतके कसे माझे म्हणणे मी पटवू शकत नाही यांना...!

आणि–काही दिवसांनी आपोआप गिजुभाईंच्या एखाद्या कृतीतून, वाक्यातून, एखाद्या लहानशा प्रसंगातून ताराबाईंना गिजुभाईंच्या विचारांची दिशा स्वच्छ समजून येई. न बोलताच त्या दोघांचा– तेवढ्या बाबतीत– समेट होई. पट्टीच्या गुरूला तेवढाच तोडीचा

* ' स्मरणांजलि ' —कै. गिजुभाई बधेका स्मृतिकथनपर लेखसंग्रह

विद्यार्थी भेटला की शिष्याला घडविता घडविता गुरुही अधिक सुघड होत जातो. ताराबाईंची साथ मिळाल्यामुळे गिजुभाईही असेच समर्थ बनले.

गिजुभाईंकडून पुष्कळच शिकण्यासारखे होते. भल्या पहाटे तीन-चार वाजता उठून त्यांचे लेखन, वाचन, मनन चाले. त्यांच्या अभ्यासिकेत दिवा दिसला की ताराबाई उठून तेथे जात. कधी रामभाई पाठक तेथे डिक्टेशन घेत असत. कधी काही चर्चा, लेखाची जुळवाजुळव चालू असे. ताराबाई त्यात सामील होत. अखेर पहाटे गुरुपत्नीने दिलेल्या कॉफीबरोबर या पहाटसत्राची सांगता होई आणि गिजुभाई हसत हसत विनयमंदिरातील मुलांना इंग्रजी शिकविण्याच्या आपल्या कामावर निघून जात. ( या इंग्रजी अध्यापनासाठीसुद्धा गिजुभाईंनी परिश्रमपूर्वक खास स्वतःची अशी परिणामकारक पद्धती शोधून काढली होती ! ) भावनाविवश होऊन कोणतीही गोष्ट स्वीकारण्याची ताराबाईंची तयारी नव्हती; परंतु रोजच्या या वाचन-विचार-वादविवाद-मंथनातून मॉन्टेसोरीबाईंची तत्त्वे ताराबाईंनी लढतझुंजत स्वीकारली. अखेर मॉन्टेसोरींच्या विचारांचा आवाका, विशालता, सर्वस्पर्शीपणा त्यांनाही जाणवला आणि ताराबाईंच्याच शब्दात,—

" एक, कधीही बरा न होणारा बालरोग मला जडला ! "

ताराबाईंनी तो स्वखुशीने जडवून घेतला. इतका समर्थ गुरू आपल्याला लाभला याबद्दल ताराबाईंना मोठीच धन्यता वाटली. गिजुभाईंच्या निधनानंतर ( १९३९ ) प्रसिद्ध झालेल्या ' स्मरणांजलि ' या संग्रहात त्यांच्या इतर सहकाऱ्यांबरोबर ताराबाईंचाही एक लहानसा परंतु हृद्य असा लेख आहे. त्या लेखात या सर्व घडामोडींचे वर्णन त्यांच्याच शब्दांत वाचायला मिळते.

दक्षिणामूर्ती येथील शिक्षणपद्धती ज्याप्रमाणे ताराबाईंना समजावून, पचवून, आत्मसात करून घ्यावी लागली त्याचप्रमाणे तेथला जीवनक्रमही आरंभी बरेच दिवस त्यांना जड गेला. तेथले सर्व वातावरण त्यांना नवे, अपरिचित होते. तेथील दिनक्रम, आचारप्रणाली सर्व गांधीजींच्या तत्त्वज्ञानावर आधारलेली होती. ताराबाई प्रथमपासून स्वतंत्र विचाराच्या आणि एकदम निराळ्या वातावरणात आजवर वाढलेल्या, राहिलेल्या. गांधीजींचे राजकीय नेतृत्व त्यांनी १९२० पासून मानले होते; त्यांची भाषणे व विचार ऐकून त्या प्रभावित, क्वचित कधी मंत्रमुग्धही झाल्या होत्या. परंतु मनात त्या गांधीजींच्या विचारसरणीच्या पूर्णपणे आहारी गेल्या नव्हत्या. इतर सर्वसाधारण महाराष्ट्रीयांप्रमाणेच त्याही गांधीवादापासून, त्यांच्या जीवनविषयक तत्त्वज्ञानापासून चार पावले दूरच होत्या. गांधीजींचे विचार त्यांना वेगळे वाटत होते. परंतु सर्वार्थाने पटले, पचले नव्हते. राष्ट्रीय वृत्ती त्यांच्या ठिकाणी होती परंतु गांधीजींची सूतकताई, खादीचा वापर, अहिंसा, अपरिग्रहवाद अशा अनेक बाबतींत त्यांचे मन काही टक्के साशंक होते. आणि पुन्हा कोणतीही गोष्ट पूर्णपणे पटल्याखेरीज स्वीकारायची त्यांची वृत्ती नव्हतीच.



एखाद्या संस्थेत काम करायचे ठरल्यावर तेथल्या जीवनाशी एकरूप झाले पाहिजे हे ताराबाईंना कळत असे, तसे त्यांचे प्रयत्नही चालू असत. परंतु खऱ्या अर्थाने त्या वातावरणात रुळायला त्यांनी वेळ घेतला. दक्षिणामूर्तीचे बहुतेक कार्यकर्ते विशेषेकरून गिजुभाई हे महात्माजींचे निष्ठावंत व क्रियाशील अनुयायी होते. त्यामुळे ताराबाईंचे त्यांच्याशी सारखे मतभेद होत. या मंडळींची कळकळ, भावना, श्रद्धा त्यांच्यापर्यंत पोचे परंतु त्या श्रद्धेमागचे विचार त्यांना सदोष, चुकीचे वाटत.

गांधीजींच्या विचारांचे, कार्याचे महत्त्व ताराबाईंना पटवून देण्याचे आणखी एक अवघड काम गिजुभाई बधेकांना करावे लागले. त्यावेळी, म्हणजे ' हरिजन ' काढण्यापूर्वी ' नवजीवन ' म्हणून साप्ताहिक गांधीजी प्रसिद्ध करीत असत. प्रत्येक सप्ताहात एकेक विषय घेऊन बापूजी त्यावर आपले विचार मांडीत असत. ही मंडळी त्यावर चर्चा करीत. अखेर अनेक दिवस खोलवर विचार केल्यावर, अनेक पुस्तके वाचल्यावर ताराबाईंनी गांधीजींची विचारसरणी स्वीकारली. त्याही गांधीजींच्या अनुयायी झाल्या. मनापासून खादी वापरू लागल्या, सूतकताई करू लागल्या; मात्र गांधीवादाचा गंडा काही त्यांनी बांधून घेतला नाही. या बाबतीतली त्यांची भूमिका त्यांच्या " प्रार्थनासमाजाने मला काय दिले ? " या लेखात स्पष्ट झाली आहे.*

दक्षिणामूर्तीतल्या जीवन प्रवाहाशी ताराबाई पुरेशा एकरूप झाल्या होत्या. तेथल्या कामात, विविध उपक्रमांत त्यांनी आपला जीव ओतला होता. त्या कामाचा प्रत्येक भाग, प्रत्येक आव्हान, प्रत्येक अडचण त्यांना आपली वाटत होती. मुख्य म्हणजे त्या कामाने त्यांना त्यांच्या खाजगी दुःखातून, वैफल्यातून बाहेर काढले होते. त्यांच्या अत्यंत आवडीची अशीच ती धावपळ होती आणि त्या धाव-पळीतच त्यांना खरी स्वस्थता, शांती लाभत होती...

प्रभाही बालमंदिरातल्या उपक्रमांना चांगली रुळली होती. तेथे तिची प्रगती पाहून ताराबाईंना व गिजुभाईंना मोठे समाधान वाटत असे. एव्हाना ' ताराबेननु घर ' बांधून झाले होते. ताराबाईंकडे आता घरकामाला एक बाई होती. स्वयंपाक-जेवण आटपून त्या, प्रभा व बबन अशा तिघी बरोबरच बाहेर पडत. बबन किशोर मंदिराची वाट धरी. प्रभा-ताराबाईंची जोडगोळी बालमंदिराचे टेकाड चढे. दुपारी बारा ते चार हे बालमंदिर भरत असे. दुपारी प्रभाला घरी पाठवून ताराबाई थोडे जास्त-कमी काम आटोपून घरी परतत. संध्याकाळचा स्वयंपाक झाला की मग सगळी अंगणात बसत. प्रभाचे सवंगडी, त्यात गिजुभाईंची मुले– सुशीला, बबू, टिक्कू या बहिणी आणि भाऊ बच्चू हेही असत. सगळे ताराबाईंभोवती गोळा होत. ताराबाई मग त्यांना गाणी शिकवीत, त्यांच्याकडून

* परिशिष्ट पाहा.

अभिनय करून घेत, त्यांना गोष्टी सांगत. प्रभा त्यावेळी नाच शिकत असे. त्यामुळे तिचा नाच हा या संध्याकाळच्या रंजनकार्यक्रमातला महत्त्वाचा भाग असे. प्रभाला सारे लाडाने 'श्यामुली' म्हणत.

ताराबाईंना मुळातच आपली नात्यातली आणि मानलेलीही भाचेमंडळी आपल्याजवळ शिकायला आणून ठेवण्याची हौस असे. त्यात खरा जिव्हाळा असे आणि त्याबरोबरच प्रभाला एकटे वाटू नये, सोबत व्हावी हाही एक हेतू असे. बबनबरोबरच इंदिराताईंची मुलगी शारू व मुलगा बाबा हीही त्यांच्याजवळ काही काळ दक्षिणामूर्तीत रहायला, शिकायला होती.

स्वयंपाकाची, घरकामाची स्त्रीसुलभ आवड ताराबाईंना होतीच, आणि उरकही होता. बबनताईंचे 'गृहविज्ञान' शिकण्याचे वय तिथेच सुरू झाले. दोघी मिळून स्वयंपाक करीत. बबनकडून नुसते काम करून घेण्याचा अगर तिला आपले अनुकरण करायला लावण्याचा त्यांचा दृष्टिकोन नसे. तर पाककला हे एक शास्त्र आहे हे तिला समजावे अशी त्यांची दृष्टी होती. साधे ताक करतानाही त्यात 'बॅक्टेरिया' कसे तयार होतात, घुसळण्याच्या क्रियेमुळे काय होते इ. समजावून सांगण्याकडे त्यांचा कटाक्ष असे.

दक्षिणामूर्तीतले सहृदय कार्यकर्ते मायलेकींच्या या जोडीकडे मोठ्या आदराने, स्नेहार्द्र दृष्टीने पाहत असत. गुजराती लोकांच्या मनमिळाऊपणाचा, स्नेहशील वृत्तीचा अनुभव ताराबाईंना या काळात आला. त्यांच्या या आदरपूर्वक समजून घेण्याच्या वृत्तीमुळे ताराबाईंची एकलेपणाची भावना, खिन्नता कमी होण्यास खूपच मदत झाली.

प्रभाला त्यावेळी बाबी हेही एक लाडके नाव असावे. प्रभाचे त्या वेळचे चुरुचुरु बोलणे आणि ताराबाईंचे तिच्याशी सतत चालणारे हितगुज पाहून दक्षिणामूर्तीच्या रहिवाशांना मोठे कौतुक वाटे. आपल्या लहानशा मुलीच्या आयुष्यातले काटे दूर करण्यासाठी ताराबाई आपले सारे व्यक्तिमत्त्व पणाला लावून झटत आहेत, हे त्यांना दिसत होते. ताराबाईंच्या या बाबीमुळे आणि गिजुभाईंच्या बन्धुभाईमुळे त्या दोन समर्थ शिक्षणप्रेमींच्या हस्ते भारतातल्या हजारो बालकांसाठी नूतन बालशिक्षणाची अमोल भेट तेथे तयार होत होती. दुर्दैवाची गोष्ट अशी की ताराबाईंची ही अतिहळवी, घुमी मुलगी तेथल्या जीवनाशी कधीच समरस होऊ शकली नाही. छोटी प्रभा तेथे मनाने कायम कुढत, झुरत राहिली...

दक्षिणामूर्तीत आल्यावर दोन वर्षांच्या अवधीत ताराबाई तेथल्या एक प्रमुख कार्यकर्त्या झाल्या. गिजुभाईंच्या एकाकी व एकलव्यी प्रयोगांना आता ताराबाईंची सबळ साथ मिळाली आणि दोघे मिळून एका ध्येयामागे वेड्यासारखी धावू लागली, बालशिक्षणाची घडी बसवू लागली, कक्षा वाढवू लागली. बालशिक्षणतज्ज्ञ म्हणून पुढे प्रसिद्धीस आलेल्या ताराबाई मोडक तर या काळात घडल्याच परंतु त्यांच्या या अमोल सहकार्यामुळे काकासाहेब कालेलकरांच्या शब्दांत, "गिजुभाईसुद्धा चतुर्भुज झाले." ताराबाईंच्या तेथील नऊ वर्षांच्या वास्तव्यात गिजुभाईंचा असा एखादाही उपक्रम नसेल की ज्याला ताराबाईंनी हातभार लावला नाही अगर साथ दिली नाही.



ताराबाईंच्या दक्षिणामूर्तीतील १९२३ ते १९३२ या उभ्यातुभ्या नऊ वर्षांच्या वास्तव्यात या दोघांनी बालशिक्षणाच्या क्षेत्रात जी विविध कार्ये उपसली त्यांतला झपाटा, धोडदौड आणि धडाका पाहता, या दोघांची साथ एकमेकांना किती पूरक होती हे लक्षात येईल. काकासाहेब कालेलकरांनीच एके ठिकाणी लिहिल्याप्रमाणे खरोखरच, "ए जमानामां गिजुभाई अने ताराबाई ए जे काम कर्युं छे ते कोईपण समाजने मगरूर बनावे एवुं छे..."*

मॉन्टेसोरी पद्धतीबद्दल तिच्या या भक्तांच्या मनांत भक्तिभाव असला तरी प्रत्यक्ष प्रयोग करताना मात्र गिजुभाई व ताराबाई यांनी आपल्या देशातील राष्ट्रीय, सामाजिक व आर्थिक परिस्थित्यनुसार या पद्धतीत आपल्याला योग्य वाटतील असे फेरफार करून घेतले होते. या दोघांनी मिळून प्रचारात आणलेल्या या पद्धतीला दक्षिणामूर्तीत 'गिता' पद्धत ( गिजुभाई-ताराबाई ) म्हणत असत. ( गिजुभाई आपल्या लेखांच्या खाली 'गि' म्हणून सही करीत, तर ताराबाई 'ता' अशी सही करीत. )

मॉन्टेसोरी सिद्धांतांशी सुसंगत अशा साधनां—उपक्रमांबरोबरच या मंडळींनी किंडरगार्टन पद्धतीत रूढ असलेल्या इतर काही उपक्रमांचा समावेशही आपल्या बालमंदिराच्या कामात केला होता. गोष्ट सांगून त्यानुसार मुलांना अभिनय, नाटुकली करायला सांगणे, परीकथांसारख्या अद्भुत गोष्टी सांगणे अशा काही गोष्टींचा उदाहरणादाखल उल्लेख करता येईल. याखेरीज, मुलांमध्ये सौंदर्यबुद्धी जोपासली जावी, त्यांची कार्यशीलता, कार्यकुशलता वाढावी या दृष्टीने भारतीय संस्कृतीशी सुसंगत अशा काही उपक्रमांनाही त्यांनी स्थान दिले होते. सौराष्ट्रातले रास, गरबा इ. सामूहिक नृत्यांचे प्रकार या निमित्ताने ताराबाईंनी आत्मसात केले. शिवणकाम—भरतकामात ताराबाईंचा हात विशेष चांगला होता. काठेवाडी भरतकाम त्यांनी शिकून घेतले. महाराष्ट्रातील रांगोळीकामाचा व रंगीबेरंगी धान्यांच्या रांगोळीचा त्यांनी नव्याने समावेश केला. बागकाम, सहली, प्रवास, अंगमेहनत, इ. कित्येक नवीन गोष्टींची भर या दुकलीने आपल्या बालशिक्षणपद्धतीत घातली. बडबडगीतांचा, लोकगीतांचा मोठा संग्रह करवून घेऊन ते एक मोठेच भांडार त्यांनी बालकांना 'पद्य बडबडीसाठी' उपलब्ध करून दिले होते. बालगाण्यांना सुद्धा शास्त्रीय संगीताचा पाया हवा अशा मताचे गिजुभाई होते. संगीतासाठी

* 'ताराबाई आणि बालशिक्षण' या श्री. स. आ. केळकर यांनी लिहीलेल्या ग्रंथाची प्रस्तावना.

त्यांनी बालमंदिराच्या इमारतीत एक वाद्यांनी व योग्य भित्तिचित्रांनी समृद्ध असे खास दालनच करून घेतले होते. संस्थानातला एक दरबारी गायक तेथे पाठ देत असे. ताराबाईंनी विद्यार्थीदशेत आणि नंतरही गायनकला, वादनकला यांचा अभ्यास केलेलाच होता. त्यामुळे त्याचाही येथे उपयोग झाला.

गिजुभाईंच्या या बालमंदिराची कीर्ती पाहता पाहता सौराष्ट्रात व गुजरातेत पसरली. त्यामुळे काही उत्साही मंडळी या नवीन शिक्षणप्रणालीकडे आकर्षित होऊन, हे तंत्र शिकण्यासाठी दक्षिणामूर्तीत आपण होऊन दाखल झाली. या विद्यार्थ्यांकरता १९२५ साली, म्हणजे ताराबाई तेथे गेल्यानंतर सुमारे दोन वर्षांनी गिजुभाईंनी बालअध्यापन मंदिराची स्थापना केली. दक्षिणामूर्तीत वसतिगृहाची सुविधा असल्यामुळे या विद्यार्थ्यांच्या राहण्याचा प्रश्न नव्हता. संस्थेचे भोजनालयही होते. विद्यार्थ्यांकडून दरमहा तेरा रुपये घेऊन जेवणाची सोय केली जाई. बाकी शिक्षणासाठी निराळी फी नव्हती. स्त्रियांकरताही एक स्वतंत्र वसतिगृह काढण्यात आले आणि त्याची व्यवस्था ताराबाईंकडे सोपवण्यात आली. ताराबाईंना प्रशिक्षण संस्था चालविण्याचा पूर्वानुभव व माहिती होती. त्यामुळे याही कामात गिजुभाईंना त्यांची चांगली मदत झाली.

या अध्यापनमंदिरातील अभ्यासक्रम त्यावेळी अर्थात निश्चित झालेला नव्हता. गिजुभाईच शिकताना शिकविताना त्याची आखणी करीत, त्यात बदल करीत, सुधारणा करीत. या अभ्यासक्रमात अर्थात मॉन्टेसोरी पद्धतीची तत्त्वे व साधनांचा वापर यावर भर होता. त्यातली गणिताची साधने ताराबाईंना विशेष आवडली होती. त्यामुळे ती दाखवण्याचे—त्यांचा वापर शिकविण्याचे काम त्यांनी आपल्याकडे घेतले होते.

याशिवाय बालमंदिराच्या सर्व कार्यक्रमांबद्दल प्रात्यक्षिकांसह व्याख्याने होत. प्रशिक्षणाच्या विद्यार्थ्यांना प्रत्यक्ष बालमंदिरात काम करावे लागे व त्यात त्यांना योग्य मार्गदर्शन केले जाई. दररोज पहाटे एक नैतिक प्रवचन असे. ही प्रवचने गिजुभाई देत किंवा संस्थेत वेळोवेळी येणारे सन्माननीय पाहुणे देत. प्रत्यक्ष जीवनाशी संबंधित अशी ही निरूपणे असल्यामुळे या उपक्रमाला जीवनमंदिर असे समर्पक नाव होते. वनस्पतीशास्त्र, प्राणिशास्त्र, प्रौढशिक्षण–योजना इ. विषयांचा, छोट्या–मोठ्या कार्यक्रमांचा समावेश गिजुभाई या अभ्यासक्रमात करीत गेले. अशा प्रकारे १९३९ सालापर्यंत ( म्हणजे गिजुभाई निवृत्त होईपर्यंत ) सुमारे ८००च्या वर विद्यार्थी येथे शिक्षण घेऊन गेले. त्यांनी या नव्या शिक्षणाचा प्रसार गुजरात, सौराष्ट्र, व अन्य प्रांतात केला. गिजुभाई या आपल्या शिष्यांना ' मॉन्टेसोरी शिक्षक ' असे प्रमाणपत्र देत असत.

या अध्यापनमंदिरात गिजुभाईंची जी व्याख्याने होत ती ऐकण्यास ताराबाई दररोज बसत. एकीकडे हाताने पत्ते लिहिणे, लेखाची प्रत काढणे अशी यांत्रिक कामे चालू असत व एकीकडे पुन्हा पुन्हा गिजुभाईंची शिकवण, विचारसरणी कानावरून जाई. त्यामुळे



गिजुभाईंच्या विचारसरणीतला बारीकसारीक तपशीलसुद्धा ताराबाईंना पाठ झाला.

गिजुभाईंनी बालशिक्षण प्रसारासाठी अनेक व्याख्याने दिली, दौरे काढले, लिखाण केले. त्यांच्या या झंझावती झपाट्यामुळे पाहता पाहता काठियावाड आणि गुजरात या भागांमध्ये व देशात इतरत्रही गिजुभाईंच्या कार्याचा बोलबाला झाला.

गिजुभाईंनी दक्षिणामूर्तीत प्रवेश केला तेव्हा ती एक लहानशी संस्था होती. गिजुभाईंनी तिचा विस्तार केला, तिला केवढीतरी प्रतिष्ठा व लोकप्रियता मिळवून दिली. १९२६ साली दक्षिणामूर्तीतील बालमंदिराच्या आवारातच पहिले मॉन्टेसोरी संमेलन भरविण्यात आले. त्या वेळीही कर्ताकरविता अर्थात गिजुभाईच होते. या संमेलनात श्रीमती सरलादेवी साराभाई या, प्रसिद्ध उद्योगपतीच्या पत्नीला अध्यक्षा करण्यात आले. सरलाबाईंना शिक्षणकार्यात विशेषतः मॉन्टेसोरी शिक्षणपद्धतीत विशेष रस व आत्मीयता होती व त्यांनी आपल्या मुलांच्या शिक्षणासाठी युरोपातून एक निष्णात मॉन्टेसोरी शिक्षक आणून आपल्या मुलांना ते शिक्षण देण्याची व्यवस्थाही केली होती. ही निवड योग्यच ठरली. कारण गिजुभाईंच्या पुढे ताराबाईंच्या कार्यातही सरलादेवींचा खूपच उपयोग झाला.

या संमेलनात बालशिक्षणाच्या या चळवळीचा प्रचार व प्रसार व्हावा या दृष्टीने दोन महत्त्वाचे निर्णय घेतले गेले. एक म्हणजे या नवीन शिक्षणपद्धतीला चालना देण्यासाठी ' मॉन्टेसोरी संघ ' या नावाची एक संस्था – गिजुभाईंच्या पुढाकाराने – स्थापन करण्यात आली. या संस्थेच्या पहिल्या अध्यक्षा पुन्हा श्री. सरलादेवीच ठरल्या. दुसरे म्हणजे बालशिक्षणप्रसारासाठी या संस्थेचे मुखपत्र म्हणून ' शिक्षणपत्रिका ' हे मासिकही सुरू करण्यात आले. मॉन्टेसोरी संघाच्या सभासदांना रु. १ /– वार्षिक वर्गणीत शिक्षणपत्रिका पुरवायचे ठरले.

मासिक सुरू करताच गिजुभाई स्वतः भावनगरला घरोघरी फिरू लागले. आणि त्यांनी एकेका घरातील पति–पत्नी दोघांना स्वतंत्र रीतीने संघाचे सभासद करण्यास सुरुवात केली. त्याचप्रमाणे गावोगाव आपल्या विद्यार्थ्यांना पत्रे टाकून त्यांनाही त्यांनी सभासद करून घेतले. अशा रीतीने थोड्याच दिवसांत शिक्षणपत्रिकेचे ३००० ग्राहक झाले.

शिक्षणपत्रिकेतले लेखन बहुधा गिजुभाई एकटेच करीत. पुढे पुढे त्यांनी आपल्या आजूबाजूच्या कार्यकर्त्यांनाही लिहिते केले. शिक्षणपत्रिकेतील लेखांचा मुख्य विषय मुलांचे संगोपन, गृहशिक्षण कसे करावे हाच होता. त्या वेळी सुशिक्षित समजल्या जाणाऱ्या पालकांकडूनसुद्धा मुलांना अतिशय कठोर वागणूक दिली जाई. गिजुभाईंना या गोष्टीचे फार दुःख होत असे. मुलांचे वकीलपत्र घेतलेला हा वकील आपल्या शिक्षणपत्रिकेतून सारखा मुलांची बाजू मांडत राही. गुजरातेतील पालकांना त्यांनी बालसन्मानाची, बालस्वातंत्र्याची नवी जाणीव दिली. घरोघरी वळणाच्या, शिस्तीच्या नावाखाली बालकांची गळचेपी होत होती, भरड होत होती. त्यांना कोपऱ्यात ढकलले जात होते. बांधून घातले जात होते.

गिजुभाई तळमळून म्हणत,— " इतक्या मुलांचा आपल्या डोळ्यांदेखत मानसिक खून होऊ द्यायचा? पालकांचे डोळे उघडावेत, कान सुधारावेत म्हणून मी बहिऱ्यांचेही कान फुटतील इतक्या जोराने शंख वाजवतोय. अरे, मनुष्याची बाल्यावस्था म्हणजे मानव-पुष्पाची न उमललेली कळी ! जे कळ्यांचा विचार करत नाहीत त्यांना फुलाची महत्ता कोठे आहे ते कळलेच नाही, असे मी म्हणेन. "

आरंभी गिजुभाईंच्या पत्रिकेतील भाषा खरोखरच प्रहार करणारी, मर्मभेदक असे. त्यांनी दिलेले दाखले बघून, वाचून श्री. मेघाणींसारखे थोर गुजराती साहित्यिक म्हणत, " हे गिजुभाई पूर्वीच्या राजेलोकांप्रमाणे काळा बुरखा पांघरून गावामध्ये फिरायला निघतात की काय ? किंवा त्यांना अदृश्य रूपाने आमच्या घरात वावरता येते की काय ? आमच्या घरी घडलेला प्रसंग पुढच्या महिन्याच्या शिक्षणपत्रिकेत हुबेहूब छापून येतो तरी कसा ? " गिजुभाईंच्या या व अशा सर्व प्रयत्नांमुळे कित्येक पालक, वाचक त्यांच्या कार्याकडे आकृष्ट झाले. आपल्या गावात बालमंदिर असावे, तिथे आपल्या मुलांनी जावे, अशी इच्छा ठिकेत उत्पन्न झाली. गावोगाव कमी खर्चात चालणारी अनेक बालमंदिरे स्थानिक लोकांच्या पुढाकाराने निघाली.

बालसंगोपनविषयक मजकुराखेरीज खास बालकांसाठी असे साहित्यही गिजुभाई पत्रिकेतून सादर करीत असत. गिजुभाई तसे विद्यार्थी असल्यापासून लिहीत होते. विविध विषयांवरची, विशेषतः शिक्षणशास्त्रविषयक अशी सुमारे ४० पुस्तके त्यांच्या नावावर जमा होती. परंतु त्यांचे वैशिष्ट्य सिद्ध झाले ते बालसाहित्यनिर्मितीत. या वेळपर्यंत मुलांसाठी खास असे लिखाण फारसे कुणी केले नव्हते. बालसाहित्य कसे असायला हवे, ते कोणत्या विषयांवर व कशा भाषेत लिहिले जावे, याविषयी फारसा कुणी विचारही केला नव्हता. गिजुभाईंनी शिक्षणपत्रिकेतून बालसाहित्याचा मेवा मुलांपुढे सादर केलाच; परंतु विशेष म्हणजे, बालवाङ्मयाची जवळजवळ १०० पुस्तके त्यांनी लिहिली. त्यांच्या या क्षेत्रातल्या कर्तृत्वाचा गौरव करताना काकासाहेब कालेलकरांनी त्यांना ' बालसाहित्याचा ब्रह्मा ' म्हटले. गुजराती साहित्यिकांनीही त्यांना ' बालसाहित्यसम्राट ' ही पदवी व सुवर्णपदक देऊन त्यांचा सन्मान केला...

ताराबाईंना व दक्षिणामूर्तीतील इतर कार्यकर्त्यांना गिजुभाई नेहमी शिक्षणपत्रिकेत लिहायचा आग्रह करीत. परंतु ताराबाईंजवळ तो आत्मविश्वास व स्फूर्ती नव्हती. शिवाय गुजरातीसारख्या परभाषेतून लिहायचे. " काय लिहू ? सुचतच नाही. मला विषयच सापडत नाही. " अशी त्यांची कुरकूर असे. अखेर एके दिवशी गिजुभाईंनी निर्वाणीचा सूर काढला,

" ताराबाईंचा लेख मिळाल्याखेरीज या महिन्याची शिक्षणपत्रिका प्रसिद्ध होणारच नाही. "



—मग ताराबाईंनी लेखणी हातात घेतली.

त्यावेळच्या शिक्षणपत्रिकेत गिजुभाईंच्या मानाने ताराबाई खूपच कमी लिखाण करीत. परंतु त्या दोघांच्या वृत्तीत, व्यक्तिमत्त्वात जो फरक होता तो त्या काळातसुद्धा त्यांच्या लेखनातून, भाषेच्या वापरामधून प्रकट होई. ताराबाईंचे लेखन बौद्धिक पातळीवरचे असे; तर गिजुभाईंचे भावनेने ओथंबलेले असे. बालसाहित्य लिहिण्याची गिजुभाईंची खास बालमनपसंत शैली मात्र ताराबाईंनी बरोबर उचलली.

गिजुभाईंना ताराबाईंच्या योग्यतेची पूर्ण जाणीव होती. संपादनाचे काम ते नेहमी ताराबाईंवर सोपवीत. त्यांनी केलेली काटछाट व इतर सूचना यांना ते मान देत. ताराबाईंनी चाळणी मारल्यावरच गिजुभाईंचा मजकूर पुढे जात असे. गिजुभाईंनी आणि ताराबाईंनी मिळून संपादित केलेल्या १०५ पुस्तकांपैकी ७६ पुस्तके गिजुभाईंनी लिहिली. ताराबाईंचीही ' घरमां मॉन्टेसोरी ', ' मंगेशना पोपट ', ' तिळगूळ घ्या ', अशी काही पुस्तके प्रसिद्ध झाली आणि वाचकांना ती फार आवडलीही. ही सर्व पुस्तके प्रसिद्ध करण्यासाठी संस्थेचा एक प्रकाशनविभाग होता, आणि श्री. गोपाळराव विद्वांस या कार्यकर्त्यांनी तिचा कारभार कुशलतेने चालवला. शिक्षणपत्रिकेच्या कामाला पगारी माणूस असा नेमला नव्हता, मानधन देण्याची पद्धत ठेवली नव्हती. वर्गणीची नोंद, हिशेब, पत्ते लिहिणे, रॅपर्स चिकटवणे ही सर्व कामे तेथले कार्यकर्ते, शिक्षक व प्रशिक्षणाचे विद्यार्थी करीत. अशा पद्धतीने शिक्षणपत्रिकेच्या वर्गणीतून गिजुभाईंनी सुमारे रु. १०,००० /–ची बचत केली. बालमंदिर, अध्यापनमंदिर, वसतिगृहे, शिक्षणपत्रिका कोणत्याही उपविभागातील महत्त्वाची कार्ये ताराबाईंनी एकदा नजरेखालून घालावीत अशी अपेक्षा असे. बारीकसारीक तपशीलही बारकाईने टिपणारी, व्यवस्थित व ' काकदृष्टीची बाई ' अशी ताराबाईंची तेथे प्रसिद्धी होती.

१९२८ साली गुजरातमध्येच अहमदाबाद येथे दुसरे मॉन्टेसोरी संमेलन भरविण्यात आले. आणि या खेपेस अध्यक्षपदाचा मान गिजुभाईंना देण्यात आला. हे संमेलन शारदामंदिर या स्थानिक संस्थेत भरविण्यात आले आणि अहमदाबादमधील व बाहेरगावचेही अनेक प्रतिष्ठित, निमंत्रित त्याला मोठ्या संख्येने उपस्थित राहिले. संमेलनाला जोडून एक सुंदर शैक्षणिक प्रदर्शनही भरविण्यात आले होते. मॉन्टेसोरी संघाच्या प्रचारकार्याला या संमेलनामुळे विशेष गती मिळाली.

मॉन्टेसोरी संघाची स्थापना झाल्यापासून पुढील सुमारे तेरा वर्षे गिजुभाईंच एका हाती संघाचे कामकाज पाहत असत. सरलादेवी साराभाई संघाच्या अध्यक्षा होत्या तर नानाभाई उपाध्यक्ष होते आणि गिजुभाई व ताराबाई हे संयुक्त कार्यवाह होते. प्रत्यक्षात मात्र कामातला सिंहाचा वाटा गिजुभाईंच उचलीत. व इतर मंडळी आवश्यक असेल तेव्हा आणि तेवढेच सहाय्य करीत. मात्र गिजुभाईंच्या या एकछत्री अमलात

संस्थेची बरीच प्रगती झाली.

ताराबाई गिजुभाईंना साथ देत त्यांच्यापासून संथा घेत असतानाच्या दिवसांतली एक हकीकत.— एका संध्याकाळी तारकेश्वरीच्या त्या टेकडीवरून खाली पाहता पाहता ताराबाईंना गिजुभाई म्हणाले होते,

" ताराबेन, अजू तो आपणुं घणुं काम बाकी छे. "

टेकडीच्या पायथ्याशी असलेल्या लहान लहान झोपड्यांकडे त्यांचे लक्ष होते. टेकडीवरचे काम संपले की ते खाली उतरून त्या वस्त्यांमध्ये, वाड्यांमध्ये शिरणार होते. बालशिक्षणाची रामबाण मुळी समाजाच्या थेट खालच्या स्तरापर्यंत नेऊन भिडवण्याची त्यांना महत्त्वाकांक्षा होती. ताराबाई त्यांचा उजवा हात; आणि या उजव्या हाताचा ओढा तर या ग्रामीण बालशिक्षणाकडे प्रथमपासून होताच.

याच सुमारास केव्हातरी महर्षी कर्वे भावनगरला येऊन दक्षिणामूर्तीला भेट देऊन गेले होते. तेथले काम पाहून ताराबाईंजवळ त्यांनी शंका व्यक्त केली होती,

" तुमचे हे काम शहरात ठीक आहे, परंतु आपला हिंदुस्थान गरीब लोकांचा देश आहे. हे महागडे शिक्षण, ही साधने आपल्याला कशी काय परवडणार ? "

त्या वेळेपासूनच अशा प्रकारच्या आक्षेपांना प्रत्यक्ष कार्य करून सक्रिय उत्तर द्यायचे अशी ताराबाईंनी खूणगाठ बांधली होती.

अखेर १९३० च्या सुमारास हा ग्रामीण बालशिक्षणाचा प्रश्न गिजुभाईंनी हाती घेतला आणि हे काम ताराबाईंवर सोपवायचे त्यांनी ठरवले. भावनगरजवळच्या खेड्यापाड्यांतून त्याचप्रमाणे गावातल्याच गरीब, मागासलेल्या वस्त्यांमधून आता बाल-मंदिराचे प्रतिनिधी, अध्यापनमंदिराचे विद्यार्थी फिरू लागले. ताराबाईंच्या देखरेखीखाली त्यांचे प्रयोग सुरू झाले...

परंतु देशाच्या इतिहासातले, राजकारणातले ते साल निराळ्या अर्थाने धामधुमीचे गेले. याच वर्षी गांधीजींनी मिठाचा कायदेभंग करायचे ठरविले व त्याप्रमाणे उभ्या देशाला त्यांनी सत्याग्रहाची हाक दिली. देशभर आंदोलनाने वेग घेतला. राष्ट्रीय बाण्याचे लोक, स्त्रिया, तरुण सारे आपापल्या नोकऱ्यांवर, व्यवसायांवर पाणी सोडून दांडीयात्रेत सामील झाले. प्रत्यक्ष सामील न झालेल्यांनीही सत्याग्रहींना आपला पाठिंबा व्यक्त करण्यासाठी आपापली कामे बंद केली. दक्षिणामूर्तीतून खुद्द नानाभाईंनी व इतरही अनेक शिक्षकांनी आणि विद्यार्थ्यांनी या क्रांतीच्या कुंडात उड्या घेतल्या. ताराबाई प्रथमपासूनच राष्ट्रीय वृत्तीच्या, त्यांना या लढ्यात भाग घेणे हे आपले कर्तव्य आहे असे तीव्रतेने वाटू लागले. गिजुभाईंचे मत मात्र थोडे निराळे होते. त्यांचे म्हणणे पडले की शिक्षकाने अशा वेळी आपले काम सोडू नये आणि सत्याग्रहात भाग घ्यायचाच असला तर सर्वांनीच शिक्षणसंस्था बंद ठेवून कारावासात जाण्यापेक्षा शिक्षकाच्या पेशाला योग्य असे एखादे



दुसरे काम त्या वेळात करीत राहावे.

" बरं तर मग आपण संस्था बंद ठेवूच. " ताराबाई म्हणाल्या, " परंतु मिठाचा कायदेभंग करण्याऐवजी या वेळी आपल्याला प्रौढशिक्षणप्रसाराचे काम करता येईल... "

गिजुभाईंना ताराबाईंची ही कल्पना एकदम पसंत पडली. झाले ! गिजुभाईंच्या कामाचा सपाटा विलक्षण होता. रातोरात त्या दोघांनी बसून प्रौढांकरता एक अक्षर-ज्ञान-पुस्तिका तयार केली, नी लगेच ती प्रसिद्धही केली आणि मग अध्यापनमंदिराचा ताफा बरोबर घेऊन लगेच मंडळी प्रौढशिक्षणप्रसाराला बाहेर पडली. गिजुभाईंचे हे कार्यही वेगाने विस्तारत गेले. संस्थानाच्या सरकारी अधिकाऱ्यांनाही दक्षिणामूर्तीतील कार्यकर्त्यांचा हा उपक्रम विशेष पसंत पडला. त्यांनी आपण होऊन या लोकांना सर्व प्रकारचे सहाय्य करायचे ठरविले. संस्थानाबाहेरही ठिकठिकाणी दौरे काढण्यात आले. नवसारी येथे एक केंद्र बनवून आजूबाजूच्या खेड्यांतून वर्ग घेतले गेले. धूमधडाक्यात प्रौढशिक्षणप्रसार सुरू झाला.

ताराबाईंनी मग श्रीमती राजस डोंगरे यांच्या मदतीने मराठी अक्षर-ज्ञान-पुस्तिकाही काढली. त्यांचे अनुयायी महाराष्ट्रात फिरू लागले. पुणे, सातारा इ. ठिकाणी ताराबाई येऊन व्याख्याने देऊन गेल्या.

१९३० च्या या लढ्यात कुमार-किशोर वयाचे विद्यार्थी उगाचच उंडारू लागले होते. मुलांच्या रिकाम्या वेळाचे रूपांतर वात्रटपणात व्हायला वेळ लागत नाही. या मुलांची शक्ती काही विधायक कार्यात गुंतवावी या उद्देशाने गिजुभाईंनी मग त्यांच्याकरिता एक अभिनव चळवळ सुरू केली; तिचे नाव वानरसेना. ही ' वानरे ' जथ्याने घोषणा करत फिरत व पद्धतशीरपणाने गल्लीगल्लीतून हिंडून आपल्या लढकाऱ्यांनी सरकारी अमल-दारांची झोप उडवीत ! पाठीवरून वाळूचे कण वाहून नेणाऱ्या रामायणातल्या खारीच जशा या !

ताराबाई आपल्या आचार्यांचा हा सपाटा पाहून स्तिमितच होऊन गेल्या. प्रौढ-शिक्षणप्रसाराच्या कल्पनेचे लहानसे बी आपण त्या एका सुपीक क्षणी गिजुभाईंच्या हातावर ठेवतो काय आणि गिजुभाई तिला असे रूप देतात काय,— त्या कल्पनेचे महाकल्पनेत रूपांतर होते काय ! एका रात्रीत पुस्तके तयार होतात काय, फिरते प्रचारगट आखले जातात काय, अध्यापनवर्गाला आदेश मिळतात काय– आणि परिसरात ठिक-ठिकाणी वर्ग घेतलेही जाऊ लागतात काय ... !

एवढ्याशा मुळीतून एवढा मोठा प्रकल्प ? ताराबाईंनी पुन्हा एकदा गिजुभाईंपुढे हात जोडले.— टेकलेही !

दुधात पाणी मिसळून जावे, तशा नती ताराबाई या गिजुभाईंच्या कार्याशी एकरूप होऊन गेल्या होत्या. आपल्या आयुष्यातल्या या नऊ वर्षांच्या दक्षिणामूर्ती पर्वात त्या

पुष्कळ काही शिकल्या होत्या, वडल्या होत्या, कार्यमग्न आणि कार्यशीलही राहिल्या होत्या... परंतु पुन्हा एकदा त्यांचे आयुष्य त्यांना एका तिठ्यापर्यंत घेऊन आले होते. त्यांच्या ध्यानीमनी नसताना तेथल्या कार्याला, वास्तव्याला अचानकच पूर्णविराम देण्याची आवश्यकता निर्माण होत होती... योग होता 'पुनश्च अमरावती'चा...

तथापि, ताराबाईंनी भावनगर सोडले तरी दक्षिणामूर्तीचा, तेथल्या जीवनाचा ठसा त्यांच्या आयुष्यावर उमटला तो मात्र कायमचा. स्थळकाळाच्या अंतराने त्यांच्या या संस्थेविषयीच्या पूज्यभावात, धन्यतेत, कृतज्ञतेत कणाचाही फरक पडला नाही.

पुढे पुष्कळ वर्षांनी ताराबाईंनी आपल्या आयुष्यातल्या या संस्मरणीय, समृद्ध आणि एका वेगळ्या तऱ्हेने रम्य ठरलेल्या काळाबद्दल मोठ्या कळकळीने लिहिले,—*

"...माझ्या जीवनातल्या एका धन्य क्षणी मी ते टेकडीवरचे बालमंदिर पाहायला गेले. त्यावेळी माझ्या मनात आपण स्वतः ते काम करावे असा विचारसुद्धा नव्हता. माझ्या मुलीला शाळा शोधण्याकरिता आणि स्वप्नाळू वाटणारे सिद्धांत हे गिजुभाई बधेका प्रत्यक्षात कसे काय उतरवतात हे बघण्याकरिता मी तेथे गेले होते. आणि तेथेच मला माझे जीवनगुरू, माझी जीवनदिशा, माझे जीवनकार्य गवसले!

माझ्या मुलीला एक सुंदर शाळा मिळाली म्हणून मी आनंदात होतेच. शिक्षणासंबंधी विशेष अभ्यास करायची मला संधी मिळाली म्हणूनही मी खूष झाले. तेथे राहून मी अभ्यासाला सुरुवात केली. नानाभाई, गिजुभाईंचा प्रेमळ स्नेहही आम्हाला मिळाला.

...आठ नऊ वर्षांनंतर मी भावनगर सोडले. ह्या कार्याचा प्रांतच सोडायचा प्रयत्न केला. स्त्री-उन्नतीचे काम केले, परिस्थितीनुसार काही काळ अर्थार्जनालाही जास्त महत्त्व दिले. पण कुठेही मला शांती मिळाली नाही. अखेर मी मराठी शिक्षणपत्रिका उचलली. शिशुविहारात येऊन पोचले. खरा दिलासा मला बालशिक्षणात स्थिर झाल्यावरच लाभला. या वेळी मला उमगले की गिजुभाईंनी मला दीक्षा दिली होती तीच खरी.

मी विलायतेत गेले असते, तिकडून एखादी पदवी घेऊन आले असते तरी, जमेल तेवढे शिक्षणकार्य मी कुवतीनुसार केले असतेच. परंतु गिजुभाईंचे जीवन पाहून मी जे ज्ञान मिळविले ते मला इतर कुठेच खरेदी करता आले नसते..."

* 'स्मरणांजलि'

# ६. पुनश्च अमरावती

गिजुभाईंच्या निधनानंतर (१९३९) प्रसिद्ध झालेल्या 'स्मरणांजलि' या गुजराती भाषेतल्या लेखसंग्रहात गिजुभाईंचे अल्पचरित्र आहे आणि त्यांच्या बऱ्याच शिष्यांचे, सहकाऱ्यांचे स्मृतिकथनपर लेखही आहेत. या पुस्तकावरून गिजुभाईंच्या व्यक्तिमत्त्वाविषयी तर माहिती मिळतेच परंतु दक्षिणामूर्ती या संस्थेतील त्या वेळच्या जीवनक्रम कसा होता याचीही चांगली कल्पना येते. दक्षिणामूर्तीमधले कार्यकर्ते केवळ गांधीजींच्या तत्त्वज्ञानाचे निस्सीम चाहते व अनुयायी नव्हते तर गांधीजींचा या संस्थेशी निकटचा प्रत्यक्ष संबंध होता.* साहजिकच तेथल्या एकंदर दिनक्रमामध्ये, कार्यक्रमामध्ये, राहणीमध्ये गांधीवाद प्रतिबिंबित झालेला असे.

या 'स्मरणांजलि'मधल्या एका लेखात तेथल्या एका कार्यकर्त्याने गिजुभाईंच्या वेळापत्रकातला भंगीकामाचा तास रंगविला आहे.

—भाईचंद सगळ्यांना खराटे वाटतो आहे. टोपली, तगारी, फावडी, झाडू घेऊन एकेकजण मैदानात दाखल होत आहे. कमलाबेन, मोंघीबेन पदर बांधून तयार आहेत. जडीबेन हसत हसत चुंबळ तयार करीत आहेत. पाणी मारायचे काम त्यांनी स्वतःकडे घेतले आहे. कमलाबेननी सुरती ढंगाने कासोटा घातला आहे. हेमूभाईंनी काचा मारला आहे; बच्चूभाई त्यांना झाडू कसा धरायचा याचे मार्गदर्शन करतो आहे. हरिहरभाईंनी तगारे डोक्यावर धारण केले आहे आणि आपण मुकुटच घातला आहे असा त्यांचा चेहरा आहे आणि ताराबाई तर या सेनेत आघाडीला आहेत.—

"हा, हवे मारी तरफ जरा ध्यान आपशोके ऽ" एकीकडे आपल्या तुटलेल्या चष्म्याची दांडी चाचपीत, धोतर खोचीत गिजुभाई आपल्या नेहमीच्या मवाळ तरीही सुस्पष्ट शैलीने बोलू लागतात,

"भाईओ अने बेहेनो...तुम्हाला माहीत आहे का? आज आपण सगळे हिंदुस्थानातल्या सर्वात पवित्र पदावर पोचणार आहोत. आज आपण भंगी होणार आहोत. बापूजी तिकडे नेहमी मोठमोठ्या अतिरथीमहारथींचा नक्षा उतरविण्यासाठी ही भंगी-

* ताराबाई तेथे असताना गांधीजींनी दक्षिणामूर्तीला भेट दिली होती, बालमंदिरही बघितले होते व गिजुभाईंना आपली वकिली आणि ताराबाईंना आपली पोस्ट गुंडाळून ठेवून मुलांमध्ये बसलेली पाहून त्याबद्दल आनंदही व्यक्त केला होता.

कामाची युक्तीच वापरतात. या मेहेतरच्या कामात एक प्रकारची जादू आहे, असं तुम्हाला जाणवेल. पैशाचा दर्प, शिक्षणाचा, उच्च कुलाचा गर्व सगळी या पाणीबरोबर वाहून जातात. चला तर, आजच आपण भंगी बनू या, खऱ्या अर्थाने निर्मळ होऊ या, आणि हे अंगण, हा सगळा आसमंत साफ करून टाकू या! चला, एक, दोन, तीन,... सुरू... ! ”

शिटी वाजते आणि सगळे ' भंगी ' एकाच उत्साहाने अंग मोडून मोडून झाडू मारू लागतात. मैदानभर एकच धुरळा उडतो; त्यात ती माणसे पाहता पाहता तीनचतुर्थांश पुसली जातात...मध्येच कुणाचे तरी धुळभरे हास्य, तगारे ठेवण्याचा आवाज, झाडूचे सेंथ, लांब फटकारे ऐकू येतात.

“ मगनभाई, पेली बाजू थाव... ”

“ हां, या लिमड्याच्या झाडाखाली करा सगळ्या कचऱ्याचा ढीग... हाश्शी ! ”

सुमारे तासभर असे आवेशाने भंगीकाम चालते आणि पुन्हा एकदा शिट्टी वाजते.

सगळे झाडू–खराटेवाले काम संपवून धावतपळत विनयमंदिराच्या भिंतीजवळ जमा होतात. कुणीतरी तेवढ्यात घाईघाईने झाडूचे शेवटचे फटकारे मारून येते. चेहरे, कपडे धुळीने माखले आहेत. कुणी मळक्या हाताच्या मनगटाने बटा कानामागे सारण्याचा प्रयत्न करतेय, तर कुणी तगारे शेजारी पालथे टाकून थेट मंग्यासारखे उकिडवे बसले आहे ..

गिजुभाई नकली गांभीर्याने त्यांची उपस्थिती घेऊ लागतात. चंद्रशेखर कागद घेऊन नावे उच्चारू लागतो.

“ हेमशंकर शामजी राव्वणो ' ऽऽ र ! ”

“ गौरीशंकर काशीराम चतुर्वेदी ऽ ”

“ अरे थांब, थांब ! ” गिजुभाई रोखतात, “ भंगी असून बामणांची नावं लावायला लाज नाही वाटत ? लिहा, ' हेमलो भगलानो. ' ”

“ गोवलो केहेलानो ऽ ” हजेरी पुढे चालू होते.

स्वतःच्या नावाला ते भंगीरूप देतात, गिजुभाई बधेकाचे—

“ गिगलो भगलानो ऽऽ ”

“ जी ऽ ” कुणीतरी हसू सांभाळत उत्तर देते.

“ रामलो नागलानो ऽ ”

“ कमी कलियानी ऽ ”

ताराबाईंची पाळी येते.

“ हं, तुमच्या वडलांचं नाव काय हो ताराबेन ? ” चंद्रशेखर विचारतो.

“ सदाशिव... ! ” ताराबाई गंभीरपणे उत्तर देतात.



“ हां चालो, लखो—

“ तारकी सिदियानी ऽऽ ”

कुणालाच हसू आवरत नाही.

“ ...आपल्या कार्यक्रमावरून बोध घ्या. त्यांची कामे आपल्याला आवडत नाहीत, त्यांची नावे आपल्याला आवडत नाहीत. आपलेच देशबांधव आपल्याला परके वाटतात...तुच्छ वाटतात...हे बरोबर नाही ! आजच्या हजेरीतला विनोद विसरून जा. पण हा पाठ विसरू नका... ”

त्याच दमल्या, भागल्या, फतकल मारल्या स्थितीत कुणाला तरी लहर येते.

“ चला. आंघोळीची व्यवस्था होतेय तोवर आपण गिजुभाईंची गोष्ट ऐकू या. ”

“ हां, गिजुभाई ! आजे तो अमनेपण वार्ता केहेवीज पडसे ! ” ही मोंघी, गिजुभाईंची विधवा पुतणी– बालमंदिराच्या कामातच असते. लोकवार्ता सांगण्याचे कसब काकाइतकेच तिच्यापाशीपण आहे.

“— नेहमी नेहमी बालकांनीच का ऐकायची गिजुभाईंची गोष्ट ! चला, सांगा. असा रे सारे तसेच ! गिजुभाई तुमची ती ' जनकराजा 'ची गोष्ट सांगा ! ”

मोठ्या माणसांच्या त्या हट्टाला बळी पडून गिजुभाई बाह्या वर करतात, मिशांना ताव देतात आणि खड्या आवाजात साद घालतात; “ ऐका– ”

...जनकराजा अष्टावक्र मुनींकडे शास्त्रे शिकत होता. एके दिवशी मुनिवर्यांनी आपल्या समस्त परिवाराची परीक्षा घ्यायचे ठरविले. आपल्या आश्रमाभोवताली त्यांनी एक मायावी जग निर्माण केले आणि त्याला आग लावून दिली. सारे ब्रह्मचारी, ऋषी–मुनी आपापली क्षुद्र मिळकत वाचवण्यासाठी सैरावैरा धावत सुटले.

इकडे अख्ख्या राज्याचा स्वामी मात्र शांत होता. तो एकाग्रतेने अष्टावक्रमुनी सांगत असलेला शास्त्रार्थ ऐकत राहिला. आगीचा डोंब उसळलेला आणि मध्यभागी गुरु-शिष्यांची जोडी सुखरूप बसली होती....! ”

—असाच आणखी एक प्रसंग. सुमारे दीडशे माणसे एक मोठे कोंडाळे करून बसली आहेत. केळीच्या पानांवर निरनिराळे पदार्थ वाढले जात आहेत. मध्यभागी सुरेख रांगोळी काढली आहे. दक्षिणामूर्तीतल्या इतर कार्यकर्त्यांबरोबर लहानमोठे हरिजन बंधूही या गोलाकार पंगतीत मिळून मिसळून – काहीसे बुजून – जेवायला बसले आहेत.

गिजुभाई म्हणतात,

“ आजचा हा दिवस खरोखर दक्षिणामूर्तीच्या इतिहासातला अविस्मरणीय असा दिवस आहे. सनातनी वातावरणात वाढलेले आपण सारे आज हरिजन बालकांबरोबर जेवत आहोत ! इतके दिवस ही माणसेच केवळ आपले सामान उचलीत होती, आपले कपडे धूत होती, पाणी काढून देत होती. आपले मनोरंजन करीत होती...

...आज या सहभोजनाने आपण त्यांच्या सेवेचे उतराई होत आहोत..."

दक्षिणामूर्तीतली जीवनपद्धत कशा प्रकारची होती याची कल्पना येण्यास असे मोजके प्रसंग पुरेसे होतील. सामुदायिक भजने, सूतकताई, खादीचा वापर, आहारनियंत्रण, प्रभातफेऱ्या... !

याच संग्रहातील काही लेखांमधून गिजुभाईंसारख्या तेथल्या प्रमुख कार्यकर्त्यांच्या विचारसरणीवर, स्वभावविशेषांवर नेमके बोट ठेविले आहे.

...पहाटे तीन किंवा त्याही आधीचा समय. रात्री उशिरापर्यंत काम करीत बसलेले गिजुभाई मोजक्या तासातच झोप आवरून पुन्हा आपल्या अभ्यासखोलीत काही लेखन करीत बसले आहेत. त्यांच्या खोलीतला दिवा लागलेला पाहून नेहमीच्या पहाटपक्ष्यांपैकी एकेक उठतात, तसे तसे तिकडे पावले वळवितात. गिजुभाई विचारतात,

"कोण ?"

"मी, रामभाई."

"रामभाई, जीवनमंदिराची वेळ झाली ?"

"छे, आता कुठे साडेतीन होताहेत. गिजुभाई, तुम्ही केव्हा उठलात ?"

"जाग आली तसा उठलोच ! घ्या, चालवा गाडी पुढे !"

गिजुभाई आपल्या पुढ्यातले कागदाचे ताव रामभाईंपुढे सारतात. गुरुशिष्यांची लेखी घोडदौड चालू राहते– मध्येच केव्हातरी ताराबेनही उठून येतात. साधकांचे टोळके एकीकडे हलकेफुलके बोलत, हसत काम करीत राहते. साडेपाच वाजता अखेर गिजुभाई कागदपत्रे आवरू लागतात.

"...भाई, जाण्यापूर्वी एखादे भजन म्हणून जा ना ! दिवसाची सुरुवात मंगल सुरांनी होऊ दे."

"कोणते म्हणू ? तुम्ही तर माझी सगळीच भजनं ऐकली आहेत !"

गिजुभाई एका आवडत्या भजनाची मागणी करतात.

"पुन्हा तेच ! गिजुभाई, तुम्ही एकच एक गोष्ट धरून बसता हां ! तेच ते भजन कितीदा ऐकाल !"

"अरे भाई, एकच एक गोष्ट धरून बसण्यातच सिद्धीची वाट असते, बाबा ! आपल्या देशात आज एकच एक गोष्ट धरून बसणाऱ्या माणसांचीच उणीव आहे. मुलं आपल्याला पुष्कळदा खूप महत्त्वाचे धडे शिकवीत असतात. लहान मूल पाहा ना, एकच एक गाणं, एकच एक गोष्ट त्याला पुन्हा पुन्हा हवी असते. मोठी माणसं त्यांच्यापासून हा जीवनमंत्र घेत नाहीत, त्याला कोण काय करणार ?"

बाहेर चांगलेच फटफटते, 'विनोद–प्रिया'च्या टेकडीवरून पहाटगारव्याच्या मंद लहरी वाहू लागतात. त्यात जाई, जुई इत्यादी सुगंधी फुलवेलींचे मंद सुवास मिसळून जातात...



जीवनमंदिराची 'पहिली सभा' सुरू झाली आहे. मंडळी जमली आहेत. पेटीचे सूर वाजतात...प्रार्थना होते आणि गिजुभाई डोळे उघडून आपल्या संथ, मऊ स्वरात निरूपणाला सुरुवात करितात.

अशाच एखाद्या संध्याकाळी चारचौघे कार्यकर्ते जवळच्या उद्यानात फिरायला गेले आहेत. सहकारी मित्रांमध्ये प्रेमळ बाचाबाची होते—

नानाभाई म्हणतात, "गिजुभाई, तुम्ही स्वतःला democrat म्हणवता, पण आहात मात्र चांगले autocrat ! पेन, पेन्सिल, कागद, स्वतःची एक देखील वस्तू दुसऱ्याला मिळायची नाही ! जरा कुणी काही घेतलं की वाघासारखे तुटून पडता !"

"पण यात democracy चा प्रश्नच कुठे येतो ? तुम्ही लोक माझ्या वस्तू घेता आणि तुम्हाला त्या पुन्हा जागेवर ठेवता मात्र येत नाहीत. माझ्या वस्तू मला लागल्या की पुन्हा मीच शोधून घ्यायच्या. हा कुठला न्याय !"

"भाई, हुं तो काम करवु जाणुं ! जी cracy कामात उपयोगी पडेल ती माझी. मी democrat पण नाही आणि autocrat पण नाही, मी आपला work-crat आहे !"

आणि हा वर्कक्रॅट अतिश्रमाने आजारी पडू लागला तरी विश्रांती म्हणून घेत नसे. अंथरूण धरावे( च ) लागले तरी उशाशी बसलेल्या, काहीतरी कुरकुरत असलेल्या एखाद्या तरुण, उतावळ्या कार्यकर्त्याला तो शांतपणे तरीही उत्कटपणे समजावून सांगत असे,

"नाही रे, मुलं मुळात वाईट कधीच नसतात. मुलाचे शरीर घाणेरडे असले, ती दंगामस्ती करीत असली, शिव्या देत असली तरी ते सोन्याला लागलेल्या कचऱ्यासारखे आहे."

समाचाराला आलेला एखादा मित्र दटावी, "गिजुभाई, काम पुरे, जरा पडून राहा ना !"

"असले चोजले आपल्याला नाही भाई मानवत !" त्यांना उत्तर मिळे, "घटकेत पडून राहा, घटकेत काम करा...! काम करायचं तेव्हा ते चोपून करायचं. ज्या दिवशी ते संपेल त्या दिवसानंतर मग त्या बाजूला ढुंकून न पाहता चालतं व्हायचं, ही आपली फिलॉसॉफी आहे."

"पण गिजुभाई, ज्याला तुम्ही काम काम म्हणता ते तरी..."

उशाशी बसल्या बसल्या एखादा स्नेही वाद घालू लागे,

"पण आज मी खरं काम करतोय असा दावाच कुठे करतोय ? मी केवळ कामाची हवा मात्र निर्माण करतो आहे. काम करणारी, खरं कार्य करणारी माणसं माझ्या मागून

चालत येताना मला दिसताहेत ... ''

आणि हा एक दक्षिणामूर्तीतला नाट्यप्रयोग.

... पार्श्वभूमीत गांधीजींचा फोटो आहे. दोन फुलदाण्या आणि एक हिरवा पडदा. रंगभूमीची सजावट झाली.

व्हरांडा विविध वयाच्या प्रेक्षकांनी फुलला आहे. खंजिरीचा खळखळाट होतो आणि पडदा सरकतो.

डोक्याला साफा, पोटरीपर्यंत लाल लुंगी आणि हातात नंगी तलवार असा एक अरब प्रवेश करतो.

हे गिजुभाई!

... धनिक बनियाचं वऱ्हाड लग्नाहून परतत होतं. पुढे गाड्या धावत होत्या आणि हातात नंगी समशेर धरून खान आपल्या मालकाच्या काफल्याबरोबर धावतो आहे.

गाडीतला बनिया पुन्हा पुन्हा म्हणतो,

" पठाण, आता पुरे! आता गाडीत बसा. थकून जाल. बहोत हो चुका. ''

" नहीं मालिक! हम तो चलेंगे! ''

... आणि ही प्रश्नोत्तरं होतच राहतात.

हळू हळू बनियाला गुंगी येते. घोड्याच्या टापांचा लयबद्ध आवाज होत राहतो... पण अरब हळू हळू मागे पडतो आहे.

पायातून कळा येतायत. मांड्यांतून पेटके. तसतसा खान आणखी चेवाचेवानं उत्तर देतो,

"— हम तो चलेंगे...''

अखेरीस खानाच्याने हार सहन होईनाशी होते. गाड्या सरळ सरळ पुढे जातात. तो मागे पडतो.

एकाएकी हातातल्या समशेरीने खान आपल्या पायावर वार करतो.

" हरामजादे! ... घी खाया, गुड खाया और चलते क्यूँ नहीं? ''

व्यापाऱ्याच्या कानावर हकीकत जाते तेव्हा तो घाईघाईने उतरतो. जखमी खान स्वतःला आणखी घायाळ करून घेण्यापूर्वीच त्याला गाडीत घेतले जाते...

दक्षिणामूर्तीतल्या जीवनक्रमाच्या काही मोजक्याच छटा, तुरळक संदर्भ वाचले तरी मूळच्या उद्योगप्रिय, ध्येयप्रिय ताराबाईंना हे वातावरण केवढे पोषक, रमणीय व स्फूर्तिदायक वाटले असेल हे समजू शकते आणि त्याचबरोबर प्रभासारख्या हळव्या मनाच्या आणि रंगीबेरंगी रुचीच्या मुलीला या प्रकारचा जीवनक्रम किती नीरस, रुक्ष वाटला असेल याचीही कल्पना येते. दक्षिणामूर्तीमध्ये प्रभा रुजली नाही याचे एक कारण म्हणजे तिच्या निसर्गतः राजस वृत्तीशी विसंगत असा ध्येयवाद तिथे अकालीच तिच्या वाट्यात



वाढला जात होता. भजन, हरिजन आणि सूतकताई ही या टेकडीवरच्या जगातली त्रिसूत्री होती! एक ते ' बालमंदिर ' नामक भातुकलीचे कपाट सोडल्यास एरवी सभोवती सगळी गांधीवादाने भारलेली गेलेली साधी, सोवळी, शुचिर्भूत माणसे. गांधीजींच्या तसबिरी, त्यांना चढवले जाणारे सुताचे हार, चरखे, हरिजनोद्धार आणि फक्त सात्त्विकतेच्या व्याख्येत बसणारा आहार! ताराबाई प्रभाला चिटाचेच झगे शिवत. त्यांनी तिच्यावर खादी लादली नव्हती. पण प्रभाला या सर्वांचा आपल्या वृत्तीशी कधी मेळच घालता आला नाही. इथेच बहुधा ताराबाईंना आपल्या आणि आपल्या मुलीच्या मनोरचनेतला फरक, तिच्या वडिलांच्या आणि तिच्या वृत्तीतले साम्य प्रकर्षाने जाणवले असेल.

हा भेद, विसंगती प्रभाला तीव्रतेने जाणवत राहिली, विसरता आली नाही ती आणखी एका कारणाने. आपण केलेल्या गृहत्यागामुळे आपली मुलगी खऱ्या अर्थाच्या कौटुंबिक जीवनाला, वडलांच्या प्रेमळ सहवासाला पारखी झाली आहे, तिच्या वडलांची जागा काही आपण भरून काढणे शक्य नाही अशी एक टोचणी ताराबाईंच्या मनाला सतत असे. त्यामुळे त्या दोघांना एकमेकांचा जो लळा व ओढ होती ती बुजविण्याचा प्रयत्न न करता उलट ती जाणीवपूर्वक टिकविण्याकडे, जोपासण्याकडे त्यांचा कल असे. प्रभाला वडील आहेत, तिला त्यांची माया मिळू दिलीच पाहिजे अशी त्यांची भूमिका असे. " Why should I deprive the child of her father's company? '' हे त्यांचेच शब्द. त्यामुळे सुटीच्या दिवसांत जेव्हा जेव्हा शक्य होईल तेव्हा तेव्हा त्या मुद्दाम केव्हीं आणि प्रभा यांना एकत्र आणण्याची योजना आखीत. सुटीमध्ये एकत्र राहता यावे म्हणून त्या चिखलदरा, छिंदवाडा, नाशिक अशा एखाद्या थंड हवेच्या ठिकाणी मुद्दाम बिऱ्हाड मांडत. केव्हींही त्यांना येऊन मिळत किंवा कामाच्या धावपळीनुसार येऊन-जाऊन असत. एखादा मोठा बंगलाच अशा वेळी भाड्याने घेतला जाई. केव्हीं आपली मोटर, ड्रायव्हर, स्वयंपाकी वगैरे ताराबाईंच्या दिमतीला धाडून देत! एकेका मुक्कामात मग हजार-दोन हजार रुपयेसुद्धा ते या दोघींसाठी उधळून टाकीत! मग सकाळी केव्हींच्या खानसाम्याने ब्रेकफास्ट मांसाहारी बनवायचा, संध्याकाळी ताराबाईंच्या कृष्णाने त्यांच्या पद्धतीचा शाकाहार शिजवायचा! उंची कपडे, खाऊ, खेळणी यांचा केव्हीं आपल्या लाडक्या लेकीवर नुसता वर्षाव करीत! त्यांची मित्रमंडळीही अशावेळी मुद्दाम पाहुणचारासाठी सहकुटुंब बोलविली जात. प्रभाला सोबत म्हणून नातेवाइकांची, निकटवर्तीयांची लहान मुलेही जमविली जात. केव्हींबरोबर ते जातील तेथे त्यांची सर्व प्रकारची ' बडदास्त 'ही ठेवली जाई आणि प्रभा त्यात मनमुराद रंगून जाई. ताराबाईही आपली गृहस्वामिनीची भूमिका तन्मयतेने, रसिकतेने केव्हींना दाद देत वठवीत— आणि सुटी संपली की पतिपत्नी पुन्हा एकदा हळुवार मनाने एकमेकांचा निरोप घेऊन आपापल्या भिन्न जीवनक्रमाकडे परतत. पत्नीचा, लेकीचा

जड अंतःकरणाने निरोप घेऊन केव्ही अमरावतीला परतत आणि ताराबाई ती ओढघटकेचा संसार मोडून भावनगरची गाडी पकडत.

अजाण, अपरिपक्व मनाच्या प्रभाला मात्र हे सारे बदल पचविणे जड जात असे. एक तर परमप्रिय अशा अप्पांचा विरह, आणि दुसरे त्यांच्याबरोबरच निघून जाणारे त्यांचे वैभव. आईचे, आपले दक्षिणामूर्तीतले साधेसुधे घर मग तिला एखाद्या ओस पडलेल्या घरट्यासारखे वाटे, यात नवल काय ? आपल्या वडलांच्या वर्तुळातली आणि आईच्या विश्वातली मूलभूत तफावत पोशाख पाळण्याइतक्या सहजतेने त्या बालवयात तिला समजून घेता येत नसे. आणि तिकडे केव्हींनाही तिची सारखी आठवण येई. त्यांची मोठमोठी, जिव्हाळ्याने भरलेली पत्रे येत. आपल्या खर्चिक वृत्तीला शोभेशी महागडी खेळणी, बाहुल्या, कपडे, खाऊ ते पाठवीतच राहत. परंतु मनापासून आवडलेल्या त्या वस्तू वापरणे—बाहेर काढणेसुद्धा प्रभाला त्या दक्षिणामूर्तीच्या वातावरणात मुश्किल होऊन बसे.

साहजिकच या सर्वांचा भावनाप्रधान प्रभाच्या मनावर सूक्ष्म ताण पडत गेला. केव्ही आणि ताराबाई दोघांचीही व्यक्तिमत्त्वे प्रभावी आणि काही बाबतीत परस्परविरोधी. या दोन निष्ठा सांभाळताना आळीपाळीने दोन पातळ्यांवरचे त्यांचे सहवास भोगताना, इतरांसारखे नसलेले आपले मोसमी कौटुंबिक जीवन समजून घेताना छोट्या प्रभाच्या मनाची तारांबळ उडे. त्याचा परिणाम मग झुरण्यात होई, घुमेपणात होई.

ताराबाईंसारख्या संवेदनाक्षम आईला मुलीची ती कुतरओढ साहजिकच जाणवल्याशिवाय राहत नसे. तिला एकटेपण जाणवू नये याच्या प्रयत्नात त्या सतत असत. दोन-तीन वर्षांनंतर बबनताई दक्षिणामूर्ती सोडून गेली तरी इंदिराताईंची मुले त्यांच्याजवळ असत. शिवाय गिजुभाईंची चार मुलेही होती. त्यांच्यापैकी बबूशी प्रभाचे विशेष गुळपीठ. कधी गच्चीवर जाऊन चांदणीभोजन करायचे, कधी झोपाळ्यावर बसून गाण्याच्या भेंड्या खेळायच्या. आपला गळा गोड आहे याचा शोध प्रभाला याच काळात लागला. ताराबाईंप्रमाणे तिलाही भजनांची गोडी लागली. भजनांचा, गुजराती लोकगीतांचा बराच संग्रह या वयातच तिने केला होता.

परंतु शक्य होते तेवढे सारे करूनही हे अतिहळवे लेकरू मनाने कुठे(च) खरे रुजत नाही; याची ताराबाईंना सतत जाणीव होती. केव्हींच्या सहवासाला ती कायम आसुसलेली असते, हे त्यांना जाणवत होते—प्रभाच्या या अशा मनोव्यथांवरचा खरा उपाय मात्र त्यांच्या खिशात नव्हता.

प्रभाचे मन असे आतून कायम विस्कटलेले, ताराबाईंनी आपले दुर्दैव कार्यमग्नतेने विरजून टाकलेले... आणि तिकडे अमरावतीला केव्ही आणि सुलोचनाबाई तरी शंभर टक्क्यांनी सुखी झाले होते का ?



केव्हीही सुखी नव्हतेच. वरवर निढावल्यासारखे वागणाऱ्या, पूर्वीप्रमाणेच रसरशीत आयुष्य जगणाऱ्या केव्हींच्या मनाचा एक कप्पा ताराबाई आणि प्रभाच्या अनुपस्थितीमुळे कायमचा रिता राहिला होता. अशा या अनैसर्गिक, दुभंगलेल्या आयुष्यक्रमात सुखी होण्याइतका निगरगट्टपणा त्यांच्या आणि सुलोचनाबाईंच्या, कुणाच्याच स्वभावात पुन्हा नव्हताच.

१९२२ मध्ये ताराबाईंनी अमरावती सोडली आणि त्यानंतर केव्ही एकटे आपली साहेबी राहणी, आपले वकिली नैपुण्य आणि आपले कुत्रे यांच्यासह अमरावतीत उरले —ते, ज्यांची मैत्री व संबंध ताराबाईंच्या गृहत्यागाला कारणीभूत झाले होते त्या डॉ. मिस जावळे आणि मोकळी मित्रमंडळींचे तेच गुलहौशी कडे.

वरकरणी ते पूर्वीप्रमाणेच भरघोस चैनीत जगत होते, धंद्यातले काही तात्पुरते व स्वाभाविक चढउतार सोडल्यास बरकतही तशीच होती– परंतु आतून मात्र त्यांनाही आयुष्यभर ज्या त्रिकोणात राहावे, वावरावे लागणार होते किंवा लागत होते त्याची किंमत ते वेगळ्या तऱ्हेने मोजीत होते.

या सर्वांचा बाह्य परिणाम असा झाला, की ताराबाई गेल्याबरोबर केव्हींचे, तोवर जरा तरी काबूत असलेले सारे शौक, नाद बळावले. ते उघड उघड एक अनावर, बेदरकार जीवनक्रम व्यतीत करू लागले. केव्हींच्या स्नेहीमंडळींच्या शब्दांत ‘ केव्हींचा सुधाकर झाला ! ’

केव्हींचे पिणे, धूम्रपान, उधळपट्टी, बेहिशेबीपणा सारेच विकोपाला गेले. त्या विकोपाचीच जणू त्यांना झिंग चढत गेली. किंवा असेही असेल की ताराबाईंचे जाणे नैमित्तिक ठरले असेल, विकोपाशिवाय जगू शकणे हे त्यांच्या पिंडात, प्रकृतिधर्मातच नसेल !

आपल्या क्षेत्रात, धंद्यात, कोर्टात कमालीचे यश मिळवणारे केव्ही आपल्या खाजगी आयुष्यात मात्र लौकरच एक छंदीफंदी, चंगीभंगी माणूस म्हणून प्रसिद्ध झाले. भोगलोलुपता, Pleasures of flesh हा त्यांच्या जीवनाचा कणा, मूलमंत्र असल्यासारखा झाला. आणि दारू ? ती तर त्यांच्या आयुष्यातून दुथडी भरून वाहू लागली. आता या परिस्थितीत या सुधाकराचे भणंग जीवनचित्र पूर्ण करायला फक्त गडकऱ्यांच्या सिंधूची आवश्यकता होती. तीही उणीव डॉ. जावळ्यांनी भरून काढली. केव्हींची साथ त्या सावलीसारखी निष्ठेने सांभाळीत होत्या. आपल्या परीने केव्हींच्या संगतीची किंमत त्याही पुरेपूर आणि न कुरकुरता मोजीत होत्या.

आणि तरीही केव्हींच्या मनात असलेली ताराबाईंची जागा त्या कधीच घेऊ शकल्या नाहीत; व त्याची त्यांना कल्पनाही होती. परिणामी, सुखी कोणीच झाले नाही. केव्ही, ताराबाई, डॉक्टर आणि प्रभा सर्वांच्याच आयुष्यात एक प्रकारची कमतरता, पोकळी शेवटपर्यंत राहिली.

या चौघांचे परस्परसंबंधही वैशिष्ट्यपूर्ण होते. आपल्या, केव्हींच्या आयुष्यात झालेला डॉक्टरांचा अपरिहार्य समावेश ताराबाईंनी मूकपणाने मानला, गृहीत धरला होता. (पहिल्या काही वर्षांतच सुलोचनाबाईंनी घटस्फोटाचा प्रस्तावही मांडला होता; परंतु तो मात्र ताराबाई आणि केव्ही या दोघांनीही फेटाळून लावला.) ताराबाई अमरावतीला गेल्या तर डॉ. जावळ्यांचे घर व मोडकांचे घर जवळ जवळ असल्यामुळे दोघींचा संबंध येई, गाठही पडे. कारणपरत्वे येणे-जाणेही घडे. ताराबाई त्यावेळी सुलोचनाबाईंशी शिष्टाचाराला धरून वागत, बोलत. प्रभा लहान असताना केव्ही तिलाही डॉक्टरांकडे घेऊन जात असत; पण तरीही आता एकीकडे ते ताराबाईंना घरी परतण्याच्या विनवण्या करायचे थांबत नव्हतेच ...

वकील म्हणून केव्हींचे कर्तृत्व केवळ वादातीत होते. एक नाणावलेले वकील अशी त्यांची त्या परिसरात ख्याती होती. विशेषतः खूनखटला चालविणे हे तर त्यांचे वैशिष्ट्य. फौजदारी कायदा त्यांच्या डोक्यात कोणी शुद्धलेखन घातलेले असावे तसा स्वच्छ, स्पष्ट लिहिला होता आणि त्याबद्दल सगळा वकीलवर्ग एकमुखाने त्यांना वाखाणीत असे. उलटतपासणी घेण्याची त्यांची जी विशिष्ट हातोटी होती ती नवे वकील प्रयत्नपूर्वक उचलावला बघत, ऐकावला बसत. कोर्टात केव्ही आपली बाजू मांडावला लागले की त्यांचे भाषाप्रभुत्व पाहून सहकारी चकित होत. आणि केव्हीही ज्युनियर वकिलांना मोठ्या आस्थेने, मोकळेपणाने, हाताशी धरत, तयार करीत. कनिष्ठांशीही सहजतेने, हसून खेळून वागत. पाश्चात्य राहणीचे ते भोक्ते असले तरी मूळचा बाणा राष्ट्रीय. त्यामुळे राष्ट्रीय खटल्यातल्या आरोपींचे खटले ते फुकट चालवीत.

Law of Evidence हा कायद्यातला अतिशय किचकट भाग. पदवी घेऊन व्यवसायाला लागलेल्या वकिलांना सुद्धा तो पुरेसा आकळलेला नसे. एकदा बोलता बोलता 'अरे, उसमें क्या है ...' म्हणून कोर्टाकडेच्या विश्रांतीच्या खोलीत त्यांनी हा भाग विशद करायला घेतला आणि एकाही पुस्तकाचा आधार न घेता तो इतक्या साध्या शब्दात आणि परिणामकारक पद्धतीने त्यातील एकेक कलम घेऊन, फोड करून दाखविला की भोवतालचे वकील पुन्हा एकदा विद्यार्थी बनून एखाद्या कवितेचे रसग्रहण ऐकावे तसे, तल्लीन होऊन ऐकत राहिले.

"कायदा ही काय चीज आहे हे आम्ही केव्हींकडून शिकलो." अशी कबुली त्यांच्यापैकी कित्येक जण पुढेही देत...

गरिबांबद्दल गरजूंबद्दल केव्हींच्या मनात पहिल्यापासून अपार कळकळ होती. गरिबांचे खटले ते कित्येक वेळा फुकट चालवीत आणि आपले वकिली कसब तितक्याच मनःपूर्वक रीतीने पणाला लावून चालवीत. अमरावतीतल्या कितीतरी टांगेवाल्यांना, रिक्षावाल्यांना केव्हींनी असे ऋणी करून ठेवले होते.



'दैनिक हिंदुस्थान'च्या संपादकांनी केव्हींच्या या गुणाचा मोठ्या कृतज्ञतेने उल्लेख केला आहे.*

त्यांच्याच शब्दांत,—

"मॅट्रिकच्या परीक्षेस मला बसायचे होते पण फॉर्म भरायला सात रुपये माझ्याकडे नव्हते. श्री. खांडेकर मास्तरांनी मला बोलावले आणि सांगितले की, 'ही यादी घे आणि त्यात लिहिलेल्या नागरिकांकडे जा. ते तुला चारआठ आणे देतील. तुझी सोय होईल. मी सर्वांना सांगितले आहे.'

दुसऱ्या दिवशी सकाळी मी मास्तरांची चिठ्ठी घेऊन निघालो. सुरुवातीला बॅरिस्टर मोडकांकडे गेलो. मालटेकडीच्या बाजूच्या बंगल्यात ते त्यावेळी राहत. ते आणि त्यांच्या पत्नी ताराबाई मोडक व्हरांड्यात चहा घेत बसले होते. हाफ पॅन्ट नि सदरा घातलेला एक गरीब छोकरा आपल्या आवारात घुसलेला मोडक साहेबांच्या वेसाळ कुत्र्याला आवडला नाही. तो खसकन् माझ्या अंगावर धावला 'नको ती श्रीमंतांची मदत' क्षणभर विचार आला आणि मी भीतीने कंपौंडबाहेर पळालो. पण बॅरिस्टर मोडक धावत आले. त्यांनी कुत्र्याला आवरले आणि ममतेने म्हटले, 'तू बाळू मराठे का? ये बेटा आत! ...तारा, हा मराठे न्यू हायस्कूलमधून मॅट्रिकला बसतो आहे.'

माझा धीर चेपला. मी विश्वासाने बाजूला उभा राहिलो.

'बाळू, खांडेकरांनी मला सर्व सांगितले आहे. हे घे पैसे. चांगला पास झाला पाहिजेस बरं का!'

बॅरिस्टर मोडकांचा हात खिशाकडे गेला. पन्नास–साठ रुपयांच्या नोटा आणि नाणी त्यांनी माझ्या हातावर ठेवली. मला ओंजळ करावी लागली एवढे पैसे घ्यायला. एवढे पैसे आयुष्यात प्रथमच माझ्या हाती पडले होते.

'मला इतके नको आहेत पैसे!' मी घाबरून अभावितपणे म्हटले.

'वेडा आहेस. घे. पुढे कॉलेजच्या फीच्या कामी पडतील.'

बॅरिस्टरसाहेबांनी पाठीवर हात फिरविला. लोबऱ्याची वडी खायला देऊन मला आशीर्वाद दिला. उभयतांना नमस्कार करून फाटकाबाहेर आल्यावर एवढे पैसे खिशात ठेवायचे कसे, हा विचार मनात आला! त्यावेळी मालटेकडी रोडवर तुरळक बंगले, उर्दू हायस्कूलचे विस्तीर्ण मैदान आणि मशिदीशिवाय काही नव्हते.

पुढे पुष्कळ वर्षांनी अमरावतीच्या रस्त्यावर उन्हापावसात व कडाक्याच्या थंडीत फाटक्या, मळकट कपड्यांनी हडकुळी कुत्री कुशीत घेऊन हिंडणारे मोडक इतरेजनांच्या

---

* दैनिक हिंदुस्थान : 'साठी उलटली' १९७३
—सं. बा. वि. मराठे

तिरस्काराचा विषय बनले असतील पण मला त्या फाटक्या, मळक्या कपड्यांत व जराजर्जर शरीरात वास करणारी मानवता व खरी श्रीमंती यांचे भव्य दर्शन होत असे ... ”

नामवंत साहित्यिक श्री. रा. भि. जोशी* यांनाही विद्यार्थीदशेत असताना केव्हींनी अशा प्रकारची मदत वेळोवेळी केली. केव्हींच्या लायब्ररीतील पुस्तके ते घरी नेऊन वाचीत असत. बी. ए. झाल्यावर रा. भि. जोशी पुढील शिक्षणासाठी मुंबईला जाताना मोडकांचा निरोप घ्यायला गेले तेव्हा मुंबईला कसे रहावे, कसे वागावे याविषयी बरेच काही सांगून केव्ही म्हणाले,

“ केस फार वाढवू नकोस. भांगबिंग पाडू नको. आणि एक लक्षात ठेव – कोकणस्थाला कमीपणा येईल असे काही करू नकोस. ”

श्री. रा. भि. जोशांना या शब्दांमागची कळकळ जाणवली आणि नखशिखान्त युरोपियन पद्धतीने राहणाऱ्या केव्हींचा हा उपदेश ऐकून त्यातल्या विसंगतीचे हसूही आले.

कोकणस्थ ब्राह्मण हा एक केव्हींच्या मनातला हळवा कोपरा होता...

केव्हींमध्ये अशा विसंगतीचे पैलू खूप होते—आणि ते व्यक्ती म्हणून त्यांच्या आकर्षकतेत भरच टाकीत असत.

वृत्तीने केव्ही अतिशय सभ्य होते. प्रथम ते अमरावतीला आले तेव्हाची गोष्ट–

एकदा शिमग्याच्या दिवशी रस्त्याने जाताना केव्हींनी अर्वाच्य शिवीगाळ ऐकली. ही शिमग्याची शिवी ऐकून केव्ही इतके भडकले की लालीलाल झाले.

“ काय ही अश्लीलता, Vulgarity... संस्कृतीची काही चाड ? ”

“ अरे बाबा, होळीचं हे असंच असतं. तो एक आउट-लेट् असतो. शिमग्याची शिवी फक्त द्यायची असते, ऐकायची नसते ... ”

“ अरे, कसला आलाय आउट–लेट् ? रस्त्यानं मुलीबाळीही जायच्या,— ही भाषा ? बीभत्सता ? ”

केव्हींना शांत करायला मित्रांना त्रास पडला होता.

कुछंद केले, ख्यालीखुशाली केली तरी केव्हींच्या वागणुकीतली या प्रकारची शुचिता, दर्जेदारपणा कधी सरली नाहीत. असभ्य असंस्कृत वर्तन त्यांनी कधी केले नाही...

एक चांगल्या चलतीच्या काळातला प्रसंग—

उत्तम पोशाख करून कोर्टात चाललेल्या केव्हींना एकदा रस्त्यातच पावसाने गाठले. कोर्टात वेळच्या वेळी पोचायचे हा केव्हींचा कटाक्ष आणि गरीबपणाने

* उपव, इम्मन, मराठी भाषेची घटना व आता ‘ साठवणी ’चे लेखक, उर्दू भाषेचे अभ्यासक.



कुडाला पाठ टेकून वळचणीला उभे रहाणारे, केव्ही नव्हतेच ! तेवढ्यात एक खेडवळ माणूस त्यांना रस्त्याने जाताना दिसला. एक पोते त्याने इरल्यासारखे पांघरले होते. केव्हींना ती कल्पना एकदम पसंत पडली. ते तरट त्यांनी मागून घेतले. एका झाडाखाली त्याला केला उभा; आणि दुसऱ्याच क्षणी अमरावतीतले ते विख्यात वकीलसाहेब इरले पांघरून कोर्टाच्या दिशेने चालू लागले ! कुणी छत्रचामरे, चवऱ्या ढाळीत असावे इतक्या सहजतेने !

शेतकऱ्याचे तरट पांघरून न्यायालयाकडे येणाऱ्या केव्हींना पाहून त्यांचे सहकारी थक्कच झाले.

“ अरे भय्या, झकासपैकी तरट मिळालं, काम हो गया ! ”

केव्हींनी खुलासा केला आणि ते इरले काढून व्यवस्थित खुंटीला ठेवून दिले !

पोशाखी वाटणारे केव्ही टापटीपीचे जेवढे भोक्ते होते तेवढेच साधेसुधेही होते.

ताराबाई आणि केव्हींचे वैमनस्यही सामान्य विभक्त जोडप्यांच्या बेबनावापेक्षा निराळ्या पातळीवरचे होते. आणि ताराबाई अमरावतीला जात तिथे, त्या वेळात मनापासून संसार चालवीत. ताराबाईंचा पुरणपोळ्या, मोदकथाळ, केळ्यांच्या वड्या अशा पाककृतींच्या बाबतीत हातखंड होता. या काळात केव्ही मुद्दाम ताराबाईंच्या हातचे जेवायला म्हणून श्री. वामनराव जोश्यांसारख्या ज्या मित्रांचा पाहुणचार करायचा राहिला असेल अशा मित्रांना बोलावणे करीत. ताराबाई आनंदाने त्यांना स्वयंपाक करून घालीत.

केव्ही म्हणत, “ ताराबाई ही अतिउत्तम बाई. ” ताराबाईंच्या कर्तृत्वाबद्दल, कार्याबद्दल त्यांना नेहमीच आदर वाटे.

“ ताराबाई बाळंतपणाला गेल्या आणि इकडे आमचा ‘ सुधाकर ’ झाला. नाही का हो, ताराबाई ? ”

“ ताराबाई, खरं सांगा. पुन्हा चान्स मिळाला तर तुम्ही माझ्याशीच लग्न कराल की नाही ? ”

आणि ताराबाईही तितक्याच खिलाडू वृत्तीने, सच्चेपणाने म्हणत, “ बट ऑफ कोर्स–! ”

ताराबाईंना दक्षिणामूर्तीला येऊन नऊ वर्षे झाली आणि एके दिवशी अचानक त्यांना डॉ. जावळे यांचे एक पत्र आले. या पत्राच्या रूपाने ताराबाईंच्या आयुष्यातली पुढची अपरिहार्य बदली अचानक अगदी समीप आली होती–अमरावतीहून केव्हींचे त्यांना बोलावणे आले होते. त्यांनी ताराबाईंचा ध्यास घेतला होता. डॉक्टरांनी स्वतः पत्र लिहून त्यांना परत येण्याची, आपली जागा घेण्याची विनंती केली होती.

या मधल्या काळात केव्हींचे पिणे बेसुमार वाढले होते. आपल्या प्रकृतीची त्यांनी

अतिशय हेळसांड करून घेतली होती. त्यातच धंद्याकडे दुर्लक्ष झाल्यामुळे म्हणा किंवा मंदीसारख्या इतर कारणांमुळे म्हणा, त्यांची प्रॅक्टिसही अगदीच घटली होती. आणि पैसा साठविण्याची कला तर त्यांना कधी अवगत नव्हतीच. ते असे मनाने, शरीराने खचले अन् बेजार झालेले असताना त्यांना टायफॉइडसारख्या गंभीर दुखण्याने घेरले होते. आणि या साऱ्या परिस्थितीत मनाने हाय खाऊन ते सारखे ताराबाईंची आठवण काढीत होते.

हे सारे प्रकरण आता कसे काय काबूत आणावे हे सुलोचनाबाईंना अजिबात समजेना. कारण केव्ही त्यांना मुळीच जुमानत नसत ताराबाईंच आता त्यांना आवरू, सावरू शकतील अशी खात्री होऊन अखेर त्यांनी ताराबाईंना पत्र घातले. ताराबाई परत आल्यास आपण नीट वागू असे आश्वासन देणारी पुस्ती त्या पत्राला केव्हींनीही जोडली होती.

पुन्हा एकदा ताराबाईंना या प्रश्नाने त्याच उंबरठ्यावर आणून उभे केले होते. एकवार पुन्हा एका कठिण निर्णयाची वेळ त्यांच्या आयुष्यात आली होती. ताराबाईंचे मन, कर्तव्यबुद्धी सारे केव्हींकडे ओढ घेऊ लागले. त्या क्षणी सारे मान–अवमान, गणिते, व्यवहार गुंडाळून ठेवून केव्हींच्या उशाशी आपली जागा घेणे, त्यांची परिचारिका व पत्नी होणे हे आपले आद्य कर्तव्य त्यांना वाटू लागले. विचार करायला फारशी सवड नव्हती. त्यांनी ताबडतोब केव्हींना अमरावतीहून दक्षिणामूर्ती येथे आणण्याची व्यवस्था केली. केव्हींचा ताप उलटला होता तो चाळीस दिवसांचा टायफॉइड ठरला. केव्ही दक्षिणामूर्तीला आल्यावर ताराबाई आणि छोट्या प्रभाने त्यांची मनापासून सेवा, शुश्रूषा केली. अखेर केव्हींच्या दुखण्याला उतार पडला. त्यांची प्रकृती हळूहळू सुधारू लागली. वातावरणात झालेला बदल, हवापालट यामुळे त्यांना लौकर हुशारी वाटू लागली. मनाने मात्र ते एखाद्या लहान मुलासारखे ताराबाईंवर अवलंबून होते. त्यांनी आता ताराबाईंना आपल्याबरोबर परतण्याची गळच घातली केव्हींची ही विकल अवस्था पाहून ताराबाईही विरघळल्या होत्या. त्या म्हणतील त्याप्रमाणे वागायला, त्यांच्यासाठी आपली वागणूक सुधारायला, जरूर ती बंधने पाळायला केव्ही तयार होते. आणि प्रभा... तिच्या मनःस्वास्थ्याच्या दृष्टीनेही ताराबाईंनी तडजोड करून परतणेच योग्य दिसत होते. वडलांबरोबर तिनेही अमरावतीला जाण्याचा ध्यास घेतला होता.

अखेर ताराबाईंनी वयाच्या एकेचाळीसाव्या वर्षी, नऊ वर्षांच्या दीर्घ एकलेपणानंतर, पुन्हा एकदा संसाराचा प्रयोग करावचा ठरविला. केव्हींसाठी, प्रभासाठी आणि स्वतः-साठीही दक्षिणामूर्तीत रुजलेली आपली सारी पाळेमुळे उपटून काढून ताराबाई परत घरी निघाल्या होत्या !

ताराबाईंनी मोटाभाई, नानाभाई भट्टांचा, गिजुभाईंचा, गोपाळराव विद्वांसांचा, मोंघी-बेनचा, जठीबेनचा, सर्वांचा जड मनाने निरोप घेतला. त्यांनीही ताराबाईंना मनापासून शुभेच्छा दिल्या. आयुष्यातल्या फार ओंबयाचोवया वेळी या सर्व मंडळींनी ताराबाईंना अकृत्रिम असा स्नेह दिला होता. त्यांचे दुःख, एकलेपणा विसरायला मदत करून या संस्थेने, या जागेने, इथल्या कामाने त्यांना कायमचे ऋणी करून ठेवले होते. दक्षिणामूर्ती सोडताना त्यांना दुःख तर होत होतेच, पण पुन्हा एकदा केव्हींबरोबर सहजीवन रचण्यासाठी नव्या उमेदीने त्यांनी अमरावतीची वाट धरली.



बारा वर्षांच्या प्रभाचे काळीज मात्र दक्षिणामूर्तीचे घर सोडताना फारसे हलले नाही. आयुष्यात प्रथमच तिला फार हवे असलेले, चारचौघांसारखे घर, आई–वडील दोघां-चाही सहवास मिळणार होता, त्यामुळे ती हरखली होती. लहानपणापासून मनात खोल रुजून बसलेल्या गांधीवादी गोष्टींचा तिटकाराच तिने तेथून बरोबर घेतला !

अमरावतीला परतल्यावर तेथल्या खऱ्या परिस्थितीची कल्पना ताराबाईंना आली. केव्हींनी बऱ्याच मित्रांची देणी करून ठेवली होती. दुकानदारांची बिले तुंबवून ठेवली होती. नोकरचाकर सोडून गेलेले, गाडी विकलेली, बागेची, सामानाची – सर्वांची मालकाप्रमाणेच रया गेलेली, अवदशा झालेली !

ताराबाईंनी खंबीरपणे सारे सावरायला घेतले. पुन्हा एकदा नव्याने घडी बसवायला घेतली. आपल्या शिल्लक पैशांतून त्यांनी केव्हींना असलेली सर्व देणी फेडून टाकली. केव्हींच्या खाण्यापिण्याची, औषधपाण्याची, विश्रांतीची आणि कामाचीही योजनाबद्ध आखणी केली. केव्हींचे पिणे बंद करणे तर त्यांना शक्य नव्हते. परंतु रोज अमुक इतके पेग्जच घ्यायचे, असे त्यांनी त्यांना नियंत्रण घालून दिले. केव्ही लहान मुलासारखे त्यांच्या स्वाधीन झाले होते. आरंभी तरी त्यांनी ताराबाईंचे ऐकले.

ताराबाईंची राहणी साधी व गरजा थोड्या होत्या. नोकरमाणसेही त्या जरूरीपुरतीच ठेवत असत. त्यामुळे राजकोटच्या नोकरीत व पुढे दक्षिणामूर्तीतल्या पगारातूनही त्यांनी बरीचशी बचत बाजूला ठेवली होती. आता ती सारी रक्कम त्यांनी 'केव्ही–सुधारणा–खात्या'वर जमा करून टाकली ! लौकरच केव्हींचा वाढदिवस आला तेव्हा आपल्या उरलेल्या पैशांतून त्यांनी केव्हींना पुन्हा एक गाडीसुद्धा भेट म्हणून घेऊन दिली. त्यानंतर आलेल्या दिवाळीला केव्ही आणि ताराबाईंनी सर्व मोडकमंडळींना अमरावतीला बोला-वून घेतले आणि समेटाचा हा खास प्रसंग साजरा केला !

ताराबाई आणि प्रभा घरी परत आल्यामुळे मोडकांच्या बंगल्याला पुन्हा घरपण आले होते. वामनराव आपटे, वामनराव जोशी प्रभृती केव्हींच्या मित्रमंडळीचे स्वागत घरगुती पद्धतीने होऊ लागले. ताराबाईंना केव्हींच्या मित्रमंडळींकडून नेहमीच फार मानाने, आदराने वागवले जाई. केव्हीही त्यांना सन्मानपूर्वकच वागवीत. प्रभाची शाळा व्यवस्थित सुरू झाली. बैठकी पुन्हा जुळू लागल्या. त्यात पूर्वीचा जोर नव्हता परंतु नकली आतषबाजीही नव्हती.

अमरावतीला आल्यावर ताराबाईंनी पुन्हा लगेच नोकरी धरली नाही. परंतु घरचे सारे स्थिरस्थावर झाल्यावर त्यांनी पुन्हा आपले समाजकार्य, शिक्षणकार्य मात्र येथे नव्याने सुरू केले.

दक्षिणामूर्तीत बालशिक्षणकार्याची जी चळवळ गिजुभाईंच्या नेतृत्वाखाली सुरू झाली होती त्याला पोषक-पूरक असे कार्य ताराबाईंनी अमरावती येथे सुरू केले.

प्रथम त्यांनी फ्रेझर टाउन येथील एका मंदिराच्या आवारात मागासलेल्या लोकांच्या मुलांकरता एक बालवाडी सुरू केली. कित्येक हरिजन मुले तेथे येऊ लागली.

ताराबाईंनी दुसरा प्रयत्न केला प्रौढ शिक्षण–प्रसाराचा. या कामासाठी त्यांची मराठी अक्षर–ज्ञान–पुस्तिका तयार होतीच. अमरावतीमधल्या स्टेशनजवळील हमालपुऱ्यात, मालटेकडीजवळच्या चपरासीपुऱ्यात व हरिजनवाड्यात राहणाऱ्या लोकांना आणि स्त्रियांना साक्षर करण्यासाठी त्या फिरू लागल्या. या श्रमजीवी स्त्रियांना त्यांच्या दिवसभराच्या कामातून, व्यापांतून ज्या दोन घटका फुरसतीच्या असत त्या नेमक्या वेळी ताराबाई स्वतः त्यांच्या वस्तीवर पोचत आणि त्यांना अक्षरओळख करून देण्याचे आपले काम सुरू करत. या बायकांना आपली दळणे दळताना ओव्या म्हणण्याची सवय. तर या ओव्यांचेच माध्यम करून त्यांना अक्षरशिक्षण देण्याचा यशस्वी प्रयत्न ताराबाईंनी येथे केला. त्यांची चिकाटी आणि कळकळ पाहून त्यांच्या कामाविषयी प्रथम उदासीन असणाऱ्या त्या लोकांनीही पुढे त्यांना चांगले सहकार्य दिले. ताराबाईंच्या या समाजकार्याला केव्हींचा पूर्ण व सक्रिय पाठिंबा होता. सुटीच्या दिवशी ते स्वतः त्यांच्याबरोबर जात, दोघे जोडीने हे काम करत.

आपल्या अक्षर–ज्ञान–पुस्तिकेची पुढे मुंबईत आल्यावर श्रीमती राजस डोंगरे यांच्या मदतीने ताराबाईंनी पुन्हा सुधारलेली आवृत्ती काढली. 'माझे पुस्तक' या नावाने तिचे दोन भाग प्रसिद्ध झाले.

गिजुभाईंनी चालवलेले 'शिक्षण–पत्रिका' हे मॉंटेसोरी संघाने काढलेले मासिक तोवर फक्त गुजराती भाषेतूनच प्रसिद्ध होत होते. १९३२ साली अमरावती येथून ताराबाईंनी मराठी शिक्षण–पत्रिका सुरू केली. शिक्षण–पत्रिकेचे वर्गणीदार आपोआपच मॉंटेसोरी संघाचे सभासद होत असल्यामुळे या मासिकामुळे संघाची मराठी शाखा उघडली गेली. ताराबाई स्वतःच लिहिण्याचे काम करीत. पुस्तिका लिहिणे, ती चालविणे, खपविणे ही तिहेरी जबाबदारी त्या एकट्या त्यावेळी सांभाळीत होत्या.

ह्या वेळेपर्यंत ताराबाई मोडक हे नाव गुजरात, सौराष्ट्र व नागविदर्भातल्या जनतेला सुपरिचित झालेले असले तरी ही 'गुजराती' बाई महाराष्ट्रात आणि इतर मराठी मुलखात फारशी कोणाच्या माहितीतली नव्हती. त्यामुळे त्यांच्या पत्रिकेला झपाट्याने ग्राहक मिळाले नाहीत. मग शिक्षण–पत्रिकेच्या खर्चाची तोंडमिळवणी करताना ताराबाई आपल्याच पदराला मुर्देड लावून घेत. शिवाय त्यांच्या भाषेला आता गुजराती वळण लागले असल्यामुळे तीही लोकांच्या मनाची पकड पटकन् घेत नसे. शिक्षण–पत्रिकेचा खप वाढविण्याच्या कामात त्यांना श्री. मायादेवी भालचंद्रांसारख्या काही मॉन्टेसोरी शिक्षणप्रेमींनी पुष्कळ मदत केली.



परंतु ताराबाईंना दोन वर्षांच्यावर अमरावती येथे राहणे शक्य झाले नाही! घरची आघाडी त्यांनी सुधारली खरी, परंतु आपल्या संसाराला नऊ वर्षांपूर्वी जी भेग पडली ती भरून न येणाऱ्या जखमेसारखी आहे, हे ताराबाईंच्या ध्यानात आले. लौकरच ते एक दुष्टचक्रच होते. केव्हींची प्रॅक्टिस या सुमाराला इतकी रोडावली होती की आवक पूर्णपणे थांबल्यासारखीच झाली होती. पैशाच्या थैलीला पडलेले खर्चाचे भोक अखेरीस इतके मोठे झाले की आपल्या नोकरीचे ठिगळ त्याला लावण्याखेरीज दुसरा मार्ग ताराबाईंना दिसेना. इतर परिस्थितीही पुन्हा तितकीशी सुखावह राहिली नव्हती. आजारातून पूर्णपणे बरे झालेले केव्ही पुन्हा आपले वागणे, धोरण बदलीत चालले होते. ताराबाईंनी त्यांच्या वागणुकीवर घातलेले निर्बंध, लगाम आता त्यांना बोचू लागले. ताराबाईंनी दारूचे पेग्ज ठरवून दिले असले तरी अशीलांनी दिलेले सगळेच पैसे काही ते घरी देत नसत–ते क्लबमध्ये, मित्रांच्या घरी द्रवरूप होऊन जात! कधी गुपचूप तर कधी उघडपणे ते ताराबाईंना धाब्यावर बसवू लागले. या खेपेस केवनात जास्त चव्हाट्यावर येण्याच्या आत, शब्दांचा कीस न पाडता मुकाट्यानेच दूर व्हावचे ताराबाईंनी ठरविले. नोकरीचे निमित्त होतेच; आणि ते खरेही होते. याच सुमारास एक मोठ्या पगाराची नोकरी चालून आली. नोकरीचे ठिकाण दूर होते. परंतु आर्थिक व इतर प्रश्न या नोकरीमुळे बरेच सुलभ होणार होते. बराच विचार करून ताराबाईंनी पुन्हा एकदा अमरावती सोडण्याचा निर्णय घेतला. या खेपेस प्रभाला मात्र त्यांनी बरोबर नेले नाही. अमरावती गर्ल्स हायस्कूलमध्ये तिचे शिक्षण व्यवस्थित चालू होते. सतत हवा असलेला वडिलांचा सहवास आणि माया तिला तिथे मिळत होती. शिवाय याच सुमारास ताराबाईंची मामेबहीण सौ. सुमति संत व श्री. उमाकांत संत हे दांपत्य त्यांच्या घरात राहत असे. त्यांनी प्रभाची सर्व काळजी घेणे मनापासून कबूल केले.

दक्षिणामूर्ती सोडून अमरावतीला आल्यावर ताराबाईंना कळले होते की केव्हींनी सुलोचनाबाईंशी त्यांच्या (ताराबाईंच्या) येण्याबाबत पैज लावली होती—

"मी जर व्यवस्थित वागलो आणि ताराबाईंना अमरावतीला परत या असे लिहिले तर त्या परत आल्याशिवाय राहणार नाहीत."

दुर्दैवाने केव्ही फार काळ व्यवस्थित वागू शकले नाहीत. केव्ही पैज जिंकले—ताराबाई मात्र पुन्हा एकदा हरल्या.

## ७. बांसदा

१९३३ च्या सुमारास ताराबाई ज्या अपरिचित ठिकाणी नोकरीवर रुजू झाल्या ते होते गुजरातेतले एक लहानसे संस्थान. बडोद्याजवळच्या बिलीमोरा स्टेशनवर उतरून मोटररस्त्याने प्रवास सुरू केला की सुमारे वीस मैलांच्या अंतरावर थोडेसे रान बाजूला करून आल्यासारखी बांसदा संस्थानाची हद्द लागे. डांगच्या जंगलापासून काही अंतरावर असलेल्या या संस्थानाचा परिसर सगळा मिळून तीनशे चौरस मैलांचा होता. तेथले राजघराणे रजपूत होते. बांसद्याचे महाराजसाहेब गुणग्राही आणि रसिक होते. येणारे पाहुणे खासे असतील तर संस्थानाची गाडी त्यांच्यासाठी बिलीमोरा स्टेशनवर पाठविली जाई.

बांसद्याच्या या महाराजांना एकूण दहा अपत्ये. परंतु त्यांच्या तीन पुत्रांपैकी दोघे अल्पायुषी ठरले होते. आता बांसद्याच्या गादीचा भावी वारस राजकुमार दिग्वीरसिंग, त्याची मोठी बहीण मधुबाबा आणि इतर छोट्या सहा राजकन्या या सर्वांची शैक्षणिक, सांस्कृतिक देखभाल करण्यासाठी ट्यूटेस म्हणून त्यांनी ताराबाई मोडकांची नेमणूक केली होती. त्यातही आठ वर्षांचे राजकुमार दिग्वीरसिंग उर्फ लालजीभाई आणि राजकन्या मधुबाबा यांची जबाबदारी त्यांनी मुख्यतः स्वीकारायची होती. ही नोकरी स्वीकारताना ताराबाईंची मुख्य दृष्टी अर्थार्जनाची होती, आणि बांसद्याची नोकरी त्यांची ही गरज उत्तम प्रकारे भागविणारी होती.

इतर संस्थानिकांप्रमाणेच आपल्या लहानशा राज्यातही गुणी माणसे जमविण्याकडे तेथल्या महाराजांचा कल असे. भोवताली चाललेल्या नव्या शैक्षणिक, सांस्कृतिक प्रगतीची चाहूल घेण्याची कुवत व मर्मज्ञता त्यांच्या ठिकाणी होती. एव्हाना गिजुभाईंनी गुजरात व सौराष्ट्रात बालशिक्षणाची कल्पना चांगलीच लोकप्रिय बनविली होती. त्यांच्या शैक्षणिक प्रयोगाकडे सर्व शिक्षणतज्ज्ञांचे लक्ष होते. बांसद्याच्या महाराजांच्या मनातही बालकांच्या विकासात आमूलाग्र बदल करणाऱ्या अभिनव मॉन्टेसोरी शिक्षणपद्धतीविषयी आकर्षण उत्पन्न झाले व या नवीन शिक्षणपद्धतीचा लाभ आपल्या मुलांना–विशेषतः युवराज दिग्वीरसिंग यांना व्हावा असे वाटून त्यांनी गिजुभाई बधेकांशी संपर्क साधला; या कामाला लायक व या नवीन शिक्षणपद्धतीत पारंगत असा एखादा शिक्षक अगर शिक्षिका आपल्याला मिळवून देण्याची त्यांना विनंती केली. ताराबाई पुन्हा एकदा नोकरीच्या शोधात आहेत हे गिजुभाईंच्या कानावर आले होते. त्यांनी ताराबाईंना या नोकरीविषयी सुचविले आणि बांसद्याच्या महाराजांकडे ताराबाईंची शिफारस केली.



डॉ. काशीबाई नवरंगे यांनी डॉक्टर या नात्याने त्याही पूर्वी काही काळ बांसदा संस्थानी नोकरी केली होती. ताराबाईंनी त्यांचे मत विचारले तेव्हा त्यांनी तेथील वातावरण संस्थानी असूनही निरोगी असल्याचा निर्वाळा दिला; आणि ताराबाईंनी ही खाजगी नोकरी स्वीकारण्याचा निर्णय घेतला.

ताराबाईंच्या आयुष्यात बांसद्याची नोकरी लिहिली गेली ती अशी.

पण ताराबाई येण्यापूर्वीच त्यांचा भावी शिष्य बांसद्याचा छोटा युवराज मात्र या अमरावतीहून येणाऱ्या नवीन शिक्षिकेविरुद्ध मनात निरगाठ बांधून बसला होता! पहिल्या प्रतिक्रियेत तरी त्याला त्यांचे वर्णन बिलकूल पसंत पडले नव्हते. ह्या बाई आपल्या नवीन व काहीशा और पद्धतीने शिकवणार आहेत, ' खेळता खेळता शिक्षण ' देणार आहेत असे काही त्याच्या कानावर आले होते आणि त्याने तो आधीच बिथरला होता. ' हे काय नवीन खूळ ? खेळ म्हणजे खेळ ! त्यात शिक्षणाची लुडबूड कशाला पाहिजे ? आपण म्हणजे काय प्रयोगाचे उंदीर वाटलो ! '

परंतु ताराबाई आल्या, त्यांनी आपल्या छोट्या शिष्यांना आपल्या ताब्यात घेतले आणि आपल्या काही भेटींतच जवळ घेऊन सुंदर सुंदर ' वार्ता ' सांगणाऱ्या, त्यातल्या गोष्टींवरून नाटुकली बसवून घेणाऱ्या ह्या वत्सल, प्रेमळ ' ताराबेन 'नी मुलांची मने जिंकून घेतली. मुले मुळात लाघवी होती, त्यांना सवयीही खानदानी होत्या. छोटा लालू किंवा लालजीभाई व मधुबाबा ही दोघे तर ताराबाईंना विशेषच चिकटली. मनात येईल तेव्हा त्यांच्या घरी येऊन ती धुडगूस घालू लागली. ताराबाईंनी केलेले खास ' दक्षिणी ' पदार्थ शंकरपाळे, थालिपीठ– यातला वाटा हक्काने मिळवू लागली. त्यांच्याकडे येणाऱ्या पाहुण्यांच्या मुलांबरोबर खेळू लागली. अखेर ताराबाईंना त्यांना उलट अट घालावी लागली की अमुक इतक्या काळात, माझ्या विश्रांतीच्या वेळात येऊन मला त्रास द्यायचा नाही!

बांसद्याच्या नोकरीत ताराबाईंना दरमहा सुमारे रु. २००/– पगार ठरला होता. याखेरीज निवासस्थान, नोकर, शिधा, वाहन या व इतर राजेशाही सवलती, सोयीही बऱ्याच होत्या. बांसद्याच्या महाराजांचा नवा राजमहाल गावाबाहेर होता. त्याच्यासमोर विस्तृत असा बगीचा, कारंजी इ. होती. या राजवाड्याच्या समोरच ' प्रबळ भवन ' नावाचा एक दुमजली बंगला होता, तो ताराबाईंना राहण्यासाठी देण्यात आला. बाकी इतर खाजगीतल्या नोकरांची—अधिकाऱ्यांची निवासस्थाने राजवाड्याच्या डाव्या अंगाला तर उजव्या बाजूला अतिथिगृहे, खेळासाठी क्लब वगैरे होते. राजवाड्याला एकूण तीन प्रवेशद्वारे होती. गावात जुना महाल, हत्ती, दरबार, दसऱ्याची स्वारी इ. सारा संस्थानी इतमाम होताच. शिवाय काही विशिष्ट खानदानी रीतिरिवाजही पाळावे लागत. उदाहरणार्थ, राजघराण्यातील सर्व स्त्रिया पडदा पाळीत असल्यामुळे महालासमोरच्या आवारातून कोणाही पुरुषाला ये–जा करण्याची बंदी असे. ताराबाईंचे घर बऱ्याच अंतरावर असूनही

त्यांना व त्यांच्या घरातील पाहुण्यांनाही मागच्या बाजूचे दार प्रवेशद्वार म्हणून वापरावे लागे. मात्र ताराबाईंना युवराज-युवराज्ञींच्या गुरू म्हणून विशेष मानाने व आदराने वागविले जाई. ताराबाई साधारणपणे दहा वाजता जेवूनच महालात जात, त्या मग दिवसभर मुलांच्या अभ्यासात, राजकुटुंबीयांच्या सान्निध्यात असत. दुपारचा बहुतेक वेळ अभ्यास चाले. अध्यापनाखेरीज राजमहालामध्ये जो काही नवीन उपक्रम निघे त्यात ताराबाई उत्साहाने घेता येईल तेवढा भाग घेत. पॅलेसमध्ये मोठे संपन्न, समृद्ध असे खाजगी वाचनालयही परिश्रमपूर्वक सजविलेले होते. महाराजांच्या कुटुंबात त्यांच्या मातोश्री, महाराणी व इतर स्त्रियांचा मिळून जमाना होता. या बायकामंडळींमध्येदेखील ताराबाई पुष्कळदा मिसळत, बोलत बसत. त्यांच्याबरोबर फिरायला जात. खेळ, सहली, जलविहार, शिकार, प्रवास अशा सर्व उपक्रमांमध्ये ताराबाईंना 'घरातल्याच एक' समजून समाविष्ट केले जाई.

पुढे, बांसद्याचे राजे दिग्वीरसिंग यांनी सांगितलेल्या त्यांच्या लहानपणच्या काही आठवणींवरून ताराबाईंनी आपल्या प्रेमळ वागणुकीने त्या आठ वर्षांच्या युवराजाच्या हृदयात कशी जागा मिळविली होती, हे सहज समजून येते. ताराबाई बांसद्याला असताना युवराजांचे एक ऑपरेशन झाले. या आजारपणात ताराबाईंनी स्वतः इतक्या वत्सलतेने व आपुलकीने त्यांची शुश्रूषा केली की त्या लबाड राजपुत्रालाही इतर कुणापेक्षा 'ताराबेन'च आपल्या उशाशी बसायला हव्या असत. कारण एकीकडे त्याला थोपटीत, त्याच्या अंगावरून हात फिरवीत त्या त्याला मृदू आवाजात रामायण–महाभारतांतल्या गोष्टी सांगत; तर कधी सुंदर, सुंदर संस्कृत श्लोक म्हणून दाखवीत आणि त्यांचे अर्थ सांगीत; किंवा कधी नुसती गोड भजने गुणगुणत राहत.

एकदा या 'लालजीभाई'नी सत्याग्रह पुकारला, "ताराबेननी सूप घेतलं तरच मी घेणार नाहीतर घोटसुद्धा घेणार नाही!"

सूप चिकनचं होतं. ताराबाई केव्हा व प्रभा यांना 'साथ' देण्यासाठी सामिष पदार्थ खातही असत परंतु त्यांना मनापासून त्यांची आवड नव्हती. शाकाहारी जेवणावर त्यांचा भर होता. अखेर वाढप्याने हळूच 'तसाच' दिसणाऱ्या 'व्हेजिटेबल सूप'ची डिश ताराबाईंपुढे सारली; ताराबाई चमचाभर सूप प्यायल्या तेव्हा कुठे छोटा राजा राजी झाला!

"तमारू पेल्हे खलास थाय छे के मारू? चालो, आपडी हरिफाई!" म्हणत त्याने मग भराभर बशी रिकामी केली. (हरिफाई म्हणजे शर्यत.)

छोट्या छोट्याच गोष्टी, परंतु अशा माध्यमातून ताराबाई व त्यांचे शिष्य यांच्यामध्ये जवळीक निर्माण होत होती.

तेथला असाच एक प्रसंग ताराबाईंनीही पुढे शिक्षणपत्रिकेच्या एका अंकात शब्दचित्रित केलेला आढळतो—



—एकदा गुरुशिष्यमंडळ नदीकाठी फिरायला गेले होते. ताराबाई आणि आणखी तिघे. दहा वर्षांच्या आतली मुले. मुलांच्या डोक्यात होडीत बसायची कल्पना आली. चांगल्या पाचसहा फेऱ्या झाल्या. गाणी झाली, गप्पा झाल्या. इकडे अंधार आणि हवेतला गारठा दोन्ही वाढत चालले. पण मुलांचे 'आणखी एक', 'आणखी एक' काही संपेना!

शेवटी ताराबाईंनी खडा सूर काढून म्हटले, "बस खलास! आता उतरा बघू!"

सगळी खट्टू मनाने उतरली आणि परतीच्या दिशेने चालू लागली. पण कुणाचेच पोटभर समाधान झाले नव्हते. मुलांनी आपली रुष्टता व्यक्त करण्यासाठी थोड्या वेळाने ताराबाईंना वगळून आपापसातच गप्पा सुरू केल्या.

मोठा मुलगा म्हणतो,

"अरे, एका मोठ्या होडीत ताराबेनना बसवलं, आणि दिलं सोडून समुद्रात, तर..."

त्याच्या खट्याळ बहिणीने तीच दोरी पकडून लगेच डोळे मिचकावले,

"हो रे हो, काय मजा येईल! समुद्राच्या मध्यावर गेल्यावर होडी उलटून यायची! ताराबेन पडतील पाण्यात... काय पण गम्मत येई ऽ ल!"

तिसऱ्या बहिणीनेही लगेच गुदगुल्या झाल्यासारखे करीत म्हटले,

"हां, मग ताराबेनच्या नाकातोंडात पाणी जाईल, खारट–खारट! हो हो हो! खाऊ देत गटांगळ्या..."

...एकीकडे सगळी चोरून ताराबाईंकडे बघत होती, त्या चिडतात की काय ते पाहायला. ताराबाईंना हसू आले. त्यांच्या लक्षात आले होते, त्यांनी नवा गाजवलेल्या सत्तेविरुद्ध मुलांनी असा झेंडा उभारला होता.

पण त्याही कमी नव्हत्या. त्या म्हणाल्या, "मधुबाबा! तुझी कल्पना मात्र जरा जास्तच वढावली गडे! मी काही गटांगळ्या खायची नाही; कारण मला पोहता येतं!... पण तुमची युक्ती समजली बरं का! आज ताराबेननी 'होडीत बसणं पुरे' म्हटलं की उद्या त्यांना दिलं टाकून समुद्रात! म्हणजे उद्या कोणी 'उतरा' म्हणायलाच नको काय? बरं बरं!"

मुलं मनापासून हसली. ताराबाईंनीही साथ दिली. त्या हसण्यात रुसवा-फुगवा पार वाहून गेला!

लालजीभाईने ताराबेनचा हात धरला, मधुबाबा चालता चालता त्यांच्या पदराशी खेळू लागली, उद्या किती वाजता यायचं, किती 'घंटे' होडीत बसायचं याचा बेत आखीत मंडळी आगेकूच करीत राहिली.

ताराबाईंनी राजपुत्राचे मन इतक्या चटकन् जिंकले याची गोम त्यांच्या नाट्यप्रवेशां-

मध्येही होती. राजपुत्राला त्या ' सात शेपट्यांचा उंदीर ' ' ओटीवरच्या पणतीला चिडवणारा घमेंडखोर कंदील ', ' आनंदी कावळा ' वगैरे तर होऊ देतच, परंतु त्याला सर्वांत प्रिय असत त्या तेल्याच्या, भंग्याच्या, हुजऱ्याच्या भूमिका ! आणि त्याच्या ताराबेन त्याला या भूमिका खुशाल करू देत, उलट प्रोत्साहन देत. प्रत्यक्ष आयुष्यातही छोट्या लालजीभाईंना आपल्या वडलांच्या मुकुटापेक्षा, अंबारीपेक्षा आपले दालन साफ करायला येणाऱ्या हुजऱ्याची, आपला सांभाळ करणाऱ्या ' छोटुमिया ' या मुसलमान नोकराची कामे अधिक आकर्षित करीत असत. एखाद्या चाकरमान्याप्रमाणे महालातली किरकोळ कामे करण्याची त्याची धडपड असे. नोकर झाडू मारू लागला की तो झाडूच हिसकावून घे, दासी येऊन खिडकी पुसू लागली की तिचे फडके घेऊन " मीच जमीन, दारं, फर्निचर पुसणार " असा हट्ट धर, हाच त्याचा खाक्या. आणि त्याच्या ताराबेन त्याला हे सारे करण्याची मुभा देत. राजाच्या मुलाची ती कैर काढण्याची हौस त्यांना बरोबर समजे. इतरांना मात्र त्यांचे राजपुत्राला असली हलकी सलकी कामे करू देणे खटकत असे. गादीच्या भावी वारसाचे हे असे भिकार चाळे !–कुणी आक्षेपदेखील घेत.

परंतु ताराबाईंचे त्यांना उत्तर असे की, त्याच्या या साऱ्या मागण्या निरोगी, बालसुलभच आहेत. त्यात वाईट काही नाही. अशा क्रियांतून मुलांचा विकासच होत असतो. आणि मोठेपणी थोडाच त्याला हा आनंद मिळणार आहे !– स्वतःची कामे स्वतः करावीशी वाटणे यात अस्वाभाविक किंवा शरम वाटण्याजोगे काहीही नाही.

कधी त्या बागेत, बागकामाचाच तास ठेवीत तर कधी कधी उपवनावर, झाडाखाली बसून चित्रकाम चाले. कधी मळ्यात नेऊन मुलांना वनस्पतिशास्त्राची ओळख करून दिली जाई तर कधी मॉन्टेसोरी पद्धतीच्या रंगीबेरंगी साधनांचा योग्य वापर करून खेळताखेळताच गणित, भाषा, भूमिती इ. चे पाठ दिले जात. ताराबाईंनी गिजुभाईंची गोष्टी सांगण्याची हातोटी बरोबर उचलली होती. गोष्ट सांगता सांगता मुलांइतक्याच त्याही कथानकात समरस होऊन जात. त्यांचा चेहरा मग आपोआप बालवय धारण करी !...

ताराबाई बांसद्याला गेल्यावर काही महिन्यांनी त्यांच्या मदतीला मिस् सरोज तोफखाने या शिक्षिकेची नेमणूक करण्यात आली. या सरोजबाईही प्रबलभवनातच राहायला आल्या. लालजीभाईंची तिसरी बहीण सरलीबाबा व खालची भावंडे ' सरोजबेन ' च्या ताब्यात राहू लागली. ' ताराबाईंच्या या सहशिक्षिका मोठ्या उत्साही, धडपड्या स्वभावाच्या, क्रीडाप्रवीण व वाचनबहाद्दर होत्या. ताराबाईंनी चाळिशी गाठलेली. तर त्या विशीतल्या परंतु वयात तब्बल वीस वर्षांचे अंतर असूनही ह्या दोन्ही स्त्रूडेसची गट्टी उत्तम जुळली. ताराबाई वरकरणी शांत व आनंदी दिसल्या तरी राजकोटच्या नोकरीप्रमाणे येथल्या वास्तव्यातही आतून त्या आपल्या भावजीवनातील त्रुटी विसरण्याच्या प्रयत्नात होत्या. अशा वेळी सरोजबाईंच्या खेळकर सहवासाची मोठीच मलमपट्टी त्यांच्या



मनाला होत असे. दोघींचा स्वयंपाक बऱ्याच वेळा एकत्र शिजू लागला. त्यांच्या घरापासून जवळच एक सुंदर दत्तमंदिर होते. संध्याकाळी दोघी मिळून तेथे फिरायला जात.

ताराबाईंच्या बांसद्याच्या वास्तव्यातही त्यांचे बहुतेक सारे आप्त त्यांच्याकडे येऊन, राहून गेले. ताराबाईंचे भाऊ, शारू, बाबा वगैरे भाचेमंडळी गिजुभाईंची तिन्ही मुले, त्यांची विधवा पुतणी– मोतीबेन ही सारी मंडळी बांसद्याचा त्यांचा पाहुणचार घेऊन गेली. ताराबाईंच्या पाहुण्यांचा राजवाड्यात विशेष आत्मीयतेने व आदराने पाहुणचार केला जाई, त्यांना नेण्या-पोचविण्यासाठी बिलिमोऱ्यापर्यंत महाराजांची गाडी जाई. केव्हाही एकदा येऊन पंधरा दिवस राहून गेले. त्यांना तेथले वातावरण आवडले. खास त्यांच्यासाठी म्हणून एक जागा निर्माण करून महाराजांनी त्यांना नोकरीही देऊ केली होती. परंतु काही कारणाने तो बेत फिसकटला.

दरवर्षी एक जूनच्या सुमारास बांसद्याचा उन्हाळा टाळण्यासाठी सर्व राजकुटुंब एखाद्या थंड हवेच्या ठिकाणी जाई. महाराज थोडे दिवस राहून मग बांसद्याला परतत. किंवा येऊन जाऊन असत. परंतु त्यांचे कुटुंब तीन-चार महिने तेथेच राही. एखादा मोठा बंगला त्यासाठी भाड्याने घेतला जाई. मुलांबरोबरच त्यांच्या शिक्षिकांनाही साहजिकच हवापालट घडे. कारण अध्यापनाचे काम एकीकडे चालू राही. ताराबाईंनी या मंडळींबरोबर महाबळेश्वर, माथेरान अशा काही ठिकाणी सफरी केल्या. अशा प्रवासात, मुक्कामात ताराबाईंना अतिशय सन्मानपूर्वक वागविले जाई. प्रसंगी स्वतः महाराज तिसऱ्या वर्गाच्या डब्यात बसत व ताराबाईंना आपल्या जागी पाठवीत !

महाबळेश्वरच्या मुक्कामातला एक हृद्य कार्यक्रम राजे दिग्वीरसिंगजी यांच्या स्मृतीत आहे—

बंगल्याला मोठे थोरले आवार होते. आवारात अंतराअंतरांवर आंब्याची झाडे होती. ताराबाई पहाटफेरीला बाहेर पडल्या की पहाटेपासून जागा होऊन बसलेला युवराज पळतपळत जाऊन त्यांना गाठे; हातात हात घालून गप्पा मारीत, जोडी हिंडत राही. मोवती महाबळेश्वरातली सकाळ उजाडत राही. परंतु ताराबाईंच्या मनात भाषेचा तास-सुद्धा असे. विश्रांतीसाठी एका दगडावर बसत त्या आपल्या विद्यार्थ्याला म्हणत, " हे बघ, मी थोडा वेळ हा देखावा पाहात स्वस्थ बसते. तू जा बघू, हा रंगीत खडू घे आणि या सगळ्या झाडांवर एकेक सुंदरसैकी ' ढ ' काढून ये ! येताना आपण किती ढ काढले ते मोजून पण यायचं बरं का ! "

राजपुत्र ट आणि ढ यांमध्ये फार घोटाळा करी. असे खेळ त्याला आवडत. उड्या मारीतच स्वारी कामावर निघे आणि थोड्याच वेळात आवारातल्या सगळ्या झाडांवर ' ढ ' काढून परते. आणि सांगे– " थयो गयुं ताराबेन ! "

मग खडूचे उरलेले थोटूक घेऊन ' बाई ' निघत वही तपासायला !

" हां! हा ढ चांगला आला आहे. पण अरे, हा 'ढ' रुसून बसलाय की काय, ब्रेकफास्ट मिळत नाही म्हणून? पाठमोरा काढला आहे तो?"

सगळे चुकीचे टकार सुधारून झाल्यावर परत जाण्यापूर्वी पाटी पुसत पुसत झाडांची पानं, जाती, प्रकार लक्षात घेतले जात. कधी एखादे बरटे लोंबताना दिसे तर कधी एखादा फुलपाखराच्या आळीचा कोष आढळे. एक सुंदर 'ढ' न पुसता तसाच ठेवून ताराबाई पुढे जात. "आता उद्या आपण 'प' ची प्रॅक्टिस करू या हं!"

ताराबाई आपली नोकरी व्यवस्थित सांभाळीत होत्या. त्यांच्या मृदू स्वभावामुळे, आपण होऊन दुसऱ्याला उपयोगी पडण्याच्या प्रवृत्तीमुळे त्या तेथे सर्वांच्या आवडत्याही बनल्या होत्या; परंतु इकडे दैव मात्र त्यांच्यासाठी आणखी एक कठीण समस्या रचीत चालले होते.

अजूनही केव्हींच्या उच्छृंखल वृत्तीचा पुरेसा अंदाज ताराबाईंना आला नव्हता, असे म्हणावे लागेल. त्यांच्या मामेबहिणीची मुलगी विमल संत त्यावेळी प्रभाबरोबरच अमरावती गर्ल्स हायस्कूलमध्ये शिकत होती. श्री. संत नुकतेच जबलपूरहून निवृत्त होऊन आले होते व तिच्यासाठी संतमंडळी अमरावतीला येऊन राहिली होती. संत-मंडळींनी प्रभाचे व केव्हींचे सर्व बघावे व आपले घरही चालवावे अशी व्यवस्था करून ताराबाईंनी अमरावती सोडली होती; त्या जोडप्याचा केव्हींना वचक वाटेल, अशी त्यांची कल्पना होती.

प्रत्यक्षात मात्र पेपरवेट उचलल्याबरोबर खालचे कागद चौफेर उडावेत त्याप्रमाणे ताराबाईंची पाठ वळताच केव्हींचे वागणे पुन्हा विकोपाला गेले आणि हळव्या मनाच्या प्रभावर या परिस्थितीचा विलक्षण परिणाम झाला. आजपर्यंत आपले वडील म्हणून एक अतिशय उमदे, बुद्धिमान, यशस्वी व खेळकर व्यक्तिमत्त्व तिच्या डोळ्यांसमोर होते. आता अचानक वडलांच्या स्वभावाची एक विपरीत बाजू फार अमंगळ स्वरूपात तिच्यापुढे आली. त्यांचे ते बेफाम वागणे तिच्या मनोवृत्तीला अजिबात पेलले नाही; सोसले नाही. अपरिपक्व वयात नको त्या गोष्टी ओंगळ, बीभत्स स्वरूपात तिच्या दृष्टीस पडल्या होत्या.

संतजोडप्याला हे सगळेच प्रकरण एकूण हाताबाहेर चालल्यासारखे वाटू लागले होते. बेताल झालेले वडील, त्यामुळे बिथरलेली त्यांची अडनाडी वयाची, मनस्वी पोर आईबाप जिवंत असून मनाने एकटी झालेली; आणि ताराबाई त्यांच्या भरवशावर तेथून दूर नवीन नोकरीत जम बसविण्यात गुंतलेल्या.

त्या अनैसर्गिक वातावरणात घुम्या वृत्तीच्या प्रभाच्या अंतर्मनात काहीतरी विलक्षण बदल घडून येत होते व त्यांचे विचित्र स्वरूप तिच्या धास्तावलेल्या वागणुकीतून प्रति-बिंबित होत चालले होते.



अखेरीस एक निर्णायक दिवस उजाडला. घरातली सर्व मंडळी दुपारच्या जेवणा-साठी डायनिंग रूममध्ये एकत्र जमली होती... केव्हींना दारूने तर्र झालेल्या अवस्थेत कसेबसे टेबलापाशी आणून बसविले होते आणि त्यांचा आरडाओरडा चालूच होता. श्री. संत त्यांना शांत करण्याचा प्रयत्न करीत होते... प्रभा आपल्या खुर्चीत चिपकून बसून हे सारे नजर बांधल्याप्रमाणे पाहत होती. समोरच्या अनावर रूपात तिला तिचे नेहमीचे 'अप्पा' दिसत नव्हते.

जेवण वाढून झाले तशी प्रभा खाली वाकून भराभर पुढ्यातले घास गिळू लागली; एकीकडे ती वडलांच्या अवताराकडे पाहून भीतीने थरथर कापतच होती. प्रभाच्या मागे केव्हींचा बटलर उभा होता. अचानक केव्हींच्या मते त्याच्या हातून काहीतरी अक्षम्य आगळीक घडली. —निमित्त किरकोळच, पण केव्ही चवताळलेल्या वाघासारखे त्याच्या अंगावर धावून गेले. त्यांचा तो आवेश पाहून प्रभा कमालीची घाबरली, तिच्या हातातला घास गळूनच पडला, पाय पायांवर आपटू लागले.

" अप्पा..."

पण पुरती हाक तिच्या तोंडून उमटण्याच्या आतच केव्हींनी पुढ्यातली सुरी उचलली आणि ते त्या बटलरच्या अंगावर धावून गेले. त्यांची ती लालसर अनोळखी खुनी दृष्टी...

काही क्षणांतच केव्ही नाही, तरी इतर माणसे भानावर आली, श्री. संतांनी नोकर-माणसांच्या मदतीने केव्हींना हळूहळू कह्यात आणले, व त्यांच्या खोलीत नेऊन त्यांना झोपविले.

प्रभा मात्र बर्फाच्या पुतळीसारखी जागच्या जागी गोठून राहिली होती! मावशीचे लक्ष तिच्याकडे गेले तेव्हा तिच्या चेहऱ्यावरचे गोठलेले ते भाव पाहून ती दचकलीच. प्रभाला तिने चुचकारले, 'जेव तू प्रभा! अग, काही नाही झालं.' परंतु प्रभाला दिसत होता मघाशी तिच्या प्रेमळ अप्पांमधून बाहेर पडलेला तो राक्षस! ती खुर्चीतल्या आपल्या देहातून आरपार जाऊ पाहणारी त्यांची सुरी!

प्रभाच्या हळव्या मनाच्या त्याने पार चिंध्या करून टाकल्या होत्या.

दिवसभर प्रभा तो धक्का आतल्या आत जिरवीत राहिली असावी. आई पैशासाठी देशोधडी लागल्यासारखी आणि वडील हे असे अनोळखी, परके झालेले...

दुसऱ्या दिवशी सकाळी प्रभा आंघोळीसाठी म्हणून न्हाणीघरात गेली ती परत बाहेरच येईना! अखेर काळजी वाटून मावशीने दार ठोठावले. खूप हाका मारल्या, आर्जवे केली. शेवटी धाकदपटशा घातला. परंतु प्रभा हूं की चूं काही करीना.

कुणाचीच मात्रा चालेना. स्वतः केव्हींनी मारलेल्या हाकांनाही लेक जाम उत्तरच देईना. आत बंब टणटण पेटलेला, ठिणग्यांचा आवाज येतो आहे अन् नळ धो धो वाहतो आहे...बस्स!

—त्या दिवशी कित्येक तास प्रभाने मोरीचे दार उघडले नाही. घरातल्या मोठ्या माणसांच्या तोंडचे पाणीच पळाले. दार फोडायचेही प्रयत्न झाले. अखेर, संध्याकाळच्या सुमारास महामुश्किलीने प्रभाला बाहेर काढण्यात आले.

अंग पार थंड होऊन गेला होता. प्रभाने आंघोळ केलीच नव्हती. कसलाच खुलासा तिच्या तोंडावर नव्हता आणि कसली जाणही ! मावशीने तिचे हातपाय तोंड पुसून तिचे कपडे बदलले, त्यालाही तिने हरकत घेतली नाही. उदासपणे एका जागी बसून तिने तो दिवस घालविला.

आपल्या भाचीचे मन कशात तरी रमवावे म्हणून दुसऱ्या दिवशी मावशीने आपल्या मुलीला, तिच्या मैत्रिणींनाही मुद्दाम बंगल्यावर जेवायला बोलावून घेतले. दुपारी सगळ्यांना सिनेमाला नेले. परंतु सबंध सिनेमाभर प्रभा खुर्चीला शिवून टाकलेली एखादी कापडी बाहुली असल्याप्रमाणे थिजून खुर्चीत बसली होती—पडद्यावरची चित्रं न बघता, पण टक लावून तिकडे पाहत.

मधले दोन दिवस सरळ गेले. तिसऱ्या दिवशी संध्याकाळी पाच वाजल्यापासून पुन्हा तिने जे बंगल्याच्या बाहेरच्या व्हरांड्यात बांधलेल्या झोपाळ्यावर ठाण मांडले— ते तिथेच ! ती जी संथ झोके घेत तेथे बसून राहिली, ती रात्रभर तेथून उठलीच नाही.

घरातली सारी माणसेही रात्रभर जागत, चुळबुळत, तिच्या विनवण्या करीत राहिली. रात्रभर मावशीने तिला सोबत केली परंतु त्या सोबतीची प्रभाला गरज नव्हती – प्रभाच्या ती गावीही नव्हती !

प्रभाच्या व्यक्तिमत्त्वात झपाट्याने बदल होत चालला. दिवस दिवस ती मुक्याने काढू लागली. कधी मोठ्या माणसासारखी दिवसभर एकापाठोपाठ एक कामेच उरकीत राही तर कधी तास न् तास एकाच जागी उभी किंवा खांबाला टेकून बसे.

श्वास रोखून हे सारे पाहणाऱ्या संतदंपतीचा मग मात्र धीर सुटला. त्यांना या एकूण प्रकाराची धास्तीच वाटू लागली.

तारेने काय काय कळविणार, असा विचार करून त्यांनी ताराबाईंना एक पत्र लिहिले आणि पत्रात सगळी हकीकत सविस्तर कळवून म्हटले की ' अशा परिस्थितीत प्रभाचा सांभाळ करणे आम्हांला यापुढे कठीण वाटू लागले आहे. तरी तुम्ही कसेही करून परत या आणि आम्हांला या जबाबदारीतून मुक्त करा. आम्ही दोघे जबलपूरला परतच जाऊ, असे म्हणतो. '

बिचाऱ्या ताराबाईंपुढे पुन्हा एकदा एक नवा पेच उभा राहिला. नव्या नोकरीत आता कुठे त्यांचे बस्तान बसत होते. अंतरही मनात येताच धाव घ्यावी इतके कमी नव्हते. त्यांनी वहिणीला कळविले की ' प्रभाला तुम्ही स्वतःच कसेही करून निदान मुंबईपर्यंत आणून पोचवा. '



संत जोडप्याने सुटकेचा निःश्वास सोडला आणि प्रभाला घेऊन केव्हींच्या घरातील विलासी वातावरणातून काढता पाय घेतला. प्रभाला त्यांनी मुंबईला डॉ. काशीबाईंच्या घरी आणून सोडले, तेथून ताराबाईंनी तिला बांसद्याला नेले.

प्रभाची ती बधिर अवस्था पाहून त्याही चांगल्याच धास्तावल्या. प्रभाला बसलेल्या मानसिक धक्क्यामुळे तिच्या मनातला एक मोठा कप्पा एकदम गोठून गेल्यासारखा झाला होता. आईच्या सान्निध्याची, प्रेमाची ऊब तिला पुरेना. ताराबाईंची जपणूक, जवळीक समजावणी आतपर्यंत पोचेना. कधी साध्याशाच आवाजाने ती विलक्षण भेदरून जाई. चौदा–पंधरा वर्षांची ही मुलगी अनोळखी माणूस अचानक दारात आला तर तेवढ्या-नेही कमालीची धपापून जाई; तास न् तास मग ती आईला सोडीत नसे. कधी गाणी म्हणायला लागली तर जिवाच्या आकांताने गातच सुटे, इतर वेळी कधी दिवसभर निप-चित पडून राही. कधी भिंतीवर कुठल्यातरीच बिंदूवर भावशून्य टक लावून बसे…याच सुमारास तिच्या मासिक पाळीलाही आरंभ झाला होता आणि तिच्या या दुखण्याचा संबंध त्या अवस्थेशीही जोडला जात होता.

प्रभाला या काळात अगदी लहान मुलासारखे सांभाळावे लागत असे. या कामात ताराबाईंना सरोजबाईंची खूप मदत झाली. चाळिशी ओलांडलेल्या ताराबाई आणि चौदा वर्षांची प्रभा यांच्यामधले वय त्यांच्यापाशी होते. लौकरच त्यांना प्रभाचा लळा लागला. दोघी मिळून आळीपाळीने प्रभाला शांत करीत – सांभाळीत. हा चमत्कारिक आजार सोडल्यास प्रभा होतीही लाघवी. राजपिंपळ्याचे डॉ. जानी म्हणून एक होमियोपाथ संस्थानच्या नोकरीत होते, त्यांचे औषध तिला सुरू केले होते. परंतु फारसा गुण येत नव्हता.

वरकरणी ताराबाई शांत दिसल्या तरी प्रभाचा आजार आणि केव्हींचा दुरावा या त्यांच्या भावजीवनातल्या दोन त्रुटींनी त्या आतून विलक्षण बेचैन होत्या. प्रभाला नेमके काय झाले आहे, तिला कोणत्या प्रकारचे उपचार करावेत, तिचे पुढे कसे व्हायचे या चिंतेने तर त्या ग्रासलेल्या होत्याच; परंतु केव्हींच्या आठवणींनेही त्या नित्य हळव्या होत असत. त्यांच्या बोलण्यात केव्ही, केव्हींची हुशारी, त्यांचे आवडते गाणे, त्यांना आवडणारे पदार्थ यांचे उल्लेख वारंवार येत…नवऱ्याला सोडून आलेली ही धीराची, दुःखी बाई आतून त्याच्यातच किती गुंतलेली आहे, हे सरोजबाईंना सारखे जाणवत असे. ताराबाईंच्या खाजगी व्यथांचा हा कोपरा वगळून त्या त्यांच्याशी आपलेपणाने वागत; त्यामुळे त्यांची साथ ताराबाईंना सुखकर होई.

ताराबाई बांसद्याला असतानाच सरोजबाईंचे लग्न ठरले आणि झालेही. त्यांचे पती श्री. ढवळे यांचा कोल्हापूरला स्वतंत्र धंदा होता. लग्नानंतरही काही महिने सरोजबाई बांसद्याला होत्या. या काळात श्री. ढवळे वरचेवर येऊन—जाऊन असत. ताराबाईंनी

सरोजबाईंना आपली मुलगी मानले होते. परंतु पुढे ढवळ्यांच्या खेळकर स्वभावामुळे तेही त्यांचे आवडते झाले,—आणि मग ढवळे त्यांचा 'मुलगा' ठरले, सरोजबाई 'सूनबाई' झाल्या! जेवणानंतर त्या दोघी पुष्कळदा टोमॅटोच्या जेलीत फेटलेली साय मिसळून बनविलेला एक थंड पदार्थ खात. श्री. ढवळ्यांना त्यात हक्काचा वाटा मिळू लागला. ढवळ्यांना तो पदार्थ फारसा आवडत नाही हे कळल्यावर तर त्यांना विशेष आग्रह करून ती 'स्वीट डिश' वाढण्यात येई!

ताराबाईंचा पोशाख याही काळात संपूर्णपणे खादीचा होता. ढवळे मंडळींची राहणी त्या मानाने छानछोकीत मोडणारी. परंतु ताराबाईंनी कधीही त्यांना कुणालाच उपदेश केला नाही की त्याबद्दल टिंगल, टीका केली नाही. प्रभावरही त्यांनी कधी आपली खादी लादली नाही.

प्रभाच्या दुखण्याला झटक्यांचे स्वरूप असे. त्यांची तीव्रता कधी कधी कमी होई. मधल्या शांततेच्या काळात प्रेमळ, अगत्यशील स्वभावाची, 'खरी प्रभा' लोकांना भेटे. तिचीसुद्धा राहणी फार टापटीपीची, ऐटबाज असे. तिच्या साऱ्याच आवडी, तिच्या राजस, रसिक वृत्तीच्या द्योतक अशा होत्या. गृहसजावट, टेबल डेकोरेशन इत्यादींकडे तिचा कल व कटाक्ष असे. ताराबाईंना विणकामाची विशेष आवड. प्रभा त्यात रस घेई. फ्रेंच कविता प्रभा सुंदर म्हणे. गाण्याचा नाद तिला होताच. ताराबाई व प्रभा दोघी मिळून तिथे भजनांचा, गुजराती लोकगीतांचा संग्रह करीत असत. प्रभा बरी असली की लालजीभाई व त्यांच्या बहिणी तिच्याशी खेळायला येत. मुले प्रभाहून लहान; प्रभाला ती प्रभाबेन म्हणत. मात्र या चांगलेपणाच्या काळातसुद्धा मानसिक दुबळेपणाचा एक धागा तिच्या व्यक्तिमत्त्वात स्पष्टपणाने जाणवे. ताराबाई आपल्याकडून उपायांची, उपचारांची शिकस्त करीत होत्या; नवीन, आधुनिक उपचारांची चौकशी सतत करीत होत्या; परंतु प्रभा बरी होत नव्हती.

याही काळात 'बालकांची वाढ—बालकांचा विकास' हाच ताराबाईंच्या वाचनाचा, चिंतनाचा विषय प्रामुख्याने होता. 'मराठी शिक्षणपत्रिका' त्या बांसद्याहूनही चालवीत होत्या व बालशिक्षणक्षेत्राकडे त्यांचे सतत लक्ष होते. स्वतःच्या अपत्याबद्दल वाटणारी तीव्र चिंता ही त्यांच्या मनातली शिशुविषयक आस्था वाढायला पोषकच ठरली असावी. प्रभाला वडलांची फार आठवण येते, त्यामुळे ती दुःखी आहे—असा त्या आपल्याकडून तिच्या व्यथेचा अर्थ लावीत असत.

केव्हाही एकदा ताराबाईंच्या बोलविण्यावरून येऊन राहून गेले. या काळात ढवळे जोडप्याला केव्हांचा सहवास झाला आणि त्यांचेही ढवळे पतिपत्नींशी तेवढेच जुळले. अमरावतीला येण्याचे आग्रहाचे आमंत्रण ताराबाईंच्या या लाडक्या 'मुलगा–सुने'ला करून केव्हा परतले.



...मग बांसद्याच्या वास्तव्यातच पुन्हा एक विशिष्ट दिवस प्रभाच्या भवितव्याच्या दृष्टीने निर्णायक ठरला. प्रसंग साधाच होता परंतु प्रभाच्या प्रतिक्रियेमुळे त्याला पुढे महत्त्व आले—

ताराबाईंच्या बांसद्याच्या नोकरीत काही काळ जेवणखाणाचाही अंतर्भाव होता. राजवाड्याजवळच्या अतिथिगृहात जेवणाखाणाची व्यवस्था केली जात असे. पॅलेसमधून रोज त्या दोघींसाठी आणि इतर काहीजणांसाठी जेवणाची ताटे येत. जेवणघर सामायिक होते. त्या दिवशी या सर्व मंडळींचे जेवण चालू असताना अचानक बांसद्याचे महाराजसाहेब जेवणघराच्या दारात येऊन उभे राहिले. जेवणारे, वाढणारे सगळेच चपापल्यासारखे झाले. सगळी जेवण सोडून पटापट उठून उभी राहिली! ताराबाईंची मुख्य दाराकडे अर्धवट पाठ होती. त्यांना महाराजांचे आगमन, अस्तित्व प्रथम जाणवले नाही आणि नंतर त्यांचे पूर्वसूचनेशिवाय येणे– अतिक्रमण– त्यांना आवडलेही नसावे. पण त्यांनी काही उठून त्यांची दखल घेतली नाही. खाली मान घालून त्या जेवीतच राहिल्या. त्यांच्या समोरच्याच खुर्चीवर दाराकडे तोंड करून प्रभा बसली होती. ती एकदा आईकडे आणि एकदा महाराजसाहेबांकडे पाहतच राहिली. तिला स्वतःला आपण उठून उभे राहायला पाहिजे की आईसारखे बसून राहावे, काहीच सुचेना. दोन मिनिटांचा हा नाट्यप्रसंग घडला आणि संपला. महाराजसाहेब आले तसे मागे वळून निघूनही गेले.

पण त्या छोट्याशा घटनेचा ताणसुद्धा अशक्त मनाच्या प्रभाला सोसला नाही. एखादा लहानसाच आवाज व्हावा पण त्यामुळे कानाचा पडदा फाटून जावा त्याप्रमाणे तेवढ्या त्या धक्क्याने प्रभाच्या आधीच विसविशीत झालेल्या मनोवृत्ती पार फाटून गेल्या!

"तू उठली नाहीस, आता तुझी नोकरी गेली! तू उठली नाहीस, आता तुझी नोकरी गेली!" एकदम ती तारवटल्यासारखी बडबडत सुटली.

ताराबाईंच्या मनात चर्र झाले. एका क्षुल्लक घटनेचा हिच्या मनावर एवढा परिणाम व्हावा? वडलांचा कल्पनेतला आधारही तुटलेला; आणि आता आईचीही नोकरी गेली तर आपले कसे व्हायचे? या कल्पनेने ते प्रभाला इतके असुरक्षित, निराधार वाटते आहे? हिच्या अजाण, हळव्या मनात कसली थैमाने चालू आहेत!

"तू अजून उठली नाहीस, आता तुझी नोकरी गेली!"

घाबऱ्या, अनैसर्गिक आवाजात प्रभाने दिवसभर एकच घोसरा लावला होता. मधूनच ती लाकडासारखी ताठ होत होती, हातांच्या मुठी घट्ट वळत होती, तिची नजर अगदी अर्थशून्य झाली होती.

ताराबाईंनी तिला खूप समजावले, धीर दिला. "अग, असं काही होत नाही, व्हायचं नाही...तू अशी घाबरू नकोस पाहू. अशी कुठे नोकरी जाते का! आणि नोकरीची काळजी तुला कशाला प्रभा? मी आहे ना बेटा..."

—बांसद्याचा तो निमित्तमात्र प्रसंग ही शेवटची काडी ठरली. त्या दिवशी प्रभाने ' आईची नोकरी जाणार ' हा जो धसका घेतला त्याची परिणती अखेर—वेडाच्या झटक्यात—झाली !

...प्रभाचे दुर्दैवी भवितव्य त्या दिवशी एकदम स्पष्ट झाले. आणि लहानपणापासून अस्वाभाविक वातावरणात, सदा अनिश्चित आयुष्य जगत असलेल्या प्रभाच्या संदर्भात एक गोष्ट निश्चित झाली; तिचा मानसिक आजार !

बांसद्यासारख्या ठिकाणी राहून प्रभाच्या प्रकृतीवर योग्य इलाज होणार नाहीत हे स्पष्ट झाले, तेव्हा ताराबाईंचे मन मुंबई—पुण्याकडे ओढ घेऊ लागले. त्यांचा—आता डॉक्टर झालेला—पुतण्या त्यांना तेथे प्रभाच्या उपचाराच्या दृष्टीने बोलावीतच होता. तिकडे केव्हींची प्रॅक्टिस व आर्थिक परिस्थितीही आता चांगली सावरली होती. त्यामुळे ताराबाईंच्या अर्थार्जनाचा प्रश्न तितका महत्त्वाचा राहिला नव्हता. दोघींना पुरेसे मासिक उत्पन्न त्यांना कोठेही मिळविता येण्यासारखे होते. शिवाय केव्हींची आर्थिक परिस्थिती घड असली की ते प्रभासाठी म्हणून पैसे पाठवीत.

ताराबाईंचे लक्ष महाराष्ट्राकडे लागावे याला या सर्वांखेरीज आणखीही एक कारण होते. त्यांच्यातली कार्यकर्ती त्यांना त्याहून विस्तृत अशा बालशिक्षणक्षेत्राची वाट दाखवीत होती. बांसद्यासारख्या आडबाजूच्या संस्थानात राजघराण्यातील चारदोन मुलांना घडवीत राहण्यापेक्षा काहीतरी जास्त भरीव, उपयुक्त असे कार्य करण्यासाठी ताराबाईंमधला शिक्षणतज्ज्ञ बाहेरच्या जगाकडे झेप घ्यायला बघत होता.

अखेर ताराबाईंनी बांसद्याच्या नोकरीचा राजीनामा दिला. एकूण परिस्थिती पाहून महाराजांनीही खळखळ न करता, त्यांची सन्मानपूर्वक मुक्तता केली आणि फार जिव्हाळ्याने त्यांना निरोप दिला. ताराबाई गेल्यानंतर थोड्या दिवसांनी सरोजबाई ढवळेही बांसद्याची नोकरी सोडणारच होत्या.

ताराबाई जिथे जिथे राहत तिथे तिथे आजूबाजूच्या कुटुंबांशी अकृत्रिम सहजसुंदर स्नेह जोडीत. ही ढवळे मंडळीही पुढच्या आयुष्यात वेगवेगळ्या वळणांवर त्यांना भेटत राहिली—स्नेह, मैत्री टिकवीत राहिली.

ताराबाईंचे वास्तव्य बांसद्याला सगळे मिळून दोनच वर्षांचे झाले. त्यांचे पूर्वायुष्य, त्यांच्या आयुष्याची दीर्घता व त्यांचे एकूण कर्तृत्व पाहता हा काळाचा तुकडा फार लहानसा व तुलनेने कमी महत्त्वाचा. बांसद्याची नोकरी म्हणजे त्यांनी परिस्थितीशी केलेली तात्पुरती तडजोडच म्हणता येईल. परंतु ही अल्प मुदतीची नोकरीही ताराबाईंनी इतकी मनःपूर्वक केली की बांसद्याच्या राजघराण्याशी त्यांचे कायमचे ऋणानुबंध राहिले. आपल्या आयुष्यातली अत्यंत संस्कारक्षम अशी दोन वर्षे ज्या सात्त्विक, प्रेमळ शिक्षिकेच्या सहवासात गेली तिला बांसद्याचा राजपुत्र व त्याच्या बहिणी कधीच विसरल्या नाहीत.



आज त्यांचे बांसद्याच्या महाराजांनी व पुढे गादीवर आल्यावर दिग्वीरसिंगजी यांनीही ( दिग्वीरसिंगजी गादीवर आल्यावर वर्षभरातच त्यांचे संस्थान विलीन झाले व त्यांची सत्ता संपुष्टात आली. ) ताराबाईंच्या बालशिक्षणकार्याला वेळोवेळी आर्थिक हातभार तर लावलाच परंतु ताराबाईंच्या भेटीगाठीही ही मंडळी नेहमी घेत राहिली. ( ताराबाईंच्या घरी कधी मधुबाला इ. मुली आल्या तर आपल्या चहाची कपबशी आपण विसळीत— ' गुरु 'ला त्या आपली सेवा करू देत नसत ! ) पुढे ताराबाई परदेशी गेल्या तेव्हा बांसद्याच्या महाराजांनी त्यांना रु. १०००/—ची मदत पाठविली. ताराबाईंचे शिष्य दिग्वीरसिंगजी हे आजही ताराबाई मोडक स्मारक समितीच्या विश्वस्तांपैकी एक महत्त्वाचे व क्रियाशील विश्वस्त ( ट्रस्टी ) आहेत.

...गिजुभाईंनी गुजरात व सौराष्ट्रात बालशिक्षणाचा प्रसार केला तसा आपण महाराष्ट्रात करावा या हेतूने आपल्या आजारी कन्येसह ताराबाईंनी मुंबईच्या दिशेने प्रयाण केले. मात्र त्या गेल्यावर बांसद्याच्या राजपुत्राचे पुढचे शिक्षण एका विद्वान व पाठांतरपुस्तीवर भर देणाऱ्या पंतोजींवर सोपविण्यात आले !

१९३८ च्या अखेरीस ताराबाईंनी बांसदा सोडले.

❍

# ८. शिशुविहार

ताराबाई मोडकांनी महाराष्ट्रात येऊन बालशिक्षणाचा प्रचार करण्यास सुरुवात केली त्यापूर्वी महाराष्ट्रात पूर्वप्राथमिक शिक्षणाची कल्पनाच नव्हती किंवा तशा प्रकारच्या शिक्षणसंस्थाच महाराष्ट्रात नव्हत्या असे नव्हे. किंडरगार्टन ( बालोद्यान ) ही शिक्षणपद्धती याही पूर्वी शिक्षणक्षेत्रातल्या लोकांच्या परिचयाची झाली होती आणि काही प्रांतात त्या धर्तीवर बालशिक्षणाचे प्रयोगदेखील चालू होते. गुजरातेत बडोदा संस्थानात तर सरकारी प्रयत्नाने ठिकठिकाणी किंडरगार्टन शाळा चालविण्यात येत होत्या. किंडरगार्टन पद्धतीचे पहिले प्रशिक्षण विद्यालय मुंबई राज्यात सोलापूर येथे १९०० च्या सुमारास निघाले होते. ( पुढे ही संस्था मेरी हार्डिंग्ज किंडरगार्टन ट्रेनिंग कॉलेज या नावाने प्रसिद्ध झाली. ) मुंबई राज्यात प्राथमिक शाळांमध्ये जे ' बिगरी 'चे वर्ग असत त्यात पाच वर्षांच्या खालची मुले असत व त्यांना खेळ, गाणी, गोष्टी अशा पद्धतीने शिक्षण देण्याचा प्रयत्न होत होता.

ताराबाईंनी बालमंदिर काढण्यापूर्वी पुणे येथे श्रीमती मैनाताई राहाणे यांनी एक बालमंदिर काढले होते. त्याचप्रमाणे प्रा. स. बा. हुदलीकर व सौ. सुलोचनाबाई हुदलीकर या जोडप्याने मुंबई व पुणे या दोन्ही ठिकाणी बालमंदिर काढण्याचा कमीअधिक प्रयत्न केला होता. मुंबईत एकदोन गुजराती बालमंदिरेही निघाली होती.

मात्र हे सारे प्रयत्न तोकडे व मर्यादित होते. पूर्वप्राथमिक शिक्षणाने मूळ धरावे, त्याचे स्वरूप नक्की व्हावे, सर्वदूर त्याचा प्रसार व्हावा, अशी जोर किंवा ताकद या प्रयत्नांमध्ये नव्हती. या सर्वांपेक्षा ताराबाईंचा प्रयत्न ठळक व वैशिष्ट्यपूर्ण असा ठरला; याचे कारण केवळ एक बालमंदिर चालवावे, यशस्वी करावे या माफक उद्दिष्टाने ताराबाई महाराष्ट्रात आल्या नव्हत्या. स्थानिक मुलांसाठी बालमंदिर चालवून त्या द्वारा महाराष्ट्रातील पालकवर्गाला बालशिक्षणाचे महत्त्व पटवून द्यावे, बालशिक्षणाचे प्रयोग करणारी संस्था त्यातून आकार घ्यावी आणि प्रशिक्षणाचे कार्यही त्यातून फोफावत जावे अशा व्यापक दृष्टीनेच त्यांनी कार्याला हात घातला होता.

त्या दृष्टीने प्रथम पुण्याला जाऊन तेथे त्यांनी ही मुळी रुजविण्याचे प्रयत्न करून पाहिले; परंतु तेथील समाजातून त्यांना आवश्यक तो पाठिंबा मिळेना. या सुमारास श्रीमती मोंघीबेन बधेका या मुंबईत येऊन एका बालमंदिरात काम करीत होत्या. तेव्हा त्यांच्या मदतीने दादर येथील हिंदू कॉलनी या भागामध्ये आपल्याला एक गुजराती–



मराठी बालमंदिर काढता येईल असा एक विचार ताराबाईंच्या मनात आला आणि काही थोडेच महिने पुण्यात राहून त्या मुंबईला आल्या. प्रथम त्यांनी डॉ. नवरंग्यांच्या घरी तात्पुरता मुक्काम केला आणि आपल्या कार्यपूर्तीच्या दृष्टीने जुळवाजुळव सुरू केली.

कार्यसिद्धीसाठी सर्व प्रकारची प्रतिकूलताच तेवढी या सुरुवातीच्या काळात ताराबाईंपुढे हात जोडून उभी होती, असे म्हटले तरी चालेल!

बालशिक्षणाची कल्पना अजून भारताला नवी होती. त्यात सारे काही फुंकून पिण्याचा महाराष्ट्रीय स्वभाव ताराबाईंना नवा नव्हताच. गुजराती लोकांप्रमाणे कुणी काही सांगतादेत तेव्हा त्यात काही अर्थ असेल म्हणून निमूटपणे त्यांचे ऐका, असा या मुलखाचा ' मेजा'च नाही, हे त्यांना स्वतःवरून चांगले ठाऊक होते. त्यांनी स्वतः मॉन्टेसोरीची तत्त्वे रडत–झुरतच स्वीकारली नव्हती का ?

जनमत आपल्या कार्याला अनुकूल नाही, उलट विरुद्धच आहे असा अनुभव त्यांना आला. आता गुजराती भाषिकांत ताराबाईंचे नाव व कार्य सुपरिचित असले तरी महाराष्ट्रात अजून त्या नव्या होत्या, त्यांचे कर्तृत्व सिद्ध झालेले नव्हते. त्यांनी चालविलेली ती धेडगुजरी शिक्षण पत्रिका आणि त्यांचे स्वतःचे धेडगुजरी व्यक्तिमत्त्व – दोन्ही महाराष्ट्रीयांना पटकन पसंत पडण्याजोगी नव्हती. त्यामुळे त्यांच्या प्रयत्नांकडे मंडळी काहीशा दुराव्याने, बऱ्याचशा आशंकेनेच पाहू लागली. हे एक काहीतरी नवेच ' फॅड ' किंवा खूळ या गांधीवादी राहणीच्या बाईने काढले आहे, अशी सर्वसाधारण प्रतिक्रिया झाली.

सुशिक्षित वर्गातूनसुद्धा निरुत्साही, थंड प्रतिक्रियांसह ताराबाईंची बोळवण केली जात होती.

कुणी म्हणत, " लहान मुलं आपली आपण मोठी होत असतात ! त्यासाठी एवढं हे अवडंबर, साधनं, खर्च सगळं हवं कशाला ? "

" मुलांचं खरं विकासस्थान म्हणजे घर, त्यांची खरी एकमेव शिक्षिका म्हणजे त्यांची आई. इतक्या लहानपणी त्यांना घराबाहेर पाठवणं, परक्याच्या हाती सोपवणं मुळी योग्यच नव्हे. "

कुणाची तक्रार असे, " मॉन्टेसोरी पद्धती तर मूढ आणि मंद मुलांसाठी आहे असं आम्ही ऐकतो. मग आमच्या हुशार मुलांना ती कशाला ? "

कागदोपत्री बालशिक्षणाचे महत्त्व कबूल व नमूद करणाऱ्या शिक्षणक्षेत्रातल्या कार्यकर्त्यांचे सुद्धा मत होते, " प्राथमिक शिक्षण जिथे अजून आपल्याला भारी पडतंय तिथे हा नवा व्याप कशाला ? This can wait. "

आणि काही ठिकाणी तर ताराबाईंच्या प्रयत्नांना वेगळाच अर्थ लावला जात होता, " काही नाही, या बाईला हे नवं खूळ काढून दरमहा पन्नास–शंभर रुपये आपल्या पदरात पाडून घ्यायचे आहेत झालं ! कुठून तरी आपल्या पोटापाण्याचा प्रश्न सुटल्याशी

कारण !"

ताराबाईंचे काम अजिबात सोपे नव्हते. गिजुभाईंनी गुजरातेत जे कार्य केले त्यापेक्षा कितीतरी प्रतिकूल परिस्थितीत त्यांना ते उभे करावयाचे होते. नवीन वस्तीतील अपरिचित मंडळींशी ओळख करून घेऊन त्यांना नवीन विचार पटवून द्यायचे आणि त्यांच्या खर्चाने, त्यांच्या सहकार्याने, त्यांच्या मुलांसाठी त्यांच्याच अंगणात त्यांना नको असलेली एक नवीन संस्था निर्माण करायची. जागा, कार्यकर्ते सर्व नव्याने जमवायचे आणि तेही अशा पूर्वग्रहदूषित वातावरणात. शिवाय आता काही गिजुभाईंसारखा समर्थ गुरू त्यांना मार्गदर्शन करायला त्यांच्या नजिक नव्हता. स्वतः गिजुभाईंनी बालशिक्षणकार्याला हात घातला तेव्हा दक्षिणामूर्तीसारख्या प्रतिष्ठित संस्थेचा, नानाभाई, मोटाभाईंसारख्या ज्येष्ठ कार्यकर्त्यांचा, सधन स्नेह्यांचा भक्कम पाठिंबा त्यांच्या आधाराला होता. ते मुळी स्वच्छ सांगत,– "ज्या क्षणी नानाभाई पैसे द्यायचे बंद करतील त्या क्षणी मी सलाम ठोकून चालता होईन ! पैसे मिळवणं आपलं काम नव्हे !"

इथे ताराबाईंना धड मासिक प्राप्ती नव्हती, नवऱ्याचा आधार नव्हता (उलट, अपेशी संसाराचा इतिहास पार्श्वभूमीला होता) – आणि एक आजारी मुलगी मात्र त्यांच्या पदरात होती !

व्याख्याने, चर्चा इ. द्वारा आपली नवीन विचारसरणी लोकांपुढे मांडण्याचा प्रयत्न करीत असताना ताराबाईंच्या ध्यानात आले की या ठिकाणी बालशिक्षण रुजवायचे असेल तर इथल्या एखाद्या मान्यवर प्रतिष्ठित संस्थेचा पाठिंबा आपण मिळविला पाहिजे आणि त्यांचे लक्ष हिंदू कॉलनीच्या तिसऱ्या गल्लीत आकार घेत असलेल्या 'दादर भगिनी समाज' या महिलासंस्थेकडे गेले.

मुळात हिंदू कॉलनीची वस्ती नवीन. पस्तीस चाळीस वर्षांपूर्वीच्या त्या काळात रेल्वेकडेच्या त्या सखल परिसरात नुकतीच काही मध्यमवर्गीय कुटुंबे घरे बांधून राहायला आली होती. सुशिक्षित, महाराष्ट्रीय कुटुंबवत्सल असे इथले रहिवासी होते. स्त्रियांच्या विकास साधण्याच्या दृष्टीने त्या वेळी अनेक स्त्री-संस्था स्थापन होत होत्या. दादर भगिनी समाज हे मंडळ त्यापैकी एक होते. बालविकासामध्ये स्त्रीचा वाटा महत्त्वाचा. तेव्हा अशा एखाद्या स्त्री-संस्थेने बालमंदिराचे काम अंगिकारले तर ते लौकर आकार घेईल आणि मग आपल्या कार्याचा प्रसारही झपाट्याने होईल, असे वाटून ताराबाईंनी चौकशी सुरू केली.

त्या वेळी दादर भगिनी समाजाच्या अध्यक्षा मालिनीबाई परांजपे या होत्या. त्यांचे यजमान गो. रा. परांजपे हे रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्सचे प्राचार्य होते. परांजपे दंपतीचा हिंदू कॉलनीत स्वतःचा तिमजली बंगला होता आणि पतिपत्नी दोघेही मध्यमवयीन, समाजकार्याची आवड असलेली व उत्साही होती.



ताराबाईंनी एके दिवशी या दोघांची भेट घेतली आणि आपला नवा विचार त्यांच्यापुढे मांडला. दादर भगिनी समाजाने आपल्या जागेत एक बालमंदिर काढावे व त्याची शैक्षणिक जबाबदारी ताराबाईंवर सोपवावी अशी ताराबाईंची योजना होती. परांजपे मंडळींनी ती उत्साहाने उचलून धरली आणि भगिनी समाजाच्या इतर कार्यकर्त्यांची या नव्या कार्यक्रमाला सम्मती मिळविली. अखेर ३१ ऑगस्ट १९३६ रोजी अनंतचतुर्दशीच्या सुमुहूर्तावर दादर भगिनी समाजातर्फे परांजपे यांच्या बंगल्यात तळमजल्यावर ताराबाईंच्या बालमंदिराचे उद्घाटन करण्यात आले. घरोघर हिंडून प्रचार, प्रसार व शंकानिरसन केल्यानंतर दादर भागातील चौदा मुले या बालमंदिरात दाखल झाली.

ताराबाईंच्या अपेक्षेप्रमाणे परांजपे व इतर सभासद मंडळींनी ताराबाईंच्या कार्याला सर्व तऱ्हेचे साहाय्य केले आणि ताराबाईंनीही उदाहरणे देऊन, चर्चा करून त्यांना आपला नवा दृष्टिकोन पटवून दिला. हळूहळू ताराबाईंच्या व्यक्तिमत्त्वाचा, विचारांचा, शब्दांचा परिणाम लोकांवर होऊ लागला. त्यांची कार्याविषयीची तळमळ, निष्ठा लोकांना जाणवली. त्यांची उज्ज्वल पार्श्वभूमी लोकांना माहीत झाली.

'फीमेल ट्रेनिंग कॉलेजच्या प्राचार्यपदासारखा गादी-तक्क्याचा मान सोडून स्वेच्छेने समाजकार्य-शिक्षणकार्य करण्यासाठी या बाईने आपले अर्धे जीवन खर्च केले; तेव्हा ही बाई निव्वळ पोटभरू खास नाही; एक सिद्धान्त अभ्यासून, नऊ वर्षे पडताळून पाहून मग ती त्याचा निष्ठेने पुरस्कार करते आहे, तेव्हा अशा ध्येयवादी सुविद्य बाईंकडून झाले तर आपल्या मुलांचे कल्याणच होईल, अशा विश्वासाने काही थोड्या पालकांनी आपली छोटी बाळे ताराबाईंच्या स्वाधीन केली होती.

आपल्या या एकखांबी तंबूचा खांब ताराबाईंच झाल्या आणि त्यावर त्यांनी, हा उपक्रम हाती घेताना त्यांच्या मनात जे एक गोकुळ घाटत होते किंवा बालविश्व आकार घेत होते त्याचे उद्दिष्ट स्पष्ट करणारी पाटी लावली 'शिशुविहार.'

मुलांचे अत्यंत संस्कारक्षम असे जे शिशुवय, त्या वयात त्यांच्या विकासाला पूर्ण वाव देणारा असा एक विहार त्या त्यांच्यासाठी उपलब्ध ठेवणार होत्या... बंधनरहित सकस व समृद्ध अशा या बालराज्यात बालकांची पसंती, इच्छा, सोय यांना मान दिला जाणार होता. त्यांच्या जिज्ञासूपणाला, धडपड्या वृत्तीला तेथे पोषण व वाव मिळणार होता.

ताराबाईंची ही शाळा म्हणजे मुलांना दररोज सहा तास त्याच त्या बाकांना बांधून ठेवणारा, घंटा ठणकावेल त्याप्रमाणे चमचा चमचा ज्ञान त्यांच्या डोक्यात कोंबणारा चरक असणार नव्हता. बाराखड्या, घोकंपट्टी, रुक्ष तक्ते काटेकोर वेळापत्रके या गोष्टींना त्यात स्थान नव्हते आणि हे सारे आजवरच्या 'घंड्या, घोक ते पाडे, नाहीतर बघ !' या शिक्षणपद्धतीहून फार वेगळे होते. साहजिकच या न मळलेल्या शिक्षणवाटेवरून आपली मुले पाठविताना पालक साशंक होत.

म्हणूनच आपल्या या अभिनव शाळेच्या शुभारंभाच्या वेळी ताराबाईंनी पालकांना दिलासा दिला.

" मी कशी आहे, माझी शाळा कशी आहे याची पूर्ण कल्पना नसूनही केवळ श्रद्धेने, विश्वासाने तुम्ही आपली बाळे माझ्याकडे सोपवलीत. मी सिद्धान्तवादी आहे म्हणून तो सिद्धान्त सिद्ध करायला मी मुलांची ओढाताण करणार नाही याची खात्री बाळगा. कारण माझा पहिलाच सिद्धान्त असा आहे की बालकांचे व्यवहारात किंवा मानसिक नुकसान होईल असा प्रयोग करावयाचाच नाही. " *

मात्र शिशुविहार चालू झाले तरी समाजातला एक मोठा वर्ग ताराबाईंच्या प्रयोगाकडे प्रतिकूल नजरेने पाहत होता. पालकांच्या मनात नाना पूर्वग्रह होते. विविध मार्गांनी ते दूर करण्याचा प्रयत्न ताराबाई सतत करीत होत्या.

कुणी टीका करी—" आयांना दुपारी झोप हवी म्हणून हे बालशिक्षणाचं स्तोम ! " आणि कुणी म्हणे—" शिस्त नाही, शिक्षण नाही—दुपारभर पोरांना हवं ते करू द्यायचं ! अशानं उद्या ती आईबापांच्या डोक्यावर मिरे वाटतील ! "

" ज्यांना गरिबीमुळे संस्कारक्षम वातावरण मिळत नाही, आईवडलांचा सहवास मिळत नाही त्यांना एक वेळ ठीक आहे. पण शिकलेल्या पालकांच्या सुखित कुटुंबातल्या मुलांना बालमंदिराची काय गरज ? "

" आपला देश मुळात गरीब. लोकांना खायला, ल्यायला, प्राथमिक शाळेत जायला पुरेसा पैसा नाही. अशा वेळी हे महागडं शिक्षण कशाला ? '

आक्षेप अनेक होते.

एका स्त्री-पालकाने तर तिला आपल्या मुलीत अपेक्षित असा फरक दिसेना तेव्हा एक खरमरीत पत्र लिहून ताराबाईंना जाबच विचारला.

ताराबाईंनीही मग तिला स्पष्ट शब्दात उत्तर दिले की, " येथे सारे बृहस्पतीच तयार होतील असे आश्वासन मी पालकांना केव्हाच दिलेले नाही ! तुमच्या मुलीची येथे अवश्य प्रगती होते आहे परंतु तिच्या स्वतःच्या कुवतीनुसार; आणि तेच योग्य आहे. आता गावठी आंब्याला कलमी आंब्याचं फळ लागेल अशी तुमची अपेक्षा असेल तर ते कसे शक्य आहे ? ही जादूगाराची प्रयोगशाळा नव्हे की गणपतीचा कारखाना नव्हे. रागावण्यापूर्वी आमची भूमिका नीट समजून घेतली असतीत तर तुमच्या मुलीतला फरक तुमचा तुम्हालासुद्धा जाणवला असता. "

एकदा ताराबाई आपल्या एका स्नेह्यांकडे गेल्या होत्या. हे जोडपे त्यांच्या कार्यात रस घेणारे, चांगले सहकार्य देणारे. परंतु त्या दिवशी ताराबाईंना एकूण रागरंग निराळाच

* शिक्षणपत्रिका



दिसला !

" काय ? आज तब्येत ठीक नाही का ? "

" छे, हो. पण ही तुमची मंटोसरी पद्धत शिरलीय ना घरात आमच्या ! पूर्वी ही प्याडं माहितीच नव्हती, तेव्हाचं बरं होतं. हात उगारला की निम्मी कामं होऊन जात. आता या मंटोसरीनं हातपण बांधलेत आणि जीभपण शिवून टाकली आहे ! एक काम वेळेवारी उरकत नाही. बरं, पुन्हा रागवायची सोय नाही ! त्यांची मनं दुखावतात ना ! "

बाई काही ऐकून घ्यायच्या मनःस्थितीत नव्हत्या, हे पाहून ताराबाईंनी भेट आवरती घेतली. नंतर चार दिवसांनी चांगल्या थंड वेळी त्यांना गाठून ताराबाईंनी समजावलं,

" हे पाहा, तुम्हाला इतका त्रास झाला याचं कारण मॉन्टेसोरींचे सिद्धान्त तुम्ही खऱ्या अर्थाने समजूनच घेतले नाहीत. मुलांना शेफारून ठेवणं, मन मानेल तसं वागू देणं म्हणजे मॉन्टेसोरी पद्धत नव्हे. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला पोषक आणि आवश्यक ते स्वातंत्र्य जरूर द्यायला हवं. मात्र कुठेतरी रेघ ही हवीच. आपण स्टेशनवर वेळेवर पोचलो नाही तर आगगाडी काही चवताळून आपल्या अंगावर येत नाही. परंतु त्याचबरोबर ती आपल्यासाठी थांबतही नाही ! ही, या प्रकारची अप्रत्यक्ष शिस्त इथे जरूर अभिप्रेत आहे. आमच्या शिशुविहारातसुद्धा एखादं खेळणं खेळायला घ्यावं की नाही, त्याच्याशी किती खेळावं, हे स्वातंत्र्य मुलाला असतं. परंतु दुसऱ्याच्या हातातलं खेळणं हिसकावून घेण्याचं स्वातंत्र्य त्याला नाही. घसरगुंडीवरून त्याला कितीही वेळा घसरता येईल पण इतरांशी धक्काबुक्की करून, क्रम मोडून पुढे जायची सवलत त्याला तो लहान, लाडका, गोरा किंवा दांडगा म्हणून दिली जात नाही. "

ताराबाईंनी व्याख्याने देऊन, प्रदर्शने व खुल्या चर्चा आयोजित करून, शिक्षणपत्रिकेतून प्रश्नोत्तरे घडवून आणून आणि वैयक्तिक पातळीवर समजावणी करून पालकांना त्या नव्या शिक्षणपद्धतीमागची भूमिका समजावून दिली. त्यांनी पालकांना सांगितले की मुळात आधी बालमंदिर घराची जागा घ्यायला निघाले आहे ही कल्पना डोक्यातून काढून टाका. मात्र ते तुमच्या मुलाचे पूरक घर अवश्य आहे, आणि त्याची गरज समाजातल्या सर्व स्थरांतील मुलांना आहे. ती एक हौसेची, चैनीची बाब नसून शैक्षणिक, सामाजिक गरज आहे.

अडीच ते पाच ही मुलाच्या आयुष्यातली वर्षे त्याच्या शिक्षणाच्या, विकासाच्या दृष्टीने सर्वांत महत्त्वाची असतात हे आज जगातील सर्व मानसशास्त्रज्ञांना, शिक्षणतज्ज्ञांना मान्य आहे, आणि या वयात मुलांना योग्य वातावरण मिळाले तर मुलांचा बुध्यंकसुद्धा वाढतो ही गोष्ट आता सिद्ध झालेली आहे. मुलांच्या चतुरस्र वाढीला पोषक व पूरक असे वातावरण दिवसातले तीनचार तास त्यांच्यासाठी उपलब्ध ठेविते ते बालमंदिर. बालमंदिर

म्हणजे देखील मुलांचे दुसरे घरच असते पण खास लहान मुलांसाठी त्यांच्या सोयी, आवडी लक्षात घेऊन ते रचलेले असते. मोठी माणसे इथे दुय्यम; सतत मोठ्यांच्या जगाशी तडजोड करीत त्यांना इथे वावरावे लागत नाही. "अरे ठेव ते खाली!"—"मोठा आला खुर्चीवर चढणारा!"—"बाबा रागावतील हं!" अशा तंब्या त्यांना इथे येताजाता कुणी देत नाही.

या वयात मुलांची शारीरिक, मानसिक, बौद्धिक—सर्व आघाड्यांवरून विकास साधण्याची धडपड चालू असते. त्यांची जिज्ञासा चहू बाजूंनी नुसती उतू जात असते आणि त्यांची आवडती माणसंच त्यांच्या प्रगतीच्या आड येत असतात; आपली कामं वेळेवर व्हावीत, घरात सुव्यवस्था नांदावी म्हणून त्यांच्या नैसर्गिक हालचालींवर बंधने घालीत असतात. त्यामुळे मोठ्या माणसांशी सतत जमवून घेत, झटापट करीत त्यांना आपली विकासाची क्रिया चालू ठेवावी लागते. आपण ज्याला उपद्व्याप, निरर्थक खोड्या म्हणतो त्यांतून वास्तविक मूल आजूबाजूच्या जगाचे सहजज्ञान मिळवीत असते. आपल्या अवयवांचा अधिक सफाईने वापर करायला शिकत असते. आईवडलांच्या प्रत्येक कृतीचे अनुकरण करायला बघून ते जीवनाचा स्वानुभव घेत असते.

मुंबईसारख्या ठिकाणी बिऱ्हाडाची जागा लहान आणि माणसे जास्त; त्यात दारिद्र्य, कमतरता यामुळे मुलांच्या कुचंबणेत भर पडते. आईबाप श्रीमंत व शिकलेले असले तरीही त्यांच्या घरातले वातावरण त्यांच्या मुलांच्या वाढीला पोषक व निरोगी असतेच असे नाही. अशा घरांतून मुलांची संख्या एकावर वा दोनावर थांबविलेली. बाकी घरात सर्व मोठी माणसे. मग मूल म्हणेल तो कायदा, अशी परिस्थिती होते. आणि ती त्याच्या व्यक्तिमत्त्व-घडणीच्या दृष्टीने आदर्श नक्कीच नसते. बाहेरच्या जगाचे, समाजजीवनाचे नियम, परस्परसहकाराची जाणीव अशा घरांतून त्यांना मिळत नाही. शिवाय त्याच्या विचारशक्तीला, प्रायोगिक वृत्तीला वाव देणारी अद्ययावत साधने त्याच्या घरी नसतात. ती आणली तरी त्यांचा योग्य वापर करायला लागणारी शास्त्रीय दृष्टी पालकांजवळ नसते. मध्यमवर्गातसुद्धा अपुरी जागा, पालकांची आर्थिक असमर्थता इ. मुळे मुलांच्या सहजक्रीडांना जाणीवपूर्वक व योग्य प्रोत्साहन, मार्गदर्शन, मोकळं वातावरण देण्यासारखी परिस्थिती व स्वस्थता पालकांजवळ नसते. मग बाहेर शाळेची चाकोरी आणि घरात घरची शिस्त यांत नेमून दिलेल्याप्रमाणे येरझारा घालीत मूल मोठे होते. नोकरी करणाऱ्या आईला तर अशिक्षित नोकरावर मूल सोडावे लागते. त्याऐवजी मुलांना सुबुद्ध, समृद्ध वातावरण आस्थेने पुरवणारे बालमंदिर केव्हाही अधिक परवडते. आणि याहून खालच्या दरिद्री वर्गात तर सगळा आनंदच असतो! तेथे स्वातंत्र्य असूनही पोषक वातावरण नसल्यामुळे बालवयाची रखडपट्टीच चालू असते.

घरात दुसरे भावंड जन्माला येणे ही गोष्टसुद्धा मुलांच्या बालविश्वात एकदम क्रांती



घडविणारी असते. घरातले मुलाचे सार्वभौमत्व एकदम संपते. एक कायमचा वाटेकरी निर्माण होतो. साहजिकच ते आपल्या परीने प्रतिकार, कांगावा करते किंवा झुरते, कोमेजते. आणि ही परिस्थिती मूल, पालक कुणालाच आनंददायक नसते.

लहान मुलाच्या आयुष्यात, भावविश्वात अशा ज्या लहानमोठ्या पोकळ्या असतात त्या शिशुविहारसारखे एखादे आदर्श बालमंदिर भरून काढू शकते. तेथल्या अनुकूल, समृद्ध व निरंकुश वातावरणात मूल स्वतःच स्वतःला घडवीत राहते. तेथे त्याला विकासाला, मनोरंजनाला योग्य अशी क्रीडासाधने असतात त्यांचा वापर करून ते आपल्या पुढील आयुष्याची पूर्वतयारी करू शकते. आपल्या डवकारलेल्या, सदा शिवशिवणाऱ्या अवयवांची, इंद्रियांची भूक भागवू शकते. यांत्रिक नव्हे तर त्याच्या भुकेल्या हातांना भरपूर काम देणारे, हस्तकौशल्य वाढविणारे, बुद्धीला चालना देणारे उद्योग त्याला पुरविले जातात. शिवाय केरसुणी, जाते, कुंचले, कात्र्या, रंग, डिंक, वाटली, नरसाळी—वरी जे जे हिसकावून घेतले जाते ते सर्व त्याला इथे मनसोक्त हाताळायला मिळते. त्याला त्यापासून अपाय होऊ नये म्हणून त्याच्यावर लक्ष ठेवणारी एक ताई म्हणजे मोठी मैत्रीणच तेथे असते. शिवाय झोपाळे, घसरगुंड्या, तळे, बाग, मासे, ससा, कबुतरे, कासव अशा कितीतरी गोष्टी त्याला या विहारात मिळू शकतात. प्रत्यक्ष लेखनवाचनाची सक्ती केली जात नसली तरी मॉन्टेसोरी पद्धतीच्या शैक्षणिक साधनांच्या द्वारा मुलाच्या प्राथमिक शिक्षणाची पूर्वतयारी येथे करून घेतली जाते.

शिवाय येथे मुलांना इतर मुलांशी जुळवून घ्यावे लागत असल्यामुळे समाजजीवनाला त्रासदायक अशा सवयी त्यांना सोडाव्या लागतात. सुदृढ समाजजीवनाला आवश्यक असे व्यक्तिमत्त्व त्याऐवजी आकार घेऊ लागते. थोडक्यात, मुलांच्या विकासाच्या सर्व प्रश्नांना एक छोटेसे तीन तासांचे उत्तर म्हणजे शिशुविहार!

ताराबाई लोकांना सांगत– "भावनगर येथे नऊ वर्षेपर्यंत आम्ही प्रयोग केले. नंतर इतकी वर्षे ठिकठिकाणी अनुभव घेतला. इतर अनुभवांशी तो पडताळून पाहिला. आमच्या अनुभवातून असे सिद्ध झाले आहे की मुलांची इच्छा, अनिच्छा न बघता चमच्याचमच्याने व कोष्टकानुसार त्यांना ज्ञान भरविण्यापेक्षा मुलाला पोषक, उत्तेजक वातावरण पुरवून पुरेशी मोकळी जागा, साधने व योग्य मार्गदर्शन, स्वातंत्र्य दिल्यास मग मूल स्वतःच्या कलाने, स्वानुभव, स्वयंशिक्षण यांद्वारा जी प्रगती आपली आपण करते ती अवश्य जास्त फायदेशीर असते. या शिक्षणपद्धतीचा उपयोग जास्त खरा व टिकाऊ असतो...

"—आणि अपरिहार्य, अत्यावश्यक खर्चाला 'जास्तीचा खर्च' कसं म्हणता? मुळात शाळापूर्व शिक्षणाकडे दुर्लक्ष करून एकदम प्राथमिक शिक्षण देणं म्हणजे पायावाचून इमारत बांधू पाहण्यासारखं आहे. पायाच कच्चा राहिल्यामुळे नापाशी,

गळती, विस्मृती या सर्वोपायी जो बुडित खर्च होतो तो कुणी मोजायचा? प्राथमिक शिक्षणाच्या नावावरही प्रतिवर्षी जो अवाढव्य, अनावश्यक खर्च होत असतो त्याचं काय? शास्त्रशुद्ध पद्धतीने पाया पक्का करा, वरची इमारतही भक्कम होईल....

" आजचा बालक म्हणजे तर उद्याची आपली आशावेल आहे. तिच्या खतपाण्यासाठी लागणारा खर्च अनावश्यक कसा म्हणता! मनुष्यजातीच्या भल्यासाठी, उन्नतीसाठी करायचा तो खर्च जास्ती आहे, म्हणून कुरकुरून कसे चालेल!"

शिशुविहारापुरते बोलायचे तर ताराबाईंना व त्यांच्या सहकाऱ्यांना आपल्या कार्याची तोंडी भलावण करायची जरूर फार काळ भासलीच नाही. तेथे चाललेल्या बालशिक्षणाचा बालकांवर होणारा सुपरिणाम पालकांना जाणवू लागला तशी बालके भरघोस संख्येने बालमंदिरात येऊ लागली. ज्या उत्साहाने मुले शिशुविहारात येत, तेथल्या उपक्रमात भाग घेत, लडिवाळपणे तेथल्या शिक्षकांच्या गळ्यात पडत त्या साऱ्या शिशुविहाराच्या सुयशाच्या नोंदी होत्या. सुटीच्या दिवशीसुद्धा, ' आज सुटी आहे ' असे आईने वारंवार सांगूनही मुलाचा विश्वास बसू नये, आणि भर उन्हात त्याने खात्री करून घेण्यासाठी आईला घेऊन शाळेत यावे असे अनुभव येत! मुलेच मग शाळेचे न नेमलेले प्रचारक बनली आणि घराघरांतून त्यांनी शिशुविहाराचा बावटा फिरविला. वर्षभरात मुलांची संख्या चौपट झाली. शाळेचे महत्त्व व यश ध्वनिक्षेपकावरून निमंत्रितांना पटवून देण्याची गरज राहिली नाही.

परांजपे–दांपत्याला ताराबाईंच्या कार्याचे महत्त्व पटले होते. त्यांनी ताराबाईंना ' शिशुविहार 'चे पायाचे दगड बसवण्यात मोलाची मदत केली. स्वतःच्या घरचा प्रशस्त तळमजला त्यांनी शिशुविहारला पहिली तीन वर्षे विनामूल्य वापरायला दिला. ही मदत मोठीच होती; कारण त्यामुळे शिशुविहारच्या मासिक खर्चातून दरमहा बरीच रक्कम कमी होत होती. ताराबाई व प्रभाही या काळात शिशुविहारच्या जागेत राहत असत. परांजप्यांच्या बंगल्याच्या तळमजल्यावर एक मोठा प्रशस्त हॉल किंवा दालन होते. या हॉलमध्ये दिवसा ताराबाईंचे शिशुमंडळ विहार करी आणि रात्री तेथेच बिछाने घातले जात! हॉलच्या कडेला एक लहानशी खोली होती, ती ढोबळ अर्थाने ताराबाई व प्रभा यांची खाजगी खोली होती. भिंतीतल्या कपाटांपैकी एक ताराबाई व प्रभा यांचे होते तर दुसऱ्यात मुलांच्या व त्यांच्या शिक्षिकांच्या खाण्यासाठी लागणाऱ्या जिनसा व इतर वस्तू ठेवण्यात येत. स्वयंपाकघर मात्र एकच होते. त्यातच घरचा चहा व स्वयंपाकपाणी होई व दुपारी बालकांसाठी खाऊ तयार होई, शिक्षिकांचे चहापाणीही होई. या काळात ताराबाईंकडे कितीही पाहुणे आले तरी त्यांची सोय होई. जागा प्रशस्त होती. मात्र दिवसा त्यांना आपली सोय दुसरीकडे पाहावी लागे. पूर्ण तीन वर्षे ताराबाई तेथे राहिल्या. स्वतः परांजपे मंडळींनी त्यांना वेळोवेळी सहकार्य दिलेच; शिवाय आपल्या ओळखीच्या



अनेक सधन लोकांकडून त्यांना त्यांनी बालमंदिरासाठी देणग्याही मिळवून दिल्या.

एकीकडे मुलांना येते, खेळते व वढते ठेवायचे, त्याच वेळी त्यांच्या पालकांच्या मनातले औदासीन्य दूर करून त्यांचे सक्रिय सहकार्य मिळवायचे आणि सुरुवातीला ताराबाई एकट्याच अध्यापनाचे काम करीत असल्या तरी आजूबाजूच्या हितेच्छूंमधून आपल्याला मदतनीस कार्यकर्ते निर्माण करायचे, प्रशिक्षणाचे वर्ग चालवायचे अशा चौफेर आघाडीवर ताराबाईंचे काम चालू झाले. एकीकडे नूतन बाल शिक्षण संघाचे व शिक्षण-पत्रिकेच्या संपादनाचे – ही कामेही होतीच.

वर्ष दीड वर्षातच ताराबाईंना तोंड द्यावे लागले ते एका निराळ्याच समस्येला, डोकेदुखीला.

आपल्या संस्थेचा खर्च ताराबाई अगदी काटकसरीने करीत होत्या. प्रसंगी पदरमोड करून त्या शिशुविहारची तूट भरून काढीत. शिशुविहारची फी त्यांनी दरमहा रु. ३/– ठेवली होती व जवळ जवळ तेवढाच वरखर्च प्रत्येक मुलामागे संस्था करीत असे. त्यासाठी अर्थात देणग्या मिळवाव्या लागत. स्वतः ताराबाई जेमतेम आपल्या गरजा भागविण्यापुरता पगार घेत. कारकून नव्हता, शिक्षिकाही त्या एकट्याच! पुढे पालकांमधूनच त्यांनी काही शिक्षिका पढवायला घेतल्या परंतु त्यासुद्धा विनावेतन काम करणाऱ्या होत्या. एखादादुसरा पगारी शिक्षक पुढे नेमला, त्यालाही अत्यंत कमी पगार दिला जाई.

परंतु खर्चाचा हात कितीही आखडता घेतला तरी योग्य बाबतीत योग्य तो खर्च अपरिहार्य म्हणून केला पाहिजे, प्रसंगी तो कर्ज काढूनसुद्धा केला पाहिजे, अशी ताराबाईंची विचारसरणी होती. आणि इथे भगिनी समाजाच्या कार्यकारी मंडळाचा व ताराबाईंचा मतभेद होऊ लागला.

दादर भगिनी समाजाने ताराबाईंचे शिशुविहार ' दत्तक ' घेतले होते; परंतु दुसऱ्याच वर्षी कार्यकारी मंडळ बदलले. नवीन मंडळी अधिकारावर आली. या नवीन कार्यकर्त्यांना शिशुविहारची जबाबदारी जाणवू लागली, हे धांडगूळ संस्थेच्या अर्थव्यवस्थेतला सिंहाचा वाटा हक्काने मागत होते. शिशुविहारची जसजशी प्रगती होत जाईल तसतशी त्याची ही आर्थिक भूक कमी न होता वाढतच जाणार होती. हे बालसंगोपन काही सभासदांना जोखमीचे वाटू लागले.

" चार आणे वर्गणीचा आपला समाज, तोही नुकताच बत्तीस साली स्थापन झालेला. अशा वेळी शिशुविहारसारखी वाढती जोखीम गळ्यात असली तर समाजाची प्रगतीच खुंटेल " अशी भीती त्यांना वाटत होती.

परंतु ' समाजा 'तल्या दुसऱ्या पक्षाचे म्हणणे होते, " जी काही आर्थिक खोट येईल ती आम्ही देणग्या मिळवून भरून काढत जाऊ; पण ताराबाईंचे बालमंदिर समाजाने चालवीत राहावे."

पटवर्धन, परांजपे, अभ्यंकर इत्यादी मंडळी या प्रकारे दादर भगिनी समाजाच्या नावाने परंतु शिशुविहारसाठी अशा रु. ५००–५०० च्या देणग्या मिळवीत होती. ( ब्राह्मणसभा ही संस्थाही त्यावेळी याच पद्धतीने डॉ. म्हसकर सूतिकागृहासाठी देणग्या मिळवीत असे. )

या सर्वांमुळे दादर भगिनी समाजातील सभासदांचे दोन तट पडले. याखेरीज आणखी बऱ्याच मंडळींना या दोन्ही संस्थांबद्दल आपुलकी होती. त्यांनी आपली मुले शिशुविहारात दाखल केली होती. मात्र तात्त्विक दृष्ट्या शिशुविहारचा बोजा समाजावर असू नये, शाळा स्वतंत्र असावी, असे त्यांचे मत होते.

हे प्रकरण विनाकारण पेटले. थोडीफार महिलामंडळी चिखलफेक झाली म्हणा, किंवा महिलामंडळी झकाझकी म्हणून मधल्यामध्ये बघ्यांनी आपली करमणूक करून घेतली म्हणा, हा वाद काही थोडक्यात मिटला नाही. आपण इथले काम करायला आलो ते बाजूलाच राहिले व हे काय वेगळेच राजकारण उसळले, असे वाटून ताराबाई मात्र हैराण होऊन गेल्या. शिशुविहार बंदच पडायची वेळ आली होती; परंतु परांजपे, पटवर्धन इ. हितेच्छूंनी या वादंगाची झळ प्रत्यक्ष शाळेला लागू दिली नाही.

अखेरीस, शिशुविहार स्वतंत्ररीत्या चालवावे व त्यासाठी ' शिशुविहार मंडळ ' म्हणून एक निराळी समिती स्थापन करून त्यात पुरुषमंडळींचाही समावेश करावा, अशा निर्णयाला ताराबाई आल्या. त्यात ताराबाईंचा एक फायदासुद्धा होता. मधल्या या प्रकरणामुळे आपल्याला जे कार्य करायचे आहे ते करण्यासाठी लागणारी धडाडी, आर्थिक झेप बायकांच्या पेलांत नाही असा त्यांना अनुभव आला होता. तेव्हा या दृष्टीने भगिनींच्या बरोबरीने बंधूंची जोड मिळाली तर कामाला विशेष गती मिळेल, असा त्यांचा अंदाज होता. त्यांच्या जुन्या हितचिंतकांना व सहकाऱ्यांनाही ही कल्पना पसंत पडली आणि दादर भगिनी समाजाने प्रारंभी घातलेली रु. ५००–६०० ची रक्कम त्याला परत करून नव्या मंडळाची स्थापना करण्यात आली.

नव्याने स्थापन झालेल्या या मंडळात श्री. व सौ. परांजपे, डॉ. व सौ. अभ्यंकर, श्री. व सौ. उदगावकर श्री. व सौ. सरदार, श्री. व सौ. पटवर्धन, डॉ. भागवत, श्री. डी. पी. जोशी, श्री. धाणेकर, सौ. धडफळे इ. बरीच वजनदार व प्रतिष्ठित मंडळी होती व त्यांतली बहुतेक मंडळी जोडप्याने सामील झाली होती. या सर्व मंडळींनी ताराबाईंना जरूर तो टेकू दिला आणि त्यांचा अंदाज खरा ठरला.

या निर्णयामुळे सर्व राजकारणाचा क्षणार्धात निचरा झाला. विरोधाचे बीजच मावळले. ज्यांनी चेवाचेवाने ' शिशुविहार 'च्या अस्तित्वावरच घाव घालू पाहिला होता त्यांनीसुद्धा आपली मुले शिशुविहारात दाखल केली.

मात्र बालमंदिर सुरळीत चालू झाले, मुलांच्या संख्येत झपाट्याने वाढ झाली; प्रशिक्ष-



णाचे कार्यही हळू हळू आकार घेऊ लागले तरी जनतेने खऱ्या अर्थाने बालशिक्षणविचार स्वीकारला होता—समजून घेतला होता, असे नव्हे. जनमत अनुकूल करून घेण्यासाठी ताराबाई आणि त्यांच्या मोजक्या अनुयायांना आपले भगीरथ प्रयत्न चालूच ठेवावे लागणार होते. आणि ताराबाईंना त्याची पुरेशी जाणीव आणि कल्पना होती. म्हणूनच १९३९ साली म्हणजे शिशुविहार स्थापन झाल्यानंतर तीन वर्षांनी बालमंदिराला जोडून काढलेल्या बाल अध्यापन मंदिराची पहिली तुकडी प्रशिक्षित होऊन बाहेर पडत असताना, आपल्या विद्यार्थ्यांना निरोपाचे ' चार शब्द ' ऐकविताना ताराबाईंनी म्हटले—

" ...तुमच्याजवळची वस्तू नवीन आहे. तात्या पंतोजींच्या धुळी शाळेची, जुन्या पद्धतीच्या पाठशाळेची सवय असलेले, बालकांविषयीच्या अज्ञानाने पूर्वग्रहदूषित असलेले असे शिक्षक व पालक तुमचे म्हणणे स्वीकारायला ताबडतोब तयार व्हायचे नाहीत. बरेचसे विचारवंत, साहित्यिकही तुमच्या वस्तूला विरोध करतील. तुमच्या हो ला हो करण्याइतके काही आमचे लोक कमी बुद्धीचे नाहीत. त्यांच्याजवळ जुना असला तरी त्यांचा स्वतःचा असा चष्मा आहे. या सर्वांच्यामध्ये, त्यांच्या सत्तेखालीच तुम्हाला तुमचे कार्य करायचे आहे. हे कार्य तुम्ही धीराने, चिकाटीने, दृढ विश्वासाने, सहनशीलपणाने पार पाडायचे ठरवाल तरच तुम्ही पुढे जाऊ शकाल. ज्यांनी ज्यांनी जीवनामध्ये, कार्यामध्ये यश मिळविले आहे त्यांनी एकच गोष्ट लक्षात ठेवली आहे. ती ही की आपल्याला सत्यसिद्धान्त म्हणून जे पटलेले आहे त्या सिद्धान्ताप्रमाणे सतत काम करीत राहणे....

तुम्हाला स्थिर बुद्धीने आणि कातडी जाड बनवून, एकच लक्ष्य डोळ्यांपुढे ठेवून सतत काम करायचे आहे... आज तीन वर्षे मी अशीच या प्रश्नाकडे लोकांचे लक्ष वेधावे यासाठी आपल्याच्याने होईल तितक्या जोराने हे बालशिक्षणाचे तुणतुणे वाजवीत आहे..."

ताराबाईंच्या ' वस्तूत ' जुन्या चष्म्याला स्तिमित करणारी अशी कोणती चीज होती ? जे संस्कार, वातावरण व शिक्षण ताराबाईंच्या शिशुविहारमध्ये बालकांना लाभत होते त्यांचे वैशिष्ट्य काय होते ? शिशुविहार काढण्यामागची शैक्षणिक भूमिका ताराबाई स्थानिक लोकांपुढे सातत्याने स्पष्ट करत होत्याच; त्यांच्या बालमंदिराला मूर्त स्वरूप आल्यानंतर तेथे सुरू झालेल्या प्रात्यक्षिकांमधून ती लोकांपुढे सोदाहरण मांडली जाऊ लागली—

...पुढचे दार बंद होते. जिकडेतिकडे शुकशुकाट. व्हरांडा ओस, बागही ओस, बालमंदिर बंद तर नाही ? हा प्रकार तरी काय आहे !

पाहुणे जरासे गोंधळले. पण कुठून तरी गुणगुण ऐकू येत होती ! आत मंडळी होती, खास. अर्ध्या इमारतीला वळसा घालून मंडळी कडेच्या दाराने आत शिरली.

" या, बसा. कोण पाहिजे आपल्याला ? "

" आम्हाला तुमचं हे बालमंदिर नीट पहायची इच्छा आहे. "

" अवश्य. "

ताईंनी पाहुण्यांना दुसऱ्या एका खोलीकडे नेत म्हटले,

" इथे अंगस्वच्छतेची चौकशी चालू आहे. पाहायची आहे ? "

पाहुण्यांकरिता त्यांनी भिंतीपाशी एक आसन घालून दिले. पाहुणी त्यावर बसली. मुले ओळीने बसली होती. ताईंनी त्यांना सांगितले,

" यमुना आता नखं तपासायला येईल, तिला नखं दाखवायची. "

एक चार वर्षांची मुलगी हसत हसत उठली. ती जवळ गेली की मुलं पालथे हात तिच्यापुढे धरत. यमुना ' छान आहेत ' ' घाणेरडी आहेत ' अशा सूचना बरोबर देत होती. मुले पुन्हा स्वतःची नखे पाहून जागेवर बसली.

ताई म्हणाल्या, " आता डोळे पाहायला मी येणार. मग हा छोटू कपड्यांची चौकशी करील. मळके कपडे असतील त्यांनी माझ्याकडे यावं. "

मळके कपडेवाल्या मुलांची नावे बाईंनी लिहून घेतली. पुन्हा बाईंचा आवाज आला.

" एकामागून एक आरशात नाक पाहून लागा कामाला. "

एकेक मूल आरशापाशी जाऊन उभं रहायचं, नाकाचा शेंडा वर करून आरशात पाहायचं आणि पुढं जायचं असा कम सुरू झाला. कुणी रांग मोडू लागले की ताई पुढे येऊन रांग नीट जुळवत. स्वच्छ नाकाची मुले खेळायच्या खोलीकडे जात. खराब नाकाची मुले बाहेर नळापाशी राहात.

अडीच ते पाच या वयोगटातल्या तीस-पस्तीस मुलांच्या अंगस्वच्छतेला अर्धा तास लागला होता.

" आरंभी काम इतकं सरळ होत नसे. चौकशीला वेळ लागायचा. मग आम्ही आरसा, पाणी, टॉवेल घेऊन गॅलरीत ठाण मांडून बसत असू. आठ आठ जणांच्या तुकड्या पाडलेल्या असत. मुलांना एकमेकांची चौकशी, तपासणी करताना मोठी मौज वाटे. आता ती सवयीने कामाला लागतात. पुढे आठवड्यातून दोनदा चौकशी पुरते. "

" ती नावं लिहून घेतलीत, त्यांचं काय कराल ? "

" आमच्याकडे पुष्कळ तऱ्हेच्या चिठ्या छापलेल्या आहेत– ' कानात तेल हवे ', ' कपडे अस्वच्छ आहेत ', अशा. आता जेवतेवेळी मुलांना चिठ्या वाटीन. मुलं त्या आपल्या आईवडिलांना दाखवतात. "

" आणि आईवडिलांनी नाही ऐकलं तर ? "

" ऐकतात तर ! दाखल करतानाच त्यांना तसं कबूल करावं लागतं. "



...एक शिक्षिका आपली अडचण सांगत होती—

" ताई, मुलांना सारखी चित्रंच काढायला हवी असतात. अर्थात मी काही त्यांना तसं करू देत नाही, म्हणा...चित्रं तरी अशी मोठी काय असणार त्यांची ? अगदी शेवटच्या तासाला फक्त मी रंग आणि कागद देते. "

" अंहं:, असं करू नका. मुलांना हवा तेवढा वेळ चित्रं काढू द्या, जितकी काढायची असतील तितकी काढू द्या. "

" दिवसभर ? "

" हो, अगदी दिवसभरदेखील. "

" पण मग ती दुसरं काहीच करायची नाहीत. "

" हरकत नाही ! आधी त्यांना पोटभर चित्रं तर काढून घेऊ देत. "

शिक्षिकेने त्याप्रमाणे सुरू केले. मुलांचे चेहरे नुसते आनंदाने फुलले. लेखनवाचन त्यांनी पार गुंडाळूनच ठेवले. वर्गाचा देखावा एकदम बदलून गेला; सबंध वर्ग चित्रकामात अगदी गर्क झाला.

—असा एक आठवडा गेला.

मुलांच्या चित्रांत आता खूपच फरक दिसू लागला. शिवाय ही सुधारणा त्यांची त्यांनी केली होती. त्यांच्या स्वतःच्या त्या स्वतंत्र कलाकृती होत्या.

—आणि मग अशी सकाळ–संध्याकाळ हवी तेवढी चित्रं काढू दिल्यावर मुलांचे पूर्ण समाधान झाले. काही दिवसांनी ती आपण होऊन लेखन–वाचन–गणिताकडे वळली. तेही उद्योग ती जास्त मनापासून करू लागली.

...खोलीची दारे बंद होती. खिडक्यांना जांभळ्या रंगाचे पडदे होते. खोलीत उदबत्तीचा वास दरवळत होता. अंधारात उदबत्त्यांची जळती, गर्द केशरी टोके सुंदर दिसत होती.

लहान लहान मुले शांतपणे भिंतीपाशी बसली होती. मांडी घालून, पाठीचा कणा ताठ; कुणी एखाद्या तपस्व्याप्रमाणे डोळे मिटले होते तर कुणी रुमाल बांधून घेतला होता ! कुणी मधून मधून डोळे उघडून बघत होती तर कुणाचे डोळे आपोआप मिटलेले राहातच नव्हते, म्हणून त्यांनी आपले हात डोळ्यांवर ठेवले होते. कुणी अंधारात उदबत्ती कशी दिसते, बाईंचा चेहरा कसा दिसतो, शेजारच्याने डोळे मिटलेत की नाही हे पाहत होती. कुणी हे दृश्य पाहून थक्कच झाले होते.

—या ठिकाणी आवाज म्हणजे घड्याळाची टिक् टिक् आणि मुलांचा श्वासोच्छ्वास. आतल्या शांततेमुळे बाहेर कुणी बोललेले, खोकलेले, घोड्यांच्या टापांचा आवाज, मोटारीचे आवाज- सारे स्पष्ट ऐकू येत होते.

दोन मिनिटेसुद्धा स्वस्थ बसू न शकणारी ही पंचवीस–चाळीस वानरे पंधरा पंधरा मिनिटे योग्यांसारखी बसलेली पाहून दृश्य अद्‌भुतच वाटत होते …

शांतीचा खेळ ही मॉन्टेसोरी पद्धतीतली अत्यंत मौलिक अशी गोष्ट आहे. मुले सदैव वळवळ, धडपड करत असतात, याचे मुख्य कारण म्हणजे त्यांना कुणी शांत बसायचे दाखविलेलेच नसते. एखादा पदार्थ कधी तोंडात घातलाच नसला तर त्याची गोडी कशी कळावी ? धाक दाखवून शांत केले की मुले दुप्पट दंगा करतात.

पण येथे शांती हा मुलांचा एक अनुभव असतो. मनावर त्याचा ताण नसतो. त्यामुळे बहुतेकांना मजा वाटते. कारण एक प्रकारचा विसावा त्यांना त्यात मिळतो. बालक मोठ्या माणसांपेक्षा जास्त आणि सतत मेहेनत करीत असते. शांतीच्या खेळामुळे त्याची क्रिया-शक्ती वाढते. ज्ञानेंद्रिये तीव्र होतात.

त्यामुळे बालमंदिरात मुले आपण होऊन आठवण करीत असतात की, " शांतीचा खेळ खेळू या ना ! " " अंधार–उजेडाचा खेळ केव्हा खेळायचा ? "

…रमा रोज परसाकडे जायची. एकटी दुकटी नव्हे तर एक लहानशी फौज जमवून लष्करी थाटात !

संगीताचा पहिला कार्यक्रम संपला की रमाचा कार्यक्रम सुरू व्हायचा. तिने सूण करायचा अवकाश की तिचे टोळके तयार. वेळप्रसंगी कुणाकुणाला बळजबरीनेही ती आपल्या लव्याजम्यात सामील करी ! मग टमरेल घेणे, पाणी भरणे आणि मग पंधरावीस मिनिटे हातपाय धुण्याच्या क्रियेत जायची.

एकूण रोज असा एक तास जायचा. आता परसाकडण्यासारख्या नैसर्गिक क्रियेला बंदी काय करायची ? पण नाही केली तर रमाच्या सैन्यातली भरती वाढत जाऊन निम्मी शाळा परसातच भरू लागायची !

ताईंनी रमाला म्हटलं,

" घरीच का नाही परसाकडे जाऊन येत ? "

चतुर रमाने उत्तर दिले,

" पण इथे पुन्हा लागते ना ! "

" मग एकटीच जात जा. एकदम सगळी कशाला इवीत बरोबर ? "

यामुळे रमाच्या फौजेतली शिबंदी खूपच रोडावली. परंतु ती बाहेर इतर वर्गातल्या मुलांशी बोलत वेळ काढीच.

एक दिवस गायनाचा कार्यक्रम आटोपल्यावर ताईंनी म्हटलं,

" रमा, तू परसात जाऊन ये. मग माझ्याकडे ये. "

मग तिची चौकशी करीत, घरी किती वेळा परसाकडे जातेस, केव्हा जेवतेस इ. विचारीत त्यांनी तिला वर्गात नेले. सर्व साधने दाखवून त्यांच्याशी कसे खेळायचे हे त्या समजावत गेल्या. रमा प्रत्येक साधनाशी एकेकदा खेळून ते हातावेगळे करत होती.

दोन दिवस असे गेले; परंतु पुन्हा मग रमाची परसाकडे मोहीम !

दरवेळी ताराबाई सांगत,

" रमा, तू एकदा परसाकडे जाऊन ये नि मग ये. "

हळू हळू त्यांच्या लक्षात आले रमाच्या क्रियाशक्तीला आहेत ती साधने पुरेनाशी झाली आहेत. तिला काही तरी नवीन, निराळा उद्योग हवा आहे. परसाकडे जाणे हे नैसर्गिक नसून वर्गात उद्योग न राहिल्यामुळे हा उद्योग, खेळ तिने शोधून काढला आहे.

दुसऱ्या दिवशी ताई म्हणाल्या, " रमा, तुझ्यासाठी एक छान रंगाची पेन्सिल आहे. चित्र काढायची आहेत का ? — देते. "

रमाने थोडा वेळ चित्रे काढली पण मग ती परसाकडे गेलीच.

तिसऱ्या दिवशी मात्र रमा आल्या आल्याच म्हणते,

" मला पेन्सिल देणार ना, आज पण ? "

ताराबाईंनी मुद्दामच म्हटले,

" गाणे म्हणून झाले की देईन. "

संगीताचा कार्यक्रम झाल्याबरोबर रमा आपण होऊन ताईकडे गेली.

रमा चित्रकलेत तल्लीन झाली.

परसाकडे जाणे बंद झाले.

…आणि मायलेकांची एक जोडी एके दिवशी शिशुविहारात आली ती वाजतगाजतच. हेमंत मुसमुसत होता. नुकतेच रडून झाल्याप्रमाणे त्याचे गाल ढगाळ दिसत होते आणि आईचा चेहरा लालसर होता. तिच्या डोळ्यांत अजूनही प्रक्षोभ होता.

आपल्या गुन्हेगार बाळाला तावडतोब ताईपुढे उभे करून आई करारी स्वरात म्हणाली,

" हं, ताईंच्या पाया पड आधी आणि सांग त्यांना ! म्हणावं, पुन्हा नाही करणार मी चोरी … म्हण ! "

पण हेमंत म्हणत नव्हता ! आपला अपमान, राग, दुःख सारे रडण्यातून व्यक्त करत तो नुसताच उभा होता. " हे पाहा, आधी मला सांगा तरी, काय केलंन यानं ते ! "

मग ताईंना हेमंतचा गुन्हा समजला. आदल्या दिवशी हेमंतने शाळेतले एक खेळणे गुपचुप घरी नेले होते. ' चोरून ' ! सकाळी धुणे भिजवताना आईला त्याच्या चड्डीच्या खिशात ते सापडले होते—आणि तिचा भडका उडाला होता.

हेमंतची आई चांगल्या घरात, सुसंस्कृत वातावरणात वाढली होती. ती आपल्या घरात सुसंस्कृत वातावरण टिकवत होती. आपल्या मुलाने चोरी करावी यात तिला स्वतःचा

पराभव वाटत होता. हेमंतच्या गालावर तिने चापट तर चढवली होतीच शिवाय देवासमोर त्याला नाक घासायला लावले होते, आणि "पुन्हा चोरी केलीस तर जेवायला वाढणार नाही तुला, बस मग उपाशी!" अशीही धमकी वर दिली होती...

प्रथम त्या अस्वस्थ आईला शांत करून मग ताई म्हणाल्या,

"हे बघा, तुमच्या हेमंतनं शाळेतला खेळ घरी नेला खरा, पण त्यानं चोरी केलेली नाही, मी त्याला 'चोर' म्हणणार नाही. 'चोरी' या शब्दाचा अर्थ आणि गंभीरपणा त्याला कळतो का? एखादी वस्तू आवडली की मोठ्या माणसालासुद्धा ती आपल्या संग्रही असावी असं वाटतं. मग हे तर लहान मूल. घरची वस्तू ती आपली, आणि शाळेतली दुसऱ्यांची– हा फरक तरी त्याला कुठे समजतो आहे? शाळा त्याला घरासारखीच वाटते. त्याच्या मते त्यानं फक्त ते खेळणं या खिशातून त्या खिशात ठेवलं आहे! असं करू नये असं त्याला समजावून सांगणे हे तुमचं, माझं कर्तव्य आहे. त्याला ही सवय लागू देऊ नका– उत्तेजन तर मुळीच देऊ नका. पण त्याच्या या लहानशा चुकीला, कृतीला तुम्ही गुन्हादेखील समजू नका, त्याबद्दल त्याला शिक्षा तर मुळीच करू नका..."

त्या दिवसापासून शिशुविहाराच्या पहिल्या दिवशी प्रत्येक पालकाकडे चिठ्ठी जाऊ लागली, "आपल्या मुलाने शाळेतील एखादी वस्तू घरी नेली तर ती दुसऱ्या दिवशी परत करावी. त्याबद्दल त्याला शिक्षा करू नये किंवा मारू नये." आणि रोज शाळा सुटायच्या वेळी एक परडी मुलांमध्ये फिरवली जाऊ लागली.

"कोणी कोणी काय काय खिशात ठेवलंय ते परत टाका बरं या टोपलीत!"

मुले निमूटपणे आपल्या खिशातून एकेक चमत्कृतीपूर्ण वस्तू बाहेर काढून टोपलीत टाकत. रंगीत खडू, दट्ट्या, कागदाची नक्षी, कधी कधी तर टोपली 'चोरीच्या' मालाने भरून जाई!

...मुले नेहमी प्रत्येक गोष्टीचे अवलोकन करून, विचार करून कार्यकारणसंबंध शोधीत असतात. सृष्टीला समजून घेण्याची ही मनुष्याची स्वाभाविक भूक आहे. म्हणूनच विज्ञान हा केवळ उपयुक्त असा कृत्रिम विषय नाही. मुलांच्या कल्पनेतही कविकल्पनांपेक्षा वैज्ञानिक कल्पना जास्त दिसून येतात.

बालमंदिरातली एक चार वर्षांची मुलगी गोष्ट ऐकताना एकसारखी डोळ्यांची उघडझाप करत होती. तिने बऱ्याच वेळा तसे केल्यावर ताईंनी विचारले,

"असं का ग करतेस?"

ती मुलगी आपल्याला डोळे उघडे असताना जास्त समजते की बंद असताना याचा प्रयोग करत होती!

ती म्हणाली, "मला किनई डोळे मिटले की जास्त समजतं."



...चार वर्षांची सुधा रंगीत पेन्सिली आणि कागद घेऊन बसली होती. वेड्यावाकड्या रेषांची बरीच चित्रे तिने काढून पाहिली. अखेर एक चित्र तिच्या मनासारखे जिवाले. ती ते घेऊन हसत हसत ताराबाईंकडे गेली.

"ताई, हे पाहा, तुला वाटेल की हे हिरवे गवत आहे. पण ते पाणी आहे बरं का."

ताराबाईंना तिच्या बोलण्याचा अर्थच समजला नाही. तिची आई आल्यावर तिने उलगडा केला.

मागील महिन्यात ती मंडळी कल्कऱ्याला गेली होती. पावसामुळे जिकडे तिकडे लहान लहान तळी साचली होती. काही तळ्यांतले पाणी स्वच्छ होते, काही तळ्यांमध्ये कमळे फुलली होती, तर काही तळी शेवाळ्यामुळे हिरवीगार दिसत होती.

एकदा पिकनिकला गेले असताना सुधा म्हणाली,

"आई, ते पाहा शेत."

"नाही, शेत नाही. पाणी आहे." आई म्हणाली.

"अंहं! गवत तर दिसतं आहे..."

तेव्हा आईने सुधाची खात्री करून देण्यासाठी एक लहानसा खडा फेकला. सगळीकडे पाणी उडाले. सुधाने चारी बाजूंनी खडे टाकून पाहिले आणि ते गवत नव्हे, पाणीच आहे याची खात्री करून घेतली होती.

—आणि हे तळे आज तिने काढले होते!

ताराबाईंना कौतुक वाटले. वरून गवतासारखे दिसत असूनही आत पाणी असू शकते हा सृष्टीचा एक आश्चर्यकारक असा नवाच प्रकार सुधाने पाहिला होता. आणि हा अनुभव चित्ररूपाने पक्का करण्याची संधी आज तिने घेतली होती.

—ताराबाईंना आज असेही वाटले की या मुलीला शाळेत बसवून चेंडू, घर, आंबा, कमळ अशीच नेमलेली चित्रे काढायला शिकवली असती तर आज तिला आपण पाहिलेले एक दृश्य रंगात उभे करण्याचा आनंद मिळाला असता का?/

...भगवान बुद्धाच्या भावाने एकदा एका हंसाला तीर मारून घायाळ केले. सिद्धार्थ धावत गेला आणि हंसाला मांडीवर घेऊन त्याने उपचार सुरू केले.

भाऊ म्हणाला,

"हंस मला दे. तो माझा आहे. मी त्याला मारले आहे."

सिद्धार्थ म्हणाला,

"देणार नाही. हंस माझा आहे, कारण मी त्याला वाचवलं आहे."

प्रकरण न्यायासाठी अखेर दरबारात गेले. मोठमोठ्या विद्वानांना प्रश्न पडला, पक्षी

कुणाचा ? मारणाऱ्याचा की जीवदान देणाऱ्याचा ?

—आईचा हात धरून दूर जाणाऱ्या इंदूकडे पाहून ताराबाईंच्या मनातसुद्धा पुन्हा पुन्हा हाच प्रश्न उत्पन्न होत होता.

इंदू कोणाची ? हे मूल कोणाचे ?

इंदू एक फार हळवी, हळुवारपणे फुलविली तरच फुलेल अशा स्वभावाची मुलगी होती. ताराबाईंच्या कुशलतेमुळे ती शिशुविहारात रुळली होती. तिथे तिचा विकास निरोगीपणाने होत होता.

पण आज अचानक इंदूचे पालक येऊन तिला तेथून उपटून घेऊन गेले होते.

आपली मुलगी गोड आवाजात 'ये ग ये ग सरी' म्हणते याने त्यांचे समाधान झाले नव्हते तर तिने किनऱ्या आवाजात स्वतःलाही न कळणारे, "बा ऽ बा ब्लॅक शीप, हॅव्ह यू एनी वुल...?" हे नर्सरी ऱ्हाइम म्हणावे असा त्यांचा आग्रह होता. त्यासाठी आज त्या मूळच्या बुजऱ्या, मंद मुलीला एकदम परक्या वातावरणात, परक्या भाषेच्या शाळेत ढकलण्याकरता ते घेऊन गेले होते. ताराबाई त्यांची समजूत घालू शकल्या नव्हत्या. कोपऱ्यावर वळून अदृश्य होणाऱ्या इंदूकडे पाहून त्यांचे मन आक्रंदत होते.

—हे मूल कोणाचे ? त्याच्या संगोपनाची, मनोविकासाची अहोरात्र चिंता ठेवून, ते बालमन प्रसन्न राखून त्याचा विकास करण्यासाठी धडपडणाऱ्या ताराबाईंचे की वरण-भात-पोळी इ. शारीरिक पोषण देऊन हक्काने आपल्या सत्तेचा दुरुपयोग करून, अजाणतेपणाने, तिची प्रगती खच्ची करणाऱ्या, अकारण तिला न झेपणारा चढ चढायला लावणाऱ्या पालकांचे ?।

...बालकाची जगाकडे पाहण्याची दृष्टी नेहमी प्रश्न व उद्‌गार चिन्हांकित असते. त्यांच्या डोळ्यांना फूल, ढगांचे आकार, अर्धा लाडू हे सर्वच विषय जिज्ञासेचे असतात.

बाळ नावाचा एक पाच वर्षांचा मुलगा एके दिवशी मातीकामात रंगला होता. त्याच्या पुढ्यात एका पसरट भांड्यात एक मातीचा गोळा होता. एक लाकडाची फळी, पाण्याची वाटी आणि फडके होते. समोर तयार झालेली चित्रे वाळवण्यासाठी ओटा होता; ती रंगवण्यासाठी रंगांचे साहित्य होते.

—ही माती इथे मुलांच्या स्नायूंना बळकटी देते. त्यांचे हस्तकौशल्य वाढवते. मातीच्या माध्यमातून मुलांची कल्पनाशक्ती चेतवली जाते.

बाळने मातीचे काही मणी केले. ते त्याने त्याची चित्रे मांडायला जो ओटा होता त्यावर ठेवले नाहीत. बराच वेळ तो विचारात पडल्याप्रमाणे मण्यांकडे पाहत होता. शेवटी तो उठला आणि मणी घेऊन धावतच ताईकडे गेला.

"यांचे भाग पाडू का मी ?"



"पाड."

थोडं आठवून बाळ म्हणाला,

"आपल्याला सगळ्यांना किती किती येतील, सांगू ?"

"किती येतील ?"

"दोन, दोन ! दोन दोन !"

डोक्यात चाललेली भागाकाराची क्रिया पूर्ण करून बाळ हसू लागला. ताईंही शाबासकीचे हसू हसल्या आणि बाळ पुन्हा मातीकामाकडे वळला.

—येथे कुणी पाढे घोकून घेऊन, परवचा घोटून घोटून त्यांची ही नैसर्गिक गणिती जिज्ञासा मारून टाकणार नव्हते. इथे कुणी त्याला गणितकुशल करण्यासाठी, ठराविक ज्ञान ठराविक वेळात त्याच्या डोक्यात कोंबण्यासाठी युक्त्याप्रयुक्त्या योजणार नव्हते.

...मॉन्टेसोरी पद्धतीत 'चिठ्ठी-वाचन' हा एक खेळासारखा वाचनप्रकार असतो. निरनिराळ्या सोप्या मजकुराच्या चिठ्ठ्या केलेल्या असतात. एक चिठ्ठी वाचली की दुसरी वाचावीशी वाटेल असा मजकूर असतो. छोटी छोटी वाक्ये असतात.

उदाहरणार्थ– 'ताईला टाळी देऊन ये.'

'पाय उचल.'

'मला हात लाव.'

'दार उघड.' अशी ती छोटी वाक्ये असतात.

चिठ्ठीवाचनाचा क्रम असा की मुलाने प्रथम मनात चिठ्ठी वाचायची, मग त्याप्रमाणे कृती करायची आणि शेवटी ती चिठ्ठी मोठ्याने वाचून दाखवायची.

आधी मूकवाचन, मग कृती व शेवटी मुखवाचन या क्रमामुळे मुलांमध्ये अर्थ समजल्याखेरीज वाचावयाचा दोष राहत नाही. हसतखेळत वाचन होते !

...दिवाळीची सुटी सुरू झाली होती. भाऊ ( बाळ ओझरकर नावाचे एक शिक्षक ) सुटीत अमरावतीला जाणार होते. अरविंदने हट्ट करून कबूल करून घेतले होते की गावाला जाण्यापूर्वी आमच्याकडे यायचे. त्याप्रमाणे भाऊ शेवटच्या दिवशी त्याच्याकडे गेले.

"आई, भाऊंना चहा दे."... "फराळाचं दे ना."... "भाऊंना मी रशियाची रेकॉर्ड लावून दाखवणार आहे."

अरविंदची नुसती धांदल उडाली. भाऊंचे ठरल्याप्रमाणे पाच मिनिटे बसणे झाले. ते घाईत होते; ते म्हणाले,

"बरंय, मी निघतो आता. नमस्कार."

"थांबा हं, आता येतो." म्हणून अरविंद आत गेला. थोड्या वेळाने तो पाटी

घेऊन बाहेर आला आणि म्हणाला, " भाऊ, चिट्ठी वाचा आणि तसं करा. "

पाटीवर लिहिले होते,

" भाऊ, जाऊ नका. "

भाऊ चकितच झाले. चिट्ठी वाचल्यावर तशी कृती करणे भागच असते. भाऊ आणखी थोडा वेळ बसले !

...लेखनही या बालमंदिरात निराळ्याच तऱ्हेने शिकविले जाते. प्रथम नुसती अक्षरेच हाताळणे, सारख्या अक्षरांच्या जोड्या काढणे, शब्दासारखा शब्द जुळवणे हे चालू असते. मुलावर कोणत्याही प्रकारे लेखन सुरू करण्याची सक्ती केली जात नाही. कळी उमलून तिचे फूल होते तशी योग्य वेळी मुलाच्या हातून स्वयंस्फूर्तीने लिहिण्याची क्रिया होऊ लागते.

" मॉन्टेसोरीबाईंच्या शब्दांत—"The children burst into writing. "

लेखन एकदा सुरू केले की श्रुतलेखन, गतिलेखन, सुलेखन आणि शुद्धलेखन असे एकेक पक्के करून घेतले जाते.

आपल्या मुलांना लौकर लिहिता-वाचता आले पाहिजे म्हणून आग्रह धरणाऱ्या पालकांना ताराबाई म्हणत, " अहो, लिहायला-वाचायला तुमची मुलं आपण नको म्हटलं तरी शिकणारच आहेत. पुढे जन्मभर त्यांना तेच करायचं आहे. जरा उशीर झाला तर काय बिघडतं ? सध्या तुमच्या मुलाच्या आतून सळसळणाऱ्या क्रियात्मकतेला मुबलक वाव द्या. त्याची चळवळणारी ज्ञानेंद्रियं, कर्मेंद्रियं आमच्यापाशी ' उद्योग ' मागताहेत. त्यांनी शोधलेली कामं घरी तुमच्या पसंतीला उतरत नाहीत. इथे तो बागकाम करितो, भांडी घासतो, शिडी चढतो, बाटलीत नरसाळ्याने पाणी भरतो... खरोखर मोठ्या मंडळींकरिता जसं निरक्षरतेविरुद्ध बंड करतात तसं बालकांच्या बाबतीत साक्षरते-विरुद्ध बंड उभारायला हवं आहे ! ही अकाली साक्षरता मुलांची जिज्ञासा खच्ची करते —त्यांच्या बुद्धीचं ताजेपण घालवते, त्यांची मौलिकता दाबते... "

...शिशुविहारात छोटी छोटी शेते पेरायची होती. मुलांना कल्पना फारच आवडली. पण दाणे कुठून आणायचे ?

" चला, आपण दाणेवाल्याकडे जाऊन विकत आणू. "

प्रत्येकाला १-१ पैसा मिळला. यादी तयार झाली. प्रत्येकाने आपण काय आणणार हे नक्की केले.

जोड्या जोड्या करून खाडखाड फुटपाथवरून निघाले शेतकरी दाणेखरेदीला !

" अहो, मला पैशाचे चणे द्या ! "



" मला बाजरी. "

" मला घौ द्या घौ ! "

आपापली पुडी मुठीत घट्ट धरून मोठ्या उत्साहाने शेतकरीमंडळ परतले.

दुसऱ्या दिवशी बालशेतकऱ्यांची एक पंगतच बसली पेरणीला. प्रत्येकाच्या समोर एकेक तसराळे होते. मुलांनी त्यात माती घातली. दाणे पेरले आणि तसराळी उन्हात ठेवून बसली आपण शेजारीच—केव्हा झाडे उगवताहेत ते पाहायला ! दाणे उगवायला तीन दिवस लागतात ही चेंगट माहिती मिळाल्यावर ती फारच नाराज झाली.

दुसऱ्या दिवशी सगळ्यांची शेते पावसाने तुडुंब भरली होती तरीसुद्धा शेतकरी वर्गाने आल्याबरोबर उत्साहाने आपापल्या शेतांना भरपूर पाणी दिले. मग सर्वांनी मिळून जास्तीचे पाणी काढून टाकले. दुपारी सगळी मडकी उन्हात ठेवली. रोज हळक्या-हळक्याने थोडे थोडे पाणी पुरवायचे, वगैरे ठरले.

आणि मग आईला टाटा करून बाळाने शिशुविहारात यावे तसा जमीन फोडून एकेक कोंब वर आला. शेतकऱ्यांची नुसती धांदल उडाली. काहींची शेते भराभर फोफावली; पाने आली. मूग-मटकीची पिके लौकर वर आली; गहू-तांदूळ या मंडळींनी पाच पाच दिवस घेतले. काही दाणे मुंग्यांनी खाल्ले, मग ते परत पेरले, मुंग्यांपासून रक्षण करायचे ठरले. रोज नेमाने शेताजवळ बसून चर्चा चालायची. कोणाचे काय-काय, किती-किती उगवले... काहींनी रोपटी उपटून पाहिली. कुणी तर मोडच खाऊन पाहिला. तसराळे जरा सावलीत ठेवले की रोपटे सूर्यप्रकाश मिळवण्यासाठी उन्हाकडे झुके !

स्वतः उगवलेली ती वीत-वीत उंचीची झाडे म्हणजे मुलांच्या फुशारकीची बात होती. आठदहा दिवसांनी शाळेत प्रदर्शन होते. भाऊ-ताईमंडळींनी वेगवेगळ्या रंगी-बेरंगी धान्यांचीच रांगोळी काढली. मुले भराभर दाणे ओळखत होती !

हे दाणे मग निवडले गेले, रोवळ्यात घालून धुतले गेले, भिजत घालून त्यांचे ढोकळे झाले.

—नि मुलांच्या पोटात जाऊन बसले !

...एक मुलगा सारा वेळ खूप गडबड, धावपळ करायचा आणि शेवटी मग काहीतरी कारण काढून रडायचा आणि ' घरी जायचं ' म्हणून सूर धरायचा.

त्याच्या जिवाला, मनाला, डोक्याला एका क्षणाची शांती म्हणून नसे. स्थिरता नसे.

मुलांना मोजायला रोज खूप दगड लागत. ताईंनी हे काम त्याच्यावर सोपविले. अंगणातले ठराविक आकाराचे दगड वेचून आणायचे. तो मुलगा हे काम खूप हौसेने करू लागला. मुलांना लागणारे दगड पुरविण्याचा त्याने कारखानाच उघडला. रोज

संगीत झाले की त्याला घाई व्हायची.

" ताई, दगड आणायला जाऊ ? "

ताईंनी त्याला या कामासाठी एक स्वतंत्र पेटीच करून दिली होती. तेवढे आपले खास काम मन लावून करून झाले की तो प्रसन्नतेने हसून घसरगुंडीवर घसरायला जायचा. पहिला आक्रस्ताळेपणा जाऊन हळू हळू तो शांत आणि स्थिर मुलगा झाला.

...अजित नावाचा एक छोटा मुलगा सारखे प्रश्न विचारी. " भंडावलं ग बाई याच्या चौकशांनी ! " अशी त्याच्या आईची आणि ताईंचीही गोड तक्रार असे. एक चौकस मुलगा म्हणून तो शिशुविहारात प्रसिद्ध झाला होता.

एके दिवशी ताई सारख्या अजितच्या अवतीभवती राहिल्या. त्याच्या प्रश्नांना एकीकडे उत्तरे देत त्या त्याच्या प्रश्नांची मनोमन नोंद घेत होत्या. दोन दिवसांच्या निरीक्षणानंतर ताईंनी त्याच्या सर्व प्रश्नांना एक कॉमन उत्तर शोधून काढले— ' स्वतःचे डोके वापरा. '

...अजितच्या आईला व ताईंना त्या म्हणाल्या,

" अजित मोठा विचारी आणि जिज्ञासू मुलगा आहे. तुम्ही त्याला मार्गदर्शन जरूर करा परंतु त्याच्या जिज्ञासेला तयार उत्तरे पुरवून तुम्ही तर त्याला आळशी बनवत आहा ! "

अशाने मुले स्वतः विचार न करता आळसाने नुसतेच प्रश्न विचारणारी बनतात. या मुलांना ज्ञानपिपासू समजण्याची दुसरी चूक आपण करतो !

" पाऊस कुठून पडतो ? "

" आकाशातून. "

अशा प्रश्नोत्तरांपेक्षा " तू सांग बघू ! पाऊस पडतो तेव्हा आकाशाचा रंग कसा दिसतो, आठव बरं... "

अशा प्रकारचे प्रश्नार्थक बोलून उत्तर त्याच्याकडून काढून घेणे अधिक चांगले.

मुलाच्या बुद्धीला पांगुळगाडे न पुरवता जेथे जेथे तो आपले डोके चालवू शकेल तेथे तेथे त्याला ते चालवू द्या ! ज्या उत्तरांमुळे मुलांची विचारशक्ती अधिक बलवान होईल अशी उत्तरे मुलांना द्या !/

...शिशुविहारातल्या मुलांना रूढ, शालेय अर्थाची शिस्त नसे. खुद्द ताईंच्या खोलीतही मुले येत, खेळत, लोळत. त्यांच्या संचाराला कुठलीच लक्ष्मणरेषा नव्हती. थोडक्यात, इथले संस्थाप्रमुख, शिक्षक आपली ' ठेवून ' घेत नव्हते ! शिशुविहारमधली ही खेळीमेळी पाहून काही लोक ' ही ताईमाईंची शाळा हो ! ' अशी टिंगल करीत असत.

एक दिवस एक अत्यंत कडक आणि चोखंदळ म्हणून गाजलेल्या शाळातपासनीस मिस् रुस्तुम भर दुपारच्या वेळी शाळा तपासायच्या कामावर आल्या. पाहतात तो सर्वत्र सामसूम ! मुले, शिक्षक कुणाचाच आवाज येत नव्हता. डिप्टीबाईंना कसली तरी शंका आली. तेवढ्यात एका दाराने एक बाई बाहेर आल्या.



" काय हो, आज तुमची शाळा बंद आहे का ? "

" नाही ! " त्या शिक्षिका आश्चर्याने म्हणाल्या, " चालू आहे की, आत या. "

आत जवळ जवळ शंभर मुले आपापल्या व्यवसायात मग्न होऊन बसलेली मिस् रुस्तुमना दिसली. शिस्त हा संस्कार येथील मुलांवर निराळ्याच मार्गाने केला गेला होता. सक्ती, धाकदपटशा, बंधन यांपैकी कुठलीही ' छडी ' न वापरता ताईमाईंच्या शाळेने मिळविलेले हे यश अपूर्व होते.

...तीन वर्षांचा कृष्णा मोठा बंडखोर आणि खेळकर मुलगा होता. तो आणि त्याची मोठी बहीण अशी दोघे गड्याबरोबर शाळेत येत. गडी त्यांना पोचवून लगेच घरी जायचा. दोन्ही मुले पहिल्या दिवसापासून आनंदाने शाळेत राहू लागली. इतर मुलांना मात्र ओळख होईपर्यंत घरची माणसे जवळ बसायला हवी असत. त्यामुळे या दोघांचे ताईंना विशेष कौतुक वाटे. बोबडा कृष्णा तर " ताई ग ताई " करून ताराबाईंच्या मागेमागेच असे.

पण आतून त्याला तितकेसे सुरक्षित वाटत नसावे. चौथ्या दिवशी त्याने एक त्यांच्या उंचीच्या मानाने भली मोठी काठीच बरोबर आणली !

" अरे कृष्णा, ही काठी कशाला आणलीस ? "

कृष्णा गोड आवाजात म्हणाला,

" ही मी तुला मारायला आणली आहे. "

ताराबाईंना गंमतच वाटली.

" असं का ? आण तर मग ती इकडे. मी ठेवून देते ती नीट कोपऱ्यात. "

तशी कृष्णाने चटकन् ती ताराबाईंकडे दिली. ताराबाईंनी ती कुठे ठेवली हे त्याने नीट पाहून घेतले आणि मग तो समाधानाने खेळायला गेला.

कृष्णाच्या काठीची ताराबाईंना मोठी मजा वाटत होती. कृष्णा तिचा उपयोग कधी करतो याची त्या वाट पाहत होत्या. त्यांनी कृष्णाशी आपले जे वर्तन होते त्यात काहीच बदल केला नाही.

कृष्णाला येथेही घरच्याप्रमाणे सदा आपलेच घोडे पुढे दामटावे असे वाटे. पण इथे घसरगुंडीसारख्या खेळांमध्ये पाळीपाळीने जावयाचे असे. पण हा छोटा धटिंगण पुष्कळ वेळा इतरांना मागे सारून पुढे जायचा प्रयत्न करी. एखादे खेळणे हवेसे वाटले की दुसऱ्या मुलाच्या हातून ते ओढून घ्यायला त्याचे हात शिवशिवत. अशा वेळी तारा-

बाईंना मध्ये पडावे लागे. अशाच एखाद्या प्रसंगी काठीचा भरपूर प्रयोग आपल्या पाठीवर होणार अशी ताराबाईंची कल्पना होती. परंतु कृष्णाने कधी साधा हातसुद्धा उगारला नाही. काठी मारण्यासारखा प्रसंग आला की चेहऱ्यावर गोड हसवा धारण करून कृष्णा जरा वेळ बाजूला उभा राही व मग पुन्हा घसरगुंडीकडे धाव घेई.

ताराबाईंच्या मनात पुन्हा पुन्हा येई— या काठीचे कृष्णाच्या शाळाजीवनात नक्की स्थान काय ? वेळप्रसंगी त्यांनाच मारायला त्याने जर आणली होती तर मग ती म्यानातच का राहत होती ?

... आतापर्यंत कृष्णा घरच्या सुरक्षित वातावरणात वाढला होता. आई, आजी, वडील त्याला क्वचित रागवत, मारीत असतील पण तीच माणसे त्याचे लाड, कौतुक करणारी.

घर सोडून प्रथमच बाहेरच्या जगात आल्यावर त्याला आधाराची जरूर वाटू लागली. मोठी बहीण बरोबर होती, त्यामुळे तो शाळेत तर येऊ लागला. तेथे त्याने पाहिले की इथली बाकी सगळी मुलं गुंडाळून ठेवता येतील अशी आहेत. पण ही ताई ! ही इथे सर्वांत मोठी दिसते. हिचे काय करावे— या प्रश्नाला उत्तर म्हणून ती काठी !

गावाबाहेर, जंगलात जाताना माणूस पिस्तूल बाळगतो, त्यापैकीच ! आपल्या स्वतःच्या हत्याराच्या जोरावर तो शूरपणाने शाळेत येत होता. कृष्णाने ती काठी कधीच वापरली नाही. उलट हळूहळू त्याची आणि ताराबाईंची दोस्ती वाढतच गेली. “ए ताई ग ऽ आज मला नवा रुमाल दिला अण्णांनी ऽऽ.”

“ताई, आज ते तेंडूचं गानं म्हणायचं हां !”

“मी तुझ्याजवळ बसनार ग ऽ”

“—हे तू ठेव हं,” म्हणून आपला खडेमातीचा मूल्यवान खजिना विश्वासाने आपल्या या मैत्रिणीच्या पदरात आणून ओतायचा.

कृष्णाच्या काठीने कुणाच्याच पाठीवर न पडता कोपऱ्यातल्या आपल्या निमूट अस्तित्वाने आपली कामगिरी बजावली होती !

“हां ! ताईंना असं म्हणायचं का ? चल, नमस्कार कर त्यांना. आण ती काठी इकडे ?” असे कृष्णाच्या पालकांनी म्हटले नव्हते आणि गुन्हा घडण्यापूर्वीच त्याची कानउघाडणी केली नव्हती. आणि ताईंनीही “मला मारणार आहेस, काय ! वा रे !” म्हणून, गुरकावून त्याची काठी हिसकावून घेऊन खिडकीबाहेर फेकून दिली नव्हती.

त्यामुळेच बालमनाचा हा सुंदर स्नेह ताराबाईंना लाभला होता.

—कृष्णाची काठी बरेच दिवसांनी आवराआवर करताना कुणीतरी टाकून दिली. नवीन इमारतीत जाताना या काठीची अडगळ कशाला, असेही कुणाला वाटले असेल.

“ती काठी असती तर मी तिला शाळेच्या संग्रहालयात महत्त्वाचं स्थान दिलं असतं.” ताराबाई म्हणाल्या.



शिशुविहार पाहायला आलेल्या आपल्या मामेभावाला ताराबाई मोठ्या कौतुकाने, उत्साहाने ‘ कृष्णाची गोष्ट ’ सांगत होत्या. ती कौतुकाने ऐकता ऐकता त्या भोळ्याच्या मनात आले, “ताराबाई, या कृष्णाला समजून घेण्यासाठी असलेली चिकाटी, समंजसपणा तुमच्याकडे त्या ‘ कृष्णाजी ’ साठी नव्हता का ?...की... !”

शिशुविहारला लागून असलेल्या इमारतीत, पाटणकरांच्या घरात त्यावेळचे मुंबई राज्याचे एक शिक्षणाधिकारी राहत असत. ताराबाईंचे बालमंदिर आणि त्यांचे घर यांमध्ये फक्त एक कुंपण होते. या गृहस्थांचे ताराबाईंनी चालविलेल्या या अभिनव शिक्षण-प्रयोगाकडे बारीक लक्ष होते. त्यांना सवड होई तेव्हा तेव्हा ते गॅलरीत उभे राहून शिशुविहारमधले कार्यक्रम पाहात. हे अधिकारी शाळातपासनीस होते. शिशुविहारची ते रोज तपासणी करीत आणि रोजच ताराबाई पास होत !

... शिशुविहारचे पहिले दोन महिन्यांचे सत्र पुरे होत आले होते. मुलांमधली प्रगती जाणवत होती. एक लहानसा शिस्त असलेला बालसमूह तेथे तयार होत होता. या छोट्याशा समाजव्यवस्थेचे कायदे मुलांना समजू लागले होते. घर्षण तर होणारच, परंतु उगाच कुणी कुणाच्या वाटेला जायचे नाही. मिळूनमिसळून वागायचे, हिसकावून काही घ्यायचे नाही. घसरगुंडीपाशी क्रम लावायचा...

ताराबाईंची साधने प्रत्यक्ष पाहावी म्हणून ते गृहस्थ कपडे करून, फाटक उघडून शिशुविहारात आले.

ताराबाईंनी त्यांना मनापासून माहिती दिली—

“इतर शाळांमधून केव्हा, काय शिकायचं आणि ते किती वेळ शिकायचं हे सर्व आधीच नक्की केलेलं असतं. इथे आमच्या शिशुविहारातल्या सर्वांत छोट्या बेबीलासुद्धा माहीत असतं की आपण आता काय करावं. त्यांच्यासाठी आम्ही मातीची चित्रं, बंगलापेटीसारखी शैक्षणिक साधनं मांडून ठेवतो. बागकामही मुलांना आता आवडू लागलं आहे.

“प्रथम प्रथम या मुलांना नुसतं या अंगणातसुद्धा घेऊन फिरणं मला कठीण जात असे. आता दोन महिन्यांच्या आत तीच मुलं घेऊन मी राणीच्या बागेत जाऊन आले. आपापली तिकिटं मुलांनीच सांभाळली... आता यापुढली पायरी म्हणजे मनाची पूर्ण स्थिरता अन् त्यातून उत्पन्न होणारी एकाग्रतापूर्ण काम करण्याची सवय...”

इकडे मुले जरा कंटाळलीशी वाटली.

ताराबाई म्हणाल्या,

“चला, आता आगगाडीचा खेळ.”

एंजिन भक् भक् करत निघाले. पुढच्या डब्याचा शर्ट मागच्या फ्रॉकने धरलेला !

भक् भक् भक् भक्

हे...हे आलं चिक्कुगाव !
छुकुक्, छुकुक्, छुकुक्......
आंबेगाव आलंऽ उतरा, उतरा... चला पुढेऽऽऽ
झाडाझाडाला वळसे देत रेल्गाडी चाललीय.
थांबा थांबा, हे आलं नारळगाव.
आणि आता गेरेच जवळ आलं...

"मोटरबाई, मोटरबाई, आत आहात का ?
दार उघडा, दार उघडा, झोपलात का ?"

हसत खिदळत आगगाडी आत गेली.

...ताराबाई मोडकांच्या या बालशिक्षणकार्यात एवढा रस घेणाऱ्या त्या कुंपणापलीकडच्या शिक्षणाधिकाऱ्यांचे नाव होते, श्री. वि. द. घाटे.

श्री. विठ्ठलराव घाट्यांनी पुढे नेहमीच ताराबाईंच्या बालशिक्षणकार्याबद्दल आस्था दाखविली. त्यांनी या शाळेला सरकारने अनुदान ( grant ) व मान्यता द्यावी म्हणून खटपट केली आणि त्यांच्या या प्रयत्नांमुळे शिशुविहारला दोन विशेष अनुदाने ( Special grants ) मिळाली. तसेच त्यांच्या या शिफारशीमुळे मुंबईचे शिक्षणखाते शिशुविहार या संस्थेकडे ताराबाई मोडकांच्या नेतृत्वाखाली बालशिक्षण क्षेत्रात संशोधनपर कार्य करणारी एक प्रयोगशाळा, एक Pilot project म्हणून आस्थेने पाहू लागले.

# ९. प्रभा आणि केन्ही ( १ )

शिशुविहारचा पाया रचीत असताना ताराबाईंनी असे जे भगीरथ प्रयत्न केले ते करताना त्यांच्या घरगुती आघाडीवर शांतता नव्हतीच. ताराबाईंना नेहमी घरातल्या समस्या सोडवीत, बाळगीत बाहेरची झुंज जिंकावी लागे.

या काळातील ताराबाईंच्या संग्रहातील काही बोलकी पत्रे केन्ही, ताराबाई व प्रभा या तिघांच्या त्या काळातल्या मनःस्थितीवर चांगल्या प्रकारे प्रकाश टाकतात.

१९३६ साली प्रभाला ताराबाईंनी हुजुरपागेत शिकायला ठेविले होते; त्या काळात ताराबाईंना केन्हींनी लिहीलेले हे पत्र—

Amaravati Camp
27-8-36

My dearest Tara,

I got your letter on the 9th inst. and should have written to you earlier but for lack of mental vigour and energy. While the last two months I was lucky enough to get sufficient work (just sufficient ) this month has been frightfully bad. Gokhale and Awate come frequently and we talk of present terrible times. Of course, it tends to further depression but when we are together we can't think of any other topic. Writing becomes difficult. Gokhale is a member of the Provincial Election Board (Congress) and he will be asked to stand for the Amravati Urban Seat. He is bound to come in by overwhelming majority but is worried about the sinews of war. Poor Awate is in a worse plight. He can hardly get Rs. 40 a month ! ( You can imagine the intensity of the deprssion in the profession. ) These worries have reacted on his health and he has been looking very bad recently. Dr. Shahane asked him to have liver soup. So he comes to us for a cup since only yesterday.

The report about Prabha was indeed very gratifying and I felt that that was at least one thing bright in the dark and

gloomy outlook. On the 3rd I sent her a parcel of sweets – laddus, coconut-barfi and खव्याच्या वड्या. I shall tell you how I managed it. One day old Khare brought some laddus to the club and gave me one. I said it was nice and said Prabha would have enjoyed them. I added that I wished I could send her a parcel and asked him if he could get Mrs. Khare to take the trouble of making some. The old man readily agreed and a week later he sent the stuff all packed and ready for despatch. It cost Rs. 4/– but it was worth it every time. I thanked him and Mrs. Khare profusely and the old man was mighty pleased. I wrote to Prabha then. After a few days I got a letter from her saying she was glad to get my letter and the sweets. Just a few days back I have written her a long letter and expect a reply. I am enclosing her letter. I have asked her to be careful about her spelling, to be regular about taking exercise and medicine and not to worry about her studies.

I don't deny that both Yeshwant and Nana * may have a soft corner for me and that it is I who keep aloof from them. Under the present circumstances I can't help keeping myself aloof.

I am glad the Balmandir School is materialising.

... I left Bombay last year on the 12th or 13th Sept. A few days more and a year will have rolled by ! I haven't left this blessed place even once....

––One comforting thought is Prabha can be said to be free from the malody. Prabhudi ( प्रभुडी ) had her m. period regularly here.

Incidentally, Prabha brought a pyjama suit from a Chinaman ! Your daughter is very expensive. ( I can't complain. She inherits the buying from me. )

Love,
Ever yours
K. V.

* केव्हींचे दोन वडील बंधू – डॉ. ना. वा. मोडक व डॉ. य. वा. मोडक



ताराबाई बांसवाला असताना केव्हींनी त्यांना लिहिलेल्या या पत्रात चिरप्रसन्न केव्हींच्या मनाचा एक निराळाच कंगोरा प्रतिबिंबित झाला आहे––

14-11-35

My dearest Tara,

I am at the end of my tether. The agony of the soul, the mental depression, the loneliness make every minute of my present existence a heavy burden. I am afraid of myself. I can't concentrate on work and am leading a purposeless and useless life. I haven't the courage to put an end to myself. At the same time I feel I will go mad if I continue it longer. One sentence in your letter occurs to my mind everyday and a number of times a day. It is, ' Prabha thinks her happiness could be complete if Appa were with her. ' I have therefore come to the decision that I must leave this place and join you. If the job that H. H. had more or less just created for me is still available I accept it and would join you by the 30th of next month. Please see H. H. and let me know immediately. Winding up here is going to be a very difficult job and would take some time.

Friday ( 15th )

I had written the above yesterday but could not go on any further. I find the same difficulty today. I shall post it by to-day's mail. You will get this on Sunday. If prospects there are good you might even send a wire– just say ' All right ' and I shall understand therefrom that the job is available.

Well, darling I must close now. Love to Ptabhudi.

Yours ever,
K. V.

सोळा वर्षांच्या प्रभाने केव्हींना वसतिगृहातून लिहिलेले हे पत्रोत्तर, तिच्याच इंग्रजीत—

Huzur Paga, Poona.
5-8-36

My dear Appa !

I received your letter when I was going for my study. Realy I was overjoyed when I got it and especially you know in the boarding ! Now I have real idea how lonly you must be feeling there. Yes, now we three are in three places and each is alone, therfor each should write to every other. Was it not this a good idea ? But first of all I will have to make rid of my lazyiness. I think I will now be able to do it for I have learn a lesson from boarding life. Now let me answer your questions.

You have asked how I like the boarding life. I like this boarding and school. The girls are good, of course some are what we call in Marathi कुढकुढ but we aught to look generaily is it not ? The teachers are also good. I am not at all afraid of them, unless I have not done my lessons. Uptill now we had three fortnight exams. English, History and Geography. I am sorry to write that I got very poor marks in English $\frac{27}{50}$ and in History $\frac{21}{50}$. And in Geography God knows what I have done ! In English I had to leave one question on account of time. About mathematics, I think we will be able to know after the exam. I like French very much. Like English my spelling is bit weak but I think it much easier than Sanskrit. My French teacher had once taken my exam. In that I got $\frac{38}{50}$ marks.

Every fortnight we have permission to go home and come back in the evening and after a month we can stay at night also. Ai ( आई ) had come here therefore I had gone to stay at Sushlilakaku's for three days and we always go there and enjoy a lot in the jolly company of Nalini and ( नव्या वहिनी ).

When my turn comes I play begmington. I think I will start tennis in the next term for we do not get good rackets in this season. I think I will take medicines regularly. Sometimes we do forget do'nt we ?

Appa ! please tell me why did you trouble yourself in



sending those sweets. You will say– 'What a girl is this ! when I am sending her sweets she is scolding me in return.' But really there was no need of all these. But now we shall enjoy them. To-day I got them. I liked them very much.

Here we all ( I and Yamutai ) are well. Hope the same there.

Yours affly

Prabhudi

बांसदा सोडून महाराष्ट्रात आल्यावर स्थानबदलामुळे म्हणा, योग्य औषधपाण्यामुळे म्हणा– प्रभाच्या प्रकृतीत बरीच सुधारणा झाली होती. तिच्या दुखण्याला बराच उतार पडला होता. तिचे शिक्षण सुरळीत चालू होते. आपल्या बालशिक्षण कार्याच्या व्यापात प्रभाची आबाळ होऊ नये, हेळसांड होऊ नये म्हणून या काळात– म्हणजे पुणे सोडून मुंबईला येताना– काही दिवस ताराबाईंनी तिला पुण्याच्या हुजूरपागेत ठेवण्याचा प्रयोग केला. प्रभाची प्रकृती आता बरी होती. तिचे वयही होते पंधरा सोळा वर्षांचे, पंख फुटण्याचे. अशा वेळी तिला बरोबरीच्या मुलींचा सहवास मिळाला तर तिचे कुढणे कमी होईल, आपले खाजगी दुःख थोडे बाजूला ठेवायला ती शिकेल आणि तिचे शिक्षणही व्यवस्थित होईल, अशीही त्यांची कल्पना होती. त्या संस्थेबद्दलचे त्यांचे स्वतःचे अनुभव, आठवणी स्वच्छ होत्या, निरोगी होत्या.

परंतु हळव्या मनाची प्रभा तेथेदेखील रुळली नाहीच. प्रभाची आई तिच्या वडिलांना सोडून आली आहे, ती मुंबईला एकटीच राहून शिक्षणकार्य करीत असते— हे सारे तेथल्या मुलींना कळल्यावर त्या प्रभाला तऱ्हेतऱ्हेने डिवचू लागल्या, टोकू लागल्या. आणि बुजऱ्या स्वभावाच्या प्रभाने ते मनाला फार लावून घेतले. याच शाळेत एके काळी छोट्या ताराला मैत्रिणींनी 'पुनर्विवाहितेची कन्या' म्हणून बोचकारले, टोकले नव्हते का ? परंतु तारा खंबीर होती, तशी प्रभा नव्हती. अखेर ताराबाईंना हुजूरपागेचा बोटक प्रयोग लौकरच आवरता घ्यावा लागला. न्यूनगंडाने अधिकच पछाडलेली, अधिकच घुमी, लहरी झालेली प्रभा आईकडे परतली. आपल्याला घर हवे, आईवडलांसकट एकसंध घर हवे असा तिने ध्यास घेतला. वास्तविक एव्हाना ताराबाईंच्या स्वतःच्या सुखी सहजीवनाबद्दलच्या आशा पूर्णपणे मावळून गेल्यासारख्या झाल्या होत्या. ताराबाईंनी आता वयाची पंचेचाळीशी गाठली होती आणि उण्यापुऱ्या एकवीस वर्षांच्या वैवाहिक जीवनात जेमतेम सात, आठ वर्षांचा काळ त्यांनी केव्हींच्या सहवासात व्यतीत केला होता व तोदेखील सलगपणाने नव्हे. मुंबईचे त्यांचे शिक्षणकार्य नुकतेच कोठे आकार घेऊ लागले होते. दादर भगिनी समाजासारख्या मान्यवर संस्थेचा आणि दादर भागातल्या प्रतिष्ठित नागरिकांचा पाठिंबा त्यांनी प्रयत्नपूर्वक मिळविला होता; अशा वेळी

स्वतः ताराबाईंनी संस्था सोडून जाणे म्हणजे मोठ्या कष्टाने जमवीत आणलेल्या त्यांच्या कार्याला पूर्णविरामच. परंतु प्रभाच्या स्वास्थ्यासाठी त्यांची घालमेल होत होती. केवळ तिच्या कलाने घ्यावे, कुठून तरी तिला बरे वाटावे एवढ्यासाठी पुन्हा एकदा त्यांनी अमरावतीला परत जाण्याचा निर्णय घेतला. या निर्णयात उत्सुकतेपेक्षा अगतिकताच अधिक होती. अमरावतीला राहण्याचा प्रयोग सफल होईपर्यंत आपल्या संस्थेकडे बघणारे कुणीतरी असावे या विचारातून त्यांनी शोध घेण्यास सुरवात केली आणि त्यांना त्यांच्या बांसद्याच्या शिक्षकसखीची, श्रीमती सरोजताई ढवळे ( तोफखाने ) यांची आठवण झाली. सरोजताईंना त्यांनी कोल्हापूरहून बोलावून घेतले आणि आपले 'शिशुविहार' त्यांच्या हाती सोपवून त्या प्रभासह अमरावतीला रवाना झाल्या.

इकडे, ताराबाई परत येणार, प्रभासह परतणार हे कळल्यावरोबर केव्हही नुसते हुरळून गेले होते. या सुमारास त्यांची प्रॅक्टिसपण बऱ्यापैकी चालू लागली होती. पुढे लौकरच त्यांना पब्लिक प्रॉसिक्यूटरची जागाही मिळाली. प्रभा आणि ताराबाई परत येत आहेत म्हणताच त्यांनी त्यांच्या स्वागताची जय्यत तयारी आरंभली. दिवाणखाना नव्याने सजविला जाऊ लागला. नवीन फर्निचर येऊन पडले. ताराबाईंसाठी खास एक ब्राह्मण स्वयंपाकी शोधून, नेमून केव्हींनी त्याला आधीपासूनच ताराबाईंना आवडणाऱ्या पदार्थांचा सराव करण्याची ताकीद दिली... आणि मित्रमंडळींना केव्ही पुन्हा पुन्हा नव्या उत्साहाने बातमी देत, " अहो, आता आमच्या ताराबाई राहायला येताहेत– आमच्या प्रभाला घेऊन ! "

मित्रांपैकी ज्यांनी ताराबाईंना त्यापूर्वी पाहिलेले नव्हते ते अचंबा करू लागले की एखाद्या संस्थानिकाच्या बायकोसारखी जिची बडदास्त ठेवली जाणार आहे, ती ही व्यक्ती आहे तरी कशी ! केव्हींच्या व्यक्तिमत्त्वाला सुसंस्कृतपणा, इरसालपणा यांच्यावरोबर तेवढाच अस्सल असा हाही एक कंगोरा होता– कुठेतरी ते अत्यंत तान्ह्या मनाचेही होते !

परंतु या तिसऱ्या आणि शेवटच्या प्रयोगातूनही हाती काहीच लागले नाही. ताराबाईंनी केव्हींना सुधारण्याचा, त्यांच्याशी जमवून घेण्याचा प्रयत्न पुन्हा पुन्हा केला होता पण ते घडायचे नव्हते. आता प्रभा स्वतः बरेवाईट समजण्याइतकी मोठी होती. या मुक्कामात प्रथमच तिला आपल्या आईच्या दुर्दैवाची, मनोव्यथेची पूर्णपणे जाणीव झाली. त्यांचे त्रीमन तिला समजले आणि मग तेथले वातावरण तिलाच नकोसे झाले. या खेपेस ती स्वतःच आईला घेऊन मुंबईला परतली. त्यानंतर पुन्हा कधी ताराबाई अमरावतीला राहायला गेल्या नाहीत.

मात्र केव्ही आणि ताराबाई यांना वारंवार प्रयत्न करूनसुद्धा आपले सहजीवन यशस्वी करता आले नाही तरी त्यांच्या मनात एकमेकांविषयीची ओढ आणि आकर्षण कायम राहिली. ताराबाईंच्या मनात केव्हींविषयी अप्रीती निर्माण झाली नाही, किंवा त्यांचा त्यांच्याविषयीचा प्रेमादरही उणावला नाही. एकमेकांविषयी किंतु, आकस, किळस, चीड यांतले काही कधी जन्मले नाही.



ताराबाई आणि प्रभा तेथून निघून गेल्यावर केव्हींना जीवन पुन्हा उजाड भासू लागले. स्नेही मंडळींनाही चुकल्या-चुकल्यासारखे वाटत राहिले. ताराबाईंच्या उपस्थितीतले केव्हींच्या घराचे वरपण त्यांनी अनुभवले होते. मोडकांचा बंगला पुन्हा पहिले फकिरी रूप घेत चालला. केव्ही ताराबाईंविषयी, त्यांच्या जाण्याविषयी काहीच बोलत नव्हते. एका मित्राने शेवटी न राहवून हळूच विचारले,

" बॅरिस्टरसाहेब, ताराबाई कुठे गेल्या ? "

" She left ! "

केव्हींनी विलक्षण तुटक स्वरात फक्त दोन शब्दांत उत्तर दिले. पुन्हा कधी ते या विषयावर बोलले नाहीत.

मुंबईला परत आल्यावर ताराबाईंनी प्रभाला किंग जॉर्ज हायस्कूल, दादर, येथे दाखल केले. तेथे तिचा आजार सांभाळीत मंद गतीने तिचे शिक्षण होऊ लागले. प्रभाचा मनोविकार बरा होण्याची चिन्हे मात्र दिसेनात.

दर चार-सहा महिन्यांनी कधी वर्षानेदेखील अचानक प्रभाला melancholia चा झटका येई. तिच्याभोवती जणू तिच्या अंतर्मुखतेचे एक अदृश्य कुंपण तयार होई. त्यावेळी प्रभा स्वतः स्वतःची राहात नसे. एखाद्या निर्जन बेटावर असल्याप्रमाणे तासन् तास ती गॅलरीतल्या स्टुलावर बसून राही आणि या काळात तिला फार जपावे लागे. ताराबाई एकीकडे आपले व्याप सांभाळून, अंत नसलेल्या मायेने, न कंटाळता, न गांजता तिची सेवा करीत राहत. कधी प्रभा अनावर होई. तिच्या मनावरचे कुठले कुठले बाळपणापासून पडलेले वळ मग परत उमडे पडत. ज्या आईवर एरवी तिचे विलक्षण प्रेम होते त्या आपल्या आईवरच ती अशा वेळी तुटून पडे, वणव्यासारखी पेटून उठे.

अमरावतीहून प्रभा आपण होऊन परतली तरी तिच्या मनात तिने मांडलेली केव्हींची व्यक्तिपूजा चालूच होती. त्यामुळे एकीकडे तिला आईचे दुःख, तिची बाजू समजत असली तरी आईबद्दल तिच्या मनात एक प्रकारची अढी निर्माण झाली होती. काही झाले तरी आईने घर सोडायला नको होते, आपल्याकडे स्त्रिया असे करीत नाहीत... अशी प्रतिक्रिया ती अंतर्मनात बाळगून होती. झटक्याच्या काळात तिचा स्फोट होई.

दिवसभर काम करून पुन्हा मध्यरात्रीपर्यंत प्रेमाने आपली सेवा करणाऱ्या आपल्या आईला मग ती ताडताड बोले. आईच्या पायांवर फटाफट थपडा मारीत ती म्हणे, " हे, हेच तुझे पाय घराबाहेर पडले ! "

ताराबाई मात्र एकदासुद्धा तिच्यावर हात उगारीत नसत, तिला दूर लोटीत नसत. तिच्या दांडगाईला तोंड देताना एका शब्दानेसुद्धा तिला त्या दुखवीत नसत.

मग त्या ' अर्धशुद्धी 'तून बाहेर आल्यावर मात्र प्रभा तिची तीच विकल होई; श्रांत होऊन, चरमून अंधारात आईजवळ जाई. आपण चापट्या दिल्या तेव्हादेखील आई आपल्याला गोंजारीतच होती, हे तिचे तिलाच आठवे.

" दमलीस ? मारलं ना तुला मी आई ? कुठे मारलं ?–इथे ? "

एखादा हुंदका देऊन प्रभा अंधारात ताराबाईंच्या पायांवरून हात फिरवीत राही. त्या स्पर्शातून प्रभाच्या मनाची कोमलता, असहायता, अपराधी भावना आईपर्यंत पोचे. ताराबाईंना तो स्पर्श सुखद वाटे, तरीही सोसवेनासा होई. त्या दिवसापुरती झुंज संपली आहे, प्रभा सावरली आहे, हे त्यांच्या लक्षात येई. संयत स्वरात त्या तिला म्हणत, " असू दे. तू नीज बरं आता. जा ! "

परंतु प्रभाचे मन ताळ्यावर असे, वृत्ती आटोक्यात असत त्या काळातसुद्धा तिच्या वागण्या–बोलण्यात एक प्रकारचे औदासीन्य, हरवलेपण जाणवत राही. प्रभा मनाची दुखणेकरीण होती त्यामुळे तिच्या मूळच्या सरळ, भावड्या स्वभावाला कसले कसले गंड जडले होते. वडलांचा सहवास न मिळणे हे एक कायमचे दुखणे होतेच...

पहिली तीन वर्षे परांजप्यांच्या बंगल्यात, शिशुविहारच्या जागेत राहिल्यानंतर शिशुविहारचा वाढता व्याप तेथे सामावला जाईना तेव्हा मग ताराबाईंनी स्वतःला राहण्याकरता स्वतंत्र भाड्याची जागा शोधायचे ठरवले. शिशुविहारच्या एक शिक्षिका सरलाताई देवधर या त्या सुमारास स्वतःसाठी ब्लॉक शोधत होत्या. देवधरमंडळींशी ताराबाईंचा स्नेह जुळला होता. ताराबाईंनी त्यांना आपल्याकरिताही एक ब्लॉक बघण्यास सांगितले आणि त्याप्रमाणे हिंदू कॉलनीच्या पाचव्या गल्लीतल्या वर्तक–गृहात तळमजल्यावरची एक व तिसऱ्या मजल्यावरची एक असे दोन चार-चार खोल्यांचे ब्लॉक्स देवधरांनी मिळवले. ताराबाईंनी वरचा ब्लॉक घेतला. पुढे १९५२ साली मुंबई सोडेपर्यंत मग त्यांचे बिऱ्हाड व ' शिक्षणपत्रिके'चे कार्यालयही तेथेच होते ( अजूनही ब्लॉक त्यांच्याच नावावर आहे. ) ताराबाईंना आवडणारा आपला गडी कृष्णा केव्हींनी त्यांच्यासाठी मुंबईला धाडून दिला होता ( त्याला सुद्धा मधून मधून पिऊन, झिंगून पडण्याची खोड होती. तेवढी सोडल्यास ताराबाईंचे घरकाम तो चांगल्या पद्धतीने व इमानाने करीत असे. बरीच वर्षे हा कृष्णा ताराबाईंकडे होता. ) ताराबाईंच्या धाकट्या भगिनी इंदिराताई गद्रे ह्या वेळपर्यंत बाकानेर संस्थानात शिक्षणखात्यात नोकरी करीत होत्या. याच सुमारास त्या निवृत्त झाल्या आणि गद्रे कुटुंब मुंबईला आले. ताराबाईंच्या ब्लॉकमध्ये ही सारी मंडळी संयुक्तपणे राहू लागली. इंदिराताई घरातले सारे व्याप जबाबदारीपूर्वक बघू लागल्या. मुख्य म्हणजे प्रभाला बरोबरीच्या मावसभावंडांची चांगली सोबत मिळाली. घराला जे घरपण हवे, ते चांगलेच मिळाले. याखेरीज ताराबाईंच्या नात्याच्या, जोडलेल्या परिवारातली माणसे सारखी येत–जात असतच. त्यामुळे प्रभा एकटी पडण्याचा, तिला एकटे



वाटण्याचा प्रश्न नव्हता.

ताराबाई मात्र अहोरात्र प्रभाची मनःस्थिती जपण्याबद्दल जागरूक असत. प्रभाचे आयुष्य सुरळीत मार्गाने जायला हवे, या दृष्टीने त्यांचे सतत प्रयत्न चालू असत. प्रभाच्या आयुष्याला, दिनक्रमाला काही तरी निश्चित आकार यावा, अर्थ प्राप्त व्हावा, कोणता तरी छंद, उद्योग तिच्या आयुष्याचे मुख्य सूत्र ठरावा आणि त्यात तिच्या अस्थिर वृत्ती गुंताव्य असा त्यांचा प्रयत्न असे. श्री. केशवराव भोळे त्यावेळी मुंबईत होते. त्यांची गाण्याची शिकवणी त्यांनी प्रभाला ठेवली.

परंतु ताराबाईंच्या अशा साऱ्या प्रयत्नांना एका ठराविक मर्यादेपर्यंतच यश येत होते. प्रभाच्या हाताला किनारा निश्चितपणे लागत नव्हता. तिच्या वृत्तीतच न्यूनता होती.

एकीकडे प्रभाच्या दुखण्यावर विविध उपचारांची शिकस्त चालू होतीच परंतु उपयोग होत नव्हता. प्रभाच्या दुखण्याचा तिच्या अभ्यासावर, शालेय प्रगतीवरच नव्हे तर एकूण स्वभावावर, व्यक्तिमत्त्वावरच परिणाम झाला होता. मूळची मनमोकळी, लाघवी, सरळ स्वभावाची – सरळ वागणुकीची प्रभा दिवसेंदिवस घुमी, कुढी, लहरी आणि चिडचिडी बनत चालली होती आणि आपल्या या कौमार्यावस्थेतल्या, मानसिक दृष्ट्या अधू असलेल्या समस्या बनत चाललेल्या अभागी अपत्याचे पालकत्व ताराबाईंना एकट्यांना व जन्मभर निभवावे लागणार होते.

याच काळात ताराबाईंनी पालकांना मार्गदर्शन करण्यासाठी एक पुस्तकमाला लिहिली. बालकांच्या आयुष्यातल्या छोट्या छोट्या दैनंदिन प्रसंगांचे गोष्टीरूपाने शब्दचित्रण करून त्या बालमनाचे विश्लेषण, पालक–बालक संबंधांचे विवेचन करीत असत. ' शिक्षणपत्रिके ' तूनही त्या अशा प्रकारचे लिखाण सातत्याने करीत होत्या. ' आमचे घर ' ' बालकांचा हट्ट ' ' बालविकास आणि शिस्त ' व ' विचारी बालके ' या त्या पुस्तकमालेतल्या चार छोट्या पुस्तिका चांगल्या प्रसिद्धीस आल्या.

या पुस्तकातले काही प्रसंग किंवा गोष्टी ताराबाईंनी आपल्या प्रभावरूनच लिहिल्या असाव्यात हे स्पष्ट दिसते. त्यातून प्रभाची त्या काळची मनःस्थिती व ताराबाईंच्या मनातला गुंता स्पष्टपणे जाणवतो.

' विचारी बालके ' या पुस्तकातली छोट्या मनोहरची गोष्ट याच स्वरूपाची आहे—

## छोट्या मनोहरची गोष्ट

खिडकीपाशी एक दहाबारा वर्षांचा बालक बसला होता. त्याच्या हातात पुस्तक होते, डोळ्यात अश्रू होते आणि त्याची दृष्टी दूर डोंगराच्या पलीकडे आभाळात होती.

" अरे मनोहर, वाचायचं सोडून तिकडे काय पाहात बसलास ? आताशी झालं आहे तरी काय तुला ?— आणि डोळे पुसलेस ते ? "

" अग, एकसारखा टक लावून ते आकाशाचे रंग पाहात होतो ना, ते पाणी आले डोळ्यात..."

मनोहर हसला पण त्याचे ते हसणे एखाद्या दुःखद हुंदक्यासारखे होते. यमुनाबाईंच्या डोळ्यातही खळकन् पाणी आले. ते लपवण्याकरिता त्या आत निघून गेल्या. त्यांच्या मनात आले,

' त्याला वडलांकडे जावंसं वाटतंय. दुसरं काय ? या उन्हाळ्यात जाऊ दे तिकडेच. त्याला जिथे सुख, तिथे मलाही सुख. '

° ° °

मनोहरने टेबलापाशी बसून काहीतरी लिहिण्याचा सपाटून आव आणला आहे. पण त्याचे डोळे पाण्याने डबडबले आहेत. समोरचे अक्षर दिसत नाही. मोठ्याने वाचायला लागतो तो गळा दाटून येतो आहे.

आबासाहेब पलीकडच्या खोलीतून त्याच्याकडे पाहत आहेत, त्याचे अश्रू पाहून ते अस्वस्थ झाले आहेत.

' —काय करावं या मनूचं ? जे मागेल ते आणून देतो, म्हणेल ते करतो, पण हा आपला उदास. विचारलं तर स्पष्टपणे काही बोलत नाही. आईची आठवण होत असेल ! पण ती सांगते, तिथेही असाच झुरतो. हा सगळा तिचाच दोष. बाकीची मुलं एवढ्या वयात कशी हसतात. खेळतात. याचं आपलं सदा पुस्तकांत डोकं. यमूलाच बोलावून घ्यावं. काही तरी उपाय करायलाच हवा. '

° ° °

" माझ्याकडे असंच करायचा म्हणून तर इकडे पाठवलं मी..."

" पण इथे त्याला मुळीच करमत नाही. म्हणून म्हटलं, त्याला आईवाचून करमत नसेल. तुझाच लहानपणापासून त्याला लळा. "

" पण आता तर मलाही झाले ना सहा महिने इथे येऊन ? आई हवी तर आई, वडील हवे तर वडील आहेत. तरी हा असा घुम्म का ? कुठे गेला याचा लहानपणचा खेळकरपणा ? कसा सगळ्यांच्या नकला करायचा ! ' अयोध्येचा राजा ' मधलं करून दाखवायचा. या दोन वर्षांत मनू अगदी बदलून गेला हो..."

" काय झालं पोराला कुणास ठाऊक ! "

° ° °

रात्री एकच टोला पडला. मनोहरने झोपेतच एक मोठा उसासा सोडला.

यमुनाबाईंच्या अंथरुणातूनही दीर्घ निश्वास ऐकू आला.

आबासाहेबांनी तिकडे कुशीवर वळून रिस्टवॉचमध्ये किती वाजले ते पाहिले.

दोघांच्याही हृदयाचा निःशब्द आवाज अस्फुटपणे गुणगुणत असावा की "आपल्याच



जीवनात प्रसन्नता नाही, हृदैक्य नाही, लाड नाही, रस नाही, रोमान्स नाही. आपल्या जीवनातल्या कटू प्रसंगांनी आलेला कडूपणा अजून तोंडातून गेलेला नाही. या सगळ्याचं प्रतिबिंब त्या नाजूक बाळहृदयावर पडल्याखेरीज कसं राहील ? आपल्याच जीवनात सुवास नाही, उत्सव नाही, ओलावा नाही. हृदयाचा मेळ नाही, सुमेळातून उत्पन्न होणारं मधुर संगीत नाही—मग पारिजातकाच्या फुलासारख्या या नाजूक बाळमनानं कसं उमलावं ? दरवळावं ? हंसावं ? "

× × ×

१९३६ सालानंतर पुन्हा कधी प्रभाने अमरावतीला कायमचे राहायला जाण्याचा प्रस्ताव मांडला नाही आणि ताराबाईंनीही पुन्हा तसा प्रयोग केला नाही. मात्र दोघींच्या मनात केव्हींबद्दलची ओढ, आकर्षण तसेच होते. १९३७–३८ या सालात केव्ही पब्लिक प्रॉसिक्यूटर होते. बहुतेक युरोपियन इंग्रज अधिकाऱ्यांशी, वरिष्ठ असामींशी केव्हींचे चांगले मित्रत्वाचे मोकळे संबंध होते; परंतु गोऱ्या रक्ताची प्रमाणाबाहेर पर्वा त्यांनी कधीच केली नाही. न्यायाधीशांच्या पुढे पुढे करण्याची, हांजी हांजी करण्याची सवय तर त्यांना कधीच नव्हती. केवळ आपल्या बुद्धीच्या — वकिली नैपुण्याच्या जोरावर ती सरकारी नोकरी उत्तम प्रकारे बजावून सुमारे वर्षभराने केव्ही निवृत्त झाले. या सुमारास वकिलीच्या धंद्यात विशेष मंदी आली होती. त्यामुळे १९४० सालानंतर पुन्हा केव्हींची वकिली चालेनाशी झाली. आपल्या खर्चिक स्वभावानुसार त्यांनी या वेळपर्यंत बऱ्याच लोकांची देणी करून ठेविली होती. खिशाला कायम उधळपट्टीचा रोग जडलेला ! पैसा पुरत नसे. सुलोचनाबाईंची प्रॅक्टिस चांगली चालत असे आणि त्यांनी पैसाही चांगला केला होता. आपल्या मिळकतीवर त्या केव्हींचा हक्क मनोभावे मानीत असत. परंतु केव्ही मात्र त्यांच्या पैशावर राहणे योग्य समजत नसत, त्यांना ते कमीपणाचे वाटे .अशा स्थितीत एकच उपाय राहिला. कुठेतरी चांगलीशी नोकरी मिळवून मित्रांची देणी फेडणे, कर्जमुक्त होणे. केव्हींचे एक मित्र श्री. घाटे रेल्वेत नोकरीला होते. त्यांच्या ओळखीने बऱ्याच खटपटीनंतर केव्हींनी मुंबईला रेल्वेत नोकरी मिळविली. रेल्वेचे वकील म्हणून दरमहा रु. ६००/– पगारावर त्यांची नेमणूक झाली.

१९४० ते १९४३ अशी सुमारे अडीच-तीन वर्षे केव्ही मुंबईत होते या काळात ते व ताराबाई एकत्रच ताराबाईंच्या ब्लॉकमध्ये राहत असत. ताराबाईंच्या सर्व कार्यांत केव्ही रस घेत. केव्हींचे इंग्रजी भाषेवर विशेष प्रभुत्व. ताराबाईंना सभा–समारंभांमध्ये जी भाषणे करावयाची असत ती लिहिण्याच्या कामी केव्ही मनापासून मदत करीत. ताराबाईंच्या कार्याविषयी, कर्तृत्वाविषयी त्यांच्या मनात नेहमीच आदर असे आणि त्यांच्या वागण्या-बोलण्यात, तत्परतेत तो सहजपणे प्रतिबिंबित होई. ' शिशुविहार 'च्या

सर्व समारंभांना ते उपस्थित असत व ताराबाई त्यांची सर्वांशी सन्मानपूर्वक ओळख करून देत. ताराबाईंच्या नातेवाइकांप्रमाणेच स्नेहीमंडळींची पण केव्ही जाणीवपूर्वक कदर करीत. रेल्वेच्या या नोकरीत असताना केव्हींना मिळणाऱ्या पासांवर केव्ही, ताराबाई, प्रभा आणि श्री. भाऊ उर्फ सदाशिव केळकर ( ताराबाईंच्या बंधूंचा, दादांचा मुलगा ) असे सारे दक्षिण भारताची सविस्तर सफरही करून आले. या प्रवासात ठिकठिकाणी केव्हींच्या स्नेह्यांकडे त्यांचे वास्तव्य झाले. या सर्व मंडळींनी ताराबाईंना विशेष आपुलकीने व सन्मानपूर्वक वागविले. मुंबईच्या वास्तव्यात केव्हींचे मदिरापान, धूम्रपान वगैरे प्रस्थ नेहेमीप्रमाणे चाललेले असे. त्यांचा बेअरा, कुत्रा, बाटल्या, काठी इ. सरंजाम येवेही लोकल प्रवासातसुद्धा बरोबर असे. केव्हींचे अंग नेहेमी दुखत असे म्हणून प्रभा त्यांना नेमाने चंपी–मालिश करून देई. मात्र आप्यांचा सहवास मिळूनही प्रभा तशी एकीकडे फुरंगटलेली, नाराजच असे. कारण केव्ही मुंबईत नोकरी करू लागल्यावर त्यांच्या पाठोपाठ सुलोचनाबाईसुद्धा मुंबईत येऊन दाखल झाल्या होत्या आणि मुंबईत शिवाजी पार्क येथे त्यांनी नव्याने प्रॅक्टिस सुरू केली होती. त्यामुळे केव्हींचे त्यांच्या घरीसुद्धा नेमाने जाणे–येणे असे. केव्ही असे गायब झाले की प्रभा फणकऱ्याने ताराबाईंना म्हणे, "—गेले असतील त्या बरी ! ती आहे ना तिकडे, तुझी ती सवत ! " केव्हींची ही एकंदर वागणूक पाहून आजूबाजूचे मध्यमवर्गीय रहिवासी त्यांच्याबाबतीत जरा बिचकूनच असत. केव्हींचे मुंबईत फारसे कुणाशी नव्याने सूर जुळले नाहीत.

एकूणच मुंबईतले चाकोरीबद्ध जीवन केव्हींच्या मध्यप्रदेशी वृत्तीला फारसे मानवले नाही. आपल्या देणेकऱ्यांचे कर्ज फेडण्याइतकी पुंजी कमावून झाल्याबरोबर केव्हींनी नि:संगाप्रमाणे रेल्वेतली नोकरी सोडून दिली आणि ते अमरावतीला परत गेले. मात्र या रेल्वेच्या नोकरीतही त्यांनी आपल्या वकिली कसबाची झलक अधिकाऱ्यांना दाखविलीच !

त्यानंतरदेखील दर सहा सहा महिन्यांनी केव्ही ताराबाईंकडे येत असत, राहत असत. हळू हळू खुशाल लोकांकडून पैसे उसने घेणे चालू झाले. घरातल्या वस्तू , पैसे नाहीसे होत, आणि केव्हींच्या मदिराखात्यावर जमा होत. मुंबईकरांनाही आता केव्हींच्या व्यक्तिमत्त्वाचा हा उपद्रवी भाग परिचयाचा झाला.

ताराबाईंनी केव्हींचे वागणे सुधारावे म्हणून गांधीजींना मध्यस्थी करायला लावली होती अशी एक वदंता या सुमारास हवेत पसरलेली होती. सौराष्ट्रात असताना ताराबाईंचा गांधीजींशी थोडाफार संबंध आला होता. पुढे कार्यामुळे या परिचयाला निश्चित अर्थ आला असावा. असे म्हणतात की एकदा गांधीजी वर्ध्याला जात असताना त्या प्रवासात त्यांची आणि केव्हींची भेट ठरविण्यात आली. त्याप्रमाणे बडनेरा स्टेशनवर केव्ही ताराबाईंसह गांधीजींच्या डब्यात चढले आणि गाडीतच त्या दोघांची बोलणी



झाली. गांधीजी बॅरिस्टर झालेले, जबरदस्त राजकारणी होते आणि केव्ही मुरब्बी, कसलेले वकील होते. केव्हींची जीवनदृष्टी भिन्न, दिवाणी परंतु तितकीच 'तयार' होती ! अखेर झाले असे की गांधीजींना युक्तिवादात हरवून वर त्यांनाच, केव्हींनी 'युक्तीच्या चार गोष्टी' ऐकविल्या ! दोघेही एकमेकांना सुधारू शकले नाहीत. खाली उतरल्यावर गांधीजींनी स्वतः होऊन ताराबाईंना म्हटले, " तुम्ही या माणसाचा नाद सोडा. "

ताराबाईंनी त्यांना उत्तर दिले " माफ करा, बापूजी. मग आपल्याला खरी भारतीय स्त्री कळलेलीच नाही ! "

" मग करा तुम्हाला काय करायचंय ते ! " बापूजी अखेर कावून म्हणाले.

ताराबाईंकडून मात्र या नाट्यपूर्ण कथेला दुजोरा मिळाला नाही. त्यांचे म्हणणे, " केव्ही माझ्याबरोबर आले होते, आम्ही गांधीजींची भेट घेतली, हे सर्व खरे आहे. परंतु सर्व बोलणे माझ्या कार्यासंबंधीच झाले, घरगुती नव्हे ! आणि या भेटीचा हेतूही तो नव्हता. उलट गांधीजींच्या व्यक्तिमत्त्वाच्या शुचितेचा परिणाम होऊन त्यानंतर सात-आठ महिने केव्हींनी मद्यपान सोडलेही होते. "

गांधीजी आणि केव्ही यांच्या भेटीची ही रंजक कहाणी केवळ गप्प नसली तरी त्यातला बराचसा भाग, विशेषतः नाट्य; कपोलकल्पित असले पाहिजे. ताराबाईंच्या मनात गांधीजींच्या नेतृत्वाबद्दल आदरभाव असला तरी गांधीजींची भाबडी व्यक्तिपूजा त्यांनी कधीच मांडली नाही, आणि तशी त्यांची वृत्ती देखील नव्हती. गिजुभाई बधेका, डॉ. मॉन्टेसोरी कुणातच त्या अशा गुंतल्या नव्हत्या. शिवाय आपल्या खाजगी आयुष्याचे प्रश्न असे कुणा परक्या व्यक्तीच्या मध्यस्थीने सुटतील, केव्हींसारख्या असामींच्या बाबतीत कुणाच्या वैयक्तिक प्रभावामुळे, सांगण्यामुळे, उपदेशामुळे परिवर्तन होईल असे मानण्याइतक्या भोळ्याही ताराबाई नव्हत्या. तेव्हा या बाबतीत ताराबाईंनी केलेला खुलासाच विश्वासार्ह मानायला हवा. असा हा रंजक किस्सा हवेत भरून राहतो याचे उत्तर ताराबाईंकडे सापडण्यापेक्षा केव्हींच्या व्यक्तिमत्त्वातच सापडू शकेल.

आपली लोकप्रिय चमकदार प्रतिमा टिकविण्याची केव्हींना हौस होती, त्यांचे तसे प्रयत्नही असत. आणि त्या दृष्टीने अशा रंगीत अफवा किंवा तिखटमीठ लावलेले प्रसंग आपल्या भोवतालच्या वलयात राहू देणे त्यांच्या अस्मितेला कुठेतरी सुखवीत असले पाहिजे. त्यामुळे अशा प्रकारच्या अफवा पसरविण्याचा त्यांचा जाणीवपूर्वक प्रयत्न नसला तरी त्यामागची सत्य परिस्थिती संदिग्ध राहू देणे त्यांना अधिक परवडत, रुचत असावे. बॅरिस्टर नसूनही अमरावतीत कायम ते 'बॅरिस्टरसाहेब' म्हणूनच ओळखले, संबोधले जात असत, ही बाब त्यापैकीच !

केव्ही आणि ताराबाई दोघेही एकमेकांबद्दल नेहेमी चांगलेच व आदराने बोलत असत. केव्ही नेहेमी म्हणत, " आमच्या ताराबाई म्हणजे अतिउत्तम बाई ! " त्यांच्या कार्या-

बद्दल केव्हींना कायम कौतुक असे.

ताराबाई शिशुविहारात असतानाची गोष्ट. एकदा एक प्रौढ, विवाहित विद्यार्थिनी ताईंना भेटायला गेली. ताराबाई एक गोल सुईवरचा अखंड विणीचा स्वेटर विणत होत्या.

" कुणासाठी विणताय हा ताई ? " विद्यार्थिनीने सहज विचारले.

ताराबाईंनी मृदू स्वरात उत्तर दिले.

" यांच्यासाठी ! "

ताराबाई वैवाहिक जीवनाच्या बाबतीत अपयशी आहेत, त्यांनी घटस्फोट घेतला आहे अशी की अफवा होती त्या पार्श्वभूमीवर, केव्हींचा उल्लेख करताना ताराबाईंच्या चेहऱ्यावर जो सहजसुंदर मधुभाव उमटला होता तो त्या विद्यार्थिनीला मोठा रमणीय, स्मृतीत जतन करून ठेवावासा वाटला.

केव्ही आणि ताराबाई यांनी घटस्फोट घेतला होता असा एक गैरसमज पुष्कळांचा होता. घटस्फोटाचा प्रश्न मधून मधून काही वर्षेपर्यंत निघत राहिला, हे मात्र खरे. केव्ही आणि ताराबाई यांचे सहजीवन, साहचर्य जमले नाही तरी मनाने त्यांच्यापैकी कोणीच घटस्फोटापर्यंत कधी पोचले नाही. एकमेकांविषयी एक प्रकारची ओढ वाटत असल्यामुळे घटस्फोटाने ' सुटका ' करून घ्यावी असे त्यांना कधी वाटले नाही. परंतु घटस्फोटाच्या प्रश्नावर खपली धरू देत नव्हत्या, त्या सुलोचनाबाई.

ताराबाई राजकोटला असताना हा प्रस्ताव सुलोचनाबाईंनी प्रथम मांडला. केव्ही आणि ताराबाई — दोघांनीही त्यावेळी प्रस्तावाच्या कल्पनेनेच कासावीस होऊन तो फेटाळून लावला. शिवाय प्रभा हा पक्का दुवा होताच. परंतु डॉक्टरीणबाईंना केव्हींशी नुसते संबंध नको होते, त्यांना केव्हींशी रीतसर लग्न करायचे होते. या त्यांच्या आकांक्षे-मागे दोन सबळ हेतू होते. एक तर त्यांच्या या संबंधामुळे समाजातल्या सुलोचनाबाईंच्या प्रतिमेवर डाग पडला होता आणि आपल्या प्रॅक्टिसवरही त्याचा परिणाम होईल अशी त्यांना भीती वाटत होती. समाजात त्यांना एक प्रतिष्ठित डॉक्टर म्हणून जगायचे होते. परंतु ही झाली व्यवहाराची बाजू. दुसरे म्हणजे केव्हींच्या ठिकाणी त्यांच्या भावना पूर्णपणे, समर्पणाने गुंतल्या होत्या. केव्हींना त्यांनी सर्वस्व मानले होते व ते पत्नीच्या निष्ठेने. आणि सौ. मोडक हे नाव त्याल्याखेरीज त्यांचे समाधान होणार नव्हते. परंतु सुलोचनाबाईंचे हे प्रयत्न केव्हींनी कधी सफल होऊ दिले नाहीत. मात्र त्यांना सरळ सरळ धुडकाविण्याचीही त्यांना हिम्मत नव्हती. ताराबाईच घटस्फोट द्यायला तयार नाहीत, कायद्याच्याही अडचणी आहेत, असे काही ना काही सांगून टोवालटोलव करण्याचे त्यांचे धोरण होते.

आता ताराबाई मुंबइला असताना पुन्हा एकदा हा प्रश्न निघाला आणि या खेपेस हा प्रश्न पूर्णपणे धसास लावण्याचा डॉ. सुलोचनाबाई चावळ्यानी निश्चय केला. ताराबाईंना



त्यांनी स्वतः एक पत्र लिहिले आणि सौ. मोडक म्हणून मरण यावे अशी माझी इच्छा आहे, तेव्हा कृपा करून तुम्ही केव्हींना घटस्फोटाची परवानगी द्या अशी ताराबाईंना विनंती केली. या खेपेस ताराबाईंनी सखेद परंतु खळखळ न करता केव्हींना घटस्फोट घेऊन दुसरे लग्न करण्याची परवानगी दिली, मात्र त्याबरोबर स्वतःचा ताराबाई मोडक हेच नाव लावायचा हक्क राखून ठेवायचे ठरवले. हे सर्व त्यांनी केव्हींना सांगितले.

आता मात्र केव्ही चांगलेच कात्रीत सापडले. इतके दिवस ताराबाईंच्या नावावर ढकलून त्यांना घटस्फोटाचा प्रश्न लांबणीवर टाकता येत होता. त्यांना ताराबाईंशी घटस्फोट घेणे मनापासून नको होते. परंतु इतके दिवस चालणारी सबब आता चालणार नव्हती, आणि ' मी घटस्फोट घेऊ इच्छित नाही ' असे सुलोचनाबाईंना सरळ सांगून टाकण्याची धमकही त्यांच्यापाशी नव्हती. ते पुन्हा ताराबाईंच्याच मागे लागले की " तूच परस्पर डॉक्टरांना पत्र लिहून आपण घटस्फोट देऊ इच्छित नाही असे कळव, म्हणजे परस्पर प्रकरण निकालात निघेल. निदान प्रभाकडे तरी पाहा, आणि यात मला साथ दे. "

ताराबाई म्हणत, " खोटं कशाला लिहायचं ? तुम्ही दुसरं लग्न करणार असाल तर मी घटस्फोट द्यायला तयार आहे. व्यक्तिशः मला घटस्फोट घ्यायला नको आहे आणि तुम्हाला काय डायव्होर्सशिवायही मनाजोगतं वागता, राहता येतंच आहे. परंतु तिची इच्छा असली तर मी आड येणार नाही आणि माझ्या मनाविरुद्ध तसं पत्रही मी तिला लिहिणार नाही. "

परंतु कायदाच आड येत होता. केव्ही आणि ताराबाई यांचे लग्न civil marriage होते व ते special marriage act खाली झालेले होते. कायद्यानुसार त्यात घटस्फोटाला वावच नव्हता. या परिस्थितीवर एकच तोडगा निघू शकत होता, केव्हींनी व सुलोचना-बाईंनी जाहीरपणे नव्हे, तर गुपचुप बंगल्यावरच पुरोहित बोलावून, चार साक्षीदार बोलावून त्यांच्या साक्षीने विवाह करावयाचा. ताराबाईंनीसुद्धा तेथे उपस्थित राहायचे, परंतु हरकत मात्र घ्यायची नाही. या पद्धतीने विवाह केल्यास तो कायदेशीर होऊ शकला असता.

या गोष्टीला मात्र ताराबाई कबूल झाल्या नाहीत. त्यांचे म्हणणे होते. " तुम्ही दोघं खुशाल लग्न करा; पण ते माझ्या अनुपस्थितीत करा. मी हरकत घेणार नाही, कोर्टाकडे तक्रार नेणार नाही. तसा शब्द मी तुम्हाला देते. एरवीतेवी तुम्ही मनाने एकमेकांशी लग्न केलेले आहेच; ते कायदेशीर करायचे असल्यास माझी त्याला ना नाही. परंतु in camera* केस झाली तरच मी डायव्होर्स द्यायला तयार आहे.

—पुन्हा एकदा घोंगडे भिजत पडले.

अखेर रेल्वेच्या नोकरीत असताना एका सुट्टीत ते आणि सुलोचनाबाई अमरावतीला

* न्यायाधीशाच्या समोर, खाजगी कक्षात; भर न्यायालयात नव्हे.

गेले होते. परत आल्यावर केन्ही ताराबाईंना सांगू लागले,

"—आता त्या अगदी ऐकतच नाहीत; लग्नच करायचं म्हणतात."

पुन्हा एकदा तीच निरगाठ आली.

यावेळी माई जयवंत मुंबईतच होत्या. केन्ही आणि ताराबाई दोघेही माईंना फार मानीत असत, दोघांनाही त्या सारख्याच जवळच्या वाटत असत आणि त्यांना केन्ही आणि ताराबाईंच्या सहजीवनाचा पूर्वेतिहास फार जवळून ठाऊक होता. ताराबाईंनी केन्हींना म्हटले,

"—या बाबतीत एकदाच काहीतरी निश्चित निर्णय घ्यायचा असला तर आता तिसऱ्या कुणातरी, निःपक्षपातीपणाने आणि पुरेशा तयस्थ भूमिकेतून विचार करू शकेल अशा एखाद्या व्यक्तीला आपण मध्यस्थ केलं पाहिजे. माईंना तुम्ही मानता ना? त्यांना सर्व परिस्थिती ठाऊक आहे. आपली कुचंबणा, कुतरओढ त्या पहिल्यापासून पाहत आहेत. माझी—त्यांची मैत्री आहे आणि तुम्हाला तर त्या भाऊच मानतात. त्यांच्यावर तुमचा विश्वास आहे की नाही? मग तुम्ही एकटेच आता परस्पर त्यांच्या घरी जा आणि त्यांची भेट घ्या. मी त्यांना तुमची भेट होण्यापूर्वी भेटत नाही आणि तुमच्याबरोबर-सुद्धा येत नाही. तुम्हीच त्यांना दोन्ही बाजू समजावून सांगा. वकील आहात, दोन्ही बाजू तुम्हीच बरोबर मांडाल! त्यानंतर त्या जो निर्णय देतील तो मी न कुरकुरता मान्य करीन; तुम्हीही केला पाहिजे. मग माईंचं वाक्य ते ब्रह्मवाक्य! तिथून पुढे हा प्रश्न संपला म्हणजे कायमचा संपला.—आहे कबूल?"

एखादी कामाची फाइल हातावेगळी करावी त्या प्रमाणे शिशुविहारात केन्हींच्या समोरच्या खुर्चीवर बसून ताराबाई (आणि केन्ही) आपल्या आयुष्यातल्या एका महत्त्वाच्या प्रश्नाची फाइल संपवीत होत्या!

ठरल्याप्रमाणे केन्ही आणि माईंची बोलणी झाली. माईंनी ताराबाईंनाही बोलावून घेतले आणि विचारले, "तुमची या लग्नाला हरकत नाही ना?"

ताराबाई उद्गारल्या, "मुळीच नाही."

अखेर माईंनी ताराबाईंच्या बाजूने निकाल दिला.

"केन्ही, तुम्ही नि डॉक्टर लग्न करा. ताराबाई केस करणार नाहीत, मोडता घालणार नाहीत, एवढीच हमी मी देते."

केन्हींचा प्रश्न तेवढ्याने सुटत नव्हता आणि ताराबाईंनी लग्नाला हजर राहावे असे त्यांना सांगायला माई तयार नव्हत्या.

"माई, तुम्ही पक्षपात केलात! शेवटी आपल्या मैत्रिणीच्या बाजूने निकाल दिलात. आपल्या भावाच्या बाजूने विचार केला नाहीत." केन्ही पुन्हा पुन्हा म्हणाले.

याप्रमाणे 'बॅरिस्टर' मोडक या हायकोर्टात दावा हरले.

## १०. संस्थाविस्तार

**ता**राबाईंचे शिशुविहार हे निव्वळ बालमंदिर नव्हते. दुसऱ्याच वर्षी म्हणजे १९३८ साली त्यांनी बालमंदिराला जोडून प्राथमिक विभागही काढला. त्यात बालवर्ग, पहिली, दुसरी व तिसरी असे चार वर्ग होते. हा प्राथमिक विभाग काढण्यामागे व्यवहारी दृष्टिकोन, तडजोड होती तसाच शैक्षणिक हेतूही होता.

आरंभी बालशिक्षणाचे महत्त्व पालकांना वाटत नसल्याने व त्याची फी जास्त वाटल्यामुळे बालमंदिरात फारच थोडी मुले दाखल झाली होती. तेव्हा बालशिक्षणाबरोबरच प्राथमिक शिक्षणाचीही सोय केल्यास बालमंदिराच्या कार्याला चालना मिळणार होती. त्याप्रमाणे पहिल्या वर्षी खरोखरच अर्ध्याहून अधिक मुले प्राथमिक विभागाचीच आली! दुसरे म्हणजे, बालमंदिरात ज्या पद्धतीने संस्कार होत असत त्याच्याशी सुसंगत अशाच पद्धतीने मुलांना पुढेही शिक्षण दिले जावे, असाही एक ताराबाईंचा दृष्टिकोन होता. तिसरे म्हणजे, एकाच संस्थेत बालशिक्षणापाठोपाठ प्राथमिक शिक्षणाचीही सोय असावी अशी पालकांचीसुद्धा मागणी होती.

काही मोजके प्रसंग पाहिल्यास या प्राथमिक विभागातली शिक्षणपद्धती बालमंदिरातील वातावरणाशी कशी सुसंगत होती याचा अंदाज येईल —

...बालमंदिराचे काम चालू होते. एका बाजूला गणिताची साधने मांडली होती. मुलांना शंका आली की ती भाऊंना विचारीत. ते त्यांच्या अडचणी सोडवीत.

—मुले मण्यांच्या चौकटी घेऊन बसली होती. मणी भरभर सरकत होते. मनात उदाहरणे होत होती. आकडे कागदावर उतरत होते. वर्गात प्रसन्न अशी शांतता होती. एखादे मूल मध्येच जरा थांबे. एखादे बाहेर जाऊन जरा पाय मोकळे करून येई. पुन्हा एकाग्रतेने गणित करू लागे.

फराळाची वेळ झाली. नेहमीप्रमाणे शिक्षकांनी परवलीचा शब्द म्हटला,

"साफसूफ."

मुले हळू हळू आपापले उद्योग, चित्रे, पुस्तके, रंग आवरून ठेवू लागली. टेबले जागेवर सरकवू लागली.

...सतीशचंद्र उठला नाही. त्याची गणिताची भूक पोटातल्या भुकेपेक्षा तीव्र होती. कोणी झाडत, पुसत होते. फळे धुणारी मुले फळे इकडून तिकडे नेत होती. आवाज तर

होतच होता. एकटा सतीशचंद्र गणिते करतो आहे.

" साफसफ ? "

उत्तर आले, " गणितं झाल्यावर. "

मुले फराळाला बसली. वाढून झाले. सतीशने आपले टेबल जेवणाच्या पंगतीपासून दूर नेले. मधून मधून तो शिक्षकांचे बोलणे, मुलांची उत्तरे ऐकतो आहे. परत गणितात मन चालतो आहे.

" ॐ सहनाववतु " झाले. फराळ सुरू झाला. जरा वेळाने सतीश उठला. गणिते संपवून, साफसूफ करून स्वारी मोठ्या प्रसन्न चेहऱ्याने फराळाला आली !

यशस्वी बौद्धिक श्रमानंतरचा आनंद त्याच्या चेहऱ्यावर दिसत होता. जवळजवळ दोन–अडीच तास त्याने गणिते केली होती.

…विमल मध्यंतरी काही दिवस गुजरातेत सुरतेला गेली होती. बरेच दिवस ती तिकडेच राहिली. परत आल्यावर ती ताराबाईंना टाळू लागली. आकडे मोजायला, वाचायला ताराबाईंनी बोलविले की पळून जायची.

मग ताराबाईंनी तिला लेखन-वाचनाला हाकच मारायची नाही असे ठरविले. त्या फक्त तिच्या आजूबाजूच्या मुलांशी गप्पागोष्टी करीत.

एके दिवशी त्या कोणाला तरी मुळाक्षरांवरून हात कसा फिरवायचा ते दाखवीत होत्या. विमल हळूच येऊन अक्षरांवर हात फिरवू लागली. तयार अक्षरे घेऊन त्यांचे सोपे सोपे शब्द जुळवू लागली.

…आणि ताराबाईंना विमलचे कोडे उकलले. बरेच दिवस गुजरातेत राहिल्यामुळे तिच्या डोक्यात दोन भाषांचा गोंधळ माजला होता.

ताराबाईंनी तिला सहज दिसतील अशी सोपी, सचित्र पुस्तके ठेवायला सुरुवात केली. कधी तिला सोप्या गोष्टी वाचून दाखवाव्यात…ताराबाई वाचू लागल्या की विमल त्यांच्या पाठीमागे जाऊन उभी राही.

—आणि एक दिवस अचानक विमलच्या हाती एक जोडाक्षरांचे परंतु सोपे पुस्तक लागले. पहिले पान तिला वाचता आले. हसत हसत ती पुस्तक घेऊन कोपऱ्यात पसार झाली. एका दमात तिने ते सबंध पुस्तक वाचून काढले.

आणि मग धावत धावत येऊन विमलने ताईंना मिठीच मारली !

" ताई, तुम्ही मला फाऽऽर आवडता. आज तुम्ही माझ्याजवळ जेवायला बसा हं ! "

ताराबाईंनी हलक्या हाताने तिच्या मनातला गुंता सोडविला होता, तिचा आत्म-विश्वास तिला परत मिळवून दिला होता.



—तो क्षण दोघींच्याही दृष्टीने रम्य आणि धन्य होता !

अभ्यासक्रमाचे अपत्य म्हणजे वेळापत्रक. अभ्यासक्रम कृत्रिम आणि त्याचे वेळापत्रक त्याहूनही कृत्रिम.

वास्तविक वेळापत्रकाचे तोटेच अधिक आहेत, नेहमी नेहमी घंटा झाल्यामुळे रसभंग होतो. विद्यार्थ्यांच्या इच्छेला, स्फूर्तीला, निवडीला, सोयीला त्यात वावच नसतो. मंदबुद्धी मुलांचे तर वेळापत्रक म्हणजे मरणच. एक उदाहरण सोडवायला जेथे त्याला एक तास हवा तेथे त्याची एका तासात पाच उदाहरणे झालीच पाहिजेत.

यापेक्षा आपल्या अभ्यासक्रमात अमुक विषय आहेत, हाताशी अमुक वर्षे आहेत अगर महिने आहेत आणि शाळेचे ५–६ तास रोज उपलब्ध आहेत – हे सर्व गृहीत धरून, विद्यार्थ्यांच्या स्वयंस्फूर्तीला मान देऊन, त्यांना स्वातंत्र्य देऊन त्यांचा विकास साधणे कार्यकुशल शिक्षकाला सहज शक्य आहे. अशामुळे हुशार विद्यार्थ्याला वर्गाबरोबर रेंगाळावे लागणार नाही आणि मंद मुलाला वर्गाबरोबर धावावे लागणार नाही.

शिशुविहारात हा प्रयोग यशस्वीरीत्या केला गेला.

" आज आम्हांला गोष्ट सांगा. " मुलांनी हट्ट धरला. शिक्षक कां कू करू लागले. गोष्ट सांगण्या–ऐकण्यासारखे वातावरण नव्हते. शेजारी संगीताचा वर्ग होता. गोंगाट चालू होता.

" आज नको, पुन्हा केव्हातरी. "

पण शेवटी शिक्षक हरले. त्यांनी एक ऐतिहासिक कथा सांगायला सुरुवात केली. सगळी मुले अगदी शांत बसून, एकाग्रतेने गोष्ट ऐकू लागली. संगीत चालूच होते. पिंजऱ्यातला पोपट बोलत होता. गोष्ट चालू असताना वरून एक विमानही घरघर करत गेले. पण मुलांची चित्ते यांपैकी कशानेही विचलित झाली नाहीत.

तेवढ्यात एक मनुष्य काहीतरी विचारायला आत येऊ लागला. एका चार वर्षांच्या मुलाने त्याला हाताने खूण करून दारातच थोपविले.

अर्धा तास गोष्ट चालली होती. शिक्षकाला पुढ्यातले दृश्य अपूर्व वाटत होते.

अशीच तन्मयतेची दृश्ये मंगलापेटीशी खेळताना, गणिताच्या साधनांवर बेरजा करतानाही वारंवार दिसून येतात.

मॅडम मॉन्टेसोरींनी अनेकदा अवलोकन व अभ्यास करून सिद्धान्त मांडला की मुले मोठ्या माणसांपेक्षाही जास्त तद्रूप, तल्लीन होऊ शकतात. पण केव्हा ? विषय निवडण्याचे स्वातंत्र्य, पोषक वातावरण आणि व्यत्ययाचा अभाव असेल तर !

शिशुविहारात सुरुवातीस ताराबाई एकट्याच अध्यापनाचे काम करीत. परंतु त्यांच्या वाढत्या व्यापांच्या दृष्टीने त्यांना साहजिकच अनेक कार्यकर्त्यांची, सहकाऱ्यांची, पालकांच्या

सहकार्याची आवश्यकता होती. जे पालक शिशुविहारात चाललेल्या कामाबाबत विशेष आस्था दाखवीत त्यांना ताराबाई आपले काम समजून, शिकून घेण्याचे आवाहन करीत. या प्रयत्नांतून प्रथम काही स्त्री-पालक तेथे येऊन त्यांना विनावेतन मदत करू लागल्या; त्यांच्या अनुयायी बनल्या. अर्थात ही सर्व मंडळी नवशिकी; जाणकार अशा फक्त ताराबाई होत्या. बालमंदिराची वेळ संपली की 'ताई' रोज त्या दिवशीचे कार्यक्रम कसे-काय झाले याचा आढावा घेत आणि दुसऱ्या दिवसाच्या कामाची सहकाऱ्यांना कल्पना देत. दररोजच्या या अनौपचारिक प्रात्यक्षिकांमधूनच बाल-अध्यापन-मंदिराची सुरुवात झाली. ( भावनगर इथे गिजुभाईंच्या अध्यापनमंदिराचा प्रारंभसुद्धा याच पद्धतीने झाला होता. )

सरलाताई देवधर, शेष नामले, अंबूताई सरदेसाई, इंदूताई जोगळेकर, सुशीला जागीरदार, माई खरे, बाळ ओझरकर इ. मंडळी ताईंच्या पहिल्या पहिल्या शिष्यांपैकी. यांतल्या काहींनी त्यांना तात्पुरती किंवा मधून मधून साथ दिली, काही थोड्यांनी कायमची संगत धरली.

सौ. सरलाताई देवधर या गृहिणी प्रथम शिशुविहाराकडे वळल्या त्या आपली मुलगी उषा हिला दाखल करण्याकरता. त्यांचे पती त्यावेळी बाहेरगावी कामावर असत. सरलाताई हळूहळू शिशुविहारात चाललेल्या कार्याकडे आकृष्ट झाल्या आणि मग त्या शिशुविहाराची पायरी उतरल्याच नाहीत. त्यांची दोन्ही मुले, त्यांचा गडी बाबू व त्या स्वत: असे समस्त देवधर कुटुंब शिशुविहारात शिकले. एकीकडे बी. ए., बी. टी. करत पुढे त्यांनी शिशुविहाराचे मुख्याध्यापकपद, अध्यापनमंदिराचे प्राचार्यपद गाठले. त्यांचा गडी तेथेच सातवीपर्यंत शिकला आणि शिशुविहाराचा प्यून व चालता बोलता ज्ञान-कोश झाला.

या सरलाताई ताराबाईंच्या अनुयायी झाल्या आणि त्यांच्या कुटुंबस्नेहीही झाल्या. प्रभादेवीतील त्यांची गट्टी झाली. परांजपे यांच्या जागेत असतानाच शिशुविहारमधील बालकसंख्या इतकी वाढली की ताराबाईंना अखेर आपली लहानशी खोलीही 'बालार्पण' करावी लागली. त्यानंतर मग देवधर व मोडक ही कुटुंबे हिंदू कॉलनीत एकाच इमारतीत वर-खाली अशी राहू लागली, याचे वर्णन मागे आलेच आहे.

शेजारी राहू लागल्यावर त्यांचा कुटुंबस्नेह दृढावत गेला. हा ऋणानुबंध पुढे नात्या-प्रमाणे दाट झाला आणि तसाच टिकून राहिला.

श्री. शेष नामले हे ताराबाई जेव्हा अमरावतीला होत्या तेव्हाच त्यांच्या शिक्षण-कार्याकडे आकर्षित होऊन त्यांच्याकडे आले. ताईंनी त्यांच्यावर नूतन-बाल-शिक्षण-संघाचा प्रचार करण्याचे व शिक्षणपत्रिकेचे वर्गणीदार मिळविण्याचे काम सोपवून बघितले आणि हा उत्साही शिष्य ताराबाईंच्या कसोटीला उतरला. विदर्भात नामल्यांनी प्रचार-



दौरेच काढले. ताराबाईंनी या नामलेभाऊंना पुढे भावनगरला गिजुभाईंकडे पाठवून दक्षिणामूर्तीतल्या अध्यापनमंदिरातून प्रशिक्षित करून घेतले. मग तेही शिशुविहाराला येऊन मिळाले. शिशुविहाराच्या प्रगतीला त्यांनी विशेष हातभार लावला– काही काळ ते शिशुविहारचे संस्थाप्रमुख, तसेच मुख्याध्यापक होते. शिक्षणपत्रिकेचे संपादकपदही त्यांनी अनेक वर्षे समर्थरीत्या सांभाळले.

प्रशिक्षणाला आलेल्या एक बाई तर लेखन-वाचनातही कच्च्या. परंतु त्यांना या कामात रस आणि उत्साह दांडगा असे. ताईंची व्याख्याने त्या भक्तिभावाने ऐकायला बसत. लेखी उत्तरे देण्याची क्षमता मात्र त्यांच्यापाशी नव्हती. ताईंनी त्यांना म्हटले,

"काही हरकत नाही. तू शिकत राहा. मी तुझी तोंडीच परीक्षा घेईन."

अमरावतीच्या वास्तव्यात मोडक दंपतीचे तेथील जागीरदार कुटुंबाशी विशेष स्नेह-संबंध होते. हे कुटुंब म्हणजे प्रसिद्ध नट गजानन जागीरदारांचे घर. ते, त्यांचा भाऊ प्रभाकर, बहीण सुशीला ही सर्वजण एकेकाळी ताराबाईंकडे राहून, पाहुणचार घेऊन गेली होती.

ही सुशीला जागीरदार एके दिवशी 'रुईया कॉलेज'मध्ये एम्. ए. साठी फॉर्म भरायला निघाली होती. परंतु येताना वाटेत तिला नप्पूरोडवरची,

शिशुविहार
बाल-अध्यापन-मंदिर
संस्थापक– ताराबाई मोडक

–अशी पाटी दिसली आणि तिच्या पूर्वस्मृती जाग्या झाल्या. गोऱ्यापान, ठसठशीत कुंकू लावलेल्या, हसऱ्या चेहऱ्याच्या आणि टोपपदरी चंद्रकळा नेसून ऑर्गंडीचा ब्लाउज घातलेल्या ताराबाई तिच्या डोळ्यांसमोर आल्या. आता त्या मुंबईला असून त्यांनी शिशु-विहार नावाची संस्था काढली आहे हे सुशीलेने वर्तमानपत्रात वाचले होते.

जाता जाता ताईंना भेटावे, शाळाही पाहावी म्हणून सुशीला आत शिरली, आणि ताराबाईंचे आताचे व्यक्तिमत्त्व पाहून ती चकितच झाली! तोच हसरा, गोल चेहरा, बोलण्यातला विनोदही तसाच, मात्र ताईंच्या व्यक्तिमत्त्वातली सुखवस्तूपणाची, राजस राह-णीची छटा लोपली होती. अंगावर खादीची पांढरी साडी आणि चेहऱ्यावर ज्ञानसाधनेच्या तपश्चर्येचे तेज, शांत-गंभीर नजर...

सुशीलेने सगळी शाळा दाखवून ताराबाईंनी तिला म्हटले, "एम. ए. होऊन तरी त्यातून नक्की काय साधणार आहेस? त्यापेक्षा शिशुविहारातच का येत नाहीस? आम्हाला होतकरू माणसं हवीच आहेत..."

सुशीलेने खरोखरच घरी जाईपर्यंत आपला बेत बदलला! ती शिशुविहारात दाखल

होऊन बालअध्यापनाचे काम शिकू लागली. पुढे नामलेमाऊ अक्क्यारला मॉन्टेसोरी अभ्यासक्रम करायला गेले तेव्हा दुसऱ्या सत्रापासून ती इकडे अध्यापनही करू लागली.

बाल-अध्यापन मंदिराच्या दुसऱ्याच तुकडीमध्ये एक पुरुष-विद्यार्थी आला. त्याचे नाव श्री. ढवळीकर. हा अभ्यासक्रम घेऊ इच्छिणारांची प्रथम चाचणी घेत आणि निवड करीत. ( प्रथम रु. ३० /- वार्षिक फीही घ्यावयाची ठरली होती; परंतु पुढे ती रद्द ठरवून ज्याची त्याला परत करण्यात आली. ) हा विद्यार्थी महिन्याभरातच कंटाळला. इथे आपण उगाचच काहीतरी निरुपयोगी शिकत राहिलोय, आपला वेळ फुकट चाललाय अशी भावना त्याच्यात उत्पन्न झाली.

श्री. ढवळीकरांनी आपले हे विचार ताईंना बोलून दाखवले.

ताराबाई त्यांना म्हणाल्या,

" नवीन जागेत राहायला गेलात की एका महिन्यात ती जागा चांगली की वाईट हे ठरवता ? नवीन कुणाचा परिचय झाला तर पहिल्याच भेटीत त्याला पास-नापास करता? त्याच्याबद्दल मत बनवता ? थोडा धीर धरा ! "

ढवळीकर राहिले. आणि एक-दोन महिन्यांतच त्यांना या कळवा फुलविण्याच्या कामात गोडी वाटू लागली.

अशा रीतीने ताराबाईंना मदतनीस मिळत गेले व त्या ते मिळवीतही गेल्या. आणि अखेर शिशुविहारच्या स्थापनेनंतर दोन-अडीच वर्षांनी म्हणजे १९३९ साली त्यांनी रीतसर ' बाल अध्यापन मंदिर ' काढले, अभ्यासक्रम निश्चित केला, प्रमाणपत्रके देण्यास सुरुवात केली.

पालकांनी आपल्या प्रयोगामागची भूमिका समजून घ्यावी असे ताराबाईंना सदैव कळकळीने वाटत असे. कार्याचा प्रसार करण्याच्या दृष्टीने तर जनमत अनुकूल करून घेणे हे महत्त्वाचे होतेच, परंतु सहकारी मिळविण्याच्या, आर्थिक मदत मिळविण्याच्या दृष्टीनेसुद्धा या ' मशागती 'ची आवश्यकता होती. आणखी एक म्हणजे बालकाचा विकास योग्य तऱ्हेने व सुसंगत पद्धतीने होण्यासाठी त्याचे घर व त्याची शाळा ही दोन्ही एकमेकांना पूरक असावीत, शिक्षकाच्या व पालकाच्या मूलभूत समजुतींतच तफावत असू नये, हे त्यांना आवश्यक वाटत होते. त्या दृष्टीने या सुरुवातीच्या काळातच त्यांनी काही सूचनापत्रके छापून पालकांना वाटली.

पालकांना त्यांनी सुचविले,--

' तुम्ही मुलांसाठी बागुलबुवा किंवा तत्सम बुजगावणे ( -शिपाई, बाघोबा, बुवाजी ) उभे केले असेल तर ते मोडून टाका. दुसऱ्यांच्या समोर त्यांना रागावू नका. त्यांना लाजवू नका. त्यांचा अपमान करू नका. आणि त्याचबरोबर त्यांची अवास्तव स्तुतीसुद्धा करू नका. शिक्षेच्या धाकाने कामे करून घेऊ नका. घरात मुलांसाठी त्याचे स्वतःचे असे



खोली, कोपरा, टेबल, कपाट, स्वतंत्र उद्योग त्याला काढून द्या. बालमंदिरातील कार्याचा त्याच्या वागणुकीवर काय परिणाम होतो याची नोंद घेत चला. '

याशिवाय निरनिराळ्या निमित्ताने पालकसभा घेतल्या जात; बाहेरही व्याख्याने होत. समाजाला बालशिक्षणासाठी अभिमुख करण्याची एकही संधी ताराबाई सोडीत नसत. व्याख्यानाची सर्व आमंत्रणे आवर्जून स्वीकारीत. अशा कार्यक्रमांना आपल्याबरोबर आपले दोनतीन मदतनीसही त्या घेऊन जात.

' तुमची मुलं आहेत ना ती आमच्या या ताईलोकांवर सोपवा. त्या व्यवस्थित सांभाळतील त्यांना. '

असे श्रोतृभगिनींना त्या आरंभीच सांगत. आपले विचार श्रोत्यांपर्यंत अचूक पोचावेत आणि निदान बालशिक्षणावरचे व्याख्यान तरी त्यांना पोरांना मडवून ऐकावे लागू नये हा त्यामागचा उद्देश होता. या उपक्रमामुळे आणखी एक गोष्ट साध्य होई. ताईंच्या बरोबर व्याख्यानाला जाऊन त्यांच्या शिष्याही हळूहळू या प्रचारकार्याला तयार होत. क्वचित कधी स्वतःला वेळ नसला की त्यांनाच ताराबाई पाठवून देत. शिष्या बिचकू लागल्या की ताराबाई म्हणत,

" प्रयत्न करा. जमेल. " ' पाण्यात ढकललं की पोहता येतं ' असे त्यांचे धोरण असे.

एके दिवशी आमंत्रणानुसार ताराबाई आणि मंडळी सभेच्या ठिकाणी पोचतात, तो हॉल रिकामा ! भाषणासाठी मोजून चार बायका हजर होत्या– बहुधा कार्यकारी मंडळाच्या, फुलदाणी आणि पाण्याचा ग्लास ठेवणाऱ्या !

ताराबाईंनी नेहमीपेक्षा १० मिनिटे जास्त जाऊ दिली आणि मग कसूर न करता नेहमीच्याच कळकळीने उपस्थित भगिनींना आपला विषय समजावून देण्यास सुरुवात केली,

" हे काय ताई, चारच बायकांसमोर तुम्ही भाषण करणार ? " एक सहकारी भगिनी उद्गारली. " त्यांतलीही एक पुन्हा लौकर जायचंय म्हणतेय ! "

" अग, असेनात का चार ! चार तरी आहेत ना ? अहो, अशा चार चार जोडीतच आपल्याला पुढे जायचं आहे. "

त्या दिवशी व्याख्यान आटोपून परतताना ताईंनी दक्षिणामूर्तीतली एक आठवण सांगितली. शून्यातून काही साकार करायचे म्हटल्यावर जी तपश्चर्या, चिकाटी, ढोरमेहनत लागते तिचे बी ताराबाईंनी तेथूनच शिशुविहारामध्ये आणले होते.

" तुम्ही आज चार बायकांपुढे कसलं बोलता म्हणालात ना ? पण मला तर असं आठवतंय की गिजुभाईंनी तर एकदा नुसत्या टेबलापुढे भाषण केलं होतं— नुसत्या टेबलापुढे ! "

मुंबईतल्याच एका प्रसिद्ध वसाहतीमध्ये एकदा हळदीकुंकू समारंभ होता. अध्यक्षा

म्हणून ताराबाईंना त्या बायकांकडून आमंत्रण आले. ताराबाईंनी आमंत्रण स्वीकारले, वेळ नक्की झाली. आणि मग अचानक त्या मंडळातील बायकांना कार्यकारी मंडळाची 'चूक' लक्षात आली,

"हळदीकुंकवासारखा समारंभ, आणि 'असली' बाई कशाला ?– नवऱ्याला सोडून आलेली..."

त्या बायकांनी आमंत्रण मागे घेतले. ताराबाईंना त्याचे काहीच वाटले नाही; निर्विकारपणे त्या म्हणाल्या,

"नसेल त्यांना रास्त वाटलं ! केलं असेल रहित. एवढंच ना ! त्यात काय झालं ?"

पुढे काही वर्षांनी त्याच संस्थेने ताराबाईंच्या एका शिष्येला बोलावले. त्यावेळी तिने आठवणीने ते माप संस्थेच्या पदरात परत ओतले—

"ते मात्र तुमचं चुकलंच. खरं म्हणजे हळदीकुंकवाच्या प्रसंगी अशा बाईंना बोलावून त्यांची खरी व्यथा तुम्ही समजून घ्यायला हवी होती. स्त्री-वर्गानेच जर अशांचे प्रश्न, व्यथा समजून घेतले नाहीत तर..."

बालशिक्षणाकरिता प्रशिक्षित विद्यार्थी तयार करण्यासाठी ताराबाईंनी जे बाल–अध्यापन–मंदिर काढले त्यात पहिल्या वर्षी फक्त पाच विद्यार्थी होते. त्यातही तीन स्त्री–पालक होत्या. एका वर्षाचा अभ्यासक्रम पूर्ण केल्यावर त्यांना ताराबाईंनी 'नूतन बालशिक्षक' हे प्रमाणपत्र दिले. पुढल्या वर्षी प्रशिक्षणाच्या विद्यार्थ्यांची संख्या १९ झाली. पैकी पाच विद्यार्थी गुजराती होते. याच सुमारास गिजुभाई बधेका दक्षिणामूर्तीतून निवृत्त झाले आणि राजकोट येथे जाऊन त्यांनी स्वतंत्र बाल–अध्यापन–मंदिर काढले. ताराबाईंच्या आणि गिजुभाईंच्या अध्यापनमंदिराची स्थापना एकाच वर्षी झाली. परंतु गिजुभाईंकडे २०० अर्ज आले तर ताराबाईंच्या अध्यापनमंदिरासाठी स्वतंत्र असा केवळ एक अर्ज आला. ताराबाईंना हा फरक खराच खटकला ! परंतु पुढल्या वर्षी, म्हणजे १९३९ साली ताराबाईंच्या बाल–अध्यापन–मंदिराला अचानक आणि अनपेक्षित बहर आला; त्याचे कारण मात्र धक्कादायक होते—

त्याच वर्षी वयाच्या पन्नासाव्या वर्षी गिजुभाईंना अकाली मृत्यू आला. १९३९ सालच्या पावसाळ्यातील ही हकीकत. मुंबई येथील हरकिसनदास हॉस्पिटलमध्ये पूज्य गिजुभाई बधेका यांना अर्धांगाच्या आजाराने अत्यवस्थ झालेल्या स्थितीत आणून ठेवले होते. हा त्यांचा शेवटचाच आजार, या वस्तुस्थितीची कल्पना त्यांच्या परिवारातल्या सर्व मंडळींना आली होती. गिजुभाई मूळचेच भावनाप्रधान. त्यांच्या जुन्या मित्रांपैकी कुणी भेटायला आले की ते हळवे होऊन एकदम रडायलाच लागत. ताराबाईंनाही फार वेळ बसायची परवानगी नव्हती. ही आता शेवटचीच भेट, या जाणिवेने मन घट्ट करून ताराबाई गिजुभाईंच्या खोलीत शिरल्या.



थोडा वेळ दोघांपैकी कुणीच बोलू शकले नाही. गिजुभाईंच्या उशाशी त्यांच्या पत्नी जडीबेन व मुलगा बच्चुभाई बसून होते. त्यांचे चेहरे उदास होते. बच्चुभाईही आता वडलांप्रमाणेच बालशिक्षणकार्यात रमला होता. हा बच्चूभाई आणि ताराबाईंची प्रभा छोटी छोटी असताना त्यांच्या बाल्यापासून स्फूर्ती घेऊनच गिजुभाई आणि ताराबाईंनी, जोडीने बालशिक्षण कार्याचा प्रकल्प रचला होता ! गिजुभाईंनी तर आयुष्यभर बालशिक्षणाखेरीज दुसरा विचारही मनात आणला नव्हता, असे म्हणायला हरकत नाही. "I am fired with Dr. Montesorie's principles," हे आपले वाक्यच जणू ते आयुष्यभर सक्रिय जगत आले होते. आता वाचा गेली होती, तरी त्यांचे मन आपल्या अपुऱ्या कार्यासाठी तडफडत होते. दोन्ही हातांनी खुणा करीत त्यांनी ताराबाईंना म्हटले,

"माझं आयुष्य आता संपलं !"

ताराबाई काय बोलणार ? त्यांनी भरून आलेल्या आवाजात म्हटले,

"असं कसं चालेल ? अजून तर आपलं पुष्कळ काम बाकी आहे. अशी सगळी कामं अर्धवट टाकून मध्येच कुणी जातं का ?"

गिजुभाईंनी पेन आणि पॅड मागवले. आपल्या अशक्त, कापऱ्या हातात सारी शक्ती एकवटून त्यांनी लिहिले,

"If you so desire, I shall continue the work, Providence granting life."

परंतु 'प्रॉव्हिडन्स 'ने त्यांना अधिक जगू देणे नाकारले. त्यांचे शरीर पार थकून गेले होते. वर्षानुवर्षे त्यांनी बालशिक्षण प्रसारासाठी आपल्या आयुष्याची मेणबत्ती दोन्ही टोकांकडून जाळली होती...शरीरावर परिणाम झाल्याशिवाय कसा राहील ?

ताराबाईंच्या या भेटीनंतर थोड्याच दिवसांत गिजुभाई कालवश झाले...

गिजुभाईंच्या निधनानंतर गांधीजींकडून आलेल्या दुखवट्याच्या संदेशात गांधीजींनी भाकीत केले,

"एमनुं काम उगी निकळशे ए हवे अटकशे नहीं."

—काकासाहेब कालेलकरांच्या शब्दांत "बालसाहित्याचा ब्रह्मा गेला !"

—आणि मॅडम मॉन्टेसोरी यांचा भारतातला निस्सीम भक्त गेला.

ज्या मॉन्टेसोरीबाईंना गुरु मानून गिजुभाईंनी आपले चौफेर कार्य केले त्या आपल्या गुरूच्या बाबतीत मात्र गिजुभाई अभागी ठरले. त्यांना मॉन्टेसोरीबाईंचे दर्शन, मार्गदर्शन तर दूरच, साधे आशीर्वादसुद्धा लाभले नाहीत.

मूळ प्रेरणा जरी गिजुभाईंनी मॉन्टेसोरीपासून घेतली असली तरी त्यांनी स्वतंत्ररीत्या विचार करून आपली शिक्षणपद्धत पुष्कळच व्यापक, शास्त्रीय व भारतीय परिस्थितीला अनुकूल अशी करून घेतली होती. इतकी की काकासाहेब कालेलकरांसारखे ज्येष्ठ

शिक्षणतज्ज्ञ त्यांना 'स्वयंभू' समजत, व ह्यांच्या पद्धतीला 'गिजुभाई शिक्षणपद्धती' म्हणत. गिजुभाईंना स्वतःला मात्र ती आपल्या गुरूशी प्रतारणा वाटे. संघाला 'मॉन्टेसोरी संघ' हे नाव देण्याचा आग्रह त्यांनी धरला, तो याच भावनेतून.

पुढे मॉन्टेसोरीबाईंना इटलीतून, त्यांच्या मायदेशातून हद्दपार केल्यानंतर (१९३८–३९) त्यांच्या या शिष्याने त्यांना आवर्जून भारतात येण्याचे आमंत्रण दिले. गिजुभाईंच्या कार्यामुळे त्या प्रत्यक्ष येथे येण्यापूर्वी त्यांच्या नावाचा, सिद्धान्तांचा भारतात बोलबाला झाला होता. त्यामुळेच येथे त्यांचे जंगी स्वागत झाले व त्यांच्या बालशिक्षणप्रचार कार्याला तयार अशी पार्श्वभूमी त्यांना मिळाली.

प्रत्यक्षात मात्र या 'द्रोणाचार्यें'ने गिजुभाईंच्या कार्याचे, निष्ठेचे कौतुक न करता, त्यांना प्रोत्साहन न देता त्यांच्या प्रयत्नांवर कडक टीकाच केली. आपल्या नावाचा वापर करावयाचा असल्यास आपल्या साधनांचा आकार रंग, रचना इत्यादींमध्ये केसाचाही फरक करता कामा नये अशी ताकीद त्यांनी बाहीरीत्या दिली. मॉन्टेसोरीबाईंची ही खप्पा मर्जीही गिजुभाईंनी शिरसावंद्य मानली. आपल्या शिक्षकांना ते 'मॉन्टेसोरी शिक्षक' ऐवजी 'नूतन बाल-शिक्षक' असे प्रमाणपत्र देऊ लागले.

मॉन्टेसोरीबाई भारतात आल्या त्यापूर्वी काही महिने गिजुभाईंचे निधन झाले होते. गिजुभाईंच्या या आराध्यदेवतेने लिहिलेल्या दुखवट्याच्या पत्रात खालील वाक्ये होती–

"I never knew him. I wish I had, for he was a great lover of the child. No obstacle stopped him in his endeavour to bring them freedom and happiness. I admire all those who strive for the child along my lines and if one has done so to the detriment of his interest, to the sacrifice of his life, that one is worthy of being remembered. May he live long in the hearts of the soldiers of the child ..." —Maria Montessorie

गिजुभाईंनी इतर कार्यकर्त्यांबरोबर काही मतभेद होऊन त्यामुळे भावनगर सोडले होते व गिजुभाई संस्थेबाहेर पडताच दक्षिणामूर्तीतले अध्यापनमंदिर बंद पडले होते. गिजुभाईंच्या मृत्यूनंतर त्यांचे राजकोटचे अध्यापनमंदिरही बंदच पडले. त्यामुळे बालशिक्षण-कार्याचा सर्वाधिक प्रसार गुजरातेत; पण गुजराती भाषिकांसाठी अध्यापनमंदिर कुठेच अस्तित्वात नाही, अशी परिस्थिती निर्माण झाली. साहजिकच प्रशिक्षण घेऊ इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या लोंढ्याने मुंबईतल्या शिशुविहाराकडे वळली.

अर्थात अध्यापनमंदिराचा गुजराती विभाग काढणे काही ताराबाईंना लगेच शक्य होणार नव्हते. मग ताराबाईंनी अध्यापनमंदिराच्या बाबतीतही एक अभिनव प्रयोग यशस्वी करून दाखविला. गुजराती–मराठी या दोन्ही भाषांतील विद्यार्थ्यांना त्या एकाच वर्गात बसवीत व त्यांना द्वैभाषिक शिक्षण देत. सुरुवातीस काही दिवस त्या तोच विषय आलटून पालटून एकेक दिवस वेगवेगळ्या भाषेतून शिकवीत. त्यामुळे दोन्ही भाषांत व दोनदा विषय कानावरून जाई, भाषा सरावाची होई. विद्यार्थी दोन्ही भाषांना रुळले की मग दीड-दोन महिन्यांनंतर एक दिवस मराठीत तर एक दिवस गुजरातीत त्या व्याख्याने देत. एव्हाना बहुतेकांना दोन्ही भाषा सवयीच्या झालेल्या असत. आणि त्यातून एखाद्याला एखादा भाग अडचणीचा वाटला तर तो त्याला त्याच्या मातृभाषेतून पुन्हा समजावून देण्याची ताराबाईंची तयारी असेच!

त्यांच्या इतर मदतनीस, शिष्या 'मला कसं जमणार?' 'मला येणार नाही' म्हणू लागल्या तर अशा प्रश्नांना त्यांच्याजवळ एकच उत्तर असे आणि ते बहुधा रामबाण ठरे, "प्रयत्न कर, सगळं येईल! मला कसं आलं असेल? मी कसं केलं असेल?"

प्रथम प्रयत्नपूर्वक आत्मसात करावी लागलेली गुजराती भाषा कालांतराने त्यांच्या तर मनाची भाषाच होऊन गेली होती. कित्येकदा मराठीतून व्याख्यान देता देता नकळत त्या सहजपणाने गुजरातीतून बोलू लागत. मराठी विद्यार्थी मग त्यांना आठवण करून देत– "अहो, पण ताई! तुम्ही गुजरातीत बोलताय!"

वर्षभरातच गुजराती विभाग वेगळा काढणे शक्य झाले आणि हा प्रयोग संपला. पुढे १९५० साली गुजराती बालमंदिरही निघाले.

गिजुभाईंनी दक्षिणामूर्तीतल्या अध्यापनमंदिरातील विद्यार्थ्यांसाठी जो अभ्यासक्रम आखला होता तोच प्रथम ताईंनी शिशुविहारात सुरू केला आणि त्यानंतर त्यांनी त्यात योग्य ते बदल आणि सुधारणा केल्या.

गिजुभाईंनी अध्यापनमंदिरात प्रवेशासाठी शैक्षणिक पात्रतेची अट ठेवली नव्हती. बालशिक्षणात रस असलेल्या कोणत्याही व्यक्तीला ते परिश्रमपूर्वक व कौशल्याने घडवादला घेत व तिच्यातून कार्यकर्ता मिळवीत. आता येथे ताराबाईंनी मात्र आपल्या विद्यार्थ्यांचे शैक्षणिक लायकीनुसार दोन भाग पाडले. मॅट्रिकहून कमी शिकलेल्यांकरता त्यांनी एक वर्षाचा संक्षिप्त अभ्यासक्रम ठेवला. या अभ्यासक्रमाचे नाव बालक्रीडांगण. हे विद्यार्थी बालमंदिरातल्या शिक्षकाला मदतनीस म्हणून, उपशिक्षक म्हणून काम करण्यास लायक होत. बालक्रीडांगणाच्या अभ्यासक्रमात मॉन्टेसोरी शैक्षणिक साधनांना विशेष महत्त्व नसे. मात्र ग्रामीण भागात बालशिक्षणकार्य करण्यास उपयुक्त अशा बाबींचा समावेश असे.

मॅट्रिक उत्तीर्ण झालेल्यांसाठी बालशिक्षकांचा दोन वर्षांचा अभ्यासक्रम होता. यात मॉन्टेसोरी साधनांचा अभ्यास व इतरही अनेक विषय सविस्तर असत.

अध्यापन मंदिराचा अभ्यासक्रम तपासण्यासाठी ताईंनी सुरुवातीपासूनच तीन शिक्षणतज्ज्ञांची समिती नेमली. तसेच या अभ्यासक्रमाला सरकारी मान्यता मिळावी म्हणून त्यांनी १९३९ पासूनच प्रयत्न सुरू केले. अशा प्रकारच्या प्रयत्नांमुळे येथल्या प्रशिक्षणाला विशेष दर्जा प्राप्त झाला. सरकारी शिक्षणखात्याचे निरीक्षक येऊन अध्यापनमंदिराचे काम तपासू लागले. अभ्यासक्रम सरकारमान्य झाला; संस्थेला सरकारी अनुदानही मिळाले. या विद्यार्थ्यांच्या परीक्षा शिशुविहार मंडळातर्फे घेतल्या जात. परीक्षक म्हणून मात्र बाहेरचे नामवंत शिक्षणतज्ज्ञ बोलावण्यात येत. यानंतर काही पदवीधर विद्यार्थी या अभ्यासक्रमाकडे आकृष्ट होऊ लागले. तेव्हा ताईंनी १९४४ साली पदवीधरांसाठी एक ऑनर्स–कोर्सही काढला परंतु पुढे तो बंद करावा लागला. कारण ताराबाईंना अपेक्षित होते तेवढ्या संख्येने पदवीधर मंडळी या क्षेत्राकडे वळली नाहीत.

ज्या अभ्यासक्रमाला आरंभी सरकारी मान्यताही नव्हती त्याचे अध्यापन मंदिर काढणे ही गोष्ट तशी धाडसाची होती; परंतु एव्हाना ताराबाईंचे नाव शिक्षणक्षेत्रात इतके मोठे झाले की त्यांची सही असलेल्या प्रमाणपत्राला सरकारमान्यतेसारखी प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. शिशुविहाराच्या या बालअध्यापन मंदिरातून शेकडो विद्यार्थी प्रशिक्षित होऊन बाहेर पडले. या विद्यार्थ्यांनी ठिकठिकाणी बालमंदिरे काढून बालशिक्षणकार्य पुढे नेलेच परंतु त्यांच्यापैकी काहींनी ठिकठिकाणी स्वतंत्र अध्यापन मंदिरेही काढली.

संस्थेची स्वतःची इमारत असावी अशी संस्थाप्रमुखसुलभ इच्छा ताईंच्या मनात १९३७ पासूनच होती व प्रत्येक वार्षिकोत्सवात त्या हे उद्दिष्ट बोलून दाखवीत असत. परंतु अकरा वर्षेपर्यंत हे ईप्सित साध्य झाले नाही. परांजपे यांच्या इमारतीचा तळमजला अपुरा पडू लागल्यामुळे पहिल्या तीन वर्षांनंतर त्या स्वतः स्वतंत्र बिऱ्हाड करून राहू लागल्या होत्या. शिशुविहार व अध्यापनाचे वर्ग मात्र परांजप्यांच्या बंगल्यांतच भरत असत. १९४८ सालापर्यंत संपूर्ण संस्था या भाड्याच्या जागेत होती.

बालमंदिरात भरघोस संख्येने बालके दाखल होऊ लागली. त्यामुळे ताराबाईंना प्राथमिक विभाग बंद करण्याचा निर्णय घ्यावा लागला. (साहजिकच प्रशिक्षणाच्या अभ्यासक्रमातूनही प्राथमिक शिक्षणाचे प्रशिक्षणही कमी करण्यात आले.) आपली संस्था मुख्यतः पूर्वप्राथमिक शिक्षणासाठी असल्यामुळे प्राधान्य बालमंदिरालाच असावे अशी त्यांना मर्यादा घालून घ्यावी लागली; परंतु हा निर्णय योग्य नव्हता व ताराबाईंनीही तो नाइलाजानेच घेतला होता. पुढे संस्थेची स्वतःची इमारत झाल्यानंतर (१९४९) पुन्हा प्राथमिक विभाग (१९६१) व माध्यमिक विभागही (१९६५) काढण्यात आले. त्याचप्रमाणे कालान्तराने अध्यापनमंदिराचा गुजराती विभाग स्वतंत्र करण्यात आला. मात्र प्रशिक्षणाच्या विद्यार्थ्यांना जे प्रॅक्टिसिंग स्कूल लागते त्यासाठी गुजराती बालमंदिर काढणे त्यांना लगेच शक्य झाले नाही. त्यामुळे काही दिवस गुजराती विद्यार्थी मराठी



बालमंदिरातच काम करीत किंवा चर्नीरोड येथे एक गुजराती बालमंदिर होते तेथे त्यांना प्रात्यक्षिकांसाठी जावे लागे. यथावकाश मग गुजराती बालमंदिरही काढण्यात आले. हळूहळू गुजराती पालकांच्या मागणीवरून मराठी विभागात असलेले सारे पोटविभाग गुजराती शाखेतही काढण्यात आले. आता परांजपे यांचे घर पाडून त्याजागी ओनरशिपचे ब्लॉक्स बांधण्यात आले असले तरी आजही त्या घराचा तळमजला संस्था भाड्याने वापरीत असते. आता फक्त गुजराती अध्यापनमंदिर त्या जागेत भरते. बाकी सर्व विभाग शिशुविहारच्या दुमजली इमारतीत आहेत.

मुख्य संचालिकेचे धोरण निरोगी व निःपक्षपातीपणाचे असल्यामुळे हे दोन्ही विभाग गुण्यागोविंदाने एकत्र वाढत, फुलत फळत राहिले व गुजराती-मराठी विकल्प शिशुविहारात मूळ धरू शकला नाही. ताराबाईंच्या प्रयत्नांची आता सरकारही दखल घेत होते, त्यांच्या संस्थेला योग्य ते महत्त्व देत होते. शिशुविहाराची समाजातली प्रतिष्ठा त्यामुळे वाढली होती.

अध्यापनमंदिराच्या विद्यार्थ्यांना शिशुविहारात बालशिक्षणाचे प्रशिक्षण तर मिळेच, परंतु ताईंच्या वागणुकीतून त्यांच्या व्यक्तिमत्त्वांवरही संस्कार होत. प्रशिक्षण विभागात ताराबाई संस्थाप्रमुख असताना शिशुविहारातले वातावरण कसे होते व ताराबाईंच्या प्रभावी व्यक्तिमत्त्वाची त्यावर किती दाट छाप होती हे त्यांच्या त्या वेळच्या काही विद्यार्थी–विद्यार्थिनींनी सांगितलेल्या आठवणींवरून ध्यानात येईल—

अध्यापनमंदिराच्या सुरुवातीच्या काळातली गोष्ट. सुरुवातीस अध्यापनमंदिराचे नेमके तास असे नसत. दिवसाचे दोन स्थूल भाग पाडलेले असत. बालमंदिराच्या वेळात विद्यार्थी मुलांमध्ये मिसळत. मुले घरी गेली की ताई त्यांना व्याख्याने देत. या व्याख्यानांना मग घंटेचे बंधन नसे. सुरू केलेला भाग पूर्ण करायचा! वेळेचे भान ताईंनाही राहत नसे व विद्यार्थ्यांनाही. ताईंना तर आपल्या विचारांना आणि बोलण्याला बांध घालताच येत नसे! एकदा त्या 'कल्पना आणि तरंग' यांच्यातला सूक्ष्म भेद विशद करत होत्या. व्याख्यान इतके काही रंगले की नोट्स घेताघेता एकीकडे अंधारून आले. अक्षरे दिसेनाशी झाली तेव्हा कुठे विद्यार्थिनी भानावर आल्या. घरी जाताना मात्र मुलींना भीती वाटू लागली. कारण हिंदू कॉलनीतली वस्ती त्या वेळी फार तुरळक होती!

नेपोलियनच्या कोशात ज्याप्रमाणे 'अशक्य' हा शब्द नव्हता त्याचप्रमाणे ताईंच्या कोशातही 'वाईट मूल' हे शब्द नव्हते. मुले मुळात वाईट कधीच नसतात. आपण त्यांना गैर वागणूक देतो म्हणून ती तशी वागतात असे त्या सांगत आणि त्या जे विधान करीत ते नेहमी सप्रमाण असे. आपल्या प्रत्येक मताला अभ्यासाचा, प्रत्यक्ष अनुभवाचा आधार देण्याबाबत त्यांचा कटाक्ष असे. त्यातून कुणाच्या मनात किंतू राहिलाच तर त्यांच्या प्रत्यक्ष कृतीतून त्याला केव्हातरी उत्तर मिळे व ती शंका धुऊन निघे.

'ताईंचा प्रत्येक पाठच त्यामुळे आदर्श असे. प्रत्येक मुलाची नाडी ओळखून त्यानुसार त्याच्याशी वागून त्याला आपलेसे करण्याचे, त्याला धाक न दाखवता, आवाजसुद्धा न चढवता सरळ करण्याचे अद्‌भुत कसब त्यांच्या अंगात होते. द्वाड, दंगेखोर, रडकी— सर्व मुले त्यांच्याभोवती खरोखरच शांतपणाने खेळताना दिसत. मुले आणि ताई दोघेही एकमेकात रंगून गेलेली असत.

या संदर्भात एक मनोरंजक आठवण एका विद्यार्थिनीच्या स्मरणात ठसलेली आढळते. प्रशिक्षित विद्यार्थ्यांपैकी कोणालाच सहसा रडकी, भांडखोर, आळशी मुले वर्गात नको असत. सगळी स्वच्छ, हसरी, खेळकर मुले त्यांना आवडत!

एके दिवशी शिक्षिकांची जरा कमतरता होती. विद्यार्थिनींना तेवढीच मदत, म्हणून ताई म्हणाल्या, "वर्गात न रमणारी मुलं असतील त्यांना खेळणी आणि साधनं देऊन माझ्या खोलीत पाठवा, रमली की पाठवत जाईन परत वर्गात!"

मुली काय, खूषच. सूर धरून बसणारी, नावडती अशी सगळीच पोरे हळूहळू ताईंच्या वर्गात रवाना झाली. इतर वर्गांमध्ये 'आदर्श' शांतता नांदू लागली. दोन-तीन दिवसांनी ताई पुन्हा म्हणाल्या, "मला जरा आठ दिवस जास्तीचं काम आहे. मुलंही जास्त आहेत. एकेक जण आळीपाळीने माझ्या मदतीला या."

थोड्याच वेळात मुलींच्या ध्यानात आले की सर्वच रडक्या मुलांचा वर्ग सांभाळणे किती कठीण आहे! त्यापेक्षा एकेका वर्गात तीनचार अशी विभागली गेलेलीच बरी. आठवड्याच्या आत ताईंचा वर्ग रिकामा झाला. एक बिनशब्दांचा धडा ताईंनी न बोलता मुलींना शिकवला होता.'

'दर महिन्याला वेगवेगळी प्रदर्शने शाळेत होत असत. मुलांसाठी, पालकांसाठी, भावी शिक्षकांसाठी. करायचे ते सारे व्यवस्थित अशी ताईंची शिस्त. एक दिवस पूर्व-तयारी, दुसरा दिवस मुख्य आणि तिसरा दिवस आवरासावरीचा. या वेळापत्रकाला मुली म्हणत, 'ताईंची त्रिसूत्री.'

पहिले दोन दिवस उत्साहाने पार पाडले जात. पण 'मागले आवरण्याचा' मुलींना कंटाळा येई. कारण त्यासाठी बहुधा रविवारी मुद्दाम शिशुविहारात यावे लागे. बऱ्याच-जणी बहुधा तिसऱ्या दिवशी अनुपस्थित राहात. एका रविवारी मात्र गंमतच झाली. एकसुद्धा मुलगी आवरासावरीला आली नाही. 'आली मेटीला, धरली वेठीला' या न्यायाने काहीतरी निरोप घेऊन आलेल्या सुशीलेला ताईंनी हाताशी घेतले आणि मोलकरणीच्या मदतीने आवरणे संपविले. हळूच मुलींची चौकशी केली, तेवढीच.

दुसऱ्या दिवशी त्यांनी वर्गात काहीच विचारले नाही. मुलींना वाटले, वाचलो!



आपण केलेला अपराध या विसरल्यादेखील. प्रत्येकीलाच वाटले, आपण तेवढ्या नव्हतो, बाकीच्या आल्याच असतील, ताईंच्या काय ध्यानात येतंय! व्याख्यान सुरू झाले. ताईंनी सुरुवात केली तीच मुळी बुधली बुधली दुधाने मंदिराचा गाभारा भरण्याच्या गोष्टीने. शेवटी म्हणाल्या, "असंच अगदी काल आमच्या बालमंदिरात झालं! प्रत्येकीला वाटलं मी एकटी गेले नाही तर काय झालं, बाकीच्या आहेतच की! म्हणून कोणीच आलं नाही. शेवटी काम झालंच. दुसऱ्या दिवशी मुलींची मात्र तारांबळ! ताईंनाही कळलं, या देवळात येणाऱ्या भक्तांत कितपत श्रद्धा आहे..."

मुली नुसत्या शरमेने लाल झाल्या. पुन्हा असे करायचे नाही अशी त्यांनी मनोमन खूणगाठ बांधली.'

एकदोन मिनिटे जाऊ दिल्यानंतर ताईंनीही मोकळ्या मनाने व्याख्यानाला सुरुवात केली.

विद्यार्थिनींना ताईंबद्दल भक्ती, आपलेपण वाटे, तसाच त्यांचा धाकही वाटे. 'ताई वाक्यं प्रमाणम्' समजून त्या वागत असत. प्रत्येक गोष्टीतल्या लहानसहान तपशीलाचीही बारकाईने व वेळेवर काळजी घेतली पाहिजे हा ताईंचा आग्रह. त्या स्वतः कोणत्याही कामात अंगचोरपणा किंवा चालढकल करीत नसत. आणि तसेच काम त्यांना इतरां-कडूनही अपेक्षित असे. कसेतरी, काहीतरी आटपून टाकलेले त्यांना कधीच चालत नसे. त्यामुळे त्यांच्या अपेक्षेला उतरणारी माणसे फार थोडी. ध्येयवादी, कर्तबगार व्यक्ती पूज्य, आदर्श, अनुकरणीय असल्या तरी पुष्कळदा त्यांचा सहवास भोवतालच्या सामान्य माणसांना तापदायक ठरत असतो. मुलींच्या कुठल्याही कार्यक्रमात ताईंना दहा फटी दिसत. वेळप्रसंगी मग त्या भर वर्गात जाऊन संबंधित शिक्षिकेला बोलून दाखवीत, रागे भरीत.

ताईंच्या धारदार, तीक्ष्ण नजरेखाली गडबडीने कामे करताना मुली मग हळूच सरला-ताईंजवळ कुरकुरत, "तुमचा गळा गोड आहे, त्यामुळे तुम्ही आपल्या सगळ्यातून सुटता! हातात झांजा घेऊन गाणी म्हणायला तुम्ही आपल्या पेटीजवळ आरामात उभ्या! आमची बघितलीत, फरपट!"

कोणत्याही कार्यक्रमाची तयारी ताई अतिशय बारकाईने व काटेकोरपणाने करीत. चार माणसांची बैठक असली तरी फुलदाणी, पाणी सर्व जेथल्या तेथे व्यवस्थित पाहिजे. सतरंजीचा कोपरा दुमडला तर स्वतः जाऊन नीट करतील. मीटिंग वेळच्या वेळीच सुरू करतील.

मुलांसाठी एखादे नाटुकले बसवले की ताईंचे विच्छेदन चालू, "आता हा बापू धोबी आहे ना?— मग धोब्याच्या हातात गाठोडे का नाही? तेवढं पैदा करणं इतकं अशक्य होतं का? त्यात काय कठीण होतं?"

अशा प्रश्नांना मुलींजवळ काय उत्तर असणार? त्यांना साहजिकच त्यांची फटफट

वाटे. पण ताई त्यांना समजावत " वेठ कशातच मारू नका, मुलांच्या कामाला तर नकाच. ' मुलांसाठी तर आहे, आहे, पालक थोडेच यायचे आहेत, ' ही पळवाट का ? आपण जेवढे व्यवस्थित राहू तितकी व्यवस्था मुलांमध्ये उतरते. मुलांना आपण नेहमी सर्व चांगलंच दाखवलं पाहिजे. आणि थोडे कष्ट, थोडी अधिक योजकता, दूरदृष्टी ठेवली की जमतं– कामात संपूर्ण रस घ्या म्हणजे असं होत नाही ! "

रोज गाण्याच्या वेळी फळ्यावर गाणे लिहून ठेवलेच पाहिजे; चार ओळींची चिट्ठी लिहिली तरी प्रत्येक शब्द, त्याची योग्य जागा, वापर, व्याकरण तपासून पुढे पाठवली जावी, असा त्यांचा कटाक्ष.

परंतु विद्यार्थिनींचे वय टिवल्याबावल्यांचे. —रस्त्याने एखादी मिरवणूक गेली की मुलांबरोबर किंवा पाऊलभर त्यांच्या आधीच त्या खिडकी गाठीत ! येताना पाहिलेली सिनेमाची जाहिरात मध्येच एकदम त्यांना आठवे ! एकदा हसू येऊ लागले की ते थांबविणे त्यांच्या हातात नसे ! ताईंसारखा अर्जुन छाप एकलक्षीपणा त्यांना कसा साधावा ? ताराबाई मोडकांसारख्या त्या पोक्त नव्हत्या, झपाटलेल्याही नव्हत्या. सिनेमा, साड्या, भावगीते— इतर दहा हलकेफुलके व्याप त्यांच्या मनांना होते. ' ताई, पण तुम्ही आमच्या दृष्टीने विचारच करत नाही ! ' त्या मग कुरकुरत.

परंतु ताईंची ती जीवनदृष्टीच होती. मोंगळपणाला त्यात स्थान नव्हते.

वर्गात पाठ घेताना जो काटेकोरपणा त्यांना अभिप्रेत असे तोच दृष्टिकोन घरी स्वयंपाक घरातले प्रयोग घेतानाही असे ! काही दिवस सुशीला जागीरदार, वसुंधरा श्रीखंडे ( आता सौ. कोमकली ). लली जयवंत ( माई जयवंतांची कन्या ) अशा पाचसहा मुली त्यांच्या घरी राहायला होत्या. याशिवाय प्रभा, इंदिराताईंच्या मुली इ. ही असतच. सुटीच्या दिवशी या सर्व मुलींना ताई नवे नवे पदार्थ शिकवीत. त्या वेळीही पूर्वतयारी, वस्तूंचा योग्य वापर, त्या परत जागच्या जागी ठेवणे, पदार्थ ठेवावे कसे, वाढावे कसे— या साऱ्या कवायतीला पदार्थांच्या चवीइतकेच महत्त्व असे. कोणता पदार्थ करावयाचा ते नक्की करून त्याला लागणारे साहित्य शनिवारीच आणून, साफ करून ठेवावे लागे. योग्य प्रकारची भांडी जमवून, स्टोव्हमध्ये तेलही भरून ठेवावे लागे. आणि पदार्थ करून झाला की इतर पसाऱ्याचा मागमूस कुठे राहता कामा नये !

वेळप्रसंगी त्या विद्यार्थिनींवर खेकसत, त्यांच्या डोळ्यांतून पाणीही काढत परंतु आपल्या विद्यार्थिनींच्या, सहकाऱ्यांच्या सोयींकडे, अडचणींकडे त्यांचे जातीने लक्ष असे.

कधी कुणाचे मूल तान्हे असेल तर घड्याळाकडे लक्ष ठेवून तिला त्याच्या भुकेच्या वेळी आठवणीने घरी धाडणे, कुणाच्या मुलाला ताप आला असला तर तिला आपण होऊन व मनापासून रजा देणे, कुणाचे यजमान बाहेरगावाहून आले तर आपणहोऊन तिला लौकर जाण्याची सवलत देणे...



एके दिवशी वर्ग चालू असताना मध्येच बाहेरच्या बाजूला कावकाव झाली. एक कावळ्याचे पिल्लू मरून पडले होते. मुलांचे कुठले मग पाठात लक्ष लागायला ? ताईंनी त्यांना खिडकी बंद करायला सांगितली नाहीच; उलट आपण होऊन पाच मिनिटे सुटी जाहीर केली— ' कावळा बघायला ! ' मुलांचे ते कुतूहल त्यांना वाजवी अन् नैसर्गिकच वाटले. आणि मुलांबरोबर त्यांच्या ताई लोकांनाही अशाच त्या समजून घेत.

एका वर्षी पावसाळ्यात समुद्राचे पाणी थेट वस्तीत घुसले ! प्रशिक्षणाच्या विद्यार्थिनी म्हणजे तरी काय, पोरीच त्या ! त्यांच्यात चुळबूळ चुळबूळ सुरू झाली. एकीने अखेर धीर करून हळूच विचारले,

" ताई, पाणी पाहायला जाऊ आम्ही ? "

" हो ऽ जा ! फार पुढे जाऊ नका मात्र ! आणि परत आल्यावर माझ्या साड्या नेसा सगळ्या जणी. तशाच बसू नका. किती जणी आहात ?... निघतील तेवढी पातळं आमच्याकडे. जा ! "

पैशाच्या बाबतीतही त्यांचे वर्तन अत्यंत चोख. वास्तविक त्या शिशुविहारात कमी पगारावर काम करीत. प्रसंगी पदरची भर करीत. पण म्हणून एखाद्या शनिवारी शिक्षिकांबरोबर साबुदाण्याची खिचडी खाल्ली तर वर्गणीचे चार आणे पर्समधून काढून टेबलावर ठेवलेच. कधी प्रभाने त्यांच्याबरोबर कॉफी घेतली तर खात्यावर त्याची नोंद झालीच. प्रभाच्या फी माफीचा प्रश्न निघाला, आग्रह झाला, परंतु त्याबाबतीत ताराबाईंनी कुणाचे ऐकले नाही. ' आपली संस्था गरीब आहे ' असे म्हणून त्या स्वतःच्या मुलीची फी देत राहिल्या. संस्थेला जन्म देणाऱ्या व्यक्तीने सुरू केलेली ही परंपरा साहजिकच शार्कांचेही पाळीत. आता सुद्धा पैसे काढून द्यायचे राहिले की शिक्षिकांना वाटते, ' अरे, ताई कशा चटकन् काढून द्यायच्या, नि आपण...'

सहकाऱ्यांच्या दोन तीन आठवणीही ताराबाईंचे व्यक्तिदर्शन घडवून जातात.

ताराबाईंच्या शाळेतलीच एक शिक्षिका, परंतु पुरेसा पोच नसलेली, शिशुविहारमध्ये काम करत असताना एकीकडे बाहेर संस्थेविरुद्ध, ताईंविरुद्ध बडबडत फिरे. " एवढं काय त्या ताराबाईंचं स्तोम माजवतात तिथे कुणास ठाऊक ! " वगैरे वगैरे.

ताराबाईंच्या कानावरही तिचे हे उद्गार गेले होते. परंतु त्यांना दुसरा कान होताच ! त्या तो अशा प्रकारच्या गोष्टी बाहेर सोडून देण्यासाठी वापरीत. पुढे काही दिवसांनी ती बाई ताराबाईंकडे कुठल्या तरी नोकरीसाठी शिफारसपत्र मागण्याकरता आली. ताराबाईंनी ते तिला शांतपणे लिहून दिले.

ती गेल्यावर कुणीतरी न राहवून म्हटले, " हे काय ताई, तुम्ही तिची शिफारस केलीत ! बाहेर ती तुमच्याबद्दल विचार न करता वाटेल ते बडबडते—"

" मग ! बोलत असेल ! तिला वाटत असेल तसं– मला नावं ठेवावीत असं. "

" पण निदान तुम्ही तिला ... "

" मला नाही वाटलं तिला शिफारसपत्र देऊ नये असं ! झालं. "

आर्थिक बाबतीतही त्या दुसऱ्याला समजून घेत. त्या स्वतः कार्य पुढे जावे म्हणून शंभर रुपयांवर काम करीत. घरसंसार, पाहुणेरावळे, प्रभाची हौस–मौज, आजारपण, देणीघेणी सारे त्यात भागवीत.

(पुढे नामलेभाऊंना प्राचार्य म्हणून घेतले; त्यांना पगाराविषयी बोलायची वेळच येऊ दिली नाही. त्यांचा पगार त्यांनी दुप्पट, रु. २००।- केला.

" हे काय ताराबाई, तुम्ही संस्थाप्रमुख – तुम्हांला पगार शंभर आणि ते हाताखालचे तरी त्यांना दुप्पट ! "

" मग असेना दुप्पट. माझ्यामागे संसार नाही. त्यांना संसार आहे, मुलंबाळं आहेत. माझ्या गरजाही थोड्या असतात. त्यांनी का मागवावे तेवढ्या पैशात ? ")

ताराबाईंनी घटस्फोट घेतला अशी बऱ्याच जणांची समजूत होती. त्यामुळे काही दुःखीकष्टी विवाहिता त्यांचा सल्ला, आधार मागायला जात. लोकांना वाटे, ताराबाई त्यांना फितवतील, घटस्फोट घेण्याचा सल्ला देतील.

परंतु स्वतःचा संसार मोडलेला असूनही इतर अनेक संसार त्यांनी सांधून जोडून दिले. पती व पत्नी दोघांच्या बाजू ऐकून संघर्ष कसा टाळता येईल याचा विचार ताराबाई जिव्हाळ्याने अशा जोडप्याशी करत.

एका मदतनिसाला तर त्यांनी प्रेमळ धाकच दाखविला की " बायकोला परत आण; तरच नोकरी देईन ! "

एकदा एक बाई मोठ्या तडफदारपणे त्यांच्या पावलावर पाऊल टाकून गृहत्याग करायला निघाली. अगदी " पुन्हा मी त्या घरात पाणी पिणार नाही, " म्हणून प्रतिज्ञा करत आली. ताईंनी तिला चुचकारले,

" बाई ग, तू आधी शांत हो ! मुळीच जाऊ नकोस त्या घरी परत ! माझ्या घरी चल ! सहा महिने माझ्याजवळ, त्यांना एकदाही न भेटता राहिलीस तर मग मी तुझ्या घटस्फोटाची परवानगी देईन. पण आततायीपणा करायचा नाही. "

पंधरा दिवसांत ती व्याकुळ झाली. दुसरे टोकही साद घालीत आले आणि ती प्रसन्नपणाने ' त्या ' घरी परत गेली. ताराबाईंनी समाधानाने स्मित करून ते पान उलटून टाकले. शक्यतो प्रत्येक तडा जोडून घ्यावा, अशक्य झाले तरच तोडावे अशी त्यांची शिकवण व सल्ला असे.

आपल्या निकट वर्तुळातील, विवाहाबाबत उदासीन असलेल्या एका तरुण स्त्रीला त्यांनी योग्य वेळी लग्न करण्यासाठी प्रवृत्त करताना एका पत्रात म्हटले,

" माझ्या स्वतःच्या संसारी जीवनाच्या कटु अनुभवानंतरही मी तुला असं लिहिते



याचं तुला आश्चर्य वाटेल. परंतु स्त्रीच्या आयुष्यात विवाहाचं स्थान फार महत्त्वाचं आहे."

" मी घराबाहेर पडले ते केव्हींविषयी दुरावा वाटतो म्हणून नव्हे, तर असह्य वातावरण, खालावत चाललेली आर्थिक परिस्थिती, यांमुळे मला घर सोडावं लागलं. अजूनसुद्धा प्रभा हा आमच्यामधला बळकट दुवा; त्याने आम्हांला बांधून ठेवलं आहेच. "

पैसा गोळा करण्याचा कार्यक्रम साधारण वर्षाआड होई. त्या वेळी ताईंच्या स्वभावाचे, कर्तृत्वाचे विविध पैलू दिसत. एक काम करत असताना त्या मनाचे इतर सारे कप्पे पूर्णपणे बंद ठेवत. त्यामुळेच त्यांना इतका अष्टावधानीपणा शक्य होई ... ' साठीला पोचल्यावरही या इतके काम कसे करतात ', असा अचंबा ताईंकडे पाहून आसपासची मंडळी व्यक्त करत. परंतु त्यांच्या या चौफेर उरकाचे रहस्य बऱ्याच प्रमाणात त्यांच्या व्यवस्थितपणामध्ये होते. बाहेरचे व्याप सांभाळून घरातले बरेच काम त्या जातीने उरकत. रोजच्या स्वयंपाकाला आवडीने हातभार लावीत. पाहुण्यांचे हवे नको यांवर अगत्याने लक्ष ठेवीत. पाहुण्यांच्या आवडीचा एखादा खास पदार्थ आठवणीने स्वतः शिजवीत. सुटीत अमरावतीला गेल्या तरी त्यांना संस्थेची काळजी असे. परत यायच्या सुमारास त्या सहकाऱ्यांना शाळा उघडण्यासंबंधीच्या सूचना पत्राने देत त्या इतक्या तपशीलवार, बिनचूक असत की शाळेचा, कचेऱ्यातल्या कामाचा, तेथल्या व्यापांचा एक नकाशाच त्यांच्या मनावर कोरलेला, गोंदलेला आहे असे वाटावे.

शाळेतही रोज स्वतः सगळीकडे फिरून संडास, मोऱ्या, जिने, कठडे, दारे सगळीकडची स्वच्छता तपासतील, शंका आली तर बोट फिरवून पाहतील !

एकदा एक मोठा समारंभ अगदी तोंडावर आलेला असताना एका रात्री त्यांनी ' अर्धांगी ' सिनेमा पाहिला. घरी आल्यावर मुली पटापट झोपून गेल्या परंतु ताई मात्र लिहायला बसल्या. बहुतेक लेखन उत्तररात्री पलंगावर बसून खिडकीचा टेबलासारखा उपयोग करून त्या उरकीत. मुली कुशीवर वळून झोपल्या. सकाळी चहाच्या वेळी पाहतात तो ताईंच्या हातात बरेचसे ताव तयार ! हे कसलं टिप्पण आलं ! प्रभाने हळूच सुचलेला चिमटा घेतला, " आजच्या कामाची यादी झालीय बरं का ! सावधान ! "

जी ती खाली मान घालून चहा पिऊ लागली. वर पाहिले तर जास्त कामे आपल्या गळ्यात यायची ही भीती ! आणि ताईंनी सांगितल्यावर ' नाही ' म्हणायची तर प्राज्ञा नाही !

" सरलाताईंना बोलवा ! " फर्मान सुटले.

आता तर श्रोत्यांची शंका आणखीच पक्की झाली. कुणी आपण होऊन त्या लिखाणाबद्दल चौकशी करीना.

सरलाताई आल्यावर ताईंनी त्यांना आज्ञा केली, " हे घ्या, मोठ्याने वाचा बरं,

म्हणजे सगळ्यांना ऐकू येईल ! ”

—आदल्या दिवशी पाहिलेल्या सिनेमाचे ते अत्यंत मार्मिकपणाने केलेले सात-आठ पानी रसग्रहण होते. मुली मनातल्या कामाचा व्याप विसरून कौतुकाने ऐकू लागल्या.

बालमंदिरातल्या रडक्या, अजागळ मुलांचा विद्यार्थिनींना साहजिकच कंटाळा येई. पण ताईंचे म्हणणे असे की ' हुशार, नीटनेटक्या, गोड मुलांचा वर्ग कुणीही घेईल ! ' मजा म्हणजे मुलींनी ज्यांच्यावर लाल फुली मारून टाकलेली असे अशा गबाळ मुलांवरच ताईंची जास्त माया. बनो नावाची एक मुलगी अगदी मंद, वेंधळी होती. कुठेतरीच पाहत बसेल, पटकन् कशाचे उत्तर देण्याचे नाव नको. असे एकूण सगळे ध्यानच होते ते ! परंतु ताईंना तीसुद्धा आपली आवडे.

पुढे पुष्कळ दिवसांनी ताईंची भाचेसून ताईंच्या सामानाचे गाठोडे बांधत होती. ते घेऊन त्या बाहेरगावी जायच्या होत्या. गाठोडे कसेतरी, बिनआकाराचे दिसत होते.

सुशीला म्हणाली, “ असं ग काय ! नीट बांध. असं बोजकं कसं नेतील ताई ? ”

“ असू दे ग. सुटणार नाही ना वाटेत, मग चालेल मला. आकार कसा का असेना, त्याला काय झालं ? ”

सुशीला उद्गारली, “ ते बरोबर आहे ! तुम्हाला ती ' बनो 'सुद्धा आवडायची. तसंच आहे हे वेंधळं गाठोडं ! ”

“ कमाल आहे हं सुशीला तुझी ! ” ताईही हसल्या, “ अजूनसुद्धा तुझ्यात काही फरक कसा नाही ? ती बनी ... ”

बावळट मुले, बावळट गाठोडी जवळ घेणाऱ्या व्यवस्थित ताईंकडे पाहून सुशीलेला मात्र मालाडच्या परिषदेची आठवण झाली !—

... मालाडला एका परिसंवादात भाग घ्यायला जायचे होते. तेथे खादीच्या साड्या नेसून जाणे आवश्यक होते. ताई शिशुविहारातून परस्पर जाणार होत्या. सुशीला आणि काही मुली घरून निघणार होत्या. प्रभाने सुशीलेला आग्रह केला. “ आईची ही साडी नेसून जा आज ! ”

कॉन्फरन्सहून परत येताना गाडीत ताईंचे लक्ष सुशीलेच्या अंगावरच्या साडीकडे गेले. पोत चाचपून पाहत त्या म्हणाल्या, “ छान आहेत काठ, रंग ! नवीन घेतलीस वाटतं ? पुन्हा गेलीस तर माझ्यासाठी आण अशीच एक. ”

मुली चाट पडल्या. पण ताईंच्या चेहऱ्यावर लबाडपणाचा मागमूसही नव्हता ! शिशुविहारातला प्रत्येक तपशील, प्रत्येक मुलाच्या स्वभावाचे, व्यक्तिमत्त्वाचे बारकावे, कागदपत्रांच्या, साधनांच्या जागा, शिक्षकांच्या, पालकांच्या वरच्या अडचणी लक्षात ठेवणाऱ्या ताई स्वतःची साडी मात्र ओळखू शकल्या नव्हत्या !

# ११. मुंबई

' शिशुविहार 'चा व्याप आणि पसारा दिवसेंदिवस वाढतच चालला होता. ताराबाईंच्या प्रयत्नांना आणि प्रयोगांना आता शासनसुद्धा महत्त्व देत होते. त्यामुळे समाजात शिशुविहारची प्रतिष्ठा वाढली होती. शिशुविहारच्या धर्तीवर इतरत्र बालकमंदिरे काढण्याचे प्रयत्न होत होते. ही सर्व बालमंदिरे शिशुविहारवर भिस्त ठेवून, शिशुविहारचे अनुकरण करून आपले कामकाज चालवीत. पुढे १९४९ साली शिशुविहारची स्वतःची इमारत बांधण्यात आली; तिचेही अनुकरण इतर बालमंदिरांकडून केले जाऊ लागले.

ताराबाईंच्या या शिक्षणसंस्थेत बालशिक्षणाची जी पद्धती आकार घेत होती, विकसित होत होती तिचे स्वरूप समजून घेण्यापूर्वी प्रथम जगात पूर्वप्राथमिक शिक्षणाचा आरंभ कसा व केव्हा झाला व कोणत्या पार्श्वभूमीवर ताराबाईंनी या कार्याला हातभार लावला हे समजून घेणे अगत्याचे ठरेल.

अडीच ते सहा या वयोगटातल्या मुलांच्या शिक्षणाची कल्पना शंभर–दिडशे वर्षांपेक्षा जुनी नाही. युरोपमध्ये औद्योगिक क्रांतीनंतर झालेला सामाजिक बदल त्याला कारणीभूत आहे. यांत्रिक शोध लागून इंग्लंडमध्ये कारखाने निघू लागले आणि स्त्री–पुरुष जोडीने तेथे काम करण्यासाठी बाहेर पडू लागले. यामुळे कौटुंबिक व्यवस्थेवर जो परिणाम झाला त्यांत बालकांची आबाळ होऊ लागली. या सामाजिक समस्येवर उपाय शोधणारा पहिला कारखानदार रॉबर्ट ओवेन. त्याने स्कॉटलंडमध्ये १८१६ साली आपल्या कामगारांच्या छोट्या मुलांसाठी एक ' क्रेश ' किंवा अर्भकालय काढले. अर्थात या प्रयत्नामागे बालकांविषयी कळकळ असली तरी विशिष्ट शैक्षणिक हेतू नव्हता.

जर्मनीमध्ये फ्रोबेल ( १७८२–१८५२ ) हा रॉबर्ट ओवेनचा समकालीन होता. त्याने जाणीवपूर्वक पूर्वप्राथमिक शिक्षणाचे महत्त्व लक्षात घेऊन १८३७ साली एक बालमंदिर काढले. हाच बालशिक्षणाचा प्रारंभ होय. फ्रोबेलच्या शिक्षणपद्धतीला किंडरगार्टन किंवा बालोद्यान पद्धती म्हणतात. आज जगभर जे बालशिक्षण प्रयत्न चालतात त्यांच्यावर या पद्धतीचा ठसा विशेषकरून आहे. फ्रोबेलनंतर सुमारे सत्तर वर्षांनी इटलीमध्ये डॉक्टर मारिया मॉंटेसोरी यांची मॉंटेसोरी पद्धत प्रचारात आली. याच सुमारास अमेरिकेतही पूर्वप्राथमिक शिक्षणाला – बालोद्यान पद्धतीच्याच अंगाने – आरंभ होत होता.

' Come Let us live with our children and learn from them '— असे म्हणणाऱ्या फ्रोबेलच्या पद्धतीला रूसो, पेस्टॉलॉझी इत्यादी पुरोगामी विचारवंतांच्या

शिक्षणविषयक कल्पनांची बैठक आहे. रूसोने प्रत्यक्ष प्रयोग केला नाही, परंतु नैसर्गिक विकासाला शिक्षणात प्रमुख स्थान द्यायला हवे अशी त्याची भूमिका होती व त्या दृष्टीने १२ वर्षे पर्यंत मुलांना अभावात्मक शिक्षण द्यावे अशा मताचा तो होता. त्याचे विचार प्रत्यक्ष कृतीत उतरवण्याचे श्रेय पेस्टॉलॉझीकडे जाते. त्यामुळे रूसोच्या कल्पनांमधली संदिग्धता जाऊन त्यांना व्यवहारात स्थान मिळाले. मात्र पेस्टॉलॉझीने चालविली ती प्राथमिक शाळा.

'फ्रोबेलने प्रथमच शिक्षणाचे स्वरूप बालकेंद्री केले. शाळा हे उद्यान व शिक्षक तेथील माळी ( kinder=मुले, garten=उद्यान ) अशी त्याची कल्पना होती. शिक्षणात खेळाला तसेच खेळाडू वृत्तीला प्राधान्य देणारा, तसेच साधनांचा वापर करणारा पहिला शिक्षक म्हणजे फ्रोबेल. मुले पंचेंद्रियांच्या अनुभवांमार्फत जे ज्ञान मिळवितात त्याला बालशिक्षणात विशेष स्थान; आणि ज्ञानेंद्रियांचे अनुभव केवळ निसर्गावर सोडणे त्याला योग्य वाटत नव्हते. मुलांच्या शिक्षणाला प्रत्यक्ष अनुभवांचा पाया हवा, म्हणून फ्रोबेलने वेगवेगळे अनुभव देणारी विशिष्ट प्रकारची साधने तयार केली, आणि हे शिक्षण सक्तीचे नाही ही कल्पना स्पष्ट करणारे नाव त्यांना दिले– देणग्या ( gifts ). सर्वांत पहिली देणगी चेंडू व शेवटची म्हणजे दोरीने होणारा मोठा गोल; अशा त्याच्या बारा मूलभूत देणग्या आहेत. मुलांनाही तो गोलाकार बसवीत असे... शून्यातून शून्याकडे जाण्याचे गूढ तत्त्व यामागे होते. ( आज त्याची मूळ साधने वा गूढतत्त्वे प्रचारात राहिलेली नाहीत. ) शाळेचे वातावरण सौंदर्ययुक्त असावे हीही कल्पना फ्रोबेलचीच. मुलांना अभिरुचिसंपन्न बनविणे तो महत्त्वाचे मानीत असे. फ्रोबेलचा भर सूचनापद्धतीवर होता. साधनांचा उपयोग कसा करावा हे सूचित करण्यासाठी त्याने खास गाणी रचली. मुलांचा कल्पना-विकास व्हावा या दृष्टीने गाणी, गोष्टी, परीकथा, अभिनयगीते, खेळ यांच्यावर भर, त्यांच्या रचनात्मक प्रवृत्तीचा विकास व्हावा म्हणून हस्तव्यवसायाचे महत्त्व, शिक्षणातून शिक्षेचे, सक्तीचे, बक्षिसा-आमिषाचे उच्चाटन अशी काही बालोद्यान पद्धतीची वैशिष्ट्ये मानण्यात येतील. वैज्ञानिक संशोधनाबरोबर, मानसशास्त्रातील प्रगतीबरोबर फ्रोबेलच्या मूळ साधनांत, पद्धतीत बरेच फेरफार केले गेले, त्याची काही तत्त्वेही मोडीत निघाली परंतु त्यामुळे त्याची पद्धत नित्यनूतन, प्रगतिशील व म्हणून लोकप्रियही राहिली.

मॉंटेसोरी पद्धती आकाराला आली ती डॉ. मारिया मॉंटेसोरी या इटलीतील बाई मागासलेल्या वस्तीतील काही मुलांवर व पुढे काही मंदबुद्धी मुलांवर शैक्षणिक प्रयोग करून त्यांना मार्गावर आणण्याचे प्रयत्न करीत असताना. मॉंटेसोरी पद्धतीत बालकाचे स्वातंत्र्य, स्वयंस्फूर्ती, स्वानुभव, स्वयंविकास ही चार तत्त्वे पायाभूत समजली जातात. या पद्धतील



मुलांना जीवनशिक्षण देणे, जीवनविषयक व्यवहारांना त्यांच्या शिक्षणात वाव देणे* त्यांनी महत्त्वाचे मानले आहे. याही पद्धतीत विशिष्ट साधने आहेत. सर्व शिक्षणाचा पाया अनुभवात असतो. या अनुभवांत विविधता व सूक्ष्मता आणण्यासाठी डॉ. मॉंटेसोरींनी ज्ञानेंद्रिय–शिक्षण महत्त्वाचे मानले. त्यांच्या पद्धतीचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे लेखन, वाचन, गणित, विज्ञान या प्राथमिक शिक्षणातील विषयांची ओळख, पूर्वतयारी करून देण्याची कल्पना व साधने. मॉंटेसोरी पद्धतीत अभिप्रेत असलेली तत्त्वे मुसोलिनीच्या फॅसिस्ट राजवटीला परण्यासारखी नव्हती, त्यामुळे मॉंटेसोरीबाईंना इटलीतून हद्दपार करण्यात आले. पुढे चाळीस–पन्नास वर्षे त्या आपल्या पद्धतीचा प्रचार करीत राहिल्या.

बालवयात नैसर्गिकपणे होणाऱ्या मुलांच्या चौफेर विकासाला मदत करणे हाच उद्देश दोन्ही पद्धतींच्या मुळाशी आहे; परंतु दोन्ही पद्धतींत काही ठळक तर काही मामुली फरकही आहेत. फ्रोबेलच्या पद्धतीत वर्गशिक्षण, वेळापत्रक यांना स्थान आहे. त्याचा भर समूहशिक्षणावर आहे व ते शिक्षकाच्या दृष्टीने सोयीचेही आहे. त्याच्या पद्धतीत शिक्षकाचे अनुकरण करून मुलाने शिकावयाचे असल्यामुळे वेळापत्रकाला महत्त्व आहे. याउलट लहान वयात प्रत्येक मुलाचा शारीरिक, मानसिक विकास आपापल्या गतीने होत असतो हे लक्षात घेऊन डॉ. मॉंटेसोरींनी वैयक्तिक शिक्षण महत्त्वाचे मानले. मूल आपला आपण विकास करून घेण्यास समर्थ असते. मॉंटेसोरी पद्धतीत आपण केव्हा, काय शिकायचे हे मूलच ठरविते, त्याला वेळापत्रकाचे बंधन नसते. बालोद्यान पद्धतीतले कृत्रिम खेळ, हस्तव्यवसायाद्वारा रचनात्मक विकास, मॉंटेसोरी पद्धतीत बसत नाहीत. याखेरीज अभिनय, गाणी, परीकथा इत्यादींना त्यांचा विरोध होता.

सुरुवातीला मॉंटेसोरींच्या क्रांतिकारक कल्पनांचा प्रसार झपाट्याने झाला. ( १९०७ साली त्यांचे विचार पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले, १९१२ मध्ये ते इंग्रजीत अनुवादित झाले व १९१४ साली भारतापुरती तरी त्यांच्या कल्पना प्रत्यक्षात उतरण्यास सुरुवातही झाली. ) परंतु पुढे या पद्धतीत तंत्रवादावर अवास्तव भर दिला गेला व त्यामुळे कृत्रिमता शिरली.

याशिवाय नर्सरी व न्यू किंडर गार्टन अशा आणखीही दोन पद्धती अस्तित्वात आहेत.

* जीवनशिक्षण याचा अर्थ जीवनासाठी उपयुक्त असे वैयक्तिक व सामाजिक शिक्षण. शिक्षण नुसते पुस्तकी होता कामा नये, ते प्रत्यक्ष जीवन जगताना घेता यावे व जीवनासाठी उपयुक्त असावे असा अर्थ यात अभिप्रेत आहे. आपल्या देशात महात्माजींनी जीवनशिक्षणपद्धती प्रस्तुत केली व ती आपल्या राष्ट्रीय शिक्षणाची चौकट म्हणून मान्य झाली. त्यामुळे पूर्व प्राथमिक व प्राथमिक शिक्षणात जीवनव्यवहाराच्या कामांना तात्त्विक दृष्ट्या तरी शैक्षणिक महत्त्व प्राप्त झाले आहे.

परंतु त्यांचे स्वरूप काहीसे संमिश्र असून साधारणपणे बालोद्यान पद्धतीच्याच त्या नव्या आवृत्त्या आहेत असे म्हणता येईल. नर्सरीत ( युरोप ) मुलांना चांगल्या मानसिक सवयी लागाव्यात हे अंतर्भूत आहे, तर न्यू किंडर गार्टन पद्धतीत ( अमेरिका ) बालमनाचे आरोग्य विशेष महत्त्वाचे मानतात.

या पाश्चात्य प्रयत्नांच्या पार्श्वभूमीत पाहिल्यास भारतात पूर्वप्राथमिक शिक्षणाला आरंभ झाला तो सामाजिक गरजेपोटी किंवा मानवतावाद्यांच्या दयाभावनेतून नव्हे, तर पूर्वप्राथमिक शिक्षणाचे महत्त्व जाणीवपूर्वक लक्षात घेऊन तो केला गेला. सन १९०० च्या सुमारास ( लॉर्ड कर्झनच्या कारकीर्दीत ) ख्रिस्ती मिशनऱ्यांनी किंडरगार्टन पद्धतीच्या पूर्वप्राथमिक शाळा, संस्था सुरू केल्या. मॉंटेसोरी पद्धतीचे बालमंदिर सर्वप्रथम अड्यार ( मद्रास ) येथे ॲनी बेझंट बाईंच्या प्रयत्नाने निघाले ( १९१४ ). गिजुभाई व ताराबाई यांच्या हस्ते भारतात ज्या शिक्षणपद्धतीने आकार घेतला ती नूतन बाल-शिक्षण पद्धती, पूर्वप्राथमिक शिक्षण पद्धती म्हणून ओळखली जाते. या मंडळींनी मॉंटेसोरी पद्धतीचाच पाया मानला तरी विशेषतः ताराबाईंनी सर्व पद्धतींतला चांगला भाग निवडून घेऊन समन्वय साधीत जाण्याचे धोरण ठेवले व आपल्या पद्धतीला अधिक व्यापक, विकसित, सकस व राष्ट्रीय स्वरूप दिले.

बालशिक्षणाचा सरसकट विचार केल्यास बालकाच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीने त्यात स्नायुविकास, बुद्धिविकास, ज्ञानेंद्रिय-शिक्षण, भाषाविकास, भावनाविकास, सामाजिक विकास, लेखन, वाचन, गणित, विज्ञान यांची प्राथमिक कल्पना, इतक्या बाबींचा समावेश होतो.

स्नायूंची वाढ मूल नैसर्गिक अंतःप्रेरणेने करून घेत असते ( उदा. उपडे पडणे ). स्नायुविकासाचा हा टप्पा मूल पार पाडीत असताना त्याचे क्रियाकौशल्य, कार्यक्षमता, स्नायुसहकार व आवर्तने वाढविण्याच्या दृष्टीने मुक्तव्यवसाय ( free activity ) जीवन-व्यवहार, क्रिडांगणातले व इतर खेळ, व्यायाम, बागकाम हस्तकला इत्यादींना महत्त्व दिले जाते.

ज्ञानेंद्रियांमार्फत होणाऱ्या ज्ञानाला म्हणतात, संवेदना. ज्ञानेंद्रिये वापरण्याची आपल्या नैसर्गिक शक्तीइतकीच ती वापरण्याची आपली सवय महत्त्वाची. आपल्याला ती विकसित करता येईल त्या प्रमाणात आपण सूक्ष्म, स्पष्ट ज्ञान ग्रहण करतो. ज्ञानेंद्रियशिक्षणामागचा प्रधान हेतू, त्यांचा उपयोग विशिष्ट पद्धतीने करण्याची सवय लावणे. मुलांच्या स्वाभाविक खेळण्याच्या वृत्तीचा उपयोग करून घेऊन ज्ञानेंद्रियशिक्षण देण्याची सोय वेगवेगळी असली तरी त्याचे महत्त्व सर्व पद्धतीत मानतात. पदार्थपाठ — पदार्थांचे गुणधर्म ओळखण्यासाठी किंडरगार्टनमध्ये साधने आहेत, तर संवेदनांतील साम्यभेद ओळखणे, सारख्या संवेदनांतील तारतम्यभाव जाणणे, त्यांचे वर्गीकरण, त्याबरोबरच बुद्धिविकास, सूक्ष्मावलोकन,



स्नायुसंचलन, कर्मेंद्रियांवर ताबा हे मॉंटेसोरी साधनांद्वारे साधले जाते.

मॉन्टेसोरी साधनांची विशेषता म्हणजे व्यक्तिगत स्वयंशिक्षण करून घेता देण्याची सोय. प्रत्येक साधनाशी स्वतंत्रपणे ओळख करून घेत, स्वतःची चूक शोधत, सुधारत क्षोभ-रहित मनाने मूल अप्रत्यक्ष शिक्षण घेते. अनुभवांची विविधता, वैचित्र्य, पुनरावर्तन, उजळणी सर्व ही साधने पुरवितात व ती स्वयंभूलनिदर्शक असल्यामुळे स्वयंस्फूर्ती व प्रयोगशीलता वाढविणारी असतात.

याखेरीज गणितातील सूक्ष्मपणा, चोखपणा, निश्चितता शिकविणारी साधने. संख्या-रचना, शून्याचे महत्त्व, हातचा म्हणजे काय या कल्पना स्पष्ट करण्याची सोय गणिताच्या साधनांमध्ये असते.

बालशिक्षणात जीवनव्यवहारांचा समावेश मॉन्टेसोरींनी प्रथम केला व त्यानुसार जेवणे, त्याची मांडामांड व तयारी, बूटपॉलिश, धातूच्या वस्तूंना पॉलिश इ. बाबी त्यांनी अंतर्भूत केल्या. त्याबरोबर मुलाला स्वतःच्या गरजा स्वतः भागवता येऊन त्याने स्वावलंबी बनावे, योग्य रीतीभाती आत्मसात कराव्या हीही उद्दिष्टे त्यात आहेत.

बडबडगीते, बालगीते, बालनाटके, शिक्षकाशी गप्पागोष्टी व अभिनयगीते यांतून भाषाविकास साधता येतो.

भावनाविकास, सामाजिक विकास यासंबंधीचा तपशील पाचव्या प्रकरणामध्ये दिलेला आहेच.

रंगीत दोरीची वेणी घालणे, बाटलीत धान्य भरणे, बटनांची चौकट, छायारंगाचे छोटे तक्ते, भौमितिक आकारांच्या रचनापेट्या, मनोरे, बेरीजपाट्या, चलमुळाक्षरपेटी, वस्तुचिठ्ठ्या, व्यंजने, स्वर इत्यादींच्या संचपेट्या यांनी बालकांच्या विविध कार्यप्रवृत्ती विकास पावतात.

बालशिक्षणामागची ही मूलभूत तत्त्वे व आचारप्रणाली समजून घेतल्यास बालमंदिरात आढळणाऱ्या या व अशा अनेक साधनांचे महत्त्व व उद्दिष्ट लक्षात येते. तसेच त्यांच्या काटेकोर वापराविषयी मॉन्टेसोरींचा कटाक्ष का होता व त्यातून तंत्रवादाला महत्त्व कसे प्राप्त झाले हेही लक्षात येते.

गिजुभाईंना व ताराबाईंना त्यांची मूळ तत्त्वे फार प्रभावी वाटली होती व त्यांनी ती पूर्णतया आत्मसातही केली होती. त्यांच्या साधनांत त्यांनी मूलभूत असे कोणतेच फरक केले नाहीत किंवा नवीन साधनेही शोधून काढली नाहीत. मात्र येथील जीवनाला, परिस्थितीला अनुकूल असे फेरफार करण्याचे स्वातंत्र्य त्यांनी प्रथमपासून स्वतःकडे ठेवले. त्यामुळे बांगड्या, डबे, रांगोळ्या यांचा समावेश झाला, दृष्टापेटीमध्ये वाट्यांचा वापर आला. १९४८ साली झालेल्या बालशिक्षणनगरात प्रथमच बाहुलीघर व मुक्तव्यवसाय यांचा समावेश श्री. नामलेभाऊ व सरलाताई यांनी केला. कागदकाम, कातरकाम, होडी-

काम, चिकटकाम आले. पुढे पुढे तर साधनाशिवाय बालशिक्षण कसे, कितपत साधता येईल याचेही प्रयोग झाले.

१९३९ च्या सुमारास म्हणजे गिजुभाई बधेकांच्या मृत्यूनंतर मॅडम मॉन्टेसोरी भारतात आल्या आणि त्यानंतर सुमारे दहा वर्षे त्या भारतात राहिल्या. ही दहा वर्षे त्यांनी आपल्या शिक्षणपद्धतीचा प्रसार करण्यात खर्च केली. गिजुभाईंना डॉ. मॉन्टेसोरींचा प्रत्यक्ष सहवास, मार्गदर्शन व कृपादृष्टी लाभली नाही परंतु ताराबाईंना मात्र हा फायदा मिळाला. त्यांचा मॉन्टेसोरीबाईंशी वारंवार संबंध आला. डॉ. मॉन्टेसोरींचा व त्यांचे काम पाहणारे त्यांचे भाचे श्री. मॉन्टेसोरी यांचा स्नेहही त्यांना मिळाला.

मॅडम मॉन्टेसोरी भारतात आल्यावर ६ मार्च १९४० रोजी अहमदाबाद येथे नूतन बालशिक्षण संघातर्फे त्यांचा भव्य सत्कार करण्यात आला. गिजुभाईंच्या निधनानंतर आता ताराबाईच संघाचे चिटणीसपद सांभाळीत होत्या त्यामुळे या 'घरच्या कार्या'त त्यांचा मॉन्टेसोरींशी जवळून संबंध आला. या समारंभात मॉन्टेसोरीबाईंना सरलादेवी साराभाईंच्या हस्ते किनखापी पिशवीतून खादीच्या कापडावर लिहिलेले खास मानपत्र अर्पण करण्यात आले.

त्यानंतर मॉन्टेसोरीबाईंनी आपल्या पद्धतीचे शिक्षण देणारे तीन–चार महिन्यांचे संक्षिप्त अभ्यासवर्ग ठिकठिकाणी घेण्यास सुरुवात केली. १९४४ मध्ये कोडाईकनाल येथे त्यांनी पहिला प्रगत ( advanced ) मॉन्टेसोरी अभ्यासक्रम घेतला त्यावेळी ताराबाई स्वतः तेथे संघाच्या प्रतिनिधी म्हणून जाऊन महिनाभर राहून शिकून आल्या. यानंतर त्यांनी शिशुविहारच्या सर्व शिक्षकांना आळीपाळीने मॉन्टेसोरींच्या निरनिराळ्या वर्गांना पाठवून, प्रशिक्षित करून घेतले.

पुढे १९४८ साली मुंबईला जे भव्य बालशिक्षणनगर ताराबाई व त्यांच्या सहकाऱ्यांनी भरविले त्याच्या उद्घाटनालासुद्धा ताराबाईंनी डॉ. मारिया मॉन्टेसोरींनाच बोलविले. या वेळी मुंबईकरांना डॉ. मॉन्टेसोरींची सहा जाहीर व्याख्याने ऐकावयास मिळाली. त्यानंतर सुमारे वर्षभराने डॉ. मॉन्टेसोरींना स्वदेशी ( इटली ) परतण्याची परवानगी मिळाली. एवढेच नव्हे तर त्यांच्या राष्ट्राकडून त्यांचा विशेष गौरवही करण्यात आला. या महत्त्व-पूर्ण प्रसंगी त्या समारंभाला ताराबाई जातीने इटलीत उपस्थित होत्या. पुढे ५ मे १९५२ रोजी मॉन्टेसोरींचे निधन झाल्यानंतर दरवर्षी ५ मे हा दिवस त्यांचा पुण्यतिथी म्हणून ताराबाईंच्या संस्थांमधून साजरा होऊ लागला व आजदेखील साजरा होत असतो.

—जाता जाता एक गोष्ट स्पष्ट करणे उचित ठरेल. मॉन्टेसोरीबाईंचे नाव व शिक्षण-पद्धत इतकी लोकप्रिय झाली ती मुख्यतः गिजुभाईंच्या व त्यांच्या सहकाऱ्यांच्या प्रचार-कार्यामुळे; इतकी की आज कुठल्याही बालशाळेचा उल्लेख सामान्य माणूस पटकन् 'मॉन्टेसोरी शाळा' असाच करतो, त्यावेळीसुद्धा या शिक्षणपद्धतीविषयी अर्धवट ज्ञान



असलेल्या माताही पटकन् म्हणत, " मला ती मॉन्टेसोरी नको; माझ्या मुलांनी मार्कच ऐकलं पाहिजे. " आज भारतात या पद्धतीला थोडेफार स्थान आहे. इतर देशांत मात्र तिला हे महत्त्व नाही. खुद्द इटलीत, जिथे ही शिक्षणपद्धत पिकली तिथेसुद्धा ती विकत नाही. आज इतरत्र किंडरगार्टन ही फ्रोबेलची पद्धत अधिक लोकप्रिय आहे.

ताराबाईंनी बालशिक्षणक्षेत्रात जे भव्य कार्य केले त्याबद्दल त्यांचा गौरव करताना लोक त्यांना 'भारताच्या मादाम मॉन्टेसोरी' अशी उपमा देऊ लागले. हे मात्र ताराबाईंना पसंत नसे. " मला असे काही म्हणू नका. मॉन्टेसोरी त्या मॉन्टेसोरी आणि ताराबाई ती ताराबाई ! " असे त्या म्हणत. एकूण कोणताच शिक्का उमटवून घेणे ताराबाईंना नको असे, हे इथे पुन्हा एकदा स्पष्ट झाले.

ताराबाईंची अशी सारी धडपड चालू असताना १९४२ चा स्वातंत्र्यलढा झाला. महात्माजींनी अखिल भारताला सत्याग्रहाची हाक दिली. १९३० साली, म्हणजे त्याआधी बारा वर्षांपूर्वी ताराबाई दक्षिणामूर्तीत असताना गांधीजींनी अशीच हाक दिली होती आणि त्यावेळी ताराबाईंनी चळवळीत भाग घेण्याची हिरीरी दाखविली होती; संस्था बंद ठेवून मंडळी प्रौढशिक्षण प्रसाराकडे वळली होती. परंतु आता त्याच ताराबाई संस्थाप्रमुख होत्या. शिशुविहार अजून तितकेसे स्थिरावले नव्हते. अशा वेळी संस्था बंद ठेवणे आत्मघाताचे ठरले असते. ताराबाईंचे शिशुविहार सत्याग्रहात सामील झाले नाही. उलट इतर शैक्षणिक संस्था बंद झाल्यामुळे तेथले विद्यार्थी उनाडक्या करू लागले होते. त्यांना एकत्र जमवून काहीतरी विधायक करण्याची तयारी ताराबाईंनी दाखविली. त्यातून निश्चित असे काही आकाराला आले नाही. परंतु त्यामुळे १९४२ च्या धामधुमीतून संस्था बचावली. त्यावेळी दुसरे महायुद्ध सुरू होते, आणि बरेच मुंबईकर बॉम्ब-फेकीच्या भीतीने मुंबई सोडून गेले होते व त्याचा शिशुविहारच्या उपस्थितीवर परिणाम झाला होता. परंतु संस्था बंद पडायची वेळ आली नाही. वेळ येईल त्याप्रमाणे शिशु-विहारचा संसार कमीत कमी पैशांत भागविण्याची, प्रसंगी ते पैसेसुद्धा पदरचे घालण्याची व झाडूवाल्यापासून सर्व कामे स्वतः करण्याची ताराबाईंची तयारी असल्यामुळे अशा धक्क्यामुळे शिशुविहारला तडे जाण्याचा संभव नव्हता. या आंदोलनकाळात ताराबाई स्वातंत्र्याच्या चळवळीत भाग घेणाऱ्या लोकांना अप्रत्यक्ष सहाय्य मात्र करीत राहिल्या.

१९४८ साली ताराबाईंनी नामलेभाऊंच्या मदतीने जी बालशिक्षणनगर नामक विराट योजना आखली तिच्या मागे संस्थेची इमारत बांधण्याची इच्छा प्रमुख होती. ताराबाईंनी बालशिक्षणनगराचा प्रस्ताव शिशुविहारमंडळापुढे मांडला आणि मंडळाने तो उचलून धरला. त्यावेळी श्रीमती ताराबेन प्रेमचंद या नूतनबालशिक्षण संघाच्या मुंबई शाखेच्या अध्यक्षा होत्या. त्यांनादेखील ती कल्पना आवडली आणि त्यांच्या शाखेने शिशुविहार-

मंडळाच्या या प्रयत्नांत सहभागी व्हायचे ठरविले. संघ आणि शिशुविहारने श्रमाची तसेच नफ्यातोट्याची भागीदारी पत्करली.

१९४८ च्या १६ ऑक्टोबरला मुंबईच्या चौपाटीवर विल्सन कॉलेजची इमारत आणि प्रांगण या परिसरात हा प्रकल्प उभा राहिला. या बालशिक्षणविषयक जंगी प्रदर्शनाचे उद्घाटन स्वतः मॅडम मॉन्टेसोरींच्या हस्ते, मुंबई राज्याचे मुख्यमंत्री श्री. बाळासाहेब खेर यांच्या अध्यक्षतेखाली झाले.

या बालशिक्षणनगराची आखणी मुख्यतः सामान्य जनतेला बालशिक्षणाची महती कळावी या दृष्टीने करण्यात आली होती. प्रदर्शनाच्या विविध दालनांत विविध कार्यक्रम सुरू होते.

ती एक अभिनव बालशाळा होती. कितीही मुलांनी तेथे यावे आणि स्वेच्छेने तेथला हवा तो उद्योग करावा, साधने हाताळावी. हे उद्योग आणि ही साधने कशी? तर मुले बौद्धिकदृष्ट्या रंगून जावीत अशी. ज्ञानेंद्रियशिक्षण, भाषाशिक्षण गणितशिक्षण विज्ञान-शिक्षण, कला, हस्तव्यवसाय, असे कितीतरी विभाग होते. जरूर तेथे तज्ज्ञ मार्गदर्शक होते. याखेरीज आनंदबझार होता. मुलांनी स्वतः चालविलेले उपाहारगृह होते. टोमॅटोच्या परड्या, खमंग काकडी, चिवडा असे पदार्थ तिथे विकले जात होते. साधनांनी परिपूर्ण असे क्रीडांगणही बालशिक्षणनगरात होते. त्याबरोबरच बालशिक्षण वस्तु संग्रहालय, मुलांशी कसे वागावे, त्यांचे संगोपन कसे करावे यांविषयी फलक, तक्ते इत्यादींच्या द्वारा मार्गदर्शन करणारे 'पालक-दालन' अशी विविध दालने होती. एका वेळी येथे ४००/५०० मुलांना खेळता यावे अशी योजना होती. मुले प्रत्यक्ष काम करताना दिसावीत अशी विशेष सोय पालकांसाठी केलेली होती.

याखेरीज रोज एक रंजन कार्यक्रम सादर केला जाई. निरनिराळ्या बालमंदिरांमधली बालके त्यांत भाग घेत. मुलांना योग्य असे चित्रपट रोज दाखविले जात. पालकांसाठी मॉन्टेसोरीबाईंची व्याख्याने ठेवली होती. याशिवाय नामवंत शिक्षणतज्ज्ञांची व विद्वानांची आणखी एक व्याख्यानमाला होती.

मुंबईतल्या अनेक प्रतिष्ठित नागरिकांनी बालशिक्षणनगराची धुरा वाहण्यास हातभार लावला. मुंबईतल्या, संघाशी संलग्न असलेल्या अशा सर्व संस्था मदतीला धावल्या. सरलादेवी साराभाई, ताराबाई प्रेमचंद, बार्बाबेन मूळजी, सरोजबेन घोष, प्रि. गो. रा. परांजपे, श्री. चंदूलाल जव्हेरी, श्री. वा. रा. पटवर्धन, मनूताई आगटे इ. मंडळी या कार्य-क्रमाचे आधारस्तंभ व जबाबदार पदाधिकारी होती. याखेरीज वेगवेगळे संयोजक आणि त्यांच्या हाताखाली आठदहा पोटसमित्या होत्या. प्रदर्शनापूर्वी कित्येक महिने आधी या समित्यांच्या बैठकी आणि इतर कामे चालली होती. शिशुविहारच्या शिक्षक व अध्यापन-मंदिराचे विद्यार्थी कित्येक दिवस प्रदर्शनाच्या पूर्वतयारीत-साधने करण्यात, फलक



रंगविण्यात गुंतलेले होते. अनेकांनी याप्रमाणे हिशोब न करता वेळ, पैसा व परिश्रम ओतले तेव्हा २९॥ हजार रुपये खर्चाच्या या भव्य प्रदर्शनाची उभारणी झाली. हजारा-हून अधिक स्वयंसेवक तेथे उत्साहाने कामे करीत होते. पंधरा दिवसांसाठी उभारलेले हे बालशिक्षणनगर खास लोकाग्रहास्तव पुढे काही दिवस चालू ठेवण्यात आले. एकूण पाच हजार मुलांनी त्याचा लाभ घेतला. २५,००० प्रेक्षकांनी आपली हजेरी लावली आणि स्वतःचे पैसे खर्चून तिकिटे काढून या प्रकल्पाचा फायदा घेतला. बालशिक्षणनगरासाठी केलेल्या अपरिमित कष्टांचे फळ म्हणून भव्य यश संचालकांच्या पदरात पडले. एकूण साडेपंचावन्न हजार रुपयांची आवक झाली. त्यापैकी खर्च वजा जाता रु. २५०००/- नफा झाला. ही रक्कम संघ व शिशुविहार यांनी अर्धी अर्धी वाटून घेतली. या आर्थिक लाभाखेरीज बालशिक्षण प्रचार व प्रसार बराच साधला.

बालशिक्षणनगराच्या या उपक्रमाचे आणखी एक वैशिष्ट्य होते. आजवर करमणुकीचे कार्यक्रम करून, नृत्य, नाटके ठेवून फंड गोळा करण्याचे प्रयत्न पुष्कळांनी यशस्वीरीत्या केले होते. परंतु या प्रयोगात ताराबाईंनी लोकशिक्षणातून लोककल्याणासाठी कसलेही आमिष न दाखवता, कसलेही 'सुव्हेनिर' न काढता संस्थेसाठी रु. १२०००/- मिळविले होते. याशिवाय आणखी लागणारा पैसा संस्थेच्या आश्रयदात्यांकडून कमी व्याजाने कर्जाऊ मिळविण्यात आला. माननीय स. का. पाटलांच्या साहाय्याने नप्पू रोडवरची किंग जॉर्ज हायस्कूलच्या समोर असलेली रेल्वेलगतची मोकळी जागा म्युनिसिपालिटीकडून मिळविली. (दुसरी एक चांगली जागा वडाळा भागात देण्याचे महानगरपालिकेने आश्वासन दिले व पुढे त्याप्रमाणे जमीन दिली. आज ती जागा संस्थेच्या ताब्यात, परंतु झोपडपट्टीखाली आहे.) अखेर सुमारे रु. ४५,००० खर्च करून सबंध मराठी विभाग व्यवस्थित मावेल अशी इमारत बांधण्यात आली (१९४९). भोवती आटोपशीर बाग व व्यवस्थित क्रीडांगण तयार झाले. गुजराती विभाग जुन्या इमारतीत व्यवस्थित राहिला. तेथे गुजराती बालमंदिरसुद्धा सुरू करण्यात आले.

स्वयंपाकघर ज्याप्रमाणे गृहिणींची सोय बघून बांधण्यात येते त्याप्रमाणे शिशुविहारची नवी इमारत खास लहान मुलांच्या सोयी, आवडी लक्षात घेऊन बांधण्यात आली होती. लहान मुलांच्या खोलीत वारा व उजेड भरपूर असावा आणि मुलांना बाहेरची गंमत बघता यावी म्हणून मोठाल्या खिडक्या, बसायला कट्टे, मुलांची उंची लक्षात घेऊन बस-विलेली कपाटे. रंगसंगतीसुद्धा बालमनांना सुखद वाटेल अशी ठेवण्यात आली.

मुलांच्या उंचीचा विचार करून, साजेसे फळे बसवले गेले. चित्रे बालदृष्टी विचारात घेऊनच भिंतीवर चढली. मुलांना सहज उचलता येतील अशा हलक्या घडवंच्या आणि मोहक आसने खरेदी करण्यात आली.

फुलांबरोबरच पोपट, कबुतरे, ससे, कासव, मासे– यांनी बाग सजली. कंटाळा आलेल्या

मुलांना खिडकीतून वाळूचा डोंगर, जंगलजिम, घसरगुंडी खुणावू लागले.

पुढे बऱ्याच बालमंदिरांनी स्वतःच्या इमारती बांधताना शिशुविहारची इमारत ' मॉडेल म्हणून डोळ्यांपुढे ठेवली.

या बालशिक्षणनगराच्या संदर्भात व निमित्ताने ताराबाईंची एक आठवण सांगण्यासारखी आहे—

महत्त्व व्यक्तीला नसून कार्याला आहे. जनतेने हे ओळखून कार्याला मदत करावी. माणूस जाणारा असतो आणि कार्य मागे राहणारे असते. असा पहिल्यापासून शेवटपर्यंत ताराबाईंचा आग्रह होता. ज्या मंडळींनी बालशिक्षणनगरच्या वेळी दान केले त्यांची वृत्ती "ताराबाई मागतात म्हणून पैसे दिले," अशी होती. "हे पैसे तुम्हांला देण्यात आम्हांला आनंद वाटतो; पण तुम्ही कार्य कार्य म्हणता त्यात आम्हांला काही रस नाही," असे ते म्हणत.

ताराबाईंना याचा खेद वाटला. त्यांनी शिक्षणपत्रिकेतून आपली खळखळ शब्दांत मांडली.

"ताराबाई मागतात म्हणून लोक पैसे देतात, कार्यासाठी पैसे देत नाहीत. हे योग्य नाही. या पैशांतून काय कार्य चालले आहे हे पाहण्यास त्यांनी यावे. ज्यांना कार्याची महती वाटत असेल त्यांनीच पैसे द्यावेत. माझ्याकडे पाहून कोणी पैसे देऊ नयेत. ज्यांनी पैसे देण्याचे कबूल केले आहे, त्यांना मी वचनातून मुक्त करते.'

परंतु योगायोग असा की त्यानंतर लौकरच ताराबाईंबद्दल वाटणारे प्रेम, भक्ती विश्वास त्यांच्या चाहत्यांनी धनरूपानेच व्यक्त केले आणि तेसुद्धा स्वतः ताराबाईंनी केलेल्या आवाहनामुळे.

१९४९ च्या ऑगस्ट महिन्यात इटलीमध्ये सॅन रेमो या शहरात आठवे आंतरराष्ट्रीय मॉन्टेसोरी सम्मेलन भरले. मॉन्टेसोरीबाईंना त्यांच्या मायदेशाने मोठ्या सन्मानाने परत बोलविले होते; त्यांचा तेथे विशेष सत्कार केला जाणार होता. आपण या सम्मेलनाला जावे असे ताराबाईंना वाटू लागले. अर्थात त्यांच्याकडे स्वतःच्या खर्चाने परदेशवारी करण्याइतका पैसा कोठून असणार? अशा स्थितीत, लोकांकडून मदत मिळवावी, त्यासाठी शिक्षणपत्रिकेतून जाहीर आवाहन करावे अशी कल्पना ताराबाईंना त्यांच्या हितचिंतकांनी सुचविली.

संघाच्या अध्यक्षा सरलादेवी साराभाई या होत्या, तेव्हा त्यांची परवानगी घेणे आवश्यक होते ताराबाईंनी आपल्या भाच्यावर ( श्री. स. अ. केळकर ) हे काम सोपविले. ताराबाईंची विनंती कानी पडताच जवळ जवळ प्रथमपासून त्यांचे कार्य पाहत असलेल्या सरलादेवी पटकन् उद्गारल्या, "जरूर आवाहन करा! अहो, या ताराबेननी शिक्षणक्षेत्रात इतके काम केले आहे की शैक्षणिक सम्मेलनाला हजर रहाण्यासाठीच काय पण नुसत्या हवाफेरीसाठी ( हावापालटासाठी ) त्या बाहेर जाणार असल्या तरी आम्ही सर्वांनी त्यांना आर्थिक साहाय्य केले पाहिजे!"



ताराबाईंचे विनंतीपत्रक प्रसिद्ध होताच एका महिन्याच्या आत तेरा हजारांवर रक्कम गोळा झाली. यात चार आकडी, तीन आकडी रक्कम धाडणारे धनिक अगदी मोजके होते. बहुतेक मदत अक्षरशः जनताजनार्दनाची होती. ताराबाईंचे वडील प. बा. स. पां. केळकर हेही याच पद्धतीने जनतेच्या मदतीने परदेशी जाऊन आले होते!

जून १९४९ च्या शिक्षणपत्रिकेत बालशिक्षनगराचा जमाखर्च प्रसिद्ध झाला आणि पाठोपाठ जुलैच्या अंकात ' माझी जाहीर विनंती ' म्हणून दात्यांपुढे प्रवासझोळी पसरताना ताराबाईंनी लिहिले, "युद्धानंतर युरोपातील सर्व देशांत पुनर्घटना चालू आहे. त्यांत मनुष्यजीवनाचे प्रश्न प्रत्येक देश कसा सोडवीत आहे याचा अभ्यास करण्याजोगा आहे. अनेक गोष्टी स्वतः जाऊन अभ्यासण्याजोग्या आहेत असे मला वाटते. शिवाय परिषदेतील व्याख्याने ऐकण्याचा प्रत्यक्ष परिचयाचा, चर्चेचा फायदा विशेष महत्त्वाचा आहे."

युद्ध परिस्थितीमुळे जवळ जवळ तेरा वर्षांचा खंड पडल्यावर आता हे सम्मेलन भरणार होते. २२ ऑगस्ट ते २९ ऑगस्ट या काळात भरणाऱ्या सम्मेलनास उपस्थित राहून मग इतर युरोपीय देशांत दौरा करावा असा ताराबाईंचा मानस होता. त्याप्रमाणे १५ ऑगस्ट १९४९ या दिवशी रात्री अकराच्या विमानाने ताराबाई युरोपला रवाना झाल्या व नेपल्स, रोम पाहून वीस तारखेला सॅन रेमो येथे पोचल्या. सम्मेलनासाठी एकूण वीस देशांतून ५०० प्रतिनिधी गेले होते व त्यांपैकी सहा प्रतिनिधी भारतीय होते. चर्चेचा मुख्य विषय होता ' जगाच्या पुनर्घटनेत मनुष्याचा विकास '. डॉ. मॉन्टेसोरींच्या व्याख्यानमालेबरोबर इतर अनेक व्याख्याने, चित्रपट, प्रदर्शन व मॉन्टेसोरी पद्धतीने चालविलेली एक आदर्श बालशाळा असे एकूण स्वरूप या उपक्रमाचे होते. याखेरीज मनोरंजनाचे व स्थळदर्शनाचे निवडक कार्यक्रम होतेच. या परिषदेत ताराबाईंनी ' हिंदुस्थानात चाललेले नूतन बालशिक्षणसंघाचे कार्य ' हा निबंध वाचला आणि बालशिक्षणकार्यातल्या आपल्या अडचणी मांडताना म्हटले, "सुशिक्षित समाजात पसरलेले अनेक गैरसमज, शंका, चुकीच्या व जुनाट कल्पना आम्हाला दूर कराव्या लागल्या ... आणि पंचवीस वर्षे अविरत प्रयत्न करून आजही आम्ही ते बिकट प्रश्न पूर्णपणे उलगडले आहेत अशी खात्री मला देता येत नाही...ज्या देशांत ' मुलांना हे शिकवायचे, ते शिकवायचे व त्यांना बालपंडित बनवायचे ' ही कल्पना लोकांनी सोडून दिली आहे व मुलांच्या शारीरिक व मानसिक विकासाबद्दल योग्य दृष्टिकोन स्वीकारला आहे असे देश पाहायला मिळतील या आशेने मी आले आहे."

या सम्मेलनाचा सविस्तर वृत्तांत ताराबाईंनी वेळोवेळी शिक्षणपत्रिकेच्या वाचकांना

लेखरूपाने कळविला. तसेच इतर नऊ देशांतील पूर्वप्राथमिक, प्राथमिक व माध्यमिक शाळा व इतर शिक्षणसंस्था त्यांनी पाहिल्या व त्यांचे तपशीलवार वर्णन वाचकांना पुरविले. याखेरीज प्रवासवर्णनात्मक लेखन व 'जाता जाता' या सदरात विविध देशांतील लोकांचे आलेले अनुभव सांगणारे लेखनही केले. स्वित्झर्लंड, हॉलंड, इंग्लंड, स्वीडन, फ्रान्स अशा टिकठिकाणच्या बालशाळा पाहताना ताराबाईंना विशेष खटकलेली गोष्ट म्हणजे बहुतेक देशांत मॉन्टेसोरी पद्धतीने चाललेल्या शाळा उत्साही व हिकमती शिक्षकांच्या हाती असल्या तरी किंडरगार्टन व इतर पद्धतींच्या मानाने उपेक्षित व अड-चणीत चालणाऱ्या वाटल्या. मॉन्टेसोरी पद्धतीचा जास्तीत जास्त प्रचार झालेला दिसला हॉलंडमध्ये. मात्र ज्या देशात या पद्धतीचा जन्म झाला त्या इटलीत त्या पद्धतीने चाललेली एकही शाळा नव्हती. तरीही एकंदरीत 'एकही मूल वाया जाऊ नये म्हणून त्यांची मानसिक व शारीरिक जोपासना करणारे' असे हे देश असल्याचे त्यांना जाणवले. तेथल्या व आपल्याकडच्या परिस्थितीतली तफावत पाहून ताराबाईंची प्रतिक्रिया झाली, ती अशी—

'"...माझी नजर सगळीकडे फिरत असते. इथल्या गरिबांच्या झोपड्या कोठे आहेत ? त्यांची फाटके तुटके कपडे घातलेली, हाडकुळी, खरुजी अशी मुले कोठे आहेत ? ...कोठेच सापडत नाहीत. आम्ही मुद्दाम...कारखान्यातील मजूर, मासेमारी करणारे लोक, बंदरावरचे मजूर, शेतकरी, डोंगरावरील लहान लहान खेड्यांमधील मागासलेले लोक—अशा सर्वांची मुले पाहिली...कोठेही अनाथपण, रोग, रोडकेपणा, उपासमार नि अपंगपणा यांपैकी काही दिसले नाही." आणि २० नोव्हेंबरला भारतात परत आल्यावर आपल्याला मिळालेल्या परदेशप्रवासाच्या संधीचा 'सिंडरेलाला पडलेले स्वप्न' असा उल्लेख करून ताराबाईंनी 'मायभूमीस परत' या आपल्या लेखात लिहिले—

"...पण हा जो चित्रपट आम्ही धावतपळत पाहिला त्याची पार्श्वभूमी सदैव काय होती ? आपला देश, आपल्या संस्था, आपले लोक, आपल्या कुटुंब-भावना, आपले समाजजीवन, आपली खेडीपाडी, आपली गरीब, उपाशी व रोगपीडित मुले... ह्यांच्याच पडद्यावर आम्हाला तेथील प्रत्येक गोष्ट दिसत असे. कित्येकदा असे वाटे की आता अधिक हिंडत बसण्यापेक्षा लवकर घरी जाऊन भराभर व खूप जोराने आपल्या येथे मुळीच न होणारी अथवा सावकाश होणारी कामे करायला लागावे. कित्येकदा वाटे की येथे एवढ्या ओळखी झाल्या, एवढ्या संस्था पाहिल्या, कित्येकांनी हिंदुस्थानात येण्याची इच्छा प्रगट केली व आम्ही सौजन्यास व औचित्यास धरून त्यांना आमंत्रणे दिली. ती सगळी मंडळी जर खरीच आपल्या येथे आली तर आपण काय दाखवणार ? त्यांनी दाख-विलेल्या साध्या प्राथमिक शाळेसारखी एखादीही शाळा आपल्याकडे नाही... हे आपले पानपिचकाऱ्यायुक्त रस्ते, कचऱ्यांनी भरलेली स्टेशने... अंग खाजवीत उभी राहणारी



गरीब जनता... ती मंडळी सध्याच आपल्या इकडे न येतील तर बरे."'

परत आल्यावर 'भराभर व जोराने' कामाला लागलेल्या ताराबाई मोडकांचे शिशु-विहार मात्र लौकरच परदेशांतून आलेल्या पाहुण्यांना दाखविण्यासाठी निवडलेल्या खास शिक्षणसंस्थांपैकी एक ठरले.

युरोपफेरीहून परतल्यावर ताराबाईंनी, जनतेच्या निधीचा विनियोग कसा झाला हे जनतेला कळविणे आपले कर्तव्य वाटून सारा जमाखर्च तपशीलवार शिक्षणपत्रिकेत प्रसिद्ध केला. पाचशे रुपयांची विशेष साधने व खेळ खरेदी करून व थोडीफार बचत करून ताराबाई परतल्या होत्या.

इकडे बालशिक्षणनगराचा प्रयोग यशस्वी झाला तेव्हा टिकठिकाणी त्या धर्तीवर कार्यक्रम करावयाचे ठरले. १९५१–५२ हे वर्ष संघाचे रौप्यमहोत्सवी वर्ष म्हणून या पद्धतीने साजरे करायचे ठरले होते. परदेशातून परत आल्याबरोबर नूतन बालशिक्षण संघाच्या चिटणीस या नात्याने ताराबाईंनी या कामात उडी घेतली.

पहिली तेरा वर्षे गिजुभाई एका हाती संघाचे काम करीत होते; त्यावेळी ताराबाई संयुक्त चिटणीस होत्या. परंतु 'मराठी शिक्षणपत्रिका' चालण्याखेरीज नेमके असे संघाचे कार्य त्या करीत नसत.

'नूतन बालशिक्षण संघाची (मॉन्टेसोरी संघाची) स्थापना करताना संघाची चार उद्दिष्टे गिजुभाई व मंडळींनी निश्चित केली होती—

(१) बालशिक्षणाचा प्रसार आणि प्रचार करणे;

(२) त्यासाठी संघाचे मुखपत्र म्हणून 'शिक्षणपत्रिका' हे मासिक चालविणे;

(३) बालशिक्षणाचे काम निर्दोष पद्धतीने व्हावे म्हणून जी बालमंदिरे रु. १० वार्षिक वर्गणी भरून संघाला जोडली जातील त्यांची नियमितपणाने तपासणी करून त्यांना मार्गदर्शन करणे;

(४) प्रदर्शने, व्याख्याने, सम्मेलने, प्रात्यक्षिके इ. आयोजित करून पालक-बालक-शिक्षक या त्रयीचे व समाजातील इतर विचारवंतांचे, शिक्षणप्रेमींचे लक्ष या क्षेत्राकडे वेधून घेणे.'

गिजुभाईंनी विशेषतः शिक्षणपत्रिकेद्वारा बालशिक्षणप्रसाराचे कार्य उत्तम केले. शिक्षण-पत्रिकेतून ते तळमळीने मुलांची बाजू मांडीत राहत. लोकांच्या मनांत बालकळवळ्याची लागण होई. गिजुभाईंच्या या प्रचारकार्यामुळे आपणही ह्या कार्यात भाग घ्यावा असे अनेक लोकांना वाटू लागले. कित्येकजण त्यांच्याकडे आपणहोऊन प्रशिक्षणासाठी आले. काही सधन मंडळींना आपल्या गावातही बालमंदिर असावे असे वाटून त्यांनी स्वखर्चाने बालमंदिराच्या इमारती बांधल्या. गुजरात, सौराष्ट्र, काठियावाड इ. प्रांतांतील जनता बाल-शिक्षणाभिमुख करण्यात गिजुभाई बरेच यशस्वी झाले. दरम्यान ताराबाईंची शिक्षणपत्रिका

मराठी भाषिकांमध्ये हेच कार्य करीत होती आणि ताराबाईंचे जेथे जेथे वास्तव्य असेल तेथे तेथे शिक्षणपत्रिकेचे कार्यालयही जात होते.

१९३९ साली गिजुभाई मिशन पावल्यावर सरलादेवी साराभाई यांनी अहमदाबाद येथे कार्यकारी मंडळाची एक बैठक बोलविली. संघाचे काम आता कोणी पाहायचे असा प्रश्न निर्माण झाला होता. या बैठकीत एकमुखाने ताराबाईंची नेमणूक मुख्यमंत्रिपदावर करण्यात आली.

ताराबाईंनी संघाचे कार्य हाती घेतल्यावर संघाचे प्रमुख कार्यालयही साहजिकच मुंबईत आले. बालशिक्षणकार्याचे केंद्र दक्षिणामूर्ती येथे होते ते आता शिशुविहारात आले. संघ आणि शिशुविहार या दोन्ही संस्था हातात हात घालून काम करू लागल्या. मराठी, गुजराती व हिंदी अशा तिन्ही शिक्षणपत्रिकांचे संपादनाचे काम मुंबईतूनच होऊ लागले.

ज्या पद्धतीने ताराबाईंनी संघाच्या चिटणीस म्हणून कामाला हात घातला त्या पद्धतीमुळे गिजुभाईंच्या व ताराबाईंच्या वृत्तीतला फरक स्पष्ट दिसतो. गिजुभाईंच्या मनात मॉन्टेसोरींच्या ठिकाणी गुरू म्हणून निस्सीम आदर व निष्ठा होत्या त्यामुळे मॉन्टेसोरींचे नाव वापरण्याबाबत त्यांचा आग्रह असे.

परंतु ताराबाईंनी अधिकारावर येताच पहिला बदल केला तो संघाच्या नावात. संघाचे नाव ' मॉन्टेसोरी संघ ' या ऐवजी ' नूतन बालशिक्षण संघ ' असे ठेवण्यात आले.

या बदलामुळे डॉ. मॉन्टेसोरींच्या रोषाचे कारण तर गेलेच परंतु आणखी एक फायदा म्हणजे मॉन्टेसोरींच्या नावाचा त्याग केल्यामुळे संघ आता कोणत्याच एका विशिष्ट शिक्षणप्रणालीला बांधील राहणार नव्हता. प्रत्येक शिक्षणपद्धतीतला जो भाग किंवा जो उपक्रम घेण्यासारखा असेल तो आपल्या शिक्षणपद्धतीत समाविष्ट करत जाण्याचे स्वातंत्र्य त्यांना राहणार होते. परिस्थितयनुसार समाजाच्या, राष्ट्राच्या, बालकांच्या बदलत्या गरजांनुसार फेरबदल केल्याने त्यांची नूतन बालशिक्षण पद्धती खऱ्या अर्थाने नूतन राहणार होती; अधिकाधिक अद्ययावत, उपयुक्त व समर्थ बनणार होती.

दुसरा बदल ताराबाईंनी केला तो संघाच्या कार्यपद्धतीत. गिजुभाईंचा खाक्या होता, एकखांबी संघूना. आता ताराबाईंनी श्री. मंगळदासभाई पक्वासा यांच्या मदतीने संघाची एक घटना तयार करून घेतली. संस्था रजिस्टर करून घेतली. व्यवस्थापक मंडळाची आखणी करून त्यांची कार्ये व अधिकार निश्चित केले. त्यांच्या मदतीला एक सल्लागार मंडळ नेमून घेतले. चार वर्षांनंतर हे सल्लागार मंडळ बंद करण्यात आले आणि निवडून येणाऱ्या सभासदसंख्येत वाढ केली. पुढे बालशिक्षणकार्याच्या क्षेत्राचे भाषिक, प्रादेशिक पातळीवर विभाग पाडून प्रत्येकावर एकेक विभागीय मंत्री नेमला. संघाच्या पाच शाखा स्थापन करण्यात आल्या.

सरलादेवी साराभाई या संघाच्या अध्यक्षा या नात्याने ताराबाईंना पुष्कळच सहाय्य



करू लागल्या. ताराबाईंच्या प्रत्येक कार्यात त्यांची साथ आणि पाठिंबा मिळे. कोणत्याही कामाची आखणी केली की ताराबाई प्रथम ते सरलादेवींपुढे संमतीकरिता मांडत आणि मग व्यवस्थापक मंडळाच्या सर्व सदस्यांपुढे ती योजना मांडून त्यावर चर्चा, विचारविनिमय होऊन कामाचे स्वरूप, दिशा, तपशील नक्की केला जाई. संघाजवळ पैसा नेहमीच तुटपुंजा. मग अशा संकल्पांसाठी लागणारा पैसा हीच मंडळी आपापल्या खिशातून एकत्र करीत आणि आर्थिक ' तोट ' आली तर तीही हेच खिसे वाटून घेत व हिशेब पूर्ण करून ठेवीत.

बालशिक्षण प्रसाराच्या कार्यात ठिकठिकाणी शैक्षणिक सम्मेलने, प्रदर्शने भरविण्यावर ताराबाईंनी विशेष भर दिला. संघातर्फे अनेक केंद्रीय व विभागीय सम्मेलने त्यांनी भरविली. भावनगर, मालाड, इंदूर अशा ठिकठिकाणी त्यांनी दर वर्षाआड किंवा जास्त वेळाही असे कार्यक्रम घडवून आणले. अशा संमेलनात शिक्षक, पालक, अध्यापकवर्ग, विचारवंत, शिक्षणतज्ञ गावातली प्रतिष्ठित मंडळी असे स्थानिक लोक हजर असत. सम्मेलनात मोठमोठ्या विचारवंतांची व्याख्याने, उद्बोधक चर्चा, कथाकथन, परिसंवाद, प्रदर्शने, प्रात्यक्षिके, मुलांचे रंजन-कार्यक्रम इ. चा समावेश असे. या सर्वांमुळे बालशिक्षणाचा प्रसार होण्यास निश्चितच मदत होई. मुंबईतही स्थानिक बालमंदिरांतील मराठी, गुजराती शिक्षकवर्गाला एकत्र आणून त्यांची स्नेहसम्मेलने त्या नित्या घडवून आणत. जुन्या शिक्षकांच्या ज्ञानाला उजळा मिळावा, त्यांचे ज्ञान व कार्यशक्ती वाढावी, क्षेत्रातल्या नव्या नव्या विचारप्रवाहांची, सुधारणांची जाणीव त्यांना असावी म्हणून ताराबाईंनी भावनगर, बोर्डी, आणंद, मुंबई इ. ठिकाणी संस्कारवर्ग घेतले.

संघाच्या शिक्षणपद्धतीप्रमाणे चालणारी बालमंदिरे संघाला जोडून घेऊन त्यांचे दरवर्षी शिक्षिकांकडून निरीक्षण केले जावे अशी एक योजना संघात होती. त्यानुसार १९४० पासून अशी सुमारे ३३ बालमंदिरे संघाशी संलग्न होती. आणि ताराबाई स्वतः निरीक्षणाचे काम करीत असत. ही मंडळे रु. १० वार्षिक वर्गणी देत. या ' फी 'मध्ये शिक्षणपत्रिका हे मासिक त्यांना पुरविले जाई व निरीक्षण-मार्गदर्शनाची व्यवस्था केली जाई. नंतर हा आकडा खूप वाढला, शंभरावर गेला आणि ताराबाईंना एकट्याने एवढे सारे व्याप सांभाळून हे काम जमेना. तेव्हा मग त्यांनी नामलेभाऊ, सरलाताई देवधर, अनुताई वाघ असे आपले अनुयायी प्रतिनिधी म्हणून या कामासाठी पाठविण्यास सुरवात केली. सरकारी निरीक्षकांप्रमाणे या निरीक्षकांचा कल टपका ठेवण्यासाठी जागा शोधण्याकडे नसून संघाचा प्रतिनिधी एक अनुभवी सल्लागार, हितचिंतक, मार्गदर्शक म्हणून तेथे जाई, त्यांच्या अडचणी समजून घेऊन त्यावर उपाय सुचवी. एकदोन दिवस तेथे राहून, एखादी पालकसभा भरवून, एखादे जाहीर व्याख्यान देऊन बालशिक्षणप्रचाराचे कामही साधून घेई. हे काम आता आवाक्यातले नाही हे लक्षात आल्यावर या निरीक्षणकार्यासाठी

शिक्षणतज्ज्ञांची वेगळी यंत्रणा स्थापन करायचे प्रयत्न ताराबाईंनी केले. परंतु ते सफल झाले नाहीत.

१९४० च्या सुमारास भावनगर येथे जे नूतनबालशिक्षण संघाचे संमेलन भरले त्यात ग्रामीण बालशिक्षणाच्या प्रश्नावर विशेष भर दिला गेला. त्याप्रमाणे १९४५ सालापासून ग्रामीण बाल शिक्षणाचे कार्य त्यांनी हाती घेतले.

१९४६ ते १९५१ या काळात पाच वर्षे ताराबाई महाराष्ट्र विधानसभेच्या सदस्या होत्या. या काळात विधानसभेत होणाऱ्या स्त्रियांच्या व शैक्षणिक प्रश्नांच्या चर्चामध्ये त्या भाग घेत. पूर्वप्राथमिक शिक्षणाच्या प्रश्नावर त्यांनी भाषण केले. तसेच नभोवाणीवरूनसुद्धा ताराबाईंनी अनेक वेळा भाषणे केली आणि पूर्वप्राथमिक शिक्षणाची कल्पना श्रोत्यांसाठी वेळोवेळी स्पष्ट केली, ठरावही मांडले.

शिक्षणविषयक लेखन सोडल्यास इतर स्फुट लेखन त्यांनी अगदी मोजके, निवडक व कारणपरत्वे केले. त्यापैकी ' स्त्री ' मासिकामध्ये अनुक्रमे १९३५ व १९३९ साली प्रसिद्ध झालेले त्यांचे ' स्त्रिया व कुंकू ' आणि ' स्त्रीजातिविकास ' हे लेख त्यांचा स्त्रीविषयक दृष्टिकोन किती प्रौढ व पुरोगामी होता याची साक्ष पटवून जातात. ( परिशिष्ट पाहा. )

कित्येक वर्षे ताराबाई बेसिक एज्युकेशन कमिटीवर सदस्या म्हणून काम करीत होत्या. मुंबई राज्यातील प्राथमिक शाळांसाठी असलेल्या पाठ्य पुस्तक समितीवर त्यांनी बरीच वर्षे कार्य केले. पाठ्यपुस्तकांमध्ये कोणत्या प्रकारच्या सुधारणा हव्यात, भाषा सुधारण्याकरता काय केले पाहिजे यांबद्दल अनेक गुजराती व मराठी पुस्तकांतील धड्यांवर त्यांनी परीक्षणे लिहिली. अखिल भारतीय शिक्षण–परिषदेच्या बालशिक्षणविभागाच्या अध्यक्षा बनण्याचा मान त्यांना दोनदा मिळाला. National Council for Elementary Education, Child Care Committee अशा कमिट्यांवर त्यांनी काम केले. M. L. A. असताना त्या J. P. ही होत्या.

या सर्व समित्यांमध्ये ताराबाईंनी कार्य केले, उपस्थिती राखली. मात्र त्यांचे खरे लक्ष बालशिक्षणक्षेत्रावरच त्यांनी केंद्रित केले होते. यासंबंधी पुष्कळ पुढे एका मुलाखतकाराच्या प्रश्नांना उत्तरे देताना त्या म्हणाल्या, " त्या साऱ्या गोष्टी आता आठवून आठवून सांगण्यात काही अर्थ नाही. खरा उल्लेख करावा अशी मी इतर कशात फारशी गुंतलेच नाही. छप्पन गोष्टींच्या मागे लागले असते तर हे काम मला धडपणे पार पाडता आले नसते. "

या काळात आणखी एक महत्त्वाचे काम त्यांनी केले ते. म्हणजे शिक्षणपत्रिकेचे संचालन–संपादन–लेखन.

' शिक्षणपत्रिका ' हे मासिक प्रथम मॉन्टेसोरी संघाचे मुखपत्र म्हणून १९२६ सालच्या मार्च महिन्यात गिजुभाई बधेकांच्या संपादकत्वाखाली सुरू झाले. पालक–बालक–शिक्षक



या त्रयींचे लक्ष बालशिक्षण क्षेत्राकडे वेधून घेणे, बालसन्मानाविषयी पालकांच्या मनात जागृती निर्माण करणे आणि आदर्श बालसाहित्याचा नमुना पालक–शिक्षक यांच्यापुढे सादर करणे अशी काही उद्दिष्टे या पत्रिकेसमोर होती. गिजुभाईंची ही शिक्षणपत्रिका गुजराती भाषेत निघत असे. गिजुभाईंचे शिक्षणपत्रिकेच्या संदर्भातले सुकार्य यापूर्वीच नोंदण्यात आले आहे.

या गुजराती शिक्षणपत्रिकेनंतर सुमारे सहा वर्षांनी ताराबाईंनी अमरावती येथून मराठी शिक्षणपत्रिका सुरू केली आणि १९३३ पासून १९५२ पर्यंत सुमारे वीस वर्षे ती एका हाती चालविली. महाराष्ट्रीय लोकांमध्ये ही शिक्षणपत्रिका लोकप्रिय करताना ताराबाईंपुढे कोणत्या अडचणी आल्या याचा तपशीलही यापूर्वी देण्यात आला आहे.

पहिली पाच–सहा वर्षे ताराबाईंचा भर गुजराती पत्रिकेतील मजकुराचा अनुवाद करून तो प्रसिद्ध करण्याकडेच होता. त्यामुळे त्यांना प्रथम अडचण आली ती भाषेची. ताराबाईंच्या साऱ्या लिखाणावर गुजरातीची छाप असे. कित्येक गुजराती शब्ददेखील त्या सवयीने वापरून जात. वाचकांकडून त्याबद्दल तक्रारी येऊ लागल्या व त्यामुळे स्वतःच्या भाषाशुद्धीचे कामच ताराबाईंना प्रथम हाती घ्यावे लागले. भावनगर येथील नऊ वर्षांच्या वास्तव्यात त्यांनी गुजराती भाषेचा अनुनय इतक्या यशस्वीरीत्या केला होता की ती त्यांच्या मनाची भाषाच बनून गेली होती. आता त्यांनी उलट दिशेने तपश्चर्या सुरू केली शिक्षणपत्रिकेच्या वाचकांपुढे त्यांनी जाहीरपणे आपल्या या उणिवेची कबुली दिली व त्यांनाच आपल्या या भाषाशुद्धीच्या कामात मदत करण्याची विनंती केली. ताराबाईंचे बंधू दादा यांचीही त्यांना या कामात पुष्कळ मदत झाली. याखेरीज ताराबाईंनी स्वतःला एक अभिनव ' शिकवणी ' ही ठेवली ! हिंगणे येथील कर्व्यांच्या संस्थेतील मंडळी ताराबाईंच्या कार्यात रस घेत. ताराबाई आपला प्रत्येक अंक श्री. भास्करराव कर्व्यांकडे पाठवीत, दोन्हीकडचा टपालखर्च देत व त्यांच्याकडून सबंध मजकूर तपासून घेत. तांबड्या पेन्सिलीने सुधारली जाऊन परत येणारी ही पत्रिका काही वेळा इतकी रंगून येई की ताराबाई हसत हसत म्हणत, " ही बघा आली आमची कम्युनिस्ट पत्रिका ! "

मातृभाषेची अशी आराधना तिच्यावर पुन्हा पहिले प्रभुत्व मिळवेपर्यंत चालली ! १९४९ साली ताराबाई परदेशांत गेल्या असताना शिक्षणपत्रिकेचे संपादनही श्री. भास्करराव कर्व्यांनी सांभाळले.

तिकडे गुजराती पत्रिकेचा प्रसार विनासायास चालू असताना ( गिजुभाईंचे साहित्यक्षेत्रात, शिक्षणक्षेत्रात पुष्कळ नाव झाले होते, त्याचाही फायदा त्यांना मिळत असे ) इकडे आपल्याला एकेक सभासद मिळविण्यासाठी केवढी धडपड करावी लागते हे ताराबाईंना जाणवल्यावाचून, खटकल्यावाचून राहत नसे. वाचकांच्या, पालकांच्या या औदासीन्याची छटा शिक्षणपत्रिकेच्या त्या वेळच्या मजकुरावरसुद्धा चढलेली दिसते. उदाहरणार्थ, पहि-

त्याच वर्षीचा बारावा अंक बालसाहित्यविशेषांक म्हणून काढून ‘ खाऊचा पुडा ’ म्हणून मुलांच्या हाती देताना ताराबाईंनी आपली रुखरुख व्यक्त केली, “ श्रीमंत बापांजवळ उंची कपडे घालण्यास, वलयातले खेळ खेळण्यास पैसे असतात, परंतु मुलांसाठी असलेल्या मासिकासाठी वार्षिक रु. १ वर्गणी देणे त्यांना भारी पडते ... ”

“ चैत्रगौरीच्या हळदीकुंकवाला बायका सहज दहापंधरा रुपये खर्च करतात. गौरीच्या पायाशी कचकड्याचे सुंदर बाळमुद्दा बसवतात. पण खऱ्याखुऱ्या बाळांच्या कल्याणासाठी काम करणारी संस्था येथे उपाशी मरते...”

हळू हळू ताराबाई आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी प्रयत्नपूर्वक, जोडे झिजवून सफलता मिळविली.

आपण होऊन बालशिक्षणकार्य शिकण्याच्या इच्छेने त्यांच्याकडे गेलेल्या नामलेमाऊंची तर ताराबाईंनी हीच कसोटी घेतली, “ काम शिकायचं असेल तर प्रथम ग्राहक मिळवा ! ” आणि नामल्यांनी गावोगाव हिंडून, व्याख्याने देऊन तीनशे सभासद नोंदले ! हळू हळू ताराबाईंच्या साऱ्या परिवारात, गोतावळ्यात शिक्षणपत्रिकेचे जाळे पसरले. शनिवार-रविवार दोन्ही दिवस ताराबाई याच मोहिमेवर असत !

परंतु केवळ वर्गणीदार वाढल्याने त्यांचे उद्दिष्ट साध्य होणार नव्हते. लोकांनी बाल-शिक्षणविचार समजून घ्यावा, त्यावर चर्चा, चिंतन, अभ्यास करावा असे ताराबाईंना वाटे. त्यांची स्वतःची तर प्रत्येक विचार, कल्पना, कृती कशी बालपूजेत केन्द्रित झाली होती ते केवळ त्यांचे मोजके शब्दप्रयोग गोळा केले तरी लक्षात येईल. बालसन्मान, बालछंद, बालअभ्यास, बालसंवाद, बालकळवळा प्रत्येक व्यवहाराला जणू ‘ बाल ’ हा कुंकुमतिलक लावूनच त्यांची वाणी त्याचा उच्चार करी, लेखणी तो लिहून काढी. लोकांना उद्देशून त्या लिहीत—

“ एक जण लिहितात, महाराष्ट्राचे व ताराबाईंचे सांधे अजून जुळले नाहीत. सांधे जुळवून घेण्याची संपादकाची मनापासून इच्छा आहे. पत्रिकेच्या द्वारा त्यांनी हात पुढे केला आहेच. वाचकांना विनंती आहे की त्यांनीही आपले विचार कळवावे. तार सांधण्याची रीत विचारविनिमय हीच आहे...”

आणखी एखाद्या पत्रिकेतून त्या प्रश्न विचारीत—

“ तुम्हाला ही शिक्षणपत्रिका आवडते ?—मला मुळीच आवडत नाही ! कारण सध्याची शिक्षणपत्रिका अगदी एकांगी आहे...”

पदवीधरांना उद्देशून ताराबाईंनी एके ठिकाणी लिहिले, “ पदवीधर स्त्रियांना, पालकांना वाटेल आम्हीही शिकलो आहोत, इंग्रजी पुस्तकांतून हे सारं ज्ञान मिळवलेलं आहे. आता ही ताराबाई आम्हाला नवं काय शिकवणार ?

“—ताराबाई काही कोणाला शिकवायला इथे आलेली नाही. आपले विचार, अभ्यासातून, अनुभवातून बनलेली आपली मते ती तुमच्यापुढे मांडीत असते आणि वाचकांनीही तसेच करावे, असे तिला कळकळीने वाटते. कारण मानसशास्त्र, बालमानस-शास्त्र ही अजून उगवती शास्त्रे आहेत– त्यामध्ये अजून नक्की आणि शेवटची विधाने झालेलीच नाहीत...”



आपले असे सारे विचार व्यक्त करताना मुद्दाम काही सजविण्याकडे, आकर्षक करण्याकडे ताराबाईंचा कल नव्हता. परंतु त्यांची भाषा तिच्या साधेपणाने, सच्चेपणाने परिणाम साधून जाई. ललितलेखकाजवळ असणारी प्रतिभा, कल्पनाशक्ती, भाषासौंदर्य ताराबाईंजवळ नव्हते. शब्दांचा उपयोग त्या आपले विचार व्यक्त करण्याचे साधन म्हणून करीत.

परंतु ताराबाई मुलांना गोष्ट सांगू लागल्या की त्यांचा असुंदर चेहरादेखील आकर्षक दिसत असे. तसेच त्यांच्या लेखनशैलीचेही होत असे. वाचकांना जिंकून घेणारी नाजूक शब्दांची कलाकुसर, कारागिरी त्यात नसे परंतु त्यामागची तळमळ, अस्सलपण, सच्चेपण त्यांच्या लिखाणाला सौंदर्यपूर्ण करीत. मोजक्या शब्दांत रोखठोकपणाने त्या विचार लिहून जात.

एके ठिकाणी त्यांनी लिहिले आहे,

“ विचारू या !

अशीलांच्या वकीलांस,

—कायद्याच्या विचारात जितका वेळ घालवता त्याचा १०० वा भाग तरी बालकारणात घालवता काय ?

रोग्यांच्या डॉक्टरास,

—औषधोपचाराच्या विचारात जितका वेळ घालवता त्याचा १०० वा भाग तरी कधी बालकारणात घालवता काय ?

राजकारणी लोकांस,

—राजकारणाच्या विचारात जेवढा वेळ घालवता त्याचा १०० वा भाग तरी बालकारणात घालवता का ?

विद्यार्थ्यांच्या शिक्षकांस,

—शिक्षणाच्या विचारात जेवढा वेळ घालवता त्याचा १०० वा भाग तरी बालकारणात घालवता का ? ”

‘ बालकाची अपूर्णता ’ यावरला चौकटीतला मजकूर असाच हृद्य आहे.

तू जर सर्वज्ञ नाहीस,<br>
तर बालकांच्या अल्प ज्ञानाला का हसतोस ?<br>
तू जर शक्तिवान नाहीस,

तर बालकांच्या अशक्तीवर का चिडतोस ?
तू जर संपूर्ण नाहीस,
तर बालकांच्या अपूर्णतेवर का चिडतोस ?

एके ठिकाणी ताराबाई म्हणतात,

" बच्चे लोक काय म्हणतात पाहा; ते म्हणतात ' मोठी मोठी युद्धे चालली आहेत, आमच्यासाठी छोट्या छोट्या लढाया कोण लढणार ! ' "

किती साध्या शब्दांत त्या आपले विचार मांडून टाकीत !

" ...पूर्वी आपल्याकडे विद्यार्थ्यांच्या शिक्षणात आज्ञापालनाला अग्रपूजेचा मान होता. आज्ञाभंग करणारी मुले गुन्हेगार ठरत. खरे म्हणजे कुटुंबव्यवस्था, समाजव्यवस्था सुलभ जावी म्हणून हे आज्ञापालनाचे महत्त्व. बालकाच्या शिक्षणात त्याच्या व्यक्तिमत्त्वाला मान दिला पाहिजे. ह्या बाबतीत आता तज्ज्ञांचे एकमत झाले आहे.

" हे ऐकून कोणी म्हणतील, वडील माणसांच्या गुलामगिरीचे तर हे युग नव्हे ? बालसन्मान म्हणजे बालपूजेच्या भावनेने वेडे होऊन, बालहट्टाला पोषक होऊन बालकांचे दास होऊन बसणे नव्हे ! " ...इ.

ही बिनासजावटीची अभिव्यक्ती ताराबाईंच्या जीवननिष्ठेशी सुसंगत अशीच होती. शिक्षणपत्रिकेच्या अनाकर्षक बाह्य रूपावरून, मुखपृष्ठावरून काही वाचकांचा ताराबाईंशी लेखी वाद झाला, त्यावेळच्या ताराबाईंच्या उत्तरातून त्यांची जीवनदृष्टी प्रतीत होते.

एकदा शिक्षणपत्रिकेच्या काही हितचिंतकांनी ताराबाईंना लिहिले की आपले मासिक वाचकांनी वाचावे असे वाटत असल्यास त्याचे स्वरूप इतके रुक्ष, गद्य व रंगहीन असू नये. मुखपृष्ठ मोहक असेल तर वाचक ते उचलून घेतील. अशी अनाकर्षक पत्रिका कोणाला उचलावीशी वाटणार ?

या आक्षेपाला उत्तर देताना आपली या बाबतची आर्थिक असमर्थता व्यक्त करून ताराबाईंनी ते अनावश्यकही असल्याचे मत प्रदर्शित केले. मुखपृष्ठाला भुलून पत्रिका उचलणारे ' वरलिया रंगा ' ला भुलणारे वाचक फक्त मुखपृष्ठ पाहून ते खालीही ठेवून देतील. लोकांनी शिक्षणपत्रिका वाचावी ती त्यातले विचार, मजकूर, विषय वेधक वाटून. आतल्या समृद्धीची ज्याला जाण आहे तो बाहेरच्या स्वरूपाला जास्त महत्त्व देणारच नाही...

खरोखरच ताराबाईंच्या शिक्षणपत्रिकेने शिक्षणक्षेत्रातल्या मोठमोठ्या व्यक्तींचे लक्ष वेधून घेतले. वि. द. घाटे, सुलभा पाणंदीकर इ. मान्यवर मंडळी पत्रिकेची नियमित वाचक बनली. कुसुमावती देशपांडे, विमलाबाई देशपांडे यांच्यासारख्या विदुषी प्रथम ताराबाईंशी मतभेद दर्शवून, वाद घालून पुढे त्यांच्या कार्याच्या चहात्या बनल्या त्या या शिक्षणपत्रिकेच्या माध्यमातून.



ओळीने वीस वर्षे ताराबाईंनी संपादन, लेखन, प्रकाशन, छपाई, विक्री, पत्ते लिहिणे, अंकांना तिकिटे लावून स्वतः जाऊन ते पोस्टात टाकणे—अशी सर्व बाजूंनी शिक्षणपत्रिका सांभाळली. त्यांचे जेथे जेथे वास्तव्य झाले तेथे तेथे शिक्षणपत्रिका त्यांच्याबरोबर फिरत राहिली.

१९३३ साली मराठी पत्रिका निघाली त्याच सुमारास श्री. काशिनाथजी त्रिवेदी यांनी हिंदी पत्रिकासुद्धा काढली होती, परंतु पुढे ते मंत्री झाल्यानंतर कार्यबाहुल्यामुळे त्यांच्याच्याने हे काम नीट पार पडेना. १९३९ साली गिजुभाईंच्या निधनानंतर गुजराती शिक्षण पत्रिकेलाही असेच पोरकेपण आले. त्यामुळे मग तीनही पत्रिकांचे संपादन ताराबाईंकडेच आले. सुमारे चौदा वर्षे मुंबईहून या पत्रिकांचे संयुक्त संपादन होत असे. बहुधा एकच मजकूर तीनही पत्रिकांत अनुवादित करून प्रसिद्ध केला जाई.

पुढे काही वर्षांनी दक्षिणामूर्ती येथील कार्यकर्त्यांनी गुजराती पत्रिका भावनगरला नेली व १९७० नंतर ती बंदच पडली. हिंदी पत्रिकेची तीच गत झाली. एक मराठी पत्रिका मात्र आपल्या पंचेचाळीस वर्षांच्या परंपरेसह व सुमारे बाराशे वर्गणीदारांच्या संख्येसह आजदेखील कार्यप्रवण राहिली आहे.

नूतन-बाल-शिक्षण संघाच्या ताराबाईंनी अंगीकारलेल्या कार्यात जसजसे बदल, सुधारणा होत गेल्या तसतसे शिक्षणपत्रिकेतल्या विषयांचे स्वरूपही बदलत गेले. उदाहरणार्थ, ताराबाईंची संस्था शहर सोडून खेड्याकडे सरकली तेव्हा शिक्षणपत्रिकेतसुद्धा ग्रामीण बालशिक्षणविषयक विचारांना, अनुभवांना, प्रयोगांना महत्त्व प्राप्त झाले. ग्रामीण बालशिक्षणासाठी साधननिर्मिती करण्यात यश मिळू लागले तेव्हा त्याची तपशीलवार माहिती कृतींसह शिक्षणपत्रिकेतून वाचता येऊ लागली. पुढे आदिवासी परिसरात कार्य सुरू झाले तेव्हा त्यावरचा मजकूर अधिक प्रमाणात शिक्षणपत्रिकेत प्रसिद्ध होऊ लागला. त्यामुळे ताराबाईंच्या कार्याची माहिती बालशिक्षणक्षेत्रातील लोकांना होत राहिली.

खेड्यातले शिक्षणकार्य हाती घेतल्यावर ताराबाईंनी शिक्षणपत्रिकेत लिहिले, " खेडे गावात मॉन्टेसोरी म्हणजे दोन असंबद्ध गोष्टी एकत्र गुंफण्याचा प्रयत्न करणे असे लोकांना वाटते. खेड्यांतल्या मुलांना शिक्षणाची जरूरच काय, असेही लिहिले जाते. श्रीमंताला मन आहे. त्याच्या मनाचा विकास होणे जरूर आहे. मग खेडवळ बालकास काय फक्त शरीरच असते ? त्याचे मन अविकसितच राहायला हवे ? माणसाला योग्य अशी समाजव्यवस्था करता आली नाही म्हणून जन्म पावलेल्या या अन्यायाची परंपरा आपण टिकवायची ?...खेडीपाडी म्हणजे तर खरी उद्योगभूमी... "

१९४९ साली इटलीला मॉन्टेसोरी सम्मेलनाला जाताना याच शिक्षणपत्रिकेचा उपयोग करून ताराबाईंनी प्रवासखर्च गोळा केला. परंतु हे सर्व जरी असले तरी ताराबाईंनी शिक्षणपत्रिका या मासिकाला कधी आपल्या खाजगी दिवाणखान्याचे स्वरूप येऊ दिले

नाही. शिक्षणपत्रिका हे ताराबाई मोडकांचे मासिक न होता बालशिक्षण-विचाराला वाहिलेले, नूतन बाल-शिक्षण संघाचे मुखपत्रच राहिले.

सुरुवातीला शिक्षणपत्रिकेने केवळ मॉन्टेसोरी पद्धतीचा प्रचार केला. त्यावेळी अध्यापनमंदिराच्या अभ्यासक्रमातसुद्धा त्याच पद्धतीवर भर दिला जात असे. पुढे १९४८ साली जे भव्य बालशिक्षणनगर भरविण्यात आले त्यात मुक्त व्यवसाय आणि बाहुलीघर या मॉन्टेसोरी पद्धतीत नसलेल्या विषयांचा समावेश होता. १९५८ साली जेव्हा अध्यापनमंदिराच्या अभ्यासक्रमात बदल करण्यात आला तेव्हा मॉन्टेसोरी हा शब्द वगळण्यात आला, परंतु चाकोरी तशीच राहिली. आणि त्याचा परिणाम शिक्षणाच्या गुणवत्तेवर झाला. अभ्यासक्रमातील अधुनिकीकरणाकरिता शिक्षणपत्रिकेने अनेक लेख दिले; परंतु तोवर अभ्यासक्रम शासनाच्या हातात गेला होता. प्राथमिक शिक्षणाच्या क्षेत्रात काम सुरू झाल्यावर शिक्षणपत्रिकेने त्या दृष्टीने आपली कक्षाही वाढविली.

१९५२ सालापर्यंत ताराबाई शिक्षणपत्रिकेचे संपादन करीत असत. त्यानंतर श्री. शेष नामले यांनी सुमारे एकवीस वर्षे हे कार्य केले व आता श्री. अनुताई वाघ शिक्षणपत्रिका सांभाळीत आहेत.

शिक्षणपत्रिकेच्या या पूर्वीच्या तीन संपादकांच्या कार्याचा आढावा घेतल्यास काही गोष्टी ठळकपणे जाणवतात. गिजुभाईंनी पत्रिका काढली त्यावेळी त्यांच्याच शब्दात, त्यांना बालशिक्षणास योग्य अशी ' हवा 'च प्रथम उत्पन्न करावयाची होती. त्यामुळे त्यांच्या शिक्षणपत्रिकेत या हवानिर्मितीचे प्रयत्न प्रामुख्याने दिसून येतात. बालशिक्षणाची कल्पना पालकांना पटविण्याची जरूर असल्याने पालकांना विशेष महत्त्व होते. शिक्षणक्षेत्रातले बालयुग सुरू झाल्याची- छडीयुग संपल्याची जाणीव गिजुभाईंनी त्यावेळच्या शिक्षक, पालक मंडळींना दिली ती शिक्षणपत्रिकेतून. बालकाच्या प्रसन्नतेचे महत्त्व, बालपूजा, बालसन्मान बालस्वातंत्र्याच्या कल्पना गिजुभाईंनी शिक्षणपत्रिकेतून शेकडो मातापित्यांना पटविल्या.

मात्र गिजुभाई नुसतेच शिक्षणतज्ज्ञ किंवा सिद्धांतवादी नव्हते तर त्यांच्या लेखणीत अभिजात साहित्यिक गुण होते. साहजिकच त्यांच्या लिखाणात विशेषत: बालसाहित्यात प्रतिभासपन्न लेखकाची शब्दकळा दिसते. कधी काव्यमय, वाङ्मयीन भाषा तर कधी कल्पनारम्यतेचा आविष्कार आढळतो. तिसरी गोष्ट म्हणजे गिजुभाईंची दृष्टी भावनिक; त्यामुळे त्यांच्या लेखनात हळवी तरलता, भावनेचा ओलावा अधिक आढळतो.

ताराबाई संपादन करू लागल्यावर त्यांनी काळाच्या मागणीनुसार बालशिक्षकांना मार्गदर्शन करण्याला महत्त्व दिले. अनेक लेखांद्वारा त्यांनी प्रशिक्षणाची पार्श्वभूमी स्पष्ट केली. तसेच शिक्षकांना उपयुक्त ठरतील अशी बालगाणी, बालगोष्टीही सादर केल्या. ताराबाईंचे लेखन अधिक वैचारिक, बुद्धिनिष्ठ व अभ्यासपूर्ण असे. त्यांनी लेखनाला सुरुवात केली तीच मुळी ' बालसाहित्यातली अश्लीलता ' हा विचारप्रवर्तक व धीट लेख लिहून; ' पादू कशी ?— ढुम्म दिशी ' सारख्या साहित्याचे समर्थन करण्यासाठी. गणित आणि विज्ञान या दोन विषयांकडे ताराबाईंचा प्रथमपासून ओढा. शिक्षणपत्रिकेतून त्या शेवटपर्यंत सातत्याने गणिताची सुलभ साधने सुचवीत असत. त्यांचे तांत्रिक लेख विशेष सरस असत व त्यांची वैज्ञानिक दृष्टीही शिक्षणपत्रिकेच्या फळ्यावर उतरली.



पुढे श्री. नामले संपादक झाल्यावर त्यांनी प्रशिक्षणकार्याकडे सतत लक्ष दिले, कारण त्यावेळेपर्यंत महाराष्ट्रात सुमारे चौदा अध्यापनमंदिरे निघाली होती व त्यांना मार्गदर्शनाची जरूर होती.

परंतु गिजुभाई व ताराबाई या दोघांचीही खरी भरीव कामगिरी नजरेत भरते ती बालसाहित्य-निर्मितीच्या संदर्भात.

या मंडळींनी बालसाहित्य लिहिण्यास प्रारंभ केला त्यापूर्वी मराठीत बालसाहित्य असे जवळ जवळ नव्हतेच. आठ वर्षांच्या खालील मुलांची साहित्यप्रांतात पूर्णपणे उपेक्षा होत असे. जे काही होते ते किशोरसाहित्य होते. त्याखाली उतरण्याचा कोणी विचारही केला नव्हता. या बालप्रेमी मंडळींनी साहित्याची कक्षा तीन वर्षांच्या बालकांपर्यंत नेऊन भिडविली आणि या क्षेत्रात ती अग्रेसर ठरली. या बाबतीत गिजुभाईंची प्रासादिक, बालमनपसंत शैली ताराबाईंनी चांगल्या प्रकारे आत्मसात केली. ट ला ट, ट ला फ पासून आरंभ करून त्यांनी असे बालसाहित्य प्रसृत केले की त्यातले निवडक नमुने आजदेखील कोणत्याही कसोटीला सहज उतरतील—

" थेंबा, थेंबा, थांब थांब  
दोरी तुझी लांब लांब  
आकाशाला पोचली  
तिथे कशी खोचली ? "

—पावसाला उद्देशून बालक म्हणते,

" सरी तुझ्या तारेच्या  
हिऱ्याच्या की मोत्याच्या !  
सोन्याच्या की रुप्याच्या !  
सरी तुझ्या ओल्या  
गंगेत जाऊन न्हायल्या ! "

असे एखादे सुंदर शिशुगीत उदाहरणादाखल पुरेसे आहे.

ताराबाईंच्या ' आजीबाईंच्या गोष्टी ' मधली ' आनंदी कावळा ' ही गोष्टसुद्धा अशीच

केवळ बालकांनाच नव्हे तर शिक्षकांना व पालकांनाही पसंत पडलेली—

' आनंदी कावळा '

एक होता कावळा.

तो राहत होता पिंपळाच्या झाडावर.

पिंपळाच्या जवळ होती विहीर.

विहिरीवर गावच्या बायका पाणी भरीत. बायकांनी हंडे भरले व डोक्यावर चढवले की कावळा त्यावर बसून पाणी प्यायचा.

रोज रोज कावळा पाणी प्यायचा. रोज रोज बायकांना पुन्हा पाणी भरावे लागायचे.

एके दिवशी बायकांना आला राग. त्या गेल्या राजाकडे फिर्याद करायला.

" राजा, राजा, पिंपळावरचा कावळा रोज आमचं पाणी पितो आणि विटाळून टाकतो. कावळ्याला शिक्षा कर."

राजा म्हणाला, " शिपाई, जा कावळ्याला घेऊन ये."

शिपाई कावळ्याला घेऊन आला.

राजा म्हणतो,

" काय रे कावळ्या, पाणी भरणारणीचं पाणी विटाळतोस ? शिपाई, याला काट्यांत नेऊन टाक!"

शिपायाने कावळ्याला काट्यात टाकले. कावळा तर तेथे गाऊ लागला.

" कोवळे कान टोचू या,
बाबा, कोवळे कान टोचू या!"

हे राजाला कळले.

राजा म्हणाला, " टाका त्याला विहिरीत." कावळा तिथेही गाऊ लागला,

" विहिरीत पोहायला शिकू या.
बाबा, विहिरीत पोहायला शिकू या!"

हे राजाला कळले.

राजा म्हणाला, " टाका त्याला चिखलात!"

कावळा तिथेही गाऊ लागला,

" चिखलामध्ये घसरू या,
बाबा, चिखलामध्ये घसरू या!"

हे राजाला कळले.

राजा म्हणाला, " कावळा अजून कसा मरत नाही ? टाका त्याला तेलात!"

कावळा तेथेही गाऊ लागला,



" कानात तेल घालू या,
बाबा, कानात तेल घालू या!"

हे राजाला कळले.

राजा म्हणाला, " टाका त्याला तुपात!"

कावळा पुन्हा गाऊ लागला,

" तुपाचे गोळे खाऊ या,
बाबा, तुपाचे गोळे खाऊ या!"

हे राजाला कळले.

राजा म्हणाला, " टाका त्याला गुळात."

कावळ्याची मजा! तो गाऊ लागला,

" गुळाच्या ढेपा खाऊ या,
बाबा, गुळाच्या ढेपा खाऊ या!"

हे राजाला कळले.

राजा म्हणाला, " टाका त्याला छपरावर!

कावळा तेथेही गाऊ लागला;

" कौलं शाकारायला शिकू या,
बाबा, कौलं शाकारायला शिकू या!"

शेवटी राजा कंटाळला व म्हणाला,

" हा कावळा तर बुवा भारी आनंदी, द्या त्याला उडवून."

' सुसुल सुसुलके डुलक्या मारी ' ही वाक्यांना ठेका असलेली, अभिनयाला वाव देणारी कथा ताराबाईंचीच.

स्वतंत्र निर्मितीखेरीज बालकांसाठी तोंडी प्रचारात असलेली ' मडगुलं–अडगुलं ' सारखी बरीच गाणी त्यांनी संग्रहीत केली आणि लोकगीतांना व लोककथांना त्यांनी लेखी प्रतिष्ठा दिली. मुलांसाठी अनेक खेळ प्रसिद्ध केले. इंग्रजीत ' नर्सरी ऱ्हाइम्स 'ना असते ते महत्त्व त्यांनी मराठीत ' बडबडगीत ' हा प्रकार फुलवून त्याला मिळवून दिले. आज जी बालगाणी, बालगोष्टी लिहिल्या जात असतात त्यांच्या लेखकांना त्याची जाणीव असो–नसो, परंतु या बडबडगीतांची पार्श्वभूमीच त्यांच्या लिखाणाला समृद्ध करीत असते. मॉन्टेसोरी शास्त्रानुसार मुलांना रमविण्यासाठी अद्‌भुत कथा, परीकथाच आवश्यक नसतात तर मुलांच्या भोवतालीच जे कल्पनेहून चमत्कृतिपूर्ण असे वास्तव असते तेही मुलांचे तितकेच मनोरंजन करू शकते. सृष्टीने घातलेली ही रंगीबेरंगी कोडी ताराबाईंनी आपल्या ज्ञानलक्षी साहित्यातून मुलांपुढे ठेवली. शंखशिंपल्या, मुंग्यांचे वारूळ या नैसर्गिक घटनां-

च्याच त्यांनी गोष्टी बनविल्या. माहितीपूर्ण तरीसुद्धा मनोरंजक असे पाठ त्यांनी शिक्षकांसाठी लिहिले. 'तारावितना पाठो' हे त्यांचे गुजराती पुस्तक प्रकाशित झाले आहे. शिशुसाहित्याचे तंत्र या दोघांनी निश्चित केले. उदाहरणार्थ, ताराबाईंचे एक मत असे होते की तीन ते पाच वर्षांच्या मुलांसाठी जे साहित्य असते ते त्यांना त्यांच्या शिक्षकांनी पालकांनी वाचून दाखवायचे असते. ते वाचायला थोडे कठीण किंवा जरा जास्त लांबीचे असले तरी चालते. परंतु आठ-नऊ वर्षांचे बालक आपल्या अपुऱ्या लेखन-वाचन शक्तीनिशी जे साहित्य वाचायला घेते ते त्याच्या आवाक्यातले, त्याला कंटाळा यायच्या आत संपणारे हवे. ताराबाईंनी या दोन्ही प्रकारचे अनेक नमुने शिक्षणपत्रिकेतून सादर केले. ताराबाईंची कामगिरी ही या प्रकारची आहे.

शिक्षणपत्रिकेच्या संदर्भातले ताराबाईंचे यश सांगितल्यावर आणखी एक गोष्ट शब्दांत मांडली पाहिजे. पहिली सहा वर्षे सोडली तरी १९३३ पासून म्हणजे पंचेचाळीस वर्षांहून अधिक परंपरा असलेले हे मासिक. नूतन बालशिक्षण संघाच्या कार्याला त्याच्यामुळे अवश्य उठाव मिळाला. बालशिक्षणक्षेत्रात इतकी — पंचेचाळीस वर्षांची परंपरा असलेले असे हे एकमेव मासिक, परंतु त्याचे यश आणि मर्यादा दोन्ही येथेच स्पष्ट होतात. कारण इतक्या वर्षांच्या प्रवासाच्या मानाने या मासिकाने आपल्या क्षेत्रात विशेष दर्जा असा प्राप्त केलेला नाही. बालशिक्षण – प्रशिक्षण क्षेत्रात काम करणाऱ्या मंडळींशी खऱ्या अर्थाने सुसंवाद हे मासिक साधू शकलेले नाही. पालकांच्या विशेषतः शहरी पालकांच्या बदललेल्या, बदलत्या समस्या, त्यांना उकल वगैरेंची जाणीवपूर्वक दखल शिक्षणपत्रिका घेताना दिसत नाही. ( उदा. बालविश्वात नव्याने प्रविष्ट झालेले दूरदर्शनासारखे माध्यम, त्यांच्या मनावर पडणारे संततिनियमनासारख्या विचारांचे ठसे, विभक्त कुटुंब, नोकरी करणारी माता इ. ) बालमनसंगोपन हे आजही पूर्वीइतकेच, किंबहुना काही बाबतीत पूर्वीपेक्षा जास्तच अवघड, नाजूक व कौशल्याचे काम होऊन बसले आहे. त्या दृष्टीने पालकशिक्षकांना मार्गदर्शन करण्याच्या बाबतीत शिक्षणपत्रिका थिटी ठरते. शिक्षणपत्रिका बालसाहित्याचे नमुने सातत्याने सादर करीत असूनही प्रत्यक्षात किती लेखक-प्रकाशक-पालक या साहित्याकडे एक आदर्श नमुना ( Model ) म्हणून पाहतात हा एक वादग्रस्त मुद्दा ठरेल.

याचे एक कारण म्हणजे जातिवंत लेखकांचे, साहित्यिकांचे लेखनसाहाय्य मिळविण्यात शिक्षणपत्रिकेचे संपादक अपुरे पडले व त्यामुळे शिक्षणपत्रिकेचे स्वरूप कमीअधिक प्रमाणात 'सब कुछ संपादक' या प्रकारचेच राहिले. श्री. पु. ग. देशपांडे, श्री. कुसुमावती देशपांडे अशा अनेक प्रतिभावंतांची लेखी, सक्रिय मदत मिळविण्याचा प्रयत्न ताराबाईंनी वेळोवेळी केला, परंतु त्यात त्यांना यश आले नाही. वस्तुस्थिती अशी आहे की संपादनासाठी, लेखनासाठी जो बौद्धिक उरक किंवा प्रतिभा लागते ती ज्यांच्यापाशी असते ती



माणसे अशा उपेक्षित क्षेत्राकडे वळत नाहीत आणि अंतःप्रेरणेमुळे जी अशा कार्याकडे वळतात त्यांच्या लेखणीत ती आवाका, कुवत असतेच असे नाही. मुळात जे आपले क्षेत्र नाही त्याच्यावर आपली जिद्द, धडपड कार्यश्रद्धा ताराबाईंनी एकवित केली आणि भरीव, रचनात्मक कार्य करून दाखविले.

शिवाय आजपर्यंतच्या संपादकांनी आपल्या अनेकविध कार्यापैकी एक अंग म्हणून मोजक्या वेळात हे काम केले. एखादा चतुरस्र ताकदीचा संपादक आपली सारी शक्ती एकवटून शिक्षणपत्रिका हाती धरील तेव्हा ती खऱ्या अर्थाने बालशिक्षणक्षेत्रातले आपले स्थान भूषवू लागेल.

—एरवी तसे ताराबाईंचे कुठलेही कार्य कार्यकर्त्यावाचून अडलेले नाहीच.

शिशुविहारचा काळ हा ताराबाईंमधल्या समाजकार्यकर्तीच्या घडणीचा काळ होता. शिशुविहारच्या यशामुळे त्यांची स्वतःची घडाडी त्यांच्या स्वतःसाठी निश्चित झाली. कार्यकर्ते मिळविणे, टिकविणे, घडविणे यांचा अनुभव सतत मिळाला. अनेक सुधारणा, नवे प्रयोग यशस्वीरीत्या त्या करीत होत्या आणि शासनाला आदर्श वाटणारी एक शिक्षणसंस्था त्यांनी कल्पनेतून प्रत्यक्षात उतरवण्याचे अवघड कार्य पार पाडले. अध्यापनमंदिराच्या कामातही शिशुविहार ही संस्था बालशिक्षणक्षेत्राने अग्रेसर ठरली. तिच्यामुळे महाराष्ट्रात बालशिक्षण कार्याचा प्रसार झपाट्याने झाला.

पुढे हा सगळा अनुभव ताराबाईंसाठी स्वयंशिक्षणाचा भाग बनला.

मुंबईला केलेल्या चुका त्यांनी पुढे बोर्डीला, कोसबाडला केल्या नाहीत.

सरकारमान्यता, ग्रॅन्ट वगैरे मिळविण्याच्या दृष्टीने विद्यार्थ्यांच्या उपस्थितीची व्यवस्थित नोंद ठेवणे, हिशेब टाकटीक असणे इत्यादी आवश्यक असते. आणि ताराबाईंना एकूण आकड्यांचा कंटाळा ! वगैरेकाम Dead stock, Roll call इ. गोष्टी त्यांना त्रस्त करीत. अशा बाबतीत अनेकदा सहकाऱ्यांशी त्या वादावर येत.

"मुलगा किती दिवस शाळेत आला यावर आकडेमोड करीत बसण्यापेक्षा तो आला तेवढ्या वेळात काय शिकला हे महत्त्वाचं नाही का...?" हा ताराबाईंचा दावा तर श्री. पटवर्धनांसारखी ( हिशेब तपासनीस ) प्रॅक्टिकल मंडळी त्यांना बजावीत, "ताराबाई, तुमचे हे भाऊ-ताईचे लाडिक संबंध वरी ठीक आहेत. ऑफिसच्या कामात त्यांची लुडबुड आणि लाड कसले ! ...कायल्गि, अकाउंट्स या बाबतीत गोंधळ काय कामाचा ?"

अखेर "संस्था मी काढली आहे की तुम्ही ?" इथपर्यंत हे वाद जात !

एकाच वेळी अनेकविध आघाड्या सांभाळीत ताराबाई शिशुविहारचा रथ हाकीत होत्या. उपलब्ध असतील त्या त्या व्यक्तींमधली चिकाटी, कर्तबगारी इमान गोळा करीत त्यांना कार्य पुढे न्यावे लागत होते. कधी कार्यकर्त्यांच्या बाबतीत त्यांची पारख चुके आणि कटू अनुभव संस्थेच्या पदराला खार लावून जाई. याउलट कधी क्वचित "Bishop's

seven candles " सारखी बोधकथाही प्रत्यक्षात घडून जाई. ताराबाईंनी मोठ्या मनाने पुन्हा एकदा जवळ केलेला कर्मचारी संस्थेच्या खांबाला आपली निष्ठा बांधून टाकी ...

कधी जमिनीवर पाय घट्ट रोवावे लागत, कधी मनाविरुद्ध पडते-मिळते घ्यावे लागे. कधी कडकपणानं विरोध ठेचावा लागे. ही सारी अवघड कवायत हळूहळू जमत गेली.

मात्र ताराबाईंनी शिशुविहाराचा कधी कारखाना होऊ दिला नाही. नियमाचा जिथे कीस नाही, झकाझकी नाही, दुराग्रह नाही, असे एक घरगुती, कौटुंबिक वातावरण तेथे निर्माण केले. आकळ्यांनीही हळूहळू त्यांच्याशी जुळवून घेतले. संस्था तिच्या जन्मदात्याकडून घडविली जात असते आणि त्याच वेळेस ती संस्था त्या प्रमुखाला घडवीतही असते, हे परस्परपूरक नाते ताराबाई अनुभवीत होत्या.

जुनाट रूढींना, जुन्या पायंड्यांना चिकटून न बसणारी, शिक्षण पद्धतीतली (उदा. मॉन्टेसोरी पद्धतीतली) कालबाह्य तत्त्वे मागे टाकून नवीन प्रकारची साधने वापरण्याबाबत, बदलत्या राष्ट्रीय व आर्थिक परिस्थितीला अनुरूप अशी वळणे घेण्याबाबत संस्था जागरूक राहिली.

समर्थ, कार्यक्षम कार्यकर्त्यांची एक पिढी मागे ठेवून ताराबाई मात्र ग्रामीण भागाकडे वळणार होत्या. सपाट जमिनीवरची वाटचाल त्यांच्या झुंजार वृत्तीला मानवणारी नव्हती.

# १२. पुन्हा प्रभा आणि केव्हा

' **मी** सुंदर नाही. '

सुमनचा रडवा, दुःखी चेहरा पाहून तिच्या प्रेमळ आईने विचारले,

" का ग बेटा ? काय झालं ? "

तेवढ्या त्या मायेच्या बोलांनी सुमनला ओक्साबोक्शी रडू फुटले.

अश्रू ओसरल्यावर आईच्या मांडीवर पडून सुमन म्हणाली,

" आई, मी सुंदर का ग झाले नाही ? "

आई अगदी गोरीमोरी झाली.

बालदुनियेतील दुःखांची तिला कल्पनाच नव्हती. कुणी मूल स्वतःच्या रूपासंबंधी इतके दुःखी असेल ?

" वेडी कुठली ! कोण म्हणतं तू सुंदर नाहीस ? सगळीच मुलं सुंदर असतात. "

" तुला मी सुंदर दिसते ग. पण शाळेत कुठे दिसते ? मास्तर गोऱ्यागोऱ्या मुलींनाच नाटकात घेतात. मला म्हणाले, तू शिपाई हो. "

" अग, त्यात काय ? सगळीचं मुलं राजा होणार म्हणाली तर नाटकभर राजेच राजे. ज्याला जे काम येत असेल त्यालाच ते मास्तर देणार ! अग गिजुभाईसुद्धा एकदा हजाम झाले होते ! "

" नाही गऽ ते निराळं. पण आमच्या शाळेत तसं नाही. दिसण्यावर आहे. सुंदर मुलांनाच मोठी कामं नि मी काळी म्हणून शिपाई ! "

सुमनचे दुःख लहान नव्हते. आईचाही गळा दाटून आला.

" अग, शरीराचं सौंदर्य म्हणजेच काही रूप नव्हे. हृदय नि मन यांच्या समृद्धपणाशिवाय रूपाला काय किंमत ? सुंदर भाव मनात असले की तो चेहरा प्रसन्न दिसतो. विद्येच्या तेजामुळे, कर्तृत्वशक्तीमुळे मुखावर प्रभाव दिसतो. "

—पण सुमनचे ' मी कुरूप आहे ' हे गेले नाहीच.

० ० ०

शिक्षणपत्रिकेमधून बालदुःखाची ही एक अंतश्छटा उलगडून दाखविताना ताराबाईंनी सुमनच्या रूपाने कळत न कळत पुन्हा आपल्या प्रभाची कथा-व्यथाच वाचकांपुढे अतिशय साध्या परंतु हृदयस्पर्शी शब्दांत चित्रित केली आहे.

कौमार्यावस्थेतल्या प्रभाची जीवनकथा अशा अनेक छोट्यामोठ्या व्यथा घेऊन पुढे सरकत होती. ताराबाई तऱ्हेतऱ्हेच्या मलमपट्ट्यांचा उपयोग करीत होत्या परंतु प्रभाचे

कुठलेच दुःख लहान नव्हते किंवा बरे होणारे नव्हते.

'मी सुंदर नाही' हे तिच्या मनातले दुःख शिक्षणपत्रिकेतल्या सुमनसारखे, ताजेच राहिले.

हळू हळू प्रभाच्या असाध्य दुखण्याचा परिणाम होऊन तिच्या मूळच्या निकोप समाधानी वृत्तीमध्ये मत्सराचे झटके सामील होत चालले होते.

वयात आल्यावर प्रभाच्या दुखण्याचे स्वरूप आणखी आणखीच निश्चित झाले होते.

दरम्यानच्या काळात प्रभाचे शालेय शिक्षण वयाच्या मानाने मंद गतीने परंतु चिकाटीचे चालू होते. प्रभा अभ्यासात तशी फार कच्ची नव्हती; गणितात मात्र तिचे डोके जेमतेम चाले. ताराबाईंचे कुटुंबस्नेही– सरलाबाई देवधरांचे यजमान– श्री. भाऊ देवधर हे बरीच मेहनत घेऊन त्या विषयातदेखील तिची तयारी करून घेत असत. प्रभाचे गणित सुधारण्याचा त्यांनी चंग बांधला होता म्हणा ना!

त्यांची आणि प्रभाची गणिताशी, 'काळकामवेगा'शी चाललेली झटापट पाहून केव्हही त्यांना नेहेमी म्हणत,

"प्रभाला आमच्या गणित येणं शक्य नाही भाऊ! अहो, मी सांगतो ना आम्ही मोडक सारे गणितात कच्चेच! हां, भाषेचं सांगतो, उत्तम मार्क मिळवील. आम्ही मोडक सारे भाषांमध्ये—"

"–येईल हो. आमच्या सरलाताईंचे शिक्षकसुद्धा सरलाताईंच्या बाबतीत असंच म्हणत असत. आलं की नाही गणित त्यांनासुद्धा!"

प्रभाचे म्हणणे, "भाऊ, तुम्ही माझ्या समोर बसलात की माझी गणितं बरोबर येतात!"

मग त्यावर भाऊ गमतीने म्हणत, "बरं बरं. आपण तशी खास व्यवस्था करून घेऊन हं, मॅट्रिकच्या परीक्षेत! मी आपला असा तुझ्यासमोर बसलेला! काय?"

अखेर प्रभा, केव्हही, आणि भाऊ तिघेही जिंकले! गणित तिला आले आणि भाषांमध्ये तिला गती होतीच; फ्रेंचमध्ये तर प्रभा पहिली आली! भाऊ आणि केव्हही दोघांचीही गणिते प्रभाने खरी ठरविली!

१९४५ साली प्रभा शालान्त परीक्षा उत्तीर्ण झाली. पुढे प्रीव्हियसचे वर्षही तिने पार केले.

मात्र हे सारे शैक्षणिक प्रयत्न प्रभाला आपली प्रकृती सांभाळून धिम्या गतीने करावे लागत होते. तिचा मनोविकार बरा होण्याची चिन्हे दिसत नव्हती. उलट तो बळावतच चालला होता.

प्रभासारख्या संवेदनाक्षम मुलीला अर्धवेडेपण किती जड जात असेल याची कल्पनाच केलेली बरी. चांगल्या शहाणेपणाच्या काळातही आपण मधून मधून वेड्या होतो, ही



जाणीव घेऊन वावरायचे. वेडाच्या एका झटक्यापासून दुसऱ्या झटक्यापर्यंतचे मधले शहाणे आठवडे, महिने, दिवस वेडाची प्रतीक्षा करत असल्यासारखे, जीवघेण्या अशांतीत घालवायचे. कधीच निर्धास्त नसायचे आणि तरी आयुष्यातला 'उद्या' मावळू नये म्हणून नेटाने पुढचे बेत, प्रयत्न करीतच राहायचे.

प्रभाच्या वृत्तीत या सर्वांमुळेच एक प्रकारचे हरवलेपण, एकलेपण कायमचे सामील झाले होते.

महिना–दोन महिन्यांनी, कधी वर्षातून एकदा–दोनदाच, पण प्रभाच्या जीवनक्रमातला एखादा दिवस अचानक असा उगवे की प्रभा एकाएकी आपली विचारशक्ती, समंजसपणा हरवून बसे. एक प्रकारचे विकृत ओसाडपण तिच्या भोवती कुंपण बनून राही. प्रभा मग कधी झपाटल्यासारखी आवाज बसू लागेपर्यंत भजनांपाठोपाठ भजने म्हणत राही, कधी कठड्यावर चढून खाली उडी टाकायलासुद्धा बघे.

या अवस्थेत कधी कधी तिला विलक्षण खा खा सुटे, तर कधी जेवणाचीसुद्धा शुद्ध नसे. दुसऱ्याने तिला कपडे घालावेत, सजवावे, भरवावे आणि प्रभाने दांडगाई करून क्षणात सारे उधळून टाकावे. आईखेरीज अशा वेळी इतक्याने, शुश्रूषा करणारे कोण असणार? ताराबाई आपले सारे व्याप सांभाळून, रात्र-रात्र जागरण करून एका हाताने तिला थोपटीत आणि एका हाताने लेखन करीत. तिची सेवा करीत, तिला सांभाळीत. जो संयम, चिकाटी आणि सहनशीलपणा शिशुविहारातल्या बालकांच्या बाबतीत त्यांच्या आईवडलांनी, शिक्षकांनी, मोठ्या माणसांनी दाखवायला हवा, असे ताराबाई म्हणत असत तो सारा संयम, समंजसपणा व सहनशक्ती त्या आपल्या स्वतःच्या किशोर–वयातल्या आजारी कन्येच्या सेवेत असताना प्रकट होई. आणि रात्री प्रभाने किती जागविलेले असो, सकाळी वेळेवर त्या शिशुविहारात उपस्थित असत.

मनाच्या या सैरभैर अवस्थेत असताना प्रभाच्या मनात बालपणापासून घर करून राहिलेला ताराबाईंबद्दलचा आकस विसाट पद्धतीने व्यक्त होई आणि आईला ती वाटेल तसे बोले. केव्हींना ताराबाईंनी सोडले याबद्दलचा तो रोष असे.

"काही झालं तरी तू घर का सोडलंस? तू तिथून निघून आली नसतीस तर अप्पा असे वागले नसते!" प्रभा आईवर हातही टाकी.

या एका बाबतीत ताराबाई कधीच प्रभाला आपली बाजू पूर्णपणे पटवू शकल्या नाहीत.

—कधी कधी प्रभा तशीच तारवटलेल्या अवस्थेत उठे आणि तरातरा आरशापुढे जाऊन उभी राही. तिला नटण्या–सजण्याची फार हौस, म्हणून एक पूर्ण उंचीचा आरसा ताराबाईंनीच तिच्यासाठी घेतला होता. परंतु हा आरसा जादूचा नव्हता! प्रभाला आरशामध्ये नेहमी एक रूपाने केवळ बऱ्यापैकी व गबाळ म्हणूनही खपणार नाही अशी, सावळी मुलगी दिसे आणि प्रभा आपल्या या प्रतिबिंबावर फार नाराज होई; दर

खेपेस नव्याने तिचा विरस होई. आरशात दिसणाऱ्या आपल्या या सुमार प्रतिमेला प्रभाने स्वतःच एक शेलके विशेषण शोधून काढले होते–डांबरी देवी !

आरशापुढच्या लाकडी फळीवर तिनेच मोठ्या हौसेने खरेदी केलेली विविध सौंदर्य-प्रसाधने तिनेच रांगेने नीट लावून ठेवलेली असत. त्यातली ऑटो–दिल–बहारची बाटली उचलून ती आरशावर उगारून तो फोडून टाकण्याच्या पवित्र्यात प्रभा स्वतःवरच खेकसे.

"—डांबरी देवी !"

पुन्हा पुन्हा शिवीसारखा या विशेषणाचा उपयोग करूनही तिचे समाधान होत नसे. मग ती अविवेकाने, आकस्ताळेपणाने आपल्याला शांत करू पाहणाऱ्या आपल्या आईवरच भडकून उठे.

"तू, तूच सगळ्याला जबाबदार आहेस ! तुझ्यामुळे मी काळी झाले ! आप्पा किती गोरे आहेत; तिकडची सगळीच माणसं गोरीपान आहेत. तू देशस्थांकडची–अळूरकरांकडची ना ! म्हणून मी अशी झाले –तुझ्यामुळे !"

या खुळ्या आरोपाला ताराबाई तरी काय उत्तर देणार ! त्या स्वतः गोऱ्या नव्हत्या का ? हसावे की रडावे, असे त्यांना होऊन जाई. प्रभा त्यांचे काही ऐकून घ्यायलाच तयार नसे.

प्रभा आणि ताराबाई यांच्या जीवनदृष्टीतसुद्धा महत्त्वाचा फरक होता, आणि प्रभा मोठी होत गेली तसतसा तो एक प्रकारच्या संघर्षाला कारणीभूत होत गेला.

प्रभाला ऐटबाज राहणीची, छानछोकीची विलक्षण आवड होती आणि ताराबाईंची राहणी अगदी साधी. खादीशिवाय दुसरे वस्त्र नाही. अंबाड्याखेरीज निराळी केशभूषा नाही की अंगावर कसलाच अलंकार नाही. मात्र ताराबाईंनी आपली साधी राहणी वा विचार प्रभावर कधी लादले नाहीत. उलट तिच्या सगळ्या हौशी, लाड, हट्ट त्या पुरवीत. तिच्यासाठी त्यांनी सर्व दागिने घडविले होते आणि प्रभा ते वापरीतसुद्धा असे. प्रभासाठी त्यांनी सगळी चांदीची भांडी खरेदी केली होती. स्टेनलेसच्या भांड्यांचा पण संपूर्ण संच विकत घेऊन त्यांच्यावर ' कु. प्रभा मोडक ' असे नाव घालून घेतले होते. तऱ्हेतऱ्हेच्या अद्ययावत साड्या, पर्सेस, चपलांचे जोड प्रभापाशी होते व प्रभा ते मनापासून, काळजीपूर्वक वापरीत असे. त्या काळात ' लेटेस्ट ' समजली जाणारी मोत्यांची लोंबती झुबरे ती वापरीत होती. पंजाबी पोशाख होता, फोल्डिंग छत्री होती, सॅण्डल्स् होत्या आणि तऱ्हतऱ्हेचा सुगंध व सौंदर्यप्रसाधनेही तिच्या वापरात असत.

त्या काळातदेखील प्रभाला रंगसंगतीची उत्तम समज होती, आणि खळ, इस्त्री, यांबद्दल तिचा कटाक्ष असे. साधे सेनापती बापट मार्गावरील मॉंच्या घरी कधी जायचे असो, चटकेत ती सरसर जिना उतरून तळमजल्यावरच्या सरलाताईंना विचारून जाई, "सरलाताई, तुम्ही कोणतं पातळ नेसणार ? मग मी कुठलं नेसू ?" पुन्हा दोनतीन साड्यांची चळत



घेऊन खाली येई, नि विचारे –"यातली कुठली नेसू ?" एकीकडे एका साडीचा पदर अंगाभोवती लपेटून आरशात आपल्या रूपाचा अंदाज घेई, "तुम्ही पण यातलीच एखादी नेसा ना !" म्हणून सरलाताईंना आग्रह करी. वर जाऊन सगळा जामानिमा व्यवस्थित आटोपून पुन्हा मनगटाला घड्याळ, जुळत्या रंगाचा रुमाल, पर्स, उंच टाचांच्या चपला, अशी पुन्हा खाली येई– का ? तर देवधरांकडे समोरासमोर दोन आरसे होते ! त्यात चिमणीसारख्या माना मुरडून, मुरडून पाहून सरलाताईंची दाद मागेल, कुंकू बारीक करील मग मानेवर सेंटच्या हळुवार शिडकावा करताना सरलाताईंनाही त्या सुगंधात सामील करीत त्यांची पावती मिळवील, "आता कशी दिसते मी, सरलाताई ? जमलंय ना सगळं छान ?"

मग हसत, नाचत पर्स उचलून बाहेर पडेल.

पण केवळ स्वतः नटून, सजून, मिरवून प्रभाचे समाधान होत नसे ! आपल्या आईमधली लंकेची पार्वती तिला अगदी नापसंत असे. मग आपल्या रूपाबरोबरच आईच्या बाह्यरूपाला लकाकी आणण्याचा, सुधारण्याचा प्रयत्न तिचा सतत चाले. ताराबाईदेखील तशा टापटीपीच्या होत्या. अस्वच्छता, चालढकल, दिरंगाई त्यांना कशातच खपत नसे; तशी ती पोशाखातही खपत नसे. त्यांच्या जीवनदृष्टीतच ते बसत नसे. दिवसातून जितक्या वेळा बाहेर पडावे लागे तितक्या वेळा चेहरा स्वच्छ करणे, वेणी घालणे, कपडे बदलणे याचा साठीच्या घरात पोचल्यावरसुद्धा त्यांना कंटाळा नसे. साड्या त्या खादीच्या नेसत तरी इस्त्री मात्र लागेच.

परंतु प्रभापुढे आदर्श होता तो केल्हींचा. तिचे म्हणणे असे, "आप्पा कसे खास शैलीने राहतात, उंची कपडे वापरतात, रुबाबदार दिसतात, आईमध्ये हा भाग का नाही ?"

स्वतःचे दागिने घडविताना तिने प्रेमाने, हट्टाने आईसाठीसुद्धा चार सोन्याच्या बांगड्या करवून घेतल्या होत्या. ताराबाई एकीकडे निरुत्साह, औदासीन्य व्यक्त करीतच राहिल्या,

"अग, मला नाही ग यात रस, मी कधी घालणार या बांगड्या ? आणि त्याने कसला फरक पडणार आहे ? शिक्षकाला कशाला हव्यात सोन्याच्या बांगड्या ?"

ताराबाईंच्या या विरक्तीवर प्रभाचा मोठा रोष होता,

"हीच साडी नेसून गेली होतीस ना मीटिंगला ? काल मी मुद्दाम तुझी निळी साडी इस्त्री करून ठेवली होती ट्रंकेवर...!" ती आईवर रागावे; ताराबाई मंद्रूल हसत.

प्रभा शेवटपर्यंत ताराबाईंना बदलू, सुधारू शकली नाही. केल्ही आणि प्रभा यांच्या सहवासात राहूनसुद्धा त्या जन्मभर ओक्याबोक्याच राहिल्या. आपल्या राहणीतला रुबाब प्रभा आईच्या व्यक्तिमत्त्वात मधीच रुजवू शकली नाही आणि ताराबाईंच्या विचारांना,

कृतींना जी एक सहजसुंदर उंची होती ती प्रभा कधी गाठू शकली नाही! ताराबाईंनी हा प्रकृतिभेद स्थितप्रज्ञतेने स्वीकारला; प्रभा मात्र कायम त्रागा करीत राहिली.

प्रभाच्या मनाला ताराबाई किती जपत असत, तिच्या बाबतीत त्या किती हळव्या होत्या याची काही उदाहरणे त्यांच्या निकटवर्तीयांच्या स्मृतीत आहेत.

एकदा प्रभाचे घड्याळ हरवले. त्या दिवशी रात्री अकरा वाजता एका नोकराला बरोबर घेऊन ताराबाई आपले स्नेही श्री. वा. रा. पटवर्धन* यांच्या घरी मदत मागण्यासाठी आल्या. श्री. पटवर्धनांना घड्याळ कुणाकडे असावे याचा अंदाज होता. ते म्हणाले की प्रभाचे घड्याळ सापडलेले आहे आणि अमुक व्यक्तीकडे ते आहे असे मला समजले आहे. परंतु आता फार उशीर झाला. उद्या सकाळी आपण जाऊ. एवढ्या रात्री कोणाला कसे उठवणार?

परंतु ताराबाई त्याच पावली त्या पत्त्यावर निघाल्या. पटवर्धनांना त्या म्हणाल्या, "प्रश्न घड्याळाच्या किमतीचा नाही, प्रभाच्या भावनेचा आहे. प्रभा किती हळवी आहे, तुम्हाला माहीतच आहे. ते घड्याळ तिला तिच्या वडलांनी वाढदिवसानिमित्त दिलेलं आहे. आता ते न घेता मी गेले तर पोर सगळी रात्र तळमळत राहील. त्यापेक्षा आपण टॅक्सीने पटकन् जाऊन येऊ."

आपल्या एका मावसबहिणीच्या लग्नात प्रभाने तिचा सुंदरसा पांढरा बनारसी शालू पाहिला. प्रभा मुळातच हौशी; '(कुणीही) लग्न करावे तर 'ताज'मध्ये!' अशा तिच्या कल्पना असत. तिचे रसिक मन त्या शालूवर जडले. परंतु आपले लग्न ही इतकी सोपी, सहजसाध्य गोष्ट असणार नाही, हे कळण्याइतकी ती आता जाणती होती. शालूवरून हात फिरविताना ती आपल्या मनातली व्यथा, नैराश्य बोलून गेली,

"आमचं लग्न व्हायचाच जिथे ठिकाणा नाही, तिथे आम्हाला कुठला मिळायला इतका सुंदर शालू!"

प्रभाचे ते बोलणे ऐकून ताराबाई कळवळल्या, "त्याला काय झालं, प्रभा?—आणि शालू घ्यायला लग्नच करायला पाहिजे असं कुठे आहे? चल आजच घेऊन टाकू. नेसता तरी येईल तुला संध्याकाळच्या समारंभात."

—लग्नसमारंभात खरोखरच प्रभा तसाच शालू नेसून मिरवली!

परंतु ताराबाई केवळ प्रभाचे बालहट्ट पुरवीत नव्हत्या; तिच्यासाठी त्या आपले सारे बालमानसशास्त्र, मानसशास्त्र पणाला लावीत होत्या; दुर्दैवाची गोष्ट अशी की प्रभासाठी कायम त्यांना बालमानसशास्त्राचे नियम लावावे लागले!

* खजिनदार, शिशुविहार मंडळ.



प्रकृतीअस्वास्थ्यामुळे प्रभाला महाविद्यालयीन शिक्षण झेपेना. तरीही प्रभा वाडिया कॉलेजमध्ये जाऊन इंटरची परीक्षा उत्तीर्ण झाली. त्यानंतर काही दिवस तिने रेशनिंग ऑफिसमध्ये नोकरीसुद्धा करून बघितली. शारीरिक प्रशिक्षणाचा प्रमाणपत्र-अभ्यासक्रम तिने पूर्ण केला होता. याखेरीज वैद्यकीय व्यवसाय करणाऱ्या आपल्या चुलतभावाकडे ती कंपौंडिंग शिकायला जात असे. गाण्याची शिकवणी होतीच. टेनिस, बॅडमिंटन ती चांगली खेळे. शिशुविहारच्या कामात ती थोडेफार लक्ष घाली, हातभार लावी म्हणून तो अभ्यासक्रमही (अध्यापन) ताराबाईंनी तिच्यामागे लावून दिला...

कुठून तरी एखाद्या उद्योगात व्यवसायात तिचे चित्त पूर्णपणे गुंतावे; त्यातून तिच्या जीवनाची घडी नीट बसवता येईल, असा ताराबाईंचा होरा होता आणि त्या सतत तशा प्रयत्नांत असत. परंतु प्रभाच्या आयुष्याची शोकांतिका तेथेच निश्चित होत होती; ताराबाईंच्या प्रयत्नाची मर्यादाही तेथेच निश्चित होत होती. प्रभाच्या दुबळ्या मनात तेवढी शक्तीच नव्हती.

प्रभा मनाने रुग्णाईत असली तरी ठार वेडी काही नव्हती. मधल्या शहाणपणाच्या काळात तिचे वागणे फार समंजसपणाचे असे. ही बिनवेडी प्रभा फार प्रेमळ, कष्टाळू आणि दुसऱ्याला समजून घेणारी होती. कोणालाही मदत करायला ती तत्पर असे. कुणी घाईगर्दीत असले तर भराभर त्याच्या कपड्यांच्या घड्या घालून देई, बॅग भरून देई. कुणाला त्याच्या आवडीचा रस्सा नाहीतर सांबार आठवणीने वाटलीत भरून पाठवी, आणखी कुणाचे प्रेमाने डोके चेपून देई. आजाऱ्याची देखभाल तर आपण होऊन अंगावर घेई. त्यामुळे प्रभाचा प्रत्यक्ष सहवास ज्यांना घडे, तिची माया ज्यांना मिळे त्यांना तिच्याबद्दल खरोखरच प्रेम, ओढ आत्मीयता वाटे. १९४४ ते १९४९ या काळात गद्रे कुटुंब त्यांच्याच घरी राहत होते. घरात पाहुण्यांची सतत ये-जा असे. गृहव्यवस्था-खाते इंदिरामावशींकडे असे आणि प्रभा मावशीला मनापासून मदत करीत असे. आल्यागेल्याचे स्वागत करणे हे तर तिच्या आवडीचे काम. लहान मुलांचा तिला विशेष लळा. नवे नवे पदार्थ ती करून बघे आणि आपल्या प्रेमातल्या माणसांना आग्रहाने खाऊ घाली. आपले भरतकामाचे नमुने, लेस असे काही लोभातल्या व्यक्तींना 'सप्रेम भेट' देऊन टाकी, ती भेट त्यांना स्वीकारायला लावी, व हे सारे मोठ्या लाघवीपणाने चाले.

—आईवर तर तिचा विशेष जीव होता. मुळात तिचा स्वभाव प्रेमळ; त्यात परिस्थितीमुळे त्या मायलेकींच्या नात्याला वेगळे गहिरेपण आले होते. स्वतःची प्रकृती बरी असली की त्या काळात प्रभा आईच्या कामाच्या वेळा, तिचे जेवण, कपडे, औषधपाणी, विश्रांती इ. कडे जातीने आईच्या मायेने लक्ष पुरवी.

प्रभा म्हणजे एक छोटी गृहिणीच होती. हाच एक पेशा, व्यवसाय तिच्या मनाजोगता होता आणि त्यात ती पूर्णपणे मन गुंतवू शकणार होती. मात्र तिची ही साधी स्त्रीसुलभ

इच्छा पूर्ण करणे तिच्या मनोदौर्बल्यामुळे ताराबाईंच्यासाठी समस्या होऊन बसले होते.

१९४५ सालच्या ऑक्टोबरमध्ये बंगलोर येथील एका विख्यात मेंदूतज्ज्ञाकडून प्रभाच्या मेंदूवर शस्त्रक्रिया करण्यात आली. प्रभा त्यावेळी पंचवीस वर्षांची होती. ही शस्त्रक्रिया म्हणजे प्रभाच्या आयुष्यातला एक मोठा – महत्त्वाचा ठरू शकेल असा टप्पा होता. त्याने तिचे भविष्य बदलू शकणार होते. ताराबाई आणि सुशीला बाहेर बाकावर बसून होत्या. आत शस्त्रक्रिया चालू होती... त्या जीवघेण्या प्रतीक्षेच्या क्षणात ताराबाईंच्या डोळ्यांपुढून प्रभाचा सारा जीवनपट चलत्‌चित्राप्रमाणे सरकून गेला असावा. त्यांचे मन त्यांच्यातल्या आईचे परखड मूल्यमापन, आत्मसंशोधन करीत असावे. प्रभाबद्दलच्या आपल्या प्रयत्नांचा आढावा घेत असावे. स्वतःशीच बोलत असल्याप्रमाणे आपली हळहळ त्यांनी व्यक्त केली,

" जी जी गोष्ट मी तिचं भलं व्हावं म्हणून केली ती ती तिच्या नाशाला कारणीभूत होत गेली..."

एका हरलेल्या आईचे ते निराशापूर्ण उद्गार होते. ताराबाईंनी त्या व्यग्र क्षणी स्वतःला नापास ठरविले होते. अडचणींचे पहाड पार करणाऱ्या, कार्याचे डोंगर उभे करू शकणाऱ्या, आव्हाने स्वतःवर ओढवून घेणाऱ्या ताराबाई मोडक फक्त दोन ठिकाणी पराभूत होत होत्या.

केव्ही आणि प्रभा.

---बरचेच त्यांना हरवीत होते.

शस्त्रक्रियेचा प्रभाला विशेष काहीच फायदा झाला नाही.

त्यानंतर एके दिवशी भर दुपारची गोष्ट. – रणरणीत उन्हाची वेळ होती. रस्ता ओस, समुद्रकिनारा तर निर्मनुष्य आणि वाळू रखरखीत, तापलेली. दादर भागातले एक मध्यमवयीन रहिवासी कसे कुणास ठाऊक, समुद्राच्या बाजूला गेले. पाहतात तो एक तरुण स्त्री भसाभस पाण्याकडे निघालेली. प्रथम त्या पाठमोऱ्या स्त्रीच्या तरकट चालण्यामुळे त्यांचे तिच्याकडे लक्ष वेधले; तेवढ्यात त्यांच्या लक्षात आले– तिचे चालणे तर नैसर्गिक नाहीच आणि तिच्या एकाच पायात चप्पल आहे...!

पाणी लागले तरी त्या मुलीची चाल मंदावली नाही. तेव्हा त्या गृहस्थांनी धावत जाऊन त्या अपरिचित मुलीला गाठले, थांबविले. मुलगी चांगली घरंदाज वाटत होती. सुदैवाने ते गृहस्थ हिंदू कॉलनीत राहणारे निघाले. ताराबाई मोडकांच्या त्या मुलीला त्यांनी पूर्वी पाहिले होते. त्या भल्या माणसाने तिला टॅक्सी करून घरी आणून सोडले. घरी सगळीच हादरली. आज प्रभाला त्या उपकारकर्त्याने वेळेवर बघितले नसते–रोखले नसते तर...? प्रभाच्या चर्येवर जाणतेपणाचे चिन्हसुद्धा नव्हते. झोपेत चालणाऱ्या माणसाप्रमाणे ती नकळतच समुद्रावर पोचली होती.



" एकाच पायात चप्पल? तू कुठे गेली होतीस, प्रभा? दुसरी चप्पल कुठे आहे तुझी?"

" अं? दुसरी चप्पल?"

बऱ्याच वेळाने प्रभाकडून उत्तर आले, " चप्पल... अंधारात कुठेतरी पडली."

अंधारात? भर दुपारी बारा वाजता रात्रीचे चांदणे पडले आहे असे समजून प्रभा फिरायला गेली होती– एकच वहाण घालून!

ताराबाईंनी कपाळाला हात लावला. इथून पुढे प्रभाला एकटे सोडणे, घरात एकटे राहू देणे धोक्याचे होते.

...प्रभा जेवलीसुद्धा नव्हती. ताराबाई जेवणाचे ताट घेऊन तिच्या खोलीत शिरल्या. मधले दार ओढून घेतले. प्रभा छताकडे पाहत मोठमोठ्याने बडबडत होती. मध्येच कोंबड्यासारखे ' कुकूच्कू ' चालले होते. ताराबाई तिला लहान मुलासारखे चुचकारत, काऊचिऊ करत एकेक घास भरवू लागल्या. मध्येच एखादा घास ती थुंकून टाकी, ताराबाईंच्या अंगावर भाताचा फवारा सोडी आणि मग मोकळ्या, स्वच्छ आवाजात गाण्याची एक तान घेई.

या सर्व तऱ्हा ताराबाईंच्या परिचयाच्या होत्या. शिशुविहारातल्या तीन वर्षांच्या बालकाशी बोलावे तशा आवाजात त्या प्रभाला आनंदी कावळ्याची गोष्ट सांगू लागल्या.

बाहेरच्या खोलीत घरातली इतर मंडळी चुपचाप होऊन बसली होती. आतल्या खोलीत चाललेले ताराबाईंचे आणि प्रभाचे हाल त्यांना ऐकवत नव्हते. तेवढ्यात प्रभाने थाडकन आईच्या हातावर एक थप्पड ठेवून दिली. थाळी दूर भिरकावली गेली. ताराबाईंचा एक मंद हुंदका ऐकू आला आणि मग त्या पुन्हा पुढची गोष्ट सांगू लागल्या.

बाहेर इंदिराताईंचे आणि बळवंतरावांचे डोळेही ओलावले. ताराबाईंच्या नशिबात संसारसुखाचे, खाजगी सुखाचे एकही वाक्य लिहिलेले नसावे याची त्यांना खंत वाटत होती. जगातली सगळी लेकरे सांभाळायला बघणाऱ्या ' ताई ' स्वतःचे एक लेकरू सुधारू शकत नव्हत्या.

प्रभाच्या दुखण्याला उतार पडेना तेव्हा धार्मिक वातावरणात वाढलेल्या सरलाताईंना चैन पडेना. त्यांनी ताईंना सुचविले, " सर्व मानवी उपाय जेव्हा खुंटतात तेव्हा... कोल्हापूरची अंबाबाई खरंच पावते. आपण तिला साडी–चोळी वाहू या, नवस करू या!"

ताराबाई शांतपणे म्हणाल्या,

" सरलाताई, माझा या प्रकारांवर विश्वास नाही, आणि त्याने काही फरक पडेल असं मला वाटत नाही. तुमच्या, तिच्या मनाला त्यामुळे बरं वाटणार असेल, तोही उपाय करावा असं वाटत असेल तर करा. मी तुमच्या आड येणार नाही. मात्र मी त्यातलं

काही करावं अशी अपेक्षा ठेवू नका. ”

० ० ०

१९४२–४३ सालानंतर केव्ही मुंबईहून अमरावतीला परतले. त्यानंतर त्यांची वकिली हळू हळू घसरत, घटतच गेली. धंद्याला मंदी होती आणि व्यसनांपायी त्यांनी व्यवसायाची, प्रकृतीची सगळ्याचीच हेळसांड करून घेतली होती.

आतापर्यंत केव्हींनी अक्षरशः हजारोंनी, खोऱ्याने पैसे कमावले होते. परंतु हजारोंनी, खोऱ्याने ते आयुष्यभर उधळलेही होते. त्या काळात त्यांची प्रॅक्टिस दरमहा तीन–चार हजारांची होती, म्हणजे पैशाची मुसळधारच म्हटली पाहिजे. किती पैसे आले, किती गेले, त्यांतले किती बुडले आणि किती कारणी लागले याची त्यांनी कधी फिकीरच केली नाही. पैसा मिळत असे तेव्हा खिशातली ती ऊब खिशाला जणू बोचत असल्याप्रमाणे ते एकेका दिवसात शंभर शंभर रुपये ब्रिजमध्ये गमावून तब्येतीत घरी परतत. कुणाला पैसे देताना आपण दान सत्पात्री करतो आहो की नाही याची पर्वा त्यांना नसे. मित्रांसाठी तर ते जिवापाड कष्ट घेत. एका स्नेह्यांच्या पत्नीला डॉक्टरांनी आजारपणात कोंबडीचे सूप पिण्यास सांगितले होते. केव्ही रोज सकाळी स्वतः ते बनवीत, आणि जाऊन त्यांच्या घरी पोचवून येत आणि हे अनेक दिवस एखाद्या व्रतासारखे चालू होते! आता पैसे पुरेनासे झाल्यावरसुद्धा त्यांचे हे दातृत्व ओसरले नव्हते. ऐन विपन्नावस्थेतसुद्धा कुणी याचना करावी आणि केव्हींनी खिसा उलटापालटा करून त्याची गरज भागवून मोकळे व्हावे, असा केव्हींचा स्वभाव होता आणि तो शेवटपर्यंत तसाच राहिला. पैसा मिळेनासा झाला तरी, झोळी फाटली तरी पैशासाठी कधी झुरणे नाही, हळहळणे नाही की उरलेला पैसा अधिक सावधानतेने, जपून वापरणे नाही!

केव्हींच्या आयुष्यातल्या या काळाबद्दल त्यांच्या एका लहान वयाच्या वकीलमित्राने दिलेल्या माहितीप्रमाणे, मद्यसेवनाचा मानसिक अगर शारीरिकरीत्या कोणताही दुष्परिणाम दिसत नसे. कारण त्यांना केव्हाही मरगळ आलेली नसे. अतिशय चैतन्य व तडफ त्यांच्यात नित्य असे. तसे ते विलक्षण टापटीपीचे व व्यवस्थित असत आणि एक प्रकारे तेवढेच घरगुतीपण. नेहेमी नवीन नवीन खाद्यपदार्थ आणीत व अर्थात मित्रांनाही आग्रहाने देत.

सुलोचनाबाईसुद्धा केव्ही अमरावतीला परतताच मुंबईची प्रॅक्टिस बंद करून अमरावतीला परतल्या होत्या. हळू हळू ती दोघे एकत्रच राहू लागली. एका दुमजली घरात वरती या दोघांचे बिऱ्हाड आणि खाली डॉक्टरीणबाईंचा दवाखाना, अशी दोघे राहत. परंतु सुलोचनाबाईंची प्रकृती हळू हळू खालावू लागली, अखेर निदान झाले कॅन्सरचे. सुलोचनाबाईंची केव्हींच्या ठिकाणी पूर्ण निष्ठा होती. आपली सर्व मिळकत केव्हींच्या नावे करून देण्याची त्यांची मनःपूर्वक इच्छा होती. परंतु या गोष्टीला मात्र केव्हींनी निक्षून नकार दिला.



“तू जिवंत आहेस तोपर्यंत मी सोन्याच्या पिंजऱ्यात राहतो आहेच. तुझ्या पश्चात मला तुझा पिंजरा नको.”

अशा शब्दांत केव्हींनी अनिच्छा व्यक्त केल्यावर मग सुलोचनाबाईंनी रुक्मिणीनगर या भागात तेलंगींच्या घराजवळ असलेली थोडी पडीक जमीन विकत घेतली आणि तेथे एक अगदी साधे झोपडीवजा घर केव्हींसाठी उभारून दिले. एका माणसाला पुरतील एवढी भांडीकुंडी, सामान ठेवून आपल्याकडून त्यांनी केव्हींची व्यवस्था करून दिली. केव्हींचे हे घर म्हणजे त्यांच्या पूर्वीच्या रुबाबदार राहणीशी पूर्णपणे विसंगत होते. शेल्फवर ॲल्युमिनियमची चार-दोन पातेली, दोरीवर दोन-चार सदरे व लुंग्या आणि कोपऱ्यात बाटल्या इतकी त्यांची स्थावर-जंगम इस्टेट आता शिल्लक होती. आणि केव्ही त्यात एखाद्या राजासारखे आपले दोन कुत्रे घेऊन राहत असत! “मी आणि माझे दोन कुत्रे असे येथे राहतो” अशी ते आपल्या झोपडीची ओळख करून देत! सुलोचनाबाईंनी आरंभी जमवून दिलेली बाकीची सारी चीजवस्तू त्यांनी हळू हळू मित्रांना देऊन टाकली होती किंवा दारूपायी विकून, फुंकून टाकून तिचा निकाल लावला होता!

केव्हींसारख्या धंदेवाज, बुद्धिमान माणसाची लौकिक अर्थाने जितकी अधोगती होऊ शकेल तेवढी त्यांची या काळात झाली. सुलोचनाबाईंना त्याची किंमत या शेवटच्या दिवसांत पुरेपूर चुकवावी लागली आणि त्यांनी ती सोशिकपणाने चुकविली.

सर्व प्रकारच्या अतिरिक्त शारीरिक उपभोगांत अधिकाधिक मशगुल होणारे, केवळ त्याच मार्गांनी ‘किक्’ मिळवू शकणारे केव्ही हळू हळू सर्वस्वी दैहिक पातळीवर जगू लागले. आयुष्यभर ज्याचे लाड पुरविले ते शरीरच त्यांच्या मनावर कुरघोडी करून त्यांचा पराभव करणार होते.

केव्हींच्या घरी अजून त्यांच्या अशा निष्कांचन अवस्थेतही त्यांच्या उमद्या स्वभावाची, प्रसन्न वागण्या-बोलण्याची, प्रेमळ वागणुकीची ओढ वाटून येणाऱ्या त्यांच्या सन्मित्रांना त्यांच्या घरी आता कोणती दृश्ये दिसतील याची शाश्वतीच वाटेनाशी झाली होती.

एका ज्येष्ठ स्नेह्यांच्या आठवणीत राहिलेला एक भडक प्रसंग केव्हींची वागणूक शेवटच्या काही वर्षांत कोणत्या थराला गेली होती याची कल्पना देण्यास पुरेसा आहे —

केव्हींनी आपल्या एक-दोन स्नेह्यांना जेवायला बोलाविले होते. स्नेही तेथे पोचतात तो पलंगावर केव्ही मद्यपान करीत विसावलेले आणि त्यांच्या दोन बाजूंना दोन तरुण मुली बसलेल्या. त्यांच्या एकंदर राहणीवरून, आविर्भावांवरून त्या स्त्रियांच्या पेशाची कल्पना स्नेह्यांना आली. त्या स्त्रियांपैकी एक मुसलमान असावी. — स्नेही चपापलेच! त्याच सुमारास नेमक्या सुलोचनाबाईही आल्या आणि पुढ्यातले दृश्य पाहून त्याही चपापल्या!

" अहो, तुम्ही तरीच या दोघी ! " केव्हींच्या या दीन बोलांनंतरही सुलोचनाबाईंनी त्यांच्या व त्यांच्या मित्रांच्या जेवणाची व्यवस्था बघून, मगच तेथून प्रयाण केले.

असे प्रसंग तुरळक व केव्ही शंभर टक्के दारूच्या नशेत असतानाचे मानले तरी ज्या विनाशाच्या दिशेने केव्ही वाटचाल करीत होते ती दिशा त्यावरून स्पष्ट होत होती.

सुलोचनाबाईंनी मात्र शेवटपर्यंत त्यांची साथ यथाशक्ती सांभाळली.

ताराबाईंना या सर्वांची कल्पना तितक्या प्रमाणात नव्हती आणि कुणी त्यांना ती देण्याचा उद्योगही केला नाही. डॉ. जावळ्यांच्या मृत्यूचे वर्तमान कळल्यावर ताराबाई कळवळून उद्‌गारल्या, " गेली ती बिचारी आधी ! "

केव्हींना अनियमित परंतु बऱ्यापैकी आर्थिक उत्पन्न होत होते तोपर्यंत ते बऱ्याच नेमाने प्रभासाठी मनिऑर्डरने पैसे पाठवीत असत. मुंबईला त्यांच्या वेळी अवेळी मधूनच खेपा होत. बोर्डी येथे ताराबाईंनी ग्रामबालशिक्षण सुरू केल्यावर ( १९४५ ) तेथे सुद्धा केव्ही त्यांना भेटावला जात, तेथे राहत. पुढे पुढे केव्हींना येता येईनासे झाले तेव्हा या भेटी थांबल्या. ताराबाईंनी आता आपले लक्ष आपल्या जीवितकार्यावरच केंद्रित केले होते. केव्हींच्या बाबतीत त्यांना जे आकर्षण व प्रेम होते ते हळू हळू केवळ भूतदया, माणुसकीच्या पातळीवर राहणार होते...

पन्नास सालानंतरचे केव्ही अमरावतीकरांना आठवतात ते अगदी खंक आणि खंगलेल्या स्थितीतले. अशक्त, वाळलेली कुडी, मळके कपडे. दाढी वाढलेली, सांधे दुखत असलेले, डोळ्यांना उन्हाळी चष्मा, तोंडात पानपट्टी, मुखरसही कधी गळतो आहे... डोक्यावर हॅट, अंगात पातळ कुडता आणि कमरेला लुंगी. पुढे पुढे तर नुसता एक तरटाचा तुकडाच गुंडाळलेला.

नेसूला पोते, कुशीत एक हाडकुळे कुत्रे आणि हातात कधी कधी शेवचिवड्याचे पुडके, असे कृश यष्टीचे केव्ही काठी टेकीत आणि पुढे पुढे तर खुरडत रस्त्याने चाललेले अनेक वेळा दिसत असत !

व्यसनांनी त्यांच्या शरीराचा घास घेण्यास सुरुवात केली होती. सारे शरीर व्याधिग्रस्त झाले, पुढे पुढे तर गुडघे, पायही कामातून गेले. त्यांच्या मित्रपरिवारापैकी काहीजण केव्हींकडून काही लभ्यांश नाही हे कळल्यावर त्यांच्यापासून दूर झाले, त्यांना चुकवू लागले. काही मद्यपानादि छंदांत सहभागी होण्यापुरते येत राहिले आणि काही सन्मित्रांनी मात्र साऱ्या गुणदोषांसकट केव्हींचा स्वीकार, सन्मान करत घरगुती पातळीवरसुद्धा त्यांची मैत्री खऱ्या प्रेमादराने टिकवून धरली. मात्र केव्हींना गर्तेतून बाहेर काढण्याचे प्रयत्न साऱ्यांनीच सोडले होते. उघड्या डोळ्यांनी विनाशाला मिठी मारायला निघालेल्या माणसाकडे काठावर उभे राहून पाहत राहण्याखेरीज कोणी झाले तरी काय करणार ! अनुकंपेपायी, भूतदयेपायी कोणी काही मदत करी तेवढीच. शिवाय कोणी काही दिले तरी ते



दुसऱ्या दिवशी ' द्रवरूप ' होऊन जाई. वस्तू, कपडा, पैसा दिला तर केव्ही तो कुणाला तरी देऊन टाकीत किंवा त्या पैशाने दारू आणत.

अतिरिक्त मद्यपानामुळे केव्हींची प्रकृती अनेक वेळा इतकी ढासळे की सुलोचनाबाई हयात असतानाही त्यांना दवाखान्यात दाखल करावे लागे. परंतु तेथून देखील केव्ही डॉक्टरांना चकवून पळून येत; कारण तेथे त्यांच्या पिण्यावर नियंत्रण येत असे ! सुलोचनाबाईंनी त्यांना स्वतःच्या बिऱ्हाडी नेले तर तेथेही ते टिकत नसत. परत आपल्या झोपडीत निघून येत. १९५० च्या सुमारास सुलोचनाबाईंचा देहान्त झाल्यावर त्यांच्या नावची सारी पुंजी केव्हींनी ' तपोवन ' या कुष्ठधामाला दान करून टाकली ! श्रीमती राजूरकर नावाच्या आपल्या एका मैत्रिणीला सुलोचनाबाईंनी केव्हींची काळजी घेण्याचे काम मरतेवेळी सोपविले होते; परंतु केव्हींचा कोण सांभाळ करणार, आणि ते कुणाला दाद देणार, हा प्रश्नच होता.

मात्र या स्थितीत देखील केव्हींचे धंद्यातले कसब ओसरले नव्हते. त्यांच्या या साऱ्या वदलौकिकाला पुरून उरेल, असे त्यांचे नाव होते. त्यामुळे " तुम्हांला आम्ही उचलून कोर्टात नेतो पण आमची केस तुम्हीच चालवा, " असे म्हणून अशिले त्यांच्या गळ्यात पडत. त्यांना केस चालवायला देत. साध्या खुर्चीवर त्यांना बसता येत नसे म्हणून त्यांच्यासाठी खास उंच खुर्ची करवून घेतली होती. शेवटी शेवटी तर कोर्टात जाण्यासाठी योग्य असे अंगभर कपडे सुद्धा केव्हींजवळ नसत. त्याच स्थितीत, कोणत्याही कपड्यात ते न्यायालयात जात आणि त्यांचा वकिलीविषेतला अधिकार लक्षात घेऊन कोर्टही तिकडे काणाडोळा करी. त्यावेळच्या वर्तमानपत्रांमध्ये यावर चर्चाही झाली होती. न्यायालयाच्या इमारतीत, बाहेरच्या व्हरांड्यात केव्ही खुशाल बाटली काढून तोंडाला लावीत.

मात्र नानासाहेब गोखले, रावबहादूर खरे, बाब. एस. तांबे यांच्यासारखी देशभक्त, प्रतिष्ठित व वडफदार माणसे त्यांना मानत होती. केव्हींचे कुछंद एवढ्या थराला गेले तरी अमरावतीकरांनी त्यांना तिरस्करणीय, घृणास्पद मानले नाही. सामान्य माणसेही " मोडकसाहेब असे का वागतात ! " म्हणून हळहळतच असत.

या काळातदेखील केव्ही गरीब टांगेवाल्यांचे रिक्षेवाल्यांचे खटले फुकट चालवीत. एखाद्या दिवशी अशिलाने पैसे हातावर ठेवले की त्यातले अर्धे खिशात जात आणि बाकीचे अर्धे कुणा गरीब रिक्षावाल्याच्या हातावर ठेवले जात; " घे, घे ! माझ्यापेक्षा तुला जास्त जरूर आहे. मी काय एकटा, मला दहा पुरतील ! " आणि त्यांना रस्त्याने खुरडत जाताना पाहिले की ते रिक्षावाले, टांगेवालेसुद्धा त्यांना आपल्या वाहनात बसवून भाडे न घेता त्यांच्या मुक्कामावर पोचवीत. त्यांना नाहीतर त्यांच्या भाईबंदांना केव्हींनी केव्हा तरी उपकृत करून ठेवलेले असे !

ताराबाईंनी स्वतःला आपल्या कार्यात, व्यापांमध्ये गुरफटून घेतले असले तरी त्या

नेमाने दरमहा रु. १००।- त्यांना पाठवीत असत. त्यांच्या जेवणाखाणाचा, औषध-पाण्याचा, राहण्याचा खर्च भागेल इतकी ही रक्कम होती. परंतु हा पैसादेखील केव्हींच्या हातात गेला की ते दोनच दिवसांत उडवून टाकीत. पुन्हा पहिली अन्नान्नदशा, कफल्लक अवस्था कायम! ताराबाईंबवळ केव्हींच्या दारूसाठी पैसे नव्हते! त्या मग आपल्या विश्वासातल्या एका स्नेह्यांच्या नावाने ही मासिक मनिऑर्डर पाठवू लागल्या. हे गृहस्थ त्या पैशांतून परस्पर एका मारवाड्याकरवी केव्हींच्या जेवणाखाणाची सोय करीत व त्यांना कपडालत्ता पुरवीत. परंतु काल घेऊन दिलेली थाळी आज जागेवर नसे, आदल्या दिवशी शिवून दिलेली चड्डी दुसऱ्या दिवशी दोरीवरून अदृश्य झालेली असे. ताराबाईंचे हे हितचिंतक त्यांच्या नात्याचे, केव्हींहून वयाने, अधिकाराने बरेच लहान. ते केव्हींच्या समोर गेले की केव्ही त्यांच्याकडून पैसे काढूनच घेत; त्यामुळे पुढे पुढे ते केव्हींची प्रत्यक्ष भेट टाळू लागले.

केव्ही आणि ताराबाईंचे संबंध या काळापर्यंत कसे व किती क्षुद्र पातळीवर पोचले होते याची साक्ष देणारी आणखी एक बोलकी स्मृती उपलब्ध आहे. – आपण केव्हींना दरमहा पैसे पाठवतो ह्या गोष्टीचा उल्लेख ताराबाईंनी कोणत्या तरी संदर्भात केव्हींचे वडील बंधू डॉ. ना. बा. मोडक यांना लिहिलेल्या एका पत्रात केला. नानासाहेबांनी आपल्या बंधूंना या गोष्टीचा संदर्भ देताच केव्हींचे त्यांना उत्तर गेले,

" ताराबाई मला पैसे पाठवतात म्हणजे काही विशेष उपकार करीत नाहीत! एके काळी मीही चिखलदरा, नाशिक अशा ठिकाणच्या मुक्कामात त्या दोघींवर एकेका महिन्यात हजार-हजार रुपये खर्च केले आहेत!"

ताराबाईंना जेव्हा केव्हींची ही प्रतिक्रिया व हे उत्तर समजले तेव्हा त्यांना फार दुःख झाले. त्यांनी नानासाहेबांजवळ आपल्या भावना व्यक्त केल्या, —"मी त्या पैशांचा उल्लेख त्या अर्थाने केला सुद्धा नव्हता. पति-पत्नीच्या नात्यात कुणी कोणावर केव्हा व कसा पैसा खर्च केला हा प्रश्न येतोच कुठे? एकदा दोघांनी एकमेकांना आपले मानल्यावर माझे पैसे ते त्यांचे अन् त्यांचे ते माझे असं नाही का! केव्हींनी त्यावेळी केलेला खर्च आता या पद्धतीने बोलून दाखवावा हा आमच्या नात्याचा पराभव आहे ... म्हणजे मग याचा अर्थ, त्यांनी त्यावेळी तरी तो खर्च कितपत मनापासून केला! की केवळ लोकांना ते आमच्यावर केवढा खर्च करतात हे दाखवण्याचा अट्टाहास त्यामागे होता! एरवी इतक्या वर्षांनी अशा संदर्भात केव्हींना त्या रकमा आठवल्या ना–"

ताराबाई मात्र इमाने इतबारे केव्हींना मनिऑर्डर पाठवीतच राहिल्या.

# १३. ' गरिबांची मॉन्टेसोरी '

ताराबाईंच्या कार्यातील एक प्रयोग हातावेगळा होण्यापूर्वीच त्यांचे मन पुढच्या प्रयोगाचा आराखडा आखू लागलेले असे. त्याप्रमाणे शिशुविहारचा विस्तार साधीत असताना एकीकडे त्यांच्यातला बालशिक्षणतज्ञ त्यांना खेड्याची वाट दाखवू लागला होता. ताराबाईंनी स्वतःच एके ठिकाणी लिहिले आहे,—

" शिशुविहारात असताना एक खंत सतत वाटत राही, की आपण येथे बसून जे काही लहानसे करीत आहो त्याचा आपल्या अवाढव्य राष्ट्राच्या उन्नतीच्या दृष्टीने काही खरा उपयोग नाही. १९४२ च्या चळवळीत उडी घ्यावी का? पण सरकारने जेलमध्ये डांबून ठेवले तर कुठलेच कार्य करणे अशक्य होईल. शेवटी नक्की केले की आपण मुंबईसारखे सुखसोयींनी युक्त असे ठिकाण सोडून खेड्यात जावे. शरीराला कष्ट देऊन देशसेवा होत असेल तर या शहरी सुखसोयींना चटावलेले जीवन सोडून खेड्यात का जाऊ नये?—आणि शक्य तितके कमी सामान घेऊन व चैन मागे ठेवून, साधे राहण्याचा निश्चय करून आम्ही बोर्डीला आलो."

अर्थात ताईबाईंनी या शब्दांत आपल्या मनाचा कल स्पष्ट केला असला तरी त्या खेड्याकडे वळल्या त्यामागची प्रेरणा इतकी तात्कालिक नव्हती तर ग्रामीण बालशिक्षणाविषयी त्यांना प्रथमपासूनच विशेष आत्मीयता व ओढ होती.

कारण पुढे एकदा याच ताराबाईंनी एका सत्काराला उत्तर देताना आपल्या भाषणात स्पष्ट केले की, " त्याग, तपश्चर्या, सेवा, दया हे शब्द उगाच माझ्यासाठी खर्च करू नका. त्यांचा मला नाद नाही. मी कुणासाठी म्हणून काही केले नाही. माझ्या स्वतःच्या आनंदाचा त्यात मोठा भाग होता. तशी मी बुद्धिप्रधान आहे."

बालशिक्षणकार्य खेड्यापर्यंत नेऊन भिडविण्याचे साध्य खुद्द डॉ. मॉन्टेसोरींनी आपल्या ग्रंथांतून व्यक्त केले होते. पुढे ताराबाई दक्षिणामूर्ती येथे असताना गिजुभाईंनी ताराबाईंच्याच सहकार्याने तसे प्रत्यक्ष प्रयोग झोपड्यांमधून करून पाहिले होते. दक्षिणामूर्ती सोडून अमरावतीला गेल्यावर ताराबाईंनी तेथील, मागासलेल्या लोकांच्या वस्तीत बालवाडी चालविली होती व मॉन्टेसोरी शाळेची गरीब आवृत्ती चालविणे शक्य आहे, हे लोकांना पटावे—पटवावे म्हणून, त्यावेळच्या शिक्षणपत्रिकेच्या अंकांमधून त्या बालशाळेचा मासिक खर्च ' रुपये–आणि–पै'वार प्रसिद्धही करीत असत.

मात्र प्रत्येक गोष्टीची वेळ यावी लागते आणि आणावी लागते.

या सुमारास गांधीजी ' खेड्यात चला ' म्हणून आपल्या देशातील कार्यकर्त्यांचे लक्ष ग्रामीण भागाकडे वेधीत होते. १९३७ साली वर्धा येथे महात्मा गांधींनी एक अखिल भारतीय शिक्षण परिषद बोलाविली आणि या परिषदेत खेड्यांकरता ' बुनियादी तालीम योजना '* तयार करण्यात आली. सरलादेवी साराभाई यांनीही नूतन बाल शिक्षण संघाने ग्रामीण परिसरात आपले बालशिक्षणकार्य सुरू करावे या कल्पनेला, संघाच्या अध्यक्षा या नात्याने विशेष चालना दिली आणि ताराबाईंनी अर्थातच त्यांची ही कल्पना मनापासून उचलून धरली. त्याप्रमाणे १९४० साली भावनगर येथे नूतन बाल शिक्षण संघाच्या कार्यकर्त्यांची एक बैठक भरविण्यात आली आणि संघाने हे काम सुरू करण्याचा निर्णय घेतला.

हा प्रयोग सुमारे तीन वर्षे चालणार होता आणि सुरुवातीच्या या प्रायोगिक कामाला येणार असलेला सुमारे रु. ९००० खर्च आपण करू असे सरलादेवींनी जाहीर केले होते.

हे प्रायोगिक काम तीन ठिकाणी करून तेथील अनुभवांवर आधारित अशी खेड्यातील पूर्वप्राथमिक शिक्षणाची रूपरेषा व पद्धत निश्चित करावी, आणि मग प्रत्यक्ष ग्रामबालशिक्षणाला हात घालावा अशी योजना होती. त्याप्रमाणे काठियावाडात आमली या खेड्यात नू. बा. संघाचे उपाध्यक्ष नानाभाई भट्ट यांनी ' ग्राम दक्षिणामूर्ती ' नावाची संस्था स्थापन केली होती; तेथे प्रयोगाला आरंभ करण्यात आला. श्री. जुगतरामभाई दवे हे बारडोलीजवळ वेडछी या गावी रानीपरज लोकांच्या वस्तीत कार्य करीत होते; तेथे दुसरा प्रयोग सुरू झाला. आणि तिसरा प्रयोग ताराबाईंच्या देखरेखीखाली मुंबई येथील मांगास, भंगी वस्तीमध्ये करावयाचे ठरले.

प्रत्यक्षात आमली व वेडछी या दोन्ही ठिकाणचे प्रयोग १९४२ च्या राजकीय चळवळीची झळ लागून अकाली बंद पडले. नानाभाई भट्टांना सरकारने कैद करून नेले तर वेडछीचा आश्रमच जप्त करण्यात आला. मुंबई येथील प्रयोग मात्र, मध्ये खंड पडून का होईना, परंतु दोन–अडीच वर्षे चांगला चालला.

* या पद्धतीला शैक्षणिक विचार करून आकार देण्याचे काम पुढे डॉ. जाकिर हुसेन कमिटीने केले. ही पद्धत खालील तत्त्वांवर आधारित आहे—
( १ ) मोफत व सक्तीचे सात वर्षेपर्यंत शिक्षण.
( २ ) शिक्षणाचे माध्यम— मातृभाषा.
( ३ ) सर्व शिक्षण एका मूलोद्योगाभोवती निगडित.
( ४ ) दैनंदिन शिक्षणाच्या उद्योगातून अर्थोत्पत्ति व स्वावलंबनाचे शिक्षण.
आरंभी या पद्धतीत पूर्वप्राथमिक शिक्षण विचारात घेतलेले नव्हते.



या प्रयोगासाठी प्रथम ताराबाईंना धड कुठे जागाच मिळेना. अखेर भायखळा येथे दादर भगिनी समाजाच्याच सेवामंदिरात एक बालवाडी उघडण्यात आली. या प्रयोगासाठी श्री. भगवतीप्रसाद शेलत नावाचे एक मोठे उत्साही कार्यकर्ते ताराबाईंना लाभले. ते बालवाडीचे प्रत्यक्ष काम पाहत आणि ताराबाई वरचेवर जाऊन त्यांना मार्गदर्शन करीत.

मुंबई येथील कामाचा अनुभव, आमली येथील कामासाठी नानाभाईंनी काळजीपूर्वक आखलेली योजना व वेडछी येथील अर्ध्यामुर्ध्या प्रयोगाचा तपशीलवार ठेवला गेलेला अहवाल या सर्वांवरून खेड्यातील बालशिक्षण कसे असावे व ते कोणत्या प्रकारे दिले जावे याविषयी ताराबाईंनी काही आडाखे बांधले.

१९४३ साली श्रीमती कस्तुरबा गांधींना देवाज्ञा झाली. त्यांचे स्मारक करण्यासाठी जनतेकडून चार कोटी रुपयांचा निधी जमविला गेला. ही रक्कम बालशिक्षण व स्त्रियांचे कार्य यासाठी वापरली जावी असे गांधीजींचे मत पडले. गांधीजींच्या ' बुनियादी तालीम ' शिक्षण योजनेत सात वर्षांखालील मुलांचा समावेश नव्हता. तेव्हा या फंडातून खेड्यांतील सात वर्षांखालील मुलांच्या शिक्षणाची काही सोय केली जावी असा प्रयत्न नू. बा. संघाने केला व त्याला यश आले. कस्तुरबा ट्रस्टने हे काम हाती घेण्याचे निश्चित केले व ताराबाईंकडून ग्रामीण बालशिक्षणासाठी एक कच्चा आराखडा आखून घेतला. कार्यारंभ म्हणून या आराखड्याच्या आधारे बिहारमध्ये मधुबनी येथे व मुंबईजवळ बोरिवली येथे पुन्हा बालशिक्षणाची शिबिरे घेण्यात आली.

बोरिवली येथील शिबिराचे संचलन शेलतभाईंनीच केले व ते चांगले यशस्वी करून दाखविले. ताराबाई तेथे रोज व्याख्याने देण्यास जात. बोरिवली येथे एक तात्पुरती बालवाडी उभारण्यात आली होती. मुलांना त्यांच्या झोपड्यांसमोर उघड्यावर काम सुरू करून, चुचकारून बालवाडीत आणले गेले. मोजक्या खर्चात, मोजक्या वेळात हे प्रात्यक्षिक यशस्वी करण्यात, तेथील पालकांचे, बालकांचे सहकार्य मिळविण्यात व प्रशिक्षणासाठी आलेल्या भगिनींना प्रत्यक्ष कार्याचा अनुभव देण्यात शेलतभाई यशस्वी झाले. या प्रयोगातून आणखी एक ठळक निष्पन्न झाले— ताराबाईंना यात्र शिबिरात श्रीमती अनुताई वाघ या कार्यकर्त्या कायमच्या सापडल्या!

बिहारमधील प्रयोग यशस्वी करण्यातदेखील शेलतभाईंचा हातभार लाभला.

दरम्यानच्या काळात ताराबाईंनी शिक्षणपत्रिकेतून ग्रामबालशिक्षणासंबंधी तीन लेख प्रसिद्ध केले. ( १ ) गरिबांची मॉन्टेसोरी, ( २ ) खेड्यातील बालशिक्षण व ( ३ ) खेड्यातील बालमंदिरे.

या तीन लेखांत मिळून या प्रश्नाचा सविस्तर ऊहापोह ताराबाईंनी केला.

१९३८ सालच्या शिक्षणपत्रिकेच्या अंकात ताराबाईंनी लिहिले होते—

"नूतन बालशिक्षण म्हणजे पुष्कळशी साधने, प्रत्येक बाबतीत विपुलता अशी आपली कल्पना झाली आहे. खेडेगावची गरिबी, खेडेगावची प्रत्येक बाबतीतली लाचारी यांत नव्या बालशिक्षणाचे खूळ तेथे कसे परवडणार ? आजच्या शहरी शाळांकडे पाहून नूतन बालशिक्षणाची जी कल्पना होते ती खेडेगावच्या जीवनाशी विसंगत दिसते. म्हणूनच मला खेडेगावात जाऊन बालशिक्षणाचा विचार सिद्ध करून दाखवायचा आहे."

आता १९४५ साली खेड्यातील बालवाडीचे एक सुंदर, काल्पनिक चित्र शब्दांत रेखाटून ताराबाईंनी लिहिले—

"...हा प्रयोग सिद्ध झाला तर मॉन्टेसोरी पद्धतीच्या प्रसाराच्या मार्गातला एक मोठा डोंगर पोखरला गेला आणि मार्ग सरळ झाला असे म्हणता येईल..."

त्यानंतर १९४६ साली पाचगणी येथे झालेली गांधीजी–ताराबाई भेट बालशिक्षण-क्षेत्रातली ऐतिहासिक महत्त्वाची भेट मानता येईल.

बालशिक्षणाच्या या मोहिमेला आरंभी कुठूनच फारसा प्रतिसाद मिळेना. मॉन्टेसोरी शिक्षणपद्धती आपल्या देशासारख्या गरीब राष्ट्राला परवडणार नाही असा एक प्रवाद त्यावेळी जनतेत होता. मॉन्टेसोरी साधने फार महागडी असतात असा एक आक्षेप घेतला जात होता. ती पद्धत परकीय म्हणूनसुद्धा लोकांचा तिला विरोध होता. कारण त्यावेळी स्वदेशीची मोहीम जोरात होती व राजकीय, सामाजिक क्षेत्रातले पुढारी परकीय गोष्टींचा निकराने निषेध करीत. तेव्हा आपण गांधीजींची भेट घेऊन आपले विचार त्यांना पटवून दिले आणि त्यांनी जर आपल्याला टेकू दिला तर आपल्या शिक्षणपद्धतीला आपोआप लोकमान्यता मिळेल असे ताराबाईंना वाटले. आणि त्या दृष्टीने त्यांनी ही भेट घेतली होती.

साराभाई कुटुंबाचे गांधीजींशी जवळचे संबंध होते. सरलादेवी साराभाई यांना बरोबर घेऊन ताराबाई गांधीजींना भेटायला गेल्या. या भेटीत ताराबाईंच्या आणि गांधीजींच्या पूर्वपरिचयाचा संदर्भ निघाला.

राजकोटच्या व भावनगरच्या वास्तव्यात ताराबाईंचा गांधीजींशी परिचय होण्याचा योग आला होता.

"हो तर ! ओळखणार कसा नाही !" बापूजी उद्गारले, — "तमोने तो हूं जाहोजलालीमां जोयां छे !" गांधीजी उद्गारले.

जाहोजलाली याचा अर्थ समृद्धी, संपन्नता, सर्व प्रकारचा वैभवकाल. ताराबाईंच्या राजकोट–निवासाशी याचा संबंध असावा.

दोन तासांची ही भेट ताराबाईंच्या दृष्टीने पूर्णार्थाने सफल झाली, असे म्हणायला हरकत नाही. या चर्चेत ताराबाईंनी मुद्दा मांडला की कोणतीही शिक्षणपद्धती ही एका राष्ट्राच्या मालकीची होऊ शकत नाही. ती कोणत्याही एका राष्ट्राच्या छापाखाली दबता



कामा नये; कारण शिक्षणपद्धती ही राष्ट्रीय नसून विश्वव्यापी असते. गांधीजींचे ताराबाईंशी एकमत झाले. ताराबाईंनी मॉन्टेसोरीची काही साधने बरोबर नेली होती. या साधनांशी खेळता खेळता मुलांचा बुद्धिविकास कसा होतो ते ताराबाईंनी गांधीजींना प्रात्यक्षिकांसह दाखविले. गांधीजींनी ताराबाईंचे विचार मान्य केले.

त्यावेळी गांधीजींची पूर्वबुनियादी पद्धत* अस्तित्वात होतीच. त्यांनी मत दिले, "बाल-शिक्षण राष्ट्रोन्नतीसाठी आवश्यक आहे तेव्हा त्याकरिता कोट्यावधी रुपये खर्च झाले तरी तो खर्च केलाच पाहिजे. मॉन्टेसोरी पद्धत महाग आहे अगर परदेशी आहे म्हणून त्याज्य ठरवणे गैर आहे. मात्र ती आपल्या देशामध्ये उपयोगात आणताना तिला आपल्या देशातील परिस्थितीशी अनुकूल असे स्वरूप दिले जावे आणि हे करताना तपशिलांपेक्षा तत्त्वांना महत्त्व दिले जावे."

मात्र याबरोबरच आणखी एक अट गांधीजींनी घातली व ताराबाईंनादेखील ती पटली. इंग्रजांनी आपल्या देशातील लोकांना कारकून करून टाकून त्यांच्या बोटातील कारागिरी कुजवून टाकली आहे, तेव्हा ही साधने परदेशातून आयात न करता अगर शहरातून न मागविता खेड्यातील लोकांकडूनच करून घ्यावीत अशी गांधीजींची आग्रहाची सूचना होती. या साधनांसाठी लागणारा कच्चा माल आसपासच्या प्रदेशातूनच घ्यायला हवा. साधने शक्यतो शिक्षकाने स्वतः तयार करावीत किंवा ते शक्य नसेल तर ती खेड्यातील कारागिरांकडूनच करवून घ्यावीत. इतर बाबतीत खेड्यांची शहरांकडून होणारी पिळवणूक या बाबतीत तरी होता कामा नये, या मुद्द्याखाली गांधीजींनी आग्रहाची अधोरेखा ओढली.

ताराबाई त्यांना उत्साहाने सांगत होत्या की "मी खेडेगावात काम करणार आहे. मागासलेल्या लोकांमध्ये पूर्वप्राथमिक शिक्षणाचा प्रसार करणार आहे."

---

* बुनियादी शिक्षण पद्धतीस आकार देताना प्रारंभी पूर्व–प्राथमिक शिक्षणाची आवश्यकता मान्य करून, आर्थिक अडचणींमुळे त्याचा विचार करता येत नसल्याचे झाकिर हुसेन कमिटीने नमूद केले होते.

१९३७ साली मूलोद्योग शिक्षण पद्धतीत जरी गांधीजींनी ७ वर्षांखालील मुलांच्या शिक्षणाचा फारसा विचार केला नव्हता तरी १९४४ साली ते तुरुंगातून बाहेर आले तोवर त्यांचे विचार निश्चित झाले होते. मुलांच्या शिक्षणाचा प्रारंभ त्यांच्या बालपणापासून नव्हे तर (गर्भावस्थेतल्या अभिमन्यूप्रमाणे) पालकांच्या प्रौढशिक्षणापासूनच होतो असे ते म्हणत. पूर्वप्राथमिक शिक्षण हा ते एकूण शिक्षणाचा अविभाज्य घटक समजत. मात्र या कोवळ्या मुलांच्या शिक्षणखर्चाचा प्रश्न सरकार सोडवू शकणार नाही असे ते म्हणत. बालशिक्षणाला त्यांच्या खिशात आर्थिक उत्तर नव्हते.

गांधीजींनी ताराबाईंना एकच नेमका प्रश्न विचारला,

"तुम्ही त्यांना खाण्यासारखे गवत कोठे मिळेल, ते कसे शिजवावे आणि कसे खावे हे शिकवाल काय ?"

प्रश्न अनपेक्षित होता तरीही ताराबाईंनी नम्रपणे उत्तर दिले,

"जरूर शिकवीन, मला ही गोष्ट माहीत नाही; तथापि मी तिचा शोध करीन आणि शिकवीन."

"मला अशा प्रकारचे गवत माहीत आहे. लहानपणी माझ्या आईला तसे गवत शिजवताना मी बघितले आहे." गांधीजी म्हणाले.

गांधीजींच्या या बोलण्याचा अर्थ त्यावेळी ताराबाईंना पुरेसा आकळला नाही. पुढे बऱ्याच वर्षांनी–आदिवासी बायकांच्या भुकेचा प्रश्न सोडवितांना— त्यांना गांधीजींच्या उद्‌गारांचे मर्म जाणवणार होते...

"बापूजी थोर मनाचे !"–ताराबाईंनी पुढे एका लेखात लिहिले आहे. "माझी कार्याला सुरुवात करण्याची दिशा चुकत असल्याचे त्यांच्या लक्षात आले होते. तरीही त्यांनी मला तसे स्पष्ट सांगून निराश केले नाही."/

गांधीजींचे सारे मौलिक विचार शिरोधार्य मानून ताराबाई पाचगणीचा डोंगर उतरल्या. विशेषतः मॉन्टेसोरी साधनांच्या वापराबाबत, निर्मितीबाबत गांधीजींनी दिलेले तीन मंत्र त्यांनी कायमचे डोळ्यांपुढे ठेवले. याच सुमारास एक श्रीमंत हितचिंतक ताराबाईंना लागणारी सर्व मॉन्टेसोरीची साधने विकत घेऊन देण्यास तयार झाले होते. त्यांच्या साहाय्याने अनेक खेड्यांमध्ये एकाच वेळी अनेक बालमंदिरे उभारणे शक्य झाले असते; परंतु ताराबाईंनी आभारपूर्वक त्यांची ही मदत नाकारली.

नू. बा. संघाचे कार्यकर्ते आता प्रत्यक्ष ग्रामबालशिक्षण सुरू करण्याच्या दृष्टीने आसपासच्या प्रदेशाची पाहणी करीत होते. दादरच्या शिशुविहारचा बराचसा व्याप अद्यापि ताराबाईंच्या गळ्यात होता आणि ताराबाईंच दोन्ही कामे सांभाळणार असल्यामुळे मुंबईच्या जवळच कुठेतरी हे नवीन केन्द्र सुरू करावे असे सर्वानुमते ठरले होते.

योग्य ठिकाणाचा प्रश्न निघाला आणि ताराबाईंना अलगद आठवण झाली मुंबईपासून ८० मैलांवर असलेल्या बोर्डी या टुमदार खेड्याची. योगायोग असा की नू. बा. संघाच्या कार्यकर्त्यांनीही नेमक्या त्याच गावाची शिफारस केली.

ताराबाई याआधी एका वयोवृद्ध नागरिकाच्या आमंत्रणावरून बोर्डी येथील महिला-मंडळात एक व्याख्यान देण्यासाठी गेल्या होत्या; त्याच वेळी हे गाव त्यांच्या मनात भरले होते. पुढे एकदा त्यांनी शिशुविहारमधल्या बाल अध्यापन मंदिराच्या विद्यार्थिनींची तुकडी तेथे सहलीसाठी नेली होती व या मुक्कामात त्यांची एक विद्यार्थिनी अकस्मात आजारी झाली तेव्हा स्थानिक लोकांनी त्यांना चांगले साहाय्य केले होते.



बोर्डी हे गाव वस्तीने लहान असले तरी तसे अगदी रांगडे, खेडेवजा किंवा आडबाजूचे नव्हते. बोर्डीची वस्ती समुद्रकिनारा पकडून लांबच लांब पसरलेली होती; त्यामुळे मुंबईकडले श्रीमंत लोक तेथे हवा खायला येत. तेथे त्यांनी काही बंगलेही बांधले होते त्यामुळे गाव तसे शहरातल्या सोयींनी युक्त होते. गावात डॉक्टर होते, गोखले एज्युकेशन सोसायटीने पंचवीस वर्षांपूर्वी काढलेले हायस्कूल होते, आणि आता तर एक सरकारी ट्रेनिंग कॉलेजसुद्धा तेथे निघाले होते. गोखले एज्युकेशन सोसायटीची तेथली शाळा म्हणजे केवळ अभ्यासाचा गोठा नव्हता तर राष्ट्रीय व नैतिक शिक्षणावर भर देणारे ते एक गुरुकुलच होते. आचार्य भिसे या आदर्श शिक्षकाची व समाजसेवकाची ती कर्मभूमी होती. आचार्यांच्या मार्गदर्शनाने एक लहानसे सेवाभावी, शिक्षणप्रेमी मंडळ तेथे कार्य करीत होते. बोर्डीची तरुण, कर्ती पिढी या शाळेच्या पठडीतून सुसंस्कारित होऊन बाहेर पडली होती. या सर्वांमुळे बोर्डीतले रहिवासी कोणत्याही सत्कार्याला अभिमुख असे असणार व त्यामुळे आपले काम इथे लौकर रुजेल अशी नू. बा. शि. संघाच्या कार्यकर्त्यांची अटकळ होती.

—ठिकाण नक्की झाले.

मग ताराबाईंनी आपल्या कामाची पूर्वतयारी करून ठेवण्यासाठी आपल्या आधी दोन महिने एक आघाडाची तुकडी, 'अरुण तुकडी' पुढे पाठवून दिली. या उत्साही तुकडीच्या एकमेव सभासद होत्या, अनुताई वाघ !

/अनुताई वाघ या सुमारे पस्तिशीच्या शिक्षिका पुण्याहून ताराबाईंना येऊन मिळाल्या होत्या. अनुताई बालविधवा होत्या. हुजुरपागा येथे बरीच वर्षेपर्यंत त्यांनी प्राथमिक शाळेतल्या शिक्षिकेचे काम केले आणि आपल्या भावंडांचे शिक्षण करून त्यांना मार्गी लावले. त्यानंतर आता उर्वरित आयुष्यात आपण व आपले कुटुंब यातून बाहेर पडून इतरांसाठी काही करावे या भावनेने त्या कस्तुरबा ट्रस्टमध्ये व त्यांच्या मार्फत ताराबाई व शेलतभाई यांनी बोरिवली येथे चालविलेल्या शिबिरात दाखल झाल्या. ताराबाईंना अनुताईंमध्ये आपला अनुयायी दिसला आणि त्यांना त्यांनी शिशुविहारमधल्या प्रशिक्षणासाठी ठेवून घेतले.

प्रत्यक्षात हा व्यवहार पार पडला याचा तपशील गमतीदार आहे. कस्तुरबा ट्रस्टच्या सेक्रेटरी श्रीमती मृदुलाबेन साराभाई यांनी सोडले तर मी येईन असे अनुताईंनी ताराबाईंना सांगितले होते. या मृदुलाबेन म्हणजे श्रीमती सरलादेवी साराभाई (अध्यक्षा, नूतन बालशिक्षण संघ) यांच्या कन्या. त्यांच्यामार्फत ताराबाईंनी अनुताईंना मागणी घातली. मृदुलाबेननी अट घातली की प्रशिक्षणावर केलेला फक्त रु. ३०० खर्च नूतन बालशिक्षण संघाने ट्रस्टला भरून द्यावा म्हणजे अनुताई मुक्त होतील. संघाला हे मान्य झाले आणि तीनशे रुपये देऊन ताराबाईंनी अनुताईंना विकत घेतले !

बोर्डी येथे केन्द्र काढण्याचे नक्की झाल्यावर मुंबईच्या एका सभेत ताराबाईंनी जाहीर पृच्छा केली,

" मी खेड्यात काम करायला जात आहे. माझ्याबरोबर कोण येणार ? "

एक हात लगेच वर झाला, तो या अनुताईंचा होता ! ताराबाईंनी अनुताईंना कस्तुरबा ट्रस्टकडून मागून घेतले; त्यांचे प्रशिक्षणही अर्ध्यावर थांबविले आणि त्यांना बोर्डीला धाडून दिले.

बोर्डी गावाची प्राथमिक पाहणी करणे, मुले कोणत्या भागात, कोणत्या संख्येने मिळतील याचा अंदाज घेऊन कार्यविभाग निश्चित करणे, केन्द्रासाठी व राहण्यासाठी योग्य अशी जागा हुडकून ठेवणे, गावातील लोकांशी परिचय करून घेऊन त्यांना आपल्या कार्याची कल्पना देणे, त्यांचे सहकार्य मिळविणे; दूध, भाजीपाला इ. जुळवाजुळव करणे अशी कामे अनुताईंवर सोपविण्यात आली होती.

अनुताईंमधला वाघ कामाला लागला !

श्री. गोपाळराव पाटील, मुकुंदराव सावे, मदनराव राऊत इ. गावकऱ्यांशी ओळखी करून घेऊन त्यांच्याकडून आवश्यक ते सहकार्य त्यांनी मिळविले. या स्थानिक मंडळींच्या मदतीने जणू त्यांच्या गरजा लक्षात घेऊन बांधलेला असावा असा एक बंगलाही मंडळींना लौकरच भाड्याने मिळाला.

—आणि एके दिवशी ताराबाई हा नवा व्याप गळ्यात घेऊन बोर्डीत दाखल झाल्या.

केन्द्राची जागेची अडचण कापडियांच्या बंगल्याने फार नामी रीतीने सोडविली होती आणि तीही माफक भाड्यात. समुद्रकिनाऱ्याला खेटूनच रांगोळीचे ठिपके घातल्यासारखी बोर्डीची घरे सुरू होतात. या घरांपैकीच एक बैठा बंगला त्यांना मिळाला होता. मध्यभागी मुख्य बैठी इमारत, भोवती प्रशस्त आवार, आवारात सावली देत उभी असलेली दोन–तीन आंब्यांची, चिंचांची झाडे. शिवाय अंगणात एक हातरहाटाची विहीर आणि बंगल्याशेजारी पूर्वी भाताची गिरण चालविण्यासाठी बांधलेले एक प्रशस्त दालन. मागच्या बाजूला प्रशिक्षणाच्या विद्यार्थ्यांना राहता येईल अशी एक दुमजली, स्वतंत्र चाळ. अन् सर्वांत रमणीय तपशील म्हणजे येताक्षणी पाहुण्यांच्या कानात, मनात भरणारी, खिडकीतून दिसणारी, पडल्यापडल्यासुद्धा ऐकू येणारी फार प्रसन्न अशी समुद्रसाथ !

शेजार मिश्र होता. पुढ्यात समुद्रकिनारा, पाठीला पाठ लावून गावचा हरिजनवाडा. डावीकडे कुंभारवाडा तर उजव्या हाताला मांगेलवाडी म्हणजे मांगेला कोळ्यांची वस्ती. उत्तरेकडे जावे तसतसे बंगले वाढत जात. या बंगल्यांतून सधन, सुशिक्षित कुटुंबे हवापालटासाठी येऊन राहिलेली दिसत.

ताराबाई आता उत्साहाने मदतनीसांचे पथक जमवू लागल्या. शेलतभाईंनी मुंबईतल्या कार्यातच आपली बालशिक्षणकार्यातली गती व रस सिद्ध केला होता. मद्रास येथे गुजराती बालमंदिरात त्यांनी अनुभव घेतला होता. वेडछीला ते काही दिवस होते आणि अड्यार येथे जाऊन तेथला मॉन्टेसोरीचा अभ्यासक्रम त्यांनी पूर्ण केला होता. सर्वार्थाने गुणी असे हे ताराबाईंचे साहाय्यक 'गिजुभाईंसारखे काम करून दाखवीन' अशी ईर्षा मनात घेऊन बोर्डीला येऊन हजर झाले. शेलतभाईंवर ताराबाईंनी बालवाडीचे मुख्य काम सोपविले व अनुताईंची त्यांना मदतनीस म्हणून नेमणूक केली.



बोर्डीला आल्यावर ताराबाईंनी प्रथम आपले भावनगर येथले समर्थ शिष्य रामभाई पाठक यांना पत्रातून साद घातली.

खेडेगावातल्या बालमंदिराचे एक सुंदर शब्दचित्र त्यांनी रेखाटले आणि म्हटले, "आ कल्पनाने मूर्त करवामां सहाय्यरूप थवानु तमने आमंत्रण आपु छुं. दक्षिणामूर्तीमां तमे तालीम लीधी हती. तमे मारा विद्यार्थी छो. आजे हुं तमारी पासे गुरुदक्षिणा मागुं छुं. आ कार्यमां ओछामां ओछा बे वर्ष आपो. पत्र मळता रवाना थाओ."

त्यावेळी रामभाई तरवडा या आपल्या गावी शेती, लेखन व समाजकार्य सांभाळीत होते. राष्ट्रीय चळवळीत भाग घेतलेला असल्याने तोही एक फार मोलाचा अनुभव त्यांच्या गाठीला होता. शिवाय कथाकथनकाची अनुपम शैली व माणसांची उत्तम पारख हे रामभाईंचे विशेष.

ताराबाईंचे पत्र हातात पडताच गुरूची आज्ञा वंद्य मानून एकनिष्ठ रामभाई पाठक जणू काही 'उलट टपाली' यावेत तसे बोर्डीला रवाना झाले. ते झाले केन्द्राचे व्यवस्थापक.

याखेरीज मुंबईहून आपली मैत्रीण सीताबाई माडगावकर यांना ताराबाईंनी बोलावून घेतले. इंदूरला असलेला त्यांचा पदवीधर, होतकरू भाचा श्री. सदाशिव ऊर्फ भाऊ केळकर हादेखील आत्याच्या हाकेला मान देऊन हजर झाला.

आचार्य भिसे, आत्मारामपंत सावे, मदनराव राऊत, डॉ. पाठक, श्री. शामराव पाटील वगैरे गावातली मंडळी ताराबाईंच्या कार्यात रस घेऊन त्यांच्या येणाऱ्या दैनंदिन अडचणी सोडवायला तत्परतेने मदत करीत होती.

स्वतः ताराबाईंच्या गळ्यात अजून शिशुविहारची जबाबदारी बरीच असल्यामुळे त्यांनी तीन दिवस मुंबई व तीन दिवस बोर्डी असा आपला आठवडा विभागायचा ठरविला होता. आणि शिशुविहारमधल्या कार्यकर्त्यांना त्या हळूहळू स्वावलंबी बनवीत होत्याच.

बोर्डीतले श्री. गोपाळराव पाटील हे वृद्ध गृहस्थ ताराबाईंच्या कार्याबद्दल विशेष आस्था बाळगून होते. रोज तीन ते चार मैल पायी चालून ते येत आणि ताराबाईंच्या बालवाडीत हजेरी लावीत.

त्यांचा मुलगा त्यांना विचारी, " बाबा, रोज रोज कशाला जाता एवढ्या लांब ? "

त्याला उत्तर मिळे, " अरे बाबा ! ती बाई ह्या वयात आपल्या मुलांच्या कल्याणासाठी इथे आपल्या आडगावात येऊन राहिली आहे, खेपा करते आहे, खपते आहे. आणि आपण नुसती फेरीसुद्धा मारायची नाही ? "

गावकऱ्यांचा हा असा सहकार, ताज्या दमाच्या सहकाऱ्यांचे सुंदर पथक मदतीला, आणि सुरवातीला तरी पैशांची पुरेशी व्यवस्था झालेली. समुद्रकाठच्या त्या रम्य ठिकाणी ताराबाईंनी आपली ही बालगुढी उभारली ती दांडग्या आत्मविश्वासाने ! ताराबाईंनी स्वतःच आपल्या या आरंभीच्या मावळ्या उत्साहाचे वर्णन एके ठिकाणी विनोदी शैलीने, यट्टेने केले आहे—

" आम्हाला आमचे काम बोटीत बसून विहार तलावाची सफर करण्यासारखे वाटत होते. झोपेतही आपण काहीतरी महान कार्य केल्याचीच आम्हाला स्वप्ने पडत होती ... आपण कार्य सुरू करण्याचीच खोटी ! कार्य आपली वाटच पाहते आहे. इतके सहजसाध्य आणि फलदायी काम हाताशी असताना बाकीची माणसे त्या शहरामध्ये तेथल्या तेथे कार्यक्षेत्र कशाला बरे बघतात ... ? "

अखेरीस २५ डिसेंबर १९४५ या दिवशी ग्रामबालशिक्षाकेन्द्राचे औपचारिक उद्‌घाटन करायचे ठरले. उद्‌घाटक होते, माननीय बाळासाहेब खेर.

त्या दिवशी समुद्रकाठी निराळीच धामधूम होती. ग्राम–बाल–शिक्षा केन्द्राच्या धुवट इमारतीची नव्याने डागडुजी करण्यात आली होती. भिंतींना सफेदी दिली गेली होती. अंगणात रंगीबेरंगी पताका लावण्यात आल्या होत्या. आवाराची झाडलोट केली होती. विहिरीवर नवा रहाट चढला होता आणि त्याला निळा रंग देऊन त्यावर घुंगरांचा एक झुपका बांधला होता. आंब्याच्या झाडाला एक छोटासा पण लाल रंगाचा झुला बांधलेला होता. कोपऱ्यात एक वाळूचा ढीगही दिसत होता.

सरलादेवी साराभाई, परमानंदभाई कापडिया, मोंघीबेन बधेका, गोपाळराव कुळकर्णी, मुंबईच्या शिशुविहारातील शिक्षकवर्ग, आचार्य भिसे आणि त्यांच्या विद्यालयातील कार्यकर्ते, नूतन बाल–शिक्षण–संघाचे पदाधिकारी व इतर आजूबाजूच्या गावांतले प्रतिष्ठित नागरिक अशी मंडळी खुर्च्या–सतरंज्यांवर बसली होती. उद्‌घाटकांच्या हस्ते बालकांना खाऊ वाटला जाऊन कार्यक्रमाला आरंभ झाला.

झाडांच्या सावल्या लक्षात घेऊन तिथे काही जाजमे अंथरण्यात आली होती आणि मध्ये जुजबी साधने ठेवून आजूबाजूची दहापंधरा उघडीवाघडी पोरे तेथे आणून बसवली होती. हे खरे 'प्रमुख पाहुणे !' दोन–तीन तरुण शिक्षिकांनी त्यांना मोठ्या मिनतवारीने खेळते ठेवले होते. त्यांचे काम जवळून पाहावे म्हणून, ना. बाळासाहेब खेर त्यांच्याजवळ गेले; त्याबरोबर त्यातल्या एका पोरीने एवढ्या मोठ्याने गळा काढला की बाळासाहेब



घाबरून आपल्या खुर्चीकडे परत जात म्हणाले, " जातो, जातो बरं बाई ! " उपस्थितांची हसून पुरेवाट झाली.

बाळासाहेब आपल्या भाषणात म्हणाले, " इतकी लहानशी बालशाळा चालवायची होती तर ताराबाई मुंबई सोडून तेवढ्यासाठी इकडे कशाला आल्या ? मला कशाला बोलावलं ?— लहानशा बीजापासूनच महान वृक्षाची उत्पत्ती होते. या कार्यापासून महान फळ मिळेल अशी अपेक्षा आहे. आपल्या देशाच्या पुनरुत्थानाकरता मुळापासून सुधारणा करायची जरूर आहे. हे काम येथे होईल अशी कल्पना आहे..."

# १४. ग्रामीण बालवाडीचा जन्म

प्रत्यक्षात बोर्डीच्या बालवाडीची सुरुवात या उद्घाटन समारंभाच्या आधीच काही दिवस झाली होती. इतके दिवस गंभीरपणे समुद्रात पाय बुडवून बसलेल्या त्या पडीक वास्तूला त्यामुळे लडिवाळ स्वरूप प्राप्त झाले होते.

बालवाडीला सुरुवात झाली त्यादिवशी बोर्डीतल्या गावकऱ्यांनी गोष्टीमधला 'अलगुजवाला' प्रत्यक्ष पाहिला! पार वस्तीच्या टोकापासून शेलतभाईंनी सुरुवात केली होती. स्वच्छ धोतर, झब्बा घातलेले, शांत, सौम्य चेहऱ्याचे शेलतभाई हातात झांजा घेऊन 'राम नाम लडवारे' हे गाणे आळवीत बालवाडीच्या दिशेने निघाले. घराघरातली, विहिरीवरची, कामावर किंवा गुरे घेऊन निघालेली मोठी माणसे हातातली कामे टाकून, थबकून ही कौतुकाची शाळा पाहू लागली. घराघरातून छोटी-मोठी मुले बाहेर पडत होती; त्यांच्या गल्लीटोकाशी शेलतभाईंची बाल-मिरवणूक थबकली की त्यात सामील होत होती. शेलतभाईंच्या गाण्याची जमेल तशी गोड री ओढायचा प्रयत्न करीत होती. अगदी लहान बाळांना त्यांची मोठी भावंडे कडेवर उचलून घेत होती. काही पोरसवदा आयाही चौकसपणाने मिरवणुकीचे शेवटचे टोक धरून होत्या. खरोखरच या शेलतभाईंपाशी एकादे अदृश्य अलगुज असले पाहिजे...

हळूहळू गाव मागे पडले. हरिजनवाडा समोर दिसू लागला. तेथूनही थोडी भरती झाली. वरात आता बरीच लांबोडकी झाली होती. शंभर तरी छोटेमोठे चेहरे असतील! कोळ्याच्या वस्तीला वळसा घालून अखेर हा बालमोर्चा बालवाडीच्या प्रवेशद्वारापर्यंत पोचला आणि मोठा गजर होऊन गाणे थांबले. बाळगोपाळांना चणेचुरमुऱ्यांचा प्रसाद वाटण्यात आला. उद्या यायचे पुसट आश्वासन चेहऱ्यावर किंवा मानेने दाखवीत भरल्या मुठींनी मंडळी घरोघर परतली.

...आता दुसऱ्या दिवशी, अनुताईंची पाळी! 'रघुपति राघव राजाराम' म्हणत त्या निघाल्या. त्यांनी हातात खंजिरी घेतली, आणि एकामोठ्या मुलाच्या हाती झांजा दिल्या. पताकाही आल्या. एकाने ढोलक्यावर ताल धरला. आणि टाळ्या तर होत्याच. ढोलक्याची डुमडुम आडगल्ल्यांत, बोळांत पोचून मुलांना जागे करू लागली. बालवाडीची तुतारी गावभर वाजली. अशा शंभर-सव्वाशे मुलांच्या भरघोस दिंडीने बालवाडीला सुरुवात झाली.

—कित्येक दिवस घरोघर हिंडून केलेल्या प्रचाराला, घेतलेल्या सभांना गावाने बालरूपाने दिलेले हे होकारार्थी उत्तर होते. मंडळी उत्साहाने कामाला लागली.

केंद्राचे काम पाहायला आलेले श्री. जुगतरामभाई दवे बालमंदिराची ही खेड्यातली



आवृत्ती पाहून कौतुकाने उद्गारले, "वा वा! या बोर्डी गावात जशा अननसांच्या-पपनसांच्या वाड्या आहेत, चिक्कूच्या वाड्या आहेत तशी ही आपली बालांची वाडी! बालवाडी."

तेथून पुढे खेडेगावात शैक्षणिक सिद्धांतानुसार परंतु कमी खर्चात चालविण्यात येणाऱ्या बालमंदिराला हेच नाव रूढ झाले—बालवाडी!

पण मग काय झाले कुणास ठाऊक! हळूहळू बालवाडीत येणाऱ्या मुलांची संख्या कमी कमीच होऊ लागली, प्रभातफेरी पार रोडावली आणि बघताबघता विरघळूनच गेली! नक्की कुठे बिनसले? मुले इतक्यात कंटाळली? की पालकांचा काही गैरसमज झाला?

—शहाणे गाव निवडले तरी त्याचा असा काही विशिष्ट अडमुठेपणा होताच, शिवाय ग्रामजीवनाचे विशिष्ट असे काही प्रश्नही होते. ताराबाईंच्या सहकाऱ्यांच्या कामात नाना अकल्पित अडथळे, अडचणी येऊ लागल्या.

'मुळात बालशिक्षणाची धड कल्पनाच या खेडेवजा गावातल्या रहिवाशांना नव्हती. आणि ते साहजिकच होते. मुंबईसारख्या शहरामध्येसुद्धा ताराबाईंना बालशिक्षण पटवून द्यावे लागले होते! या मंडळींनी आजवर ज्या पाठशाळा बघितल्या होत्या त्यापेक्षा ही बालवाडी म्हणजे काही वेगळेच प्रकरण होते. इतक्या लहान मुलांची शाळा? म्हणजे मग लौकर लौकर ग म भ न शिकवायची शाळा असेल. परंतु इथे पाहावे तर अक्षरलेखन, अंकलेखन यांचे नावच नाही! मग अशा शाळेत मुलांना पाठवायचेच कशाला? अडीच-तीन वर्षांची तर पोरे– त्यांची तोंडे धुवा, त्यांच्या वेण्या घाला, त्यांना कपडे चढवा! त्यापेक्षा पाठवलेच नाही की काम सोपे! शिवाय एवढ्याशा मुलांना शाळा हवीच कशाला? खेळायला अंगणात काय कमी जागा आहे?

शिक्षणाला लेखन-वाचनाखेरीज इतरही नैतिक, सांस्कृतिक बाजू आहेत, हा विचार त्या श्रमजीवी लोकांना कोठून उमजणार?'

शिवाय लोकांच्या मनामध्ये शिवाशिवीची छुपी भीती असल्यामुळे त्यांचे प्रश्न, दृष्टी, बोलणी आव्हानात्मक असत!

काही पालकांना वाटे, हे लोक आपल्या मुलांना नेतील आणि बाटवतील धरून! नाहीतर लढाईवर तरी घेऊन जातील. काँग्रेसचे लोक असले तर निदानपक्षी तुरुंगात तरी टाकणारच! आपण होऊन कुणी मूल आलेच मागे तर त्याचे मोठे भावंडसुद्धा रक्षक म्हणून रस्त्याच्या कडेकडेने बरोबर बरोबर येत राही.

गाव लहानसेच होते, पण निरनिराळ्या भागांतून रोज मुले गोळा करीत हिंडावे लागे. प्रत्येक घरी थांबायचे. मुलाची चौकशी करायची, मूल तयार आहे की नाही? कुठे आंघोळ व्हायची असे तर कुठे खाणेच आटोपलेले नसे. कधी मूलच यायला तयार नाही.

आणि ते रडू लागले की इथवर हसतखेळत बरोबर आलेली पोरेही बिथरत, सूर काढत. सबंध गावात फेरी मारायची म्हणजे बळसा मोठा पडे. अर्धी मुले वाटेतल्या या रखडपट्टीनेच कंटाळत व आडवाटेने मागच्या मागे पसार होत. दुसऱ्या दिवशी यायला ती कुरकुरत! बरे, एकेका मुलाला बालवाडीत सोडून परत यावे तर ते एका माणसाच्याने होणारे काम नव्हे. मुले पाठवायला काही पालकांची 'ना' नसे, परंतु रोज ठराविक वेळेला मुलांना तयार करून शाळेत पाठवायचे हे संस्कारच या वस्तीतल्या पालकांवर नव्हते आणि बालकांवरही नव्हते. रोज कोणीतरी बोलवायला आल्याखेरीज शाळेत जाणे त्यांना सुचतच नसे! एखादे मूल आजारी पडले की त्याच्या हजेरीत खंड पडे. दुसऱ्या दिवशी आठवणीने त्याच्या घरी जाऊन ते बरे असेल तर त्याला आठवणीने घेऊन यायचे काम शिक्षिकेचेच. एरवी ते पुन्हा रस्त्यावर, धुळीत खेळण्यात दंग होई! कधी आईबाप घरीच नसत आणि मुले कंटाळा करीत. पालकांनी शाळेकडे साफ दुर्लक्ष करावे, मुलांनी खेळत राहावे आणि शिक्षकांनी भर पावसात, उन्हात, थंडीत त्यांना बोलावीत फिरावे हे वारंवार घडे.

संचालकमंडळींना हा अनुभव नवीन होता. शहरातल्या पालकांच्या खिशातून दरमहा फी वसूल होत असे त्यामुळे म्हणा, किंवा शाळेचे महत्त्व त्यांना पटल्यामुळे म्हणा, शहरातले पालक या बाबतीत दक्ष, जागरूक असत.

इथे शिक्षिका बोलवायला गेली तर कधी उदास सहकार मिळे, "बगा कुठं खेळत असली तर! येत असली तर जा घ्यून!"

खरे तर पोर शाळेत जाण्यापेक्षा म्हशीमागे गेलेले परवडले, हा दृढ विश्वास!

कधी कधी तर उघड उघड असहकार पदरात पडे,

"त्याला घ्यून जातीस ती, इथेन गोळा कराया तू येनार काय ग?"

"आता उद्यापासून येणार ना?"

मुलालाच ताई विचारी.

"नि!"

—म्हणजे नाही!

नावे लिहून घ्यायची तर मुळीच तयारी नसे. पोरगा दडून बसे; बाप पाठ फिरवून बसे.

काही मुलांची रोज मनधरणीच करावी लागे, असे नव्हे. शिक्षिका दिसली की 'ताई, ताई' म्हणून मागे मागे येत; पण कधी घरी स्वयंपाक झालेला नसे, कधी लाकूडफाटाच नसे; कधी धान्य आणण्यापासून सुरुवात असे. ते आणून, दळण दळून झाल्यावर मग चूल पेटणार! एकीकडे 'बकरीला चारायला ने' म्हणून आई मागे लागलेली असे. जेवल्याशिवाय मुले शाळेत येणार कशी? घरातली कामे टाकून त्यांचे शाळेत लक्ष कसे लागणार?



तसेच गोळा करून नेले तर साडेअकरा वाजता एका आईची हाक येई,

"हरी चल, भाकरी वाढली."

दीड वाजता दुसऱ्या आईची हाळी येई,

"वेणे ऽ चल..."

सुट्टी केव्हा द्यावी तेच कळत नसे. कारण प्रत्येक घरची वेळ वेगळी. "पोराला जेवायला घालूनच का पाठवत नाही?" म्हटले तर उत्तर येई "बाई, सकाळी साडेदहा–अकरापर्यंत आम्ही टोपल्या विणतो, त्या बाजारात जाऊन विकतो. त्या पैशाची मीठ–मिरची आणतो. धान्य आणतो, निवडतो, दळतो. तेव्हा कुठे दुपारला पोरांच्या पोटात भाकरी घालता येते. तुम्ही जेवायला सोडले नाही तर अख्खा दिवस चहाच्या घोटावर राहतील पोरं! पहिले पहिले आम्ही सकाळच्या चहाबरोबर रोटली देत होतो. आता गरिबीमुळे परवडेना झालंय..."

मग सकाळी साडेआठ ते अकरा व दुपारी तीन ते पाच अशा दोन वेळा ठरवल्या. तरी मधून मधून प्रश्न येतच—

"बाई दळावां जाऊ?"

"बाई कंट्रोलमा (रेशन–दुकान) जाऊ?"

—पाठवावेच लागे.

अशा एकूण सुट्टयाच खूप, मग मुद्दाम सुट्टया द्यायच्या कधी? त्यामुळे कार्यकर्त्यांना मात्र रोजच काम पडे.

बरे, मुलांची उपस्थिती कधी २ तर कधी ११ न् कधी एकदम पन्नाससाठ! वर्ग निश्चित कसे करायचे तेच समजत नसे.

—सरासरी उपस्थिती पाहायची!

कधी दुपट्यातले बाळ शाळेत हजर होई; कधी लेकुरवाळी आई सगळ्या लेकरांना पुढे घालून बालवाडीत मुक्कामाला येई.

वयोमर्यादा निश्चित करायला जावे तर तेवढेच निमित्त व्हायचे!

अडचणी अनंत आणि रोज नव्या होत्या.

परंतु ग्राम-बाल-शिक्षिका केंद्राच्या कार्यकर्त्यांना सर्वात गंभीर प्रश्न वाटला तो स्पृश्यास्पृश्यतेचा; आणि ही समस्या त्यांना चांगली पाचसहा वर्षे पुरून उरली.

थोड्याच दिवसांत गावातल्या सवर्ण नागरिकांच्या ध्यानात आले की या बालवाडीवाल्यांना त्यांच्या मागच्या बाजूस असलेल्या हरिजनवाड्याचा शेजार आहे. आणि अस्पृश्य, अमंगळ असे जे महार, वेड, भंगी त्यांच्याशी या मंडळींनी संबंध ठेवले आहेत. संस्थेची झाडलोट करणारी नोकराणी तर भंगी जातीची आहेच परंतु त्यांच्या गायींचे दूध काढणारा गडीसुद्धा हरिजन आहे. आणि विहिरीचे पाणी शेंदायला एका

चांभाराची नेमणूक करण्यात आली आहे. या संस्थेची सुरुवातच मुळी हरिजन मुलांना बालवाडीत आणून बसवून केली आहे! आणि हे सारे नकळत नव्हे, तर बुद्धिपुरस्सर झालेले आहे; इथल्या, त्या विचित्र म्हातारीला म्हणे, आपल्या वाडीत पहिला प्रवेश उपेक्षितांच्या मुलांनी केला ही गोष्टच आनंदाची वाटते आहे. ती देशाची खरी माती म्हणे...

—विरोध सुरू झाला.

तास न् तास कार्यकर्ते एकेका ओटीवर बसून राहात. ग्राम बाल-शिक्षा केंद्रात कार्यकर्त्यांची चणचण होतीच. परंतु औटघटकेचे मदतनीस कधी नाशकातून, कधी नूतन बाल शिक्षण संघाच्या इतर केंद्रांतून, कधी बोर्डीतल्याच सुशिक्षित घरांतून मिळत होते. त्यातून टिकाऊ कार्यकर्ते घडत नसत, परंतु संस्थेची वेळ निभावून नेता येई. रमेशभाई मेहता, चंपूताई राऊत, लीलाताई पाटील, खंडूभाई, रामीबेन पटेल, जयंतभाई शुक्ल, ताराबाईंची भाची शारदा गद्रे —असे हंगामी कार्यकर्तेच संस्थेने राबवीत नेले. सकाळ, दुपार, संध्याकाळ ही मंडळी झोपड्या–झोपड्यांतून खेपा घालीत. कधी चावडीवरच्या गप्पांमध्ये सामील होत आणि आपली बाजू मांडीत—कधी एखाद्या घरात एखादी 'शकुताई' मागल्या दाराने प्रवेश मिळवी. आणि आधी 'स्वयंपाकघर' आपल्या बाजूला वळवू घेऊन मग 'बैठकी'शी वाद घाली....

एखाद्या दिवशी अनुताई, एखाद्या मदतनीस शिक्षिकेला घेऊन नन्नाचा पाढा ऐकायलाच बाहेर पडत. *

कुंभारवाड्यातली कुणी एक बाई ओटीवर आपल्या मुलींच्या वेण्या घालत बसलेली असे. अनुताईंनी 'सुतोवाच' करताच ती नाना कारणे पुढे मांडी. "—अजून स्वयंपाक कुठे झाला आहे?" "मुलं तिथे राहणार नाहीत." "अजून हातपाय धुणी, वेणी बाकी आहे ना!—थोड्या वेळाने धाडीन."

ताई मुळी ऐकले न ऐकलेसे करीत पायऱ्यांवर बैठकच मारीत. आणि मुलांनाच परस्पर विचारीत, "येणार ना बाळांनो, माझ्याबरोबर?"

मुले चटकन् 'हो' म्हणत.

"बघा, ती तर एक पायावर तयार आहेत."

एवढे झाल्यावर झोपडीतून एखादा पुरुष तावातावाने बाहेर येई आणि म्हणे,

"आमची मुलं यायची नाहीत, हे पक्कं. तुमच्याकडे तो चांभारडा पाणी भरतो ना!"

मग पोट सावरीत आजा बाहेर येऊन बसे.

* 'ग्रामीण बालशिक्षण व त्याचे प्रश्न' —लेखक स. आ. केळकर.



"उद्या आम्हाला वाळीत टाकतील त्याचं काय? आमची जात कडक आहे. तुम्ही जा!"

आणि आपण पालथ्या घड्यावर पाणी ओततोय हे ध्यानात धरूनच अनुताईंनी चिकाटीने समजावू लागावे,

"अहो, हा उच्च-नीच भाव आता सोडायला हवा. तो चांभार आता तुमच्यापेक्षा स्वच्छ राहतो! शिवाय आम्ही रोज गाळून उकळून भरतो, ते पाणी बाईट कसं असेल? आणि बहिष्काराला काय भिता? आता कायदासुद्धा तुमच्या बाजूला आहे. बहिष्कारवाल्यांवर तुम्हाला खटला भरता येतो."

"आणि असं पाहा, मी सुद्धा ब्राह्मणाची बाई आहे. पण गोरा कुंभार, चोखामेळा, तुका वाण्याला आपला म्हणते की नाही?"

"जा रे सगळी, हातपाय धुवून त्यांच्याबरोबर." अखेर ओटीवरची बाई उवा काढणे आटोपते घेऊन म्हणे, "अहो, पण त्यांचं जेवण..."

"जेवायला पाठवते मी मग. पण आता नेते."

आणि मंडळींना आणखी कां कूं करायला संधी न देता ताई मुले घेऊन पळ काढीत!

मग लागे कोळ्यांची वस्ती, मंगलवाडी. इथे तर कुणी मुळी उत्तर द्यायलाच तयार नसे. किती का गोड बोला ना, एक ना दोन.

"आमची मुलं सिक आहेत."

एका बाईची मुले आत खेळताना दिसताहेत आणि बाई खुशाल म्हणते, "आम्हाला मुलं नाहीत."

एका बहाद्दर स्त्रीने तर केवळ चेहरा मख्ख ठेवून ब्याद पुढे पिटाळली! माशी न उडेल असा ढालीसारखा चेहरा करून बसून होती आपली!

एक बाप बाहेर येऊन निक्षून म्हणाला, "नहीं, नहीं, अमारा छोकरा तमारे त्यां नहीं आवे."

चेहऱ्यावर "चालते व्हा!" चा उर्मट आविर्भाव!

"का?"

"तो माझा खाजगी प्रश्न आहे."

"न पाठवण्याचं कारण तरी मला लिहून द्या. म्हणजे आम्हाला वरिष्ठांना मुलं न येण्याचं कारण सांगता येईल."

"मी काही तुमच्या वरिष्ठांपाशी खुलासा करायला बांधलेला नाही."

"पण तुम्ही कारणच सांगितलं नाहीत तर आम्ही सुधारणा तरी कशी करणार?"

शेवटी त्याचा पारा उतरला. त्या दोघींना ओटीवर बसवून आपली बाजू त्याने सांगितली.

चांभार–घेडांत मिसळून त्यांच्या मुलांची संस्कृती बिघडणार होती.

" पण आता पाहा, ती खूप बदलली आहेत, शिव्या देत नाहीत. तुमच्या मुलांवर वाईट संस्कार होणार नाहीत... "

" आमच्या मुलांचं आरोग्य त्या घाणेरड्या मुलांमुळे बिघडेल. "

" साफ खोटी समजूत आहे. आम्ही त्या मुलांकडून रोज आंघोळी करून घेतो. रोज धुतलेले कपडे त्यांना देतो. येऊन तर पाहा— तुम्हाला ओळखणार नाही की कुठली चांभाराची मुलं नि कुठली—"

" धर्माला ही गोष्ट संमत नाही "

" तुम्ही खंबीर मनानं पाठवा, धर्माला कायद्याचा धाक आहे, आपोआप संमत होईल ! "

" जे सुधारक म्हणून मिरवतात त्यांची तरी मुलं कुठे येतायत ? "

" खरं आहे. ते नावापुरतेच सुधारक आहेत. पण आपण त्यांना खरी सुधारणा दाखवून द्यायला हवी. "

पण अखेर त्या माणसाने मुले धाडली नाहीतच. " आठ-दहा दिवसांनी एक सभा घेऊन सर्वांना पटवून द्या, मग पाठवू "— एवढे कबूल केले.

...एक नवीन शिक्षिका भयंकर तापली होती. तिच्या जिभेवर लाह्यांसारखी सणसणीत उत्तरे फुटत होती.

" अहो कमलताई, हा अनुभव आता नेहमीचाच झाला आहे, " अनुताई म्हणाल्या, " चला, चार तर चार मुलं. बालवाडी चालवायला जाऊ या. "

तथाकथित शिकलेल्या, सुधारलेल्या घरातल्या माणसांकडूनही सहकार्य मिळत नव्हते, हे खरेच होते. मात्र या मंडळींच्या पोटात नकार असला तरी चेहऱ्यावर बतावणी असे.

काही पालक यथायोग्य स्वागत करीत, चहापाणी देत पण मुलांना पाठवायचे नाव काढू देत नसत. कुणी तर पायऱ्यांवरूनच कटवत. काही वेळा खरे कारण न सांगता तिसरेच निमित्त पुढे केले जाई. " हरकत नाही हो मुलांना पाठवायला ! पण तुमची बालवाडी की नाही, लांब पडते फार ! "

काही संभावित लोक म्हणत,

" तुम्ही पुढे व्हा ! मी पाठवतो त्यांना तयार करून. "

खेड्यातली ही मुले अत्यंत अस्वच्छ असत. त्यामुळे बालवाडीच्या कार्यक्रमाला प्रथम मुलांना आंघोळी घालूनच आरंभ केला जात असे. या आंघोळीचा कार्यक्रम विहिरीवर होई. विहिरीचे पाणी हरिजन मुलांसाठी वापरले म्हणजे विहीर बाटली, विहिरीचे मालकही बाटलेच !



संस्थेने गायी म्हशी बाळगल्या होत्या. सुटीच्या दिवशी दुधाचा खप होत नसे. पण जास्तीचे दूध विकायचा प्रयत्न केला तर हिंदूंनाच काय पण पारशी, मुसलमान गाव-कऱ्यांनाही ते दूध चालत नसे.

" आमच्या दुधात एक थेंबही पाणी नसतं. मग घेत का नाही ? " असे विचारले तर उत्तर मिळे, " तुम्ही सड धुवायला, चरवी धुवायला त्या विहिरीचं पाणी घेता ना, म्हणून ते दूध आम्हाला चालत नाही. "

—म्हणजे दूधही बाटगे ! शिवाय हरिजनांची वृत्ती तरी फारशी निराळी कुठे होती ? चांभारांची विहीर निराळी, माह्यावंशी धेडांची निराळी तर महारांना विहीर नाहीच, असा पंक्तिप्रपंच तिथेही होताच. धेडांच्या मुलांना घेतले म्हणून चांभार आपल्या मुलांना ओढून परत नेत. महारांच्या मुलांना घेतले की इतर हरिजन खवळून उठत !

प्रथम प्रथम भंगीण यायची, ती " पाणी काढून द्या " म्हणायची.

" तू ओढून घे " म्हटले तर, " मी कशी शिवू आडाला ? " तिला प्रश्न पडे.

" मी सांगते, शीव जा ! " म्हटले तर, " मला येत नाही काढता " हे सोंग ! " तुम्हीच द्या काढून. "

एखाद्या दिवशी एखादी म्हातारी चिडून म्हणायची,

" तू तर काही मुलखावेगळीच मास्तरीण दिसतेस ! "

" हो, मी निराळीच आहे. मुलांना पाठवाच. मी त्यांना शिकवणार. "

" मग आम्ही शिकवू , जा. "

" नाही, नाही. तुम्ही काय शिकवणार ? हे बघ, या बांबूच्या किती टोपल्या होतील हे मला सांगता येईल का ? नाही. तू लगेच सांगशील. कारण तो तुझा धंदा आहे. तसं माझं काम मलाच माहीत. "

असा अनुनय सर्व आबाळ्यांवर चालू ठेवला—तळमळीने, चिकाटीने.

चंपूताईंचे घर गावात होते. बालवाडी अकरा वाजता सुरू होई. चंपूताई दहा वाजता घरून निघत असे. येता येता आपल्या वाटेतली मुले ती गोळा करीत येई. गावातल्या बऱ्याच मुलांची नावे बालवाडीत दाखल केलेली होती. प्रत्यक्षात यायची मात्र अगदी थोडी.

एके दिवशी पालकांनी चंपूताईंना म्हटले,

" ताई, तुमच्या बालवाडीत तुम्ही महारा-मंग्यांची मुलंसुद्धा घेता, आमची मुलं अशानं बिघडायची ! त्यांच्यातच खेळणार, त्यांच्याशेजारी बसणार ! तुम्ही त्यांना धेडांच्या मुलांबरोबर खायला घालता, उष्टी मांडी देता ! तुम्ही ती घाणेरडी मुलं आधी

बंद करा. मग आम्ही स्वतः आमची मुलं शाळेत आणून पोचवीत जाऊ."

शिक्षिकेला कल्पना एकदम पटली. खरंच, काय चुकले त्यांचे ? ही अशी गलिच्छ मुले बालवाडीचा सुद्धा उकिरडा करून टाकतील ! त्यापेक्षा त्या शहाण्या घरातल्या मुलांनीच आपली बालवाडी नटवावी. ती तेथे खरी शोभतील पण.

चंपूताईंना शाळेत पोचायला उशीरच झाला. अनुताईंनी मुलांच्या आंघोळींना सुरुवात केली होती. त्या त्यांची अंगं चोळून, पुसून देत होत्या. महादू शिपाई त्यांना गरम–थंड पाणी पुरवत होता. त्यांना स्वच्छ कपड्यांच्या घड्या देत होता. ही सगळी मुले मग ताराबाईंच्या भोवती गोळा होत. एका मोठ्या आरशासमोर, एका लहानशा स्टुलावर बसून ताराबाई त्यांचे केस विंचरत, बांधत होत्या.

"अनुताई, पुन्हा लिखा झालेल्या दिसतायत सगळ्यांच्या डोक्यात. उद्या पुन्हा सगळ्यांना औषध लावून न्हायला घातलं पाहिजे..." ताराबाई म्हणाल्या, अन् त्यांचे लक्ष चंपूताईंकडे गेले, "का हो, आज इतकीच मुले ?"

चंपूताई चपला काढता काढता अम्मळ चाचरतच पालकांचा निरोप ऐकवू लागली,

"ताई, ते लोक म्हणतात, तुम्ही हरिजन मुलांना बंदी करा म्हणजे आमची मुलं पाठवू !— खरंच ताई, आपण या मुलांना बंदच करू या ना ! नाहीतरी यांच्यामागे रोज अर्धा वेळ फुकटच जातो आपला ! धुवा, पुसा ! त्यापेक्षा..."

ताराबाई केस विंचरता विंचरता एकदम थांबल्या. त्यांची लोण्यासारखी सहिष्णू नजर कठोर बनली. एखाद्या अनोळखी बाईकडे पाहावे तशा त्या शिक्षिकेकडे पाहत त्या म्हणाल्या,

"चंपूताई ! या उपेक्षित मुलांना जवळ करणं, शिक्षणाद्वारे त्यांच्यावर योग्य ते संस्कार करणं, त्यांची काळजी करणं हे माझं ध्येय आहे. त्याचबरोबर त्यांच्या पालकांतही जागृती येणं हे माझं स्वप्न आहे. जे लोक सधन आहेत, ते आपली मुलं मुंबईलाही पाठवू शकतील. पण या मुलांकरता तशी दुसरी कोणतीच सोय नाही, मार्ग नाही. आपण त्यांना बंद केलं तर त्यांना दुसरीकडे कुठेही जागा नाही. नाही आली ती मोठ्यांची मुलं, तरी हरकत नाही. हरिजनांच्या एका मुलाकरता सुद्धा मी माझी संस्था चालू ठेवीन; बंद पडू देणार नाही."

—त्या शिक्षिकेच्या मनावर त्या निर्धाराच्या बोलांनी एक संस्कार झाला. ती खजील झाली आणि विचारमग्नही. आणि दुसऱ्या दिवसापासून त्या उपेक्षित मुलांची न्हाणीधुणी ती खऱ्या आपलेपणाने, जास्त मनापासून करू लागली. ती नाइलाजाने केलेली अप्रिय कामे तिला आता आवडू लागली. कार्याबद्दल एक निराळीच निष्ठा, भक्तिभाव तिच्या मनात उत्पन्न झाला.

"त्या क्षणी मी घडले !" पुढे पंधरा-वीस वर्षांनी तिने कृतज्ञ उद्‌गार लिहिले.



...मांगेलवाड्यात एका झाडाखाली उघड्यावरच एक बालवाडी आकार घेत होती. एके दिवशी ताईंबरोबर एक हरिजन मुलगा तेथे आला. ताराबाईंनी विहिरीतून पाणी काढले तशी 'मी नेतो' म्हणून त्याने बादलीला हात घातला.

झाले ! मांगेलवाडीत हाहाकार उडाला. कोळ्यांची विहीर बाटली होती. आयांनी भराभर मुले ओढून घरात नेली.

"अहो, हरी विहिरीला शिवलाच नाही."

परंतु ऐकतेय कोण ? शिव्यांचा मात्र भडिमार झाला.

सुदैवाने त्यांच्यातल्याच एका बाईने आवाज उठविला,

"चला, पुरे झालं. आगगाडीत भंग्याशेजारी बसून प्रवास करता, भजी खाता, तेव्हा ? बिचाऱ्या ताईंना, उगाच सतावून राहिलायत ते ?"

तिच्या या उलट्या बोलण्यामुळे सगळेच जरा नरमले. पण पुढे आठ दिवस ताई तेथे बालवाडी चालवू शकल्या नाहीत.

रोज ताई आल्या की मुलांनी त्यांच्याभवती गोळा व्हायचे, आणि आयांनी त्यांना फरपटत परत न्यायचे. दार नसलेल्या आपल्या झोपडीत त्यांना कोंडायचा प्रयत्न करायचा. ती रडरड करायची की आया धपाटे मारायच्या.

पण हळूहळू आया कंटाळल्या. मुले परत नेण्याचा कंटाळा करू लागल्या.

बालवाडी परत अंग धरू लागली.

पुन्हा एके दिवशी नरसिंह म्हणून भंग्याचा मुलगा आला. लगेच मुलांना फरक कसा कळला कुणास ठाऊक. त्याचा हात धरायला कुणी तयार होईना. ताईंनी 'गोल करा' म्हटले की तो एकटा पडे. मग दोन तायांनी त्याचे दोन्हीकडून हात धरले. आपण मध्ये राहिल्या. प्रश्न खुबीने सोडवला व सांगायला सुरुवात केली,

"आपण सारे होऊ एक,
महार, भंगी, तेली, माळी,
होऊ एक, होऊ एक
हाती हात मिळवोनी
गळ्यात गळे घालोनी
हिंद भूमिची बाळे सारी
होऊ एक, होऊ एक..."

परंतु झोपड्यांमधून इशारा झाला की काय न कळे. एकेक मूल निघून गेले... राहिल्या दोन शिक्षिका ! एकमेकींचे हात धरलेल्या !

आणि एक दिवस तर बालवाडीत फक्त तीन मुले ! मग कळले, ही तीन भंग्यांची मुले

वेळ लागली म्हणून गावातल्यांनी, हरिजनांनी सर्वांनीच बालवाडीवर बहिष्कार घातला आहे.

मग पुन्हा घराघरांना भेटी, समजावणी.

बरे, ज्यांच्यामुळे हे रामायण घडले ती तीन मुले तरी नेमाने रोज येणारी असावीत? तीही बापडी मधून येत, मधूनच बंद होत.

—पण म्हणून त्यांना बंदी करायची नव्हतीच.

आणि त्यानंतर तर एक दिवस असा उजाडला की बालवाडीत फक्त एक—आदिवासी—मूल तेवढे आले.

बालवाडीचा अलगुजवाला एकटा गावभर फिरून आला. परंतु त्याच्यामागून त्याचा एकही बोबडा दोस्त आला नाही, नाक मुरडायला देखील कुणी बाहेर आले नाही! शेलतभाई एकटेच आपले पोकळ पावा घेऊन बालवाडीत परतले... काबुलीवाल्यासारखे.

बालवाडी दिवसभर उघडी होती. पण मुलांसाठी बांधलेला तो झोपाळा तसाच उन्हात लोंबत राहिला. छोटी छोटी जाजमे तशीच कोपऱ्यात पडून राहिली. मुलांच्या आंघोळीचे छोटे टबि तसेच उन्हात तापून थंड झाले!

ते एकच मूल अंगणातल्या खांबाला विरस्या घालीत होते आणि आतमध्ये फक्त अनुताई आणि शेलतभाई सगळी खेळणी, साधने यांची मांडामांड करून कपाळाला हात लावून बसली होती. एकीकडे रडकुंडीला आलेली आणि एकीकडे 'अति झाले आणि हसू आले' अशी त्यांची परिस्थिती झालेली.

शेलतभाईंनी मात्र हे अपेश फार मनाला लावून घेतले. 'मी खेड्यात नमुनेदार बालवाडी चालवून दाखवीन' असा संकल्प करून, गिजुभाईंचा आदर्श डोळ्यांसमोर ठेवून ते बोर्डीला आले होते. दिवसाच्या चोवीस तासांपैकी सव्वीस तास जणू ते या कामासाठी पणाला लावीत होते. त्यांनी जिवापाड कष्ट घेतले होते. रात्री दहा दहा वाजेपर्यंत उन्हा-पावसांतून, चिखल तुडवीत ते प्रचारासाठी हिंडले होते. या उत्कट मनाच्या त्या 'बाल-कलावंताला' ही बालकांनी केलेली शिक्षा सोसवली नाही. ते पार खचले.

त्याच रात्री त्यांना हृदयविकाराचा झटका आला आणि त्यांना त्यांच्या गावी विश्रांती-साठी पाठवावे लागले. महिन्याभराच्या आतच ते निधन पावले. अखेरपर्यंत त्यांनी बाल-वाडीचा ध्यास घेतला होता. आपण हाती घेतलेले कार्य पूर्ण तर राहोच, सुरुसुद्धा करू शकलो नाही अशी हाय खाऊन शेलतभाई गेले! इतके घर्मबिंदू पेरले होते त्यातून एखादा तरी हिरवा कोंभ त्यांच्या डोळ्यांदेखत अंकुरता तर...

ताराबाईंच्या सुधारकी, सुविद्य शहरी मनालाही हा एक मोठाच धक्का होता. वर्ण-भेदाचे विष इतके खोलवर भिनून आहे!... आणि तिकडे गांधीजी अस्पृश्यता-निवारणाची



मोहीम उघडून आहेत, सरकार कायदे करते आहे, साने गुरुजी मंदिर-प्रवेशासाठी उपोषण करीत आहेत...

यावर उपाय म्हणून मग एक विचार सुचविला गेला. हरिजन मुलांकरता कापडियांच्या या बंगल्यात बालवाडी चालूच ठेवावी आणि गावामध्ये स्पृश्यांच्या मुलांकरता स्वतंत्र शाखा काढावी, परंतु या गोष्टीला ताराबाईंनी खंबीरपणाने नकार दिला. स्पृश्यास्पृश्यतेच्या प्रश्नापुढे नमते न घेण्याचा त्यांचा निर्धार होता.

वास्तविक कस्तुरबा ट्रस्टच्या आग्रहामुळे पहिल्या तीन महिन्यांतच बोर्डी येथे त्यांनी ग्राम—बाल—अध्यापनमंदिरही सुरू केले होते. आणि त्याच्याही मार्गातल्या अडचणी त्या सोडवीतच होत्या. इथे बालवाडीच आकार घेत नाही तर प्रशिक्षणाच्या विद्यार्थ्यांना प्रत्यक्ष अनुभव कसा व कुठे देणार?

परंतु ताराबाईंनी ठरवले, गावकऱ्यांची मने कशीही वळवू, बदलू, पण हीच बालवाडी यशस्वी करू. खोट्या आणि अनिष्ट रूढींसाठी समझोता करायचा नाही. मग तत्त्वासाठी आपली संस्था बंद पडली तरी बेहेत्तर! कारण दोन बालवाड्या काढल्यामुळे काम लौकर फोफावणार होते हे खरे; पण ती तत्त्वच्युती झाली असती. एका तऱ्हेने शरणागती, अस्पृश्यतेला संमतीच ठरली असती!

एकंदरीत बालवाडीचे पहिले वर्ष असे 'नितांतरमणीय' गेले! वर्षाअखेरीस मुसल-मानांची तीन, चांभारांची दोन आणि गावातल्या सुधारकांची चार अशी प्रचंड बालसंख्या बालवाडीत उरली. खर्चाचा आकडा एव्हाना अडीच–तीन हजारांच्या घरात पोचला होता. इतक्या थोड्या मुलांकरता एवढा खर्च करणे इष्ट आहे का, इथपासून पुनर्विचार करणे आले; काम बंदच करावे लागणार की काय अशी परिस्थिती निर्माण झाली.

—परंतु पुन्हा प्रयत्न!

हरिजन तर हरिजन मुले; तीच येऊ द्या. मग त्यांना अनुकूल अशा निरनिराळ्या वेळा ठेवून बघितल्या. हरिजनवाड्यावरच लक्ष केंद्रित करायचे ठरविले होते. पाहिले, तर ही मुले अतिशय गलिच्छ. आतापर्यंत कार्यकर्त्यांना सवय होती शहरातल्या, घरून स्वच्छ होऊन येणाऱ्या गोऱ्यागोमट्या बाळांची. इथे मुलांचे डोळे आलेले, अंगावर गळवे, आणि पोटे जंतांनी फुगलेली. अंगावर कधीच धुतल्या न जाणाऱ्या चिंध्या.

तेव्हा मग या मुलांसाठी विहिरीवर सर्वात प्रथम सुरू केली रामन्हाणी! सर्वांना ऊन पाण्याने रोज आंघोळी घालायच्या. तेल लावून केस विंचरायचे व कपडे साबणाच्या पाण्यात घालून उकळायचे.

मुलांच्या अस्वच्छतेमागची कारणे उघड होती. एक तर स्वच्छतेचे महत्त्व त्यांच्या आईबापांनाच उमजलेले नव्हते व आईबापांजवळ स्वच्छतेत फुकट घालवायला वेळही नसे. खेडेगावांत धूळ फार आणि पाण्याची टंचाईही बरीच.

बालवाडीत मुलांसाठी लहान लहान बादल्या व लोटे विकत आणले. मोठी मुले लहान मुलांच्या पाठी चोळून देत. शिक्षिका हलक्या हाताने खरूज धूत. आंघोळीनंतर खरजेवर मलम, लोशन किंवा कडुलिंबाचा पाला लावून वर पट्टी बांधून टाकायची. डोळे आले असतील तर ते शेकायचे. प्रत्येक मुलाला कपड्याचे दोन-दोन जोड देण्यात आले. प्रत्येकाला आपापले कपडे ओळखता यावेत म्हणून रंगीत दोऱ्याने भरतकाम करून त्यावर निरनिराळ्या खुणा केल्या. कपडे वाळत घालणे, घड्या घालणे यात मुलांच्या पाळ्या लावल्या.

मुलांना आंघोळीची चटक लगेच लागली. सुटी असली तरी आपली आंघोळीची वेळ झाली की बालवाडीच्या दाराशी घुटमळू लागत. ताईंना मग तेवढ्यासाठी रविवारी सुद्धा बालवाडी उघडी ठेवावी लागे. आंघोळी झाल्यावर मात्र चड्डया चढवीत ती जी निघून जात, ती फराळाच्या सुमाराला परतत !

असा नेट धरल्यावर पंचवीस-तीस हरिजन मुले जरा तरी स्थिर झाली. परंतु ती वाढली की गावातली मुले बंद व्हायची. आणि गावातल्यांना चुचकारून पुन्हा बालवाडीत आणले की हरिजन मुले सुंबाल्या करत.

याबाबतीत हरिजन मुलांची मनोधारणा पुन्हा वेगळीच होती. एरवी, मनात आले की उठसूट बालवाडीत येणारी, जा म्हटले तरी घरी जायला तयार नसणारी ही मुले, गावातली मुले बालवाडीत आलेली दिसली की दारापर्यंत येऊन नुसतीच डोकावून परत जात. अर्धे काम टाकून मध्येसुद्धा पळ काढत. जागा तीच, शिक्षक तेच, साधने तीच, मग असे का ? तर या मुलांनाच न्यूनगंड. त्यांना पांढरपेशा मुलांच्या संगतीत बुजल्यासारखे होई. त्यांचे कपडे, भाषा, राहणी, यातले बारकावे, वेगळेपण जाणवून या मुलांमध्ये आपण मिसळायचे कसे, असे त्यांना वाटे.

मग पुन्हा त्यांना समारंभपूर्वक बोलवायला जा, त्यांची समजूत काढा. टाळ, झांजा वाजवीत. सतत दोन वर्षे अशी दोन्ही आघाड्यांची आळीपाळीने आळवणी चालू होती.

हरिजन पालकांकडूनसुद्धा सहज सहकार्य मिळत असे अशातला भाग नव्हे ! मुळात शिकण्याची फारशी गरजच त्यांना वाटत नसे. त्यात त्यांचे शहरात काम करणारे नातेवाईक सुटीवर आले की त्यांना दिलासा देत, " नाही मुलगा शिकला तरी काही बिघडत नाही. मी त्याला शहरात नोकरी मिळवून देईन. "

ही उपेक्षित समाजातली माणसे, हे लक्षात ठेवून संस्था त्यांना मदत करण्यास, त्यांचे मित्रत्व मिळविण्यास प्रयत्नशील असे. याचा परिणाम मात्र उलटा होऊ लागला. ज्या अर्थी ही माणसे इतकी मागे लागतात त्या अर्थी आपली मुले शाळेत येण्यावर त्यांची सरकारी ' ग्रांट ' अवलंबून असावी असा कयास या चाणाक्ष उपेक्षितांनी बांधला !

अडीअडचणीला या गरीब शेजाऱ्यांच्या उपयोगी पडावे, माणुसकीला जागावे म्हणून



संस्थेने त्यांच्यातल्या काहीजणांना हातउसनी कर्जे दिली होती. आजारपणात दवापाणी मिळे. आता ' अमुक अमुक केलेत तरच मुले पाठवू, नाहीतर नाही धाडत ' अशा उलट्या तंब्या हे पालक देऊ लागले !

सुशिक्षित पालकांच्या मुलांना दीडदोन मैलांवरून यावे लागे. इतके पायी चालणे रोज शक्य नव्हते म्हणून अशा लोकांच्या मुलांसाठी संस्थेने बैलगाडीची व्यवस्था केली होती. लहान लहान मुले गाडीत बसत. त्यांच्याहून लहान मुले आली की मोठी मुले उतरून पायी चालू लागत ! अशा तऱ्हेने १५ । २० मुले गाडीने व ५० । ६० चालत अशी मिरवणूक सुमारे दोन वर्षे चालू होती. प्रत्येक गल्ली-तोंडाशी थांबून बैलगाडीतून घंटा दिली जाई.

पण याची प्रतिक्रिया म्हणून अचानक एकदा हरिजन मुले येईनाशी झाली. जाऊन विचारले तर म्हणे, तुम्ही त्या मुलांसाठी गाडी ठेवली. आमच्या मुलांसाठी का नाही ?

आता बालवाडीच्या परसात यांच्या झोपड्या ! बैलगाडीने वरात का काढायचीय ? हाही एक प्रकारचा न्यूनगंडच म्हणायचा...मग तीन महिने त्यांच्या अंगणातच बालवाडी चालवली ...

सवर्ण लोकांची नाराजी बरेच दिवस अभेद्य होती. पण बालवाडीचे धोरणही अभेद्यच राहिले ! लोकांची इतर कार्यक्रमांना आता तितकीशी हरकत नव्हती पण एकत्र खाणेपिणे होई, त्याला त्यांचा विरोध होता. कुणी कुणी याबाबत मुलांना सूचना देऊन पाठवीत. खायच्या वेळी नेमकी ही मुले तेवढ्यातल्या तेवढ्यात हरिजन मुलांपासून दूर जाऊन बसत. आता तर बालवाडीतली हरिजन मुलेही स्वच्छ, नीटनेटकी असत. मग कसा त्यांना फरक कळे कुणास ठाऊक ! काही मुलांना खाण्याच्या वेळी नेमके घरून बोलावणे येई !

बालवाडीच्या ताई किंवा भाऊ मात्र तिकडे फारसे लक्ष न देता सर्वांना सारख्याच वाढण्याच्या पाळ्या लावून देत.

नाही म्हटले तरी या तटस्थ चिकाटीचा परिणाम होऊ लागला होता. विरोधाची धार कमी होत होती. शिवाय घरोघर हिंडून दाखले देणे, समजावणे हे चाललेले असेच. मुलांमधली प्रगतीही पालकांना जाणवत होती. बाहेरची हवा बदलत होती. अस्पृश्यता-निवारणाच्या चळवळीला बहर होता व ' काळ ' हे औषधही लागू पडतेच. हळू हळू लोकांच्या मनातला दुरावा मावळत चालला.

सुरुवातीला बालवाडीतल्या मुलांसाठी फळे व दूध असा कोरडा आहार ठेवला होता. हळू हळू कोणताही पदार्थ असला तरी पालकांना चालू लागले. भंग्यांची मुले इतर मुलांमध्ये एकरूप होऊन गेली तरी तिकडे गावाने काणाडोळा केला.

सर्व जातींच्या मुलांनी केलेल्या स्वयंपाकाला कुणी आक्षेप घेतला नाही. ब्राह्मणापासून धेडांपर्यंत सर्व मुले एकत्र बसू, उठू, जेवू लागली. आणि अखेर एके दिवशी गावातल्या

स्पृश्यास्पृश्य लोकांचा एकत्र भोजन-समारंभच बालवाडीत साजरा करण्यात आला! त्या दिवशी सर्व स्वयंपाक हरिजन विद्यार्थ्यांनी केला व वाढायचे कामही त्यांनीच केले. बालवाडी त्या दिवशी खऱ्या अर्थाने जिंकली! बोर्डी गावाला अस्पृश्यता-निवारणाचे पारितोषिकही मिळाले.

ताराबाईंनी ती निरगाठ कुशल परंतु खंबीर हातांनी सोडवली होती, म्हणूनच सुटली होती! निदान शंभर मुले बालवाडीत नियमित येऊ लागली तर हे कार्य पुढे चालवण्यात काही अर्थ होता. अनुताई शंभर मुले व्हावीत म्हणून सत्यनारायण बोलल्या होत्या! 'प्रयत्ने वाळूचे कण' पद्धतीने सतत सातआठ वर्षे प्रयत्न केल्यानंतर अखेर बालवाडीने हा उच्चांक गाठला! त्या दिवशी खरोखर श्रमसाफल्यामुळे आनंदून जाऊन त्यांनी बालवाडीत सत्यनारायणाची मोठी पूजा केली.

—त्या सत्यनारायणालाही असे खडीसाखरेचे साकडे यापूर्वी कुणी घातले नसावे!

—बोर्डीच्या ग्रामबालशिक्षणकेंद्रातील सुरुवातीच्या कार्यकर्त्यांपैकी शेलतभाईंचे आरंभीच्या काळातच निधन झाले. रामभाई पाठकांना काही महिन्यांतच घरची जबाबदारी, शेतीवाडी पाहण्यासाठी आपल्या गावी परतावे लागले. भाऊ केळकर पुढील शिक्षणासाठी बडोद्याला गेले. सीताबाई मढगावकर प्रकृतीअस्वास्थ्यामुळे सहा महिन्यांतच मुंबईला परतल्या. टिकले असे फक्त अनुताई वाघ व वामन शिपाई!

त्यामुळे कार्यकर्त्यांचा संच पुन्हा पुन्हा जुळवावा लागे. कार्यकर्ते नेहमीच अपुरे असत. मुळात अशा कामात रस असलेली, ध्येयवादी माणसेच कमी असत. त्यात खेड्यात राहून तेथल्या परिस्थितीला तोंड देत तेथे संसार करायची, मुले वाढवायची तयारी असलेले फार थोडे निघतात. बालवाडीला येऊन मिळालेले सारेच कार्यकर्ते काही या कामात रुळत नसत. काम शिकून तयार होत आणि सोडून जात. गावातून पुरुष कार्यकर्ते फारसे मिळाले नाहीत. काही स्त्रिया, तरुणी मदत करत, तयार होत. परंतु त्यातही अविवाहित स्त्रिया जात; लग्न झाल्यावर त्या साहजिकच संस्थेच्या बांधणीत एकेक दोनदोन चिरे, विटा चढवून सोडून जात. पुन्हा नवीन मदतनीस शोधून काढायचे.

त्यातच बालवाडीच्या कामाला धड सुरुवात होण्यापूर्वीच अध्यापनमंदिर सुरू केले गेले. या अभ्यासक्रमासाठी कस्तुरबा ट्रस्टकडून अखिल भारतातले विद्यार्थी पाठविण्यात आले. बंगाल, ओरिसा, केरळ, मध्यप्रदेश, गुजरात, सौराष्ट्र, महाराष्ट्र अशा सर्व प्रांतांमधून विविधभाषिक विद्यार्थी आले. त्यामुळे अध्यापनाचे माध्यम हिंदी ठेवावे लागले. आणि ज्या मुलांमध्ये काम करून या विद्यार्थ्यांना प्रत्यक्ष अनुभव घ्यायचा असे त्यांची भाषा मराठी, त्यामुळे हे सारेच काम धेडगुजरी स्वरूपाचे झाले. राहण्याची जागा, पाणी, दिवे सर्वांची सोय होईपर्यंत या विद्यार्थ्यांना काही दैनंदिन अडचणी सोसाव्या लागल्या. त्यातच गृहपती म्हणून काम करणाऱ्या अनुताईंची स्वयंपाकाची महाराष्ट्रीय पद्धत. कित्येक मुलांचा त्याला विरोध असे. त्यांचे इथल्या पद्धतीनुसार 'दुधावरची साय काढून ठेवून लोणी कढवणे' या परप्रांतीयांना कद्रूपणाचे वाटे! बाहेरून संस्था पाहावला येणाऱ्या पाहुण्यांना—तज्ज्ञांनासुद्धा या मंडळींपुढच्या अडचणींचा अदृश्य डोंगर अर्थातच दिसत नसे. त्यांना यांच्या कामातले दोष तेवढे दिसत, ते ठपका ठेवून निघून जात!

कोंभाला उगवायचीच अनिच्छा असावी तशी ही धिमी प्रगती... तरुण शिक्षिकाही कधी कंटाळत. त्रासून, वैतागून जात. अडीच अडीच वर्षे झाली तरी रोजचा निम्मा वेळ मुले गोळा करण्यातच जातो, म्हणजे काय? हे तर खडकावर बगीचा करायचा म्हणून खडक सुईने पोखरायला घेण्यासारखे झाले! "हे गावच नको ताई! आपण दुसरीकडे जाऊ या ना! तिकडे आपण..."

अनुताईंसकट साऱ्या तरुण, सशक्त सहकाऱ्यांचे असे उद्‍गार ऐकून पेन्शनीला आलेल्या ताराबाई तरी आपला उत्साह किती दिवस टिकवून धरणार?

परंतु आजूबाजूची मच्छीमारांची गावे, दुबळ्या लोकांच्या वस्त्या तपासून पाहून ताराबाई पुन्हा पुन्हा मान हलवीत.

"छे, खरं काम इथेच आहे. इथेच आपण आपलं काम यशस्वी करून दाखवलं पाहिजे. इतकं पेरतो आहोत, केव्हा तरी काहीतरी उगवेल! प्रत्येक गावी अशीच परिस्थिती असणार. आपल्याला यातूनच मार्ग काढला पाहिजे."

खरी गोष्ट अशी होती की मनाने पेन्शनीला येणे या बाईला माहीतच नव्हते!

सगळ्या अडचणींना तोंड देत, सहकाऱ्यांची समजूत घालीत, एकीकडे मंद हसून ताराबाई म्हणत, "मोठ्या कष्टाने पाच दगड उचलून ठेवले तर ठेवणाऱ्यांना तर वाटतंच की आपण केवढं मोठं काम केलं! बघणारा म्हणतो— हे काय? पाचच का दगड उचलले?" *

साऱ्या सहकाऱ्यांची अशी दमछाक होत होती आणि ताराबाईंच्या मनात मात्र बालशिक्षणाचा प्रचार व प्रसार करण्याच्या दृष्टीने बोर्डी येथे एक बालशिक्षणनगर वसवावे, अशी योजना आकार घेऊ लागली होती.

* शिक्षणपत्रिका, जून १९४८

# १७. खेड्यातील बालशिक्षण

**बोर्डी** येथे बालशिक्षणप्रयोग करीत असताना ताराबाईंनी कमीत कमी खर्चात आणि कमीत कमी वेळात बालशिक्षण सार्वत्रिक करण्याच्या दृष्टीने एक उत्तर शोधून काढले — फिरती बालवाडी किंवा अंगणवाडी.

खेड्यात शहराच्या मानाने वस्ती विरळ, विखुरलेली असते. लांब लांबच्या वस्त्यांमधून पाच पाच वर्षांच्या मुलांना दररोज बालवाडीत येणे शक्य होत नसे. मुले बालवाडीत येत नाहीत असे पाहून ताराबाईंनी आपली 'प्रचारवाडीच' त्यांच्या अंगणात ढकलत नेली... !

ताराबाईंचा शिक्षक रोज दुपारी एका पिशवीत थोडी साधने घेऊन एखाद्या, आधीच हेरून ठेवलेल्या वस्तीच्या दिशेने निघे. तिथे गेल्यावर त्याने एखादी वाडी, खोपटांचा पुंजका बघून तेथली एखादी 'शेणमातीने सारवलेली पडवी किंवा अंगण आपली कार्यभूमी म्हणून निवडायची. झोपड्यांच्या दारांमधून कुतूहलाने डोकावणाऱ्या पोरांना चुचकारून जवळ बोलवायचे, कुणाला झाडू तर कुणाला पाणी आणायला सांगायचे आणि जागेची सफाई करायची. मग आजूबाजूची काही पिंपळाची पाने, पळसाची फुले गोळा करून मध्यभागी थोडे सुशोभन करायचे आणि मुलांना घेऊन कोंडाळे करून बसायचे. एव्हाना या अभिनव शाळेची चाहूल सर्वांना लागलेली असे. लहान मुलांच्या पाठोपाठ त्यांची दहा-बारा वर्षांची भावंडे गोळा होत. अंगणवाडीभोवती कडे करून ती उभी राहात. त्यांच्या पाठोपाठ त्यांच्या लेकुरवाळ्या आया, आज्याही कडेवर तान्ह्या बाळांना घेऊन हजर होत '...हा बाबा आपल्या लेकरांना संगटी घिऊन हा कसला खेळ करतोय ?...'

अंगणवाडीत त्यांना मुलांची अंगसफाई सुरू झालेली दिसे. हात-पाय-तोंड धुऊन केस विंचरल्यावर मुलांच्या रूपात केवढा तरी बदल होई. मग शिक्षकाने सुरू करावीत गाणी. ही गाणी, बडबडगीते मुद्दाम मुलांच्या रोजच्या पाहण्यात असणाऱ्या विषयांवर, व्यवहारांवर, त्यांची करमणूक व्हावी, त्यांच्या जिभांना वळण लागावे व शब्दांकडे, अर्थाकडे त्यांचे लक्ष जावे अशा दृष्टीने रचलेली असत. मोठी मुले टाळ्या वाजवून ताल धरीत. गाणी संपल्यावर थोडे खेळ, मग गोष्टी सांगणे. गोष्ट सुरू झाली की पुरुषमाणसे हातातली कामे बाजूला ठेवून जवळच्या पारावर किंवा पडवीत येऊन बसत, उकिडव्याने पुढे सरकत आणि हौसेने ऐकू लागत.



मग हा शिक्षक तिथे रोज येऊ लागे; जास्त वेळ थांबू लागे. आपल्या हातातली पिशवी तेथेच एखाद्या झोपडीत ठेवायची सोय करून घेई. आणि जमेल त्याप्रमाणे बालवाडीच्या कार्यक्रमांना हस्तव्यवसाय, शिवणकाम, सूतकताई इत्यादींची जोड देऊ लागे. मात्र त्याचा मुख्य भर असे तो आजूबाजूच्या परिसरातून ज्या वस्तू मिळवता येतील त्यांचा साधने म्हणून उपयोग करण्यावर. कधी वाळूवर काटक्यांची चित्रे जुळवायची. कधी झोपड्यांच्या सारवलेल्या भिंतीचा फळ्यासारखा उपयोग करून चित्रकाम चालायचे. सफाई, मातीकाम, घडीकाम, होडीकाम या सर्वांतून मुलांची उद्योगप्रियता, एकाग्रता, एका ठिकाणी बसून काही काम करण्याची सवय वाढीला लागावी असा त्यांचा हेतू असे. एकमेकांशी सहकार्य करून एकत्र उद्योग करायची सवय त्यातून लागे. मुलांची भाषेची कक्षासुद्धा शिक्षकाला वाढविता येई.

अंगणवाडीला वयाची अट फारशी नसल्यामुळे मुलांबरोबर वस्तीचेही अप्रत्यक्ष लोकशिक्षण साधले जाई. मोठी मुलेही चार अक्षरे शिकत, आयाबाया चार टाके घालायला शिकत. प्रौढशिक्षणालाही वाव मिळे. आणि या सर्वांमधून बालवाडीचे संस्कार बरोबर पोचू लागत.

मुख्य म्हणजे अंगणवाडीच्या या उपक्रमामुळे हळू हळू बालवाडीला — शाळाशिक्षणाला योग्य अशी पार्श्वभूमी तेथे तयार होऊ लागे. गावकरी व शिक्षक यांचा रोजच संबंध येई. त्यांचे उपक्रम पाहून, त्यांच्याशी बोलून लोकांना आपल्या गावात एकादी स्थिर बालवाडी असावी, निदान मुख्य बालवाडीत आपली मुले आपण पाठवावीत, असे वाटू लागे. ओढीने काही दिवस एका अंगणात बालवाडी चालविल्यावर तिचा एखादा चुणचुणीत बालसभासद म्हणे,

"भाई, आता उद्या आमच्या अंगणात या, हं का !"

अंगणवाडी हसून होकार देई आणि दुसऱ्या दिवशी ही बिनचाकाची बिनछपराची प्रचारवाडी नवीन अंगणात सरके.

हे साध्य लहान नसे !

बोर्डी गावाच्या आसपास असलेल्या मांगेलवाडा, कुंभारवाडा, भंडारी वस्ती इ. वस्त्यांमधून अंगणवाडीचा हा उपक्रम चांगला यशस्वी झाला. हळू हळू तेथली मुले बालवाडीकडे आकृष्ट झाली. गावापासून दूर असलेल्या आदिवासींच्या पाड्यांमधूनही (उपवस्त्यांमधून) हळपतवाडी, कमळवाडी इ. ठिकाणी अंगणवाड्या चालविल्या गेल्या. खाडीच्या पलीकडे असलेल्या झाई या कोळ्यांच्या गावातदेखील बालवाडीचे हे फिरते प्रचारक पोचले.

अंगणवाड्यांमुळे ग्राम-बाल-शिक्षा-केंद्राच्या बालवाडीने तर बाळसे धरलेच, परंतु

अध्यापन मंदिराच्या ( प्रशिक्षणाच्या ) विद्यार्थ्यांनाही प्रत्यक्ष कामाचा अनुभव घेण्याच्या दृष्टीने त्यांचा उपयोग करता आला. पाचसहा विद्यार्थ्यांच्या तुकडीने परिसराची पाहणी करून आपण कुठे अंगणवाडी काढायची हे निश्चित करायचे आणि रोज तेथे जाऊन साधारणपणे तीन महिनेपर्यंत तेथे अंगणवाडी चालवायची. ही अंगणवाडी चालविताना ज्या अडचणी येत त्या त्यांना स्वतः सोडवाव्या लागत. हळू हळू विद्यार्थी तरबेज होत.

ताराबाईंनी लावलेला हा जो फिरत्या बालवाड्यांचा शोध होता– किंवा आहे– तो आपल्या देशातील ग्रामीण व मागास भागात बालशिक्षणप्रसार, शिक्षणप्रसार करण्याच्या दृष्टीने अत्यंत मौलिक असा आहे. जेथून मुले येणे शक्य नाही अशा दूरच्या टापूतल्या वस्त्यांमध्ये, सर्व ठिकाणी ही अंगणवाडी पोचू शकते. एकच शिक्षक दिवसातून दोनदा दोन ठिकाणी अशी अंगणवाड्या चालवू शकतो किंवा एके ठिकाणी मध्यवर्ती बालवाडी सकाळच्या वेळात चालवून दुपारी तो दुसऱ्या वस्तीवर जाऊन येऊ शकतो. या अंगणवाड्या पावसाळ्यात बंद ठेवाव्या लागत असल्यामुळे तशा हंगामी असतात. शिवाय साधनांच्या वापरावर मर्यादा असल्यामुळे त्यांच्या द्वारा होणारे संस्कार व शिक्षणही मर्यादित असते. परंतु जनतेला शिक्षणाभिमुख करून घेण्याचे महत्त्वाचे कार्य अंगणवाडीमुळे साध्य होई. शिवाय या अंगणवाडीचा वार्षिक खर्चही –शिक्षकाचा स्वतःचा पगार सोडल्यास–दर मुलामागे एकदोन रुपयांपेक्षा अधिक येत नसे.

आतापर्यंतचे बालमंदिर म्हणजे बालकांचे मानसशास्त्र लक्षात घेऊन त्यांच्या विकासाला उपयुक्त असलेल्या साधनांनी समृद्ध बनविलेली अशी एक कृत्रिम प्रयोगशाळा होती. इथे बालमंदिराचे हे स्वरूप बदलले. ती जास्त अनौपचारिक झाली. बालकांच्या ती अंगणात उतरली, ओटीवर चढली, ओसरीवर येऊन बसली.

एकीकडे बोर्डीच्या बालवाडीत द्यावयाच्या असलेल्या प्रत्यक्ष बालशिक्षणाची घडी ताराबाई अत्यंत विचारपूर्वक आणि काळजीपूर्वक बसवत होत्या.

अनेक वर्षांपूर्वी दक्षिणामूर्ती येथे गिजुभाईंचे व ताराबाईंचे संयुक्त प्रयत्न पाहायला आलेल्या महर्षि कर्व्यांनी हे शिक्षण गरीब देशाला परवडणारे नाही असा आक्षेप घेतला होता.

ताराबाई ते विसरल्या नव्हत्या. 'काही थोड्या संपन्न लोकांचा एक प्रकारचा ऐषआराम म्हणून ही पद्धत ठीक आहे ' असा एक सर्वसाधारण प्रवाद एकूण हवेत होता त्याला आता इथे कागदोपत्री किंवा व्याख्यानांतून नव्हे, तर प्रत्यक्ष कृतींद्वारा चोख उत्तर त्यांना द्यायचे होते.

ही बालवाडी महागडी होता कामा नये, ग्रामीण परिस्थितीला योग्य असे तिचे स्वरूप असावे परंतु त्याबरोबरच बालमनोविकासाला आवश्यक अशा सर्व साधनसामग्रीने ती परिपूर्ण असली पाहिजे. पूर्व प्राथमिक–शिक्षणाच्या मूळ तत्त्वांना त्यातून धक्का



लागता कामा नये...

प्रथम बरेच दिवस बालवाडीच्या कार्यक्रमांत गाणी, गोष्टी, गप्पा, अभिनय, खेळ, बागकाम, सफाई यांवरच भर होता व तो आवश्यकही होता. मॉन्टेसोरी साधनांचा वापर येथे करावा की नाही या गोष्टीवर बराच विचारविनिमय झाला आणि अखेर ती वापरणे आवश्यक आहे, असा निर्णय ताराबाईंनी घेतला. साधनांच्या निर्मितीच्या बाबतीत मात्र गांधीजींनी आखून दिलेल्या निसूत्रीनुसार ताराबाई वागणार होत्या. परंतु एखादे धोरण ठरविणे, स्वीकारणे वेगळे आणि प्रत्यक्षात त्याचा अवलंब करणे वेगळे. इथे आता शिक्षकांच्या योजकतेला, प्रयत्नशीलतेला, निर्मितिक्षमतेला भरपूर वाव होता आणि खरे आव्हान होते.

आसमंतातून पाने, फुले, सुरूची फळे, गुंजा, बिया, काड्या आणि शंखशिंपल्या गोळा करण्यात आल्या. बियांच्या रांगोळ्या काढणे, माळा ओवणे, समुद्रातले मासे पकडून छोट्या छोट्या घमेल्यात तळी ' निर्माण ' करून ते जगविणे, पाळणे, केळीच्या सोपटाचा रफिया गवताप्रमाणे उपयोग करून अनेक सुंदर वस्तू, लहान लहान मनीबॅग्ज इ. बनवणे, मातीच्या विटा पाडणे, भिंती सारविणे, चटया विणणे, थोडे बुरूडकामसुद्धा सुरू केले.

बोर्डीपासून जवळच असलेल्या नारगोलच्या समुद्रकिनाऱ्यावर काळी रेती मिळे. एके दिवशी अनुताई पिशवी भरून रेतीच घेऊन आल्या ! या रेतीचा काय उपयोग करता येईल ? जाड कागद घेऊन त्यांना त्यांनी सरस लावला. त्यावर रेती पसरून मग त्याची अक्षरे कापली आणि ती पुठ्ठ्याच्या तक्त्यावर चिकटविली. बाजारात जी अक्षरे साडेपात रुपयांना मिळत ती या पद्धतीने तयार केल्यामुळे आठबारा आणेच खर्च होऊ लागला. चित्रकामासाठी छोटे छोटे तट्टे मातीने सारवून त्यांचे लहान लहान फळे तयार केले. वडाच्या कोवळ्या पारंब्या कापून, ठेचून त्यांचे कुंचले बनवले. गेरू, चुनखडी, पिवळी माती यांचा वापर रंगांसाठी होऊ लागला. चुनखडीत रंग मिसळून निळ्या-हिरव्या रंगछटा तयार होऊ लागल्या. फलकांची तशी कमतरता नव्हती. जमिनी, तवे, पणत्या, अंगण, दारे, भिंती, मातीची मडकी– वगैरे होतीच !

याशिवाय कातरकाम, घडीकाम, होडीकाम, चिकटकाम यासाठी वर्तमानपत्राची रद्दी मिळवली. वर्तमानपत्रांच्या कागदाच्या भेंगळ्या करून, त्यात निरनिराळ्या वजनाचे दगड, रेती भरून, त्यावर आकर्षक लाल निळे बोटीव कागद चिकटवून निरनिराळ्या प्रकारच्या आवाज-डब्या तयार केल्या. अगदी लहान चिंधोरी–कपटे पाण्यात भिजत घालून त्यांच्या लगद्यातून खेळणी, सजावटीच्या वस्तू बनविण्यात येत. मातीकामासाठी कुंभार माती तयार करतात तशी माती तयार करण्याची व्यवस्था बालवाडीत केली. त्यामुळे हेही काम जवळजवळ बिनखर्चाचे झाले. मातीच्या वस्तू वाळल्या की त्यांना रंग दिले जात.

काही मोजकी, विशिष्ट लाकडी साधने स्थानिक सुतारांकडून करवून घेऊन शिक्षकांनी

त्यांना रंग दिले. लाकडापेक्षा पुठ्ठा स्वस्त; तेव्हा गणिताकरता कित्येक साधने पुठ्ठयाची बनवली. ती टिकावीत म्हणून त्यांना वरून तेल्या रंगाचा थर दिला. दशकाच्या पाट्या केल्या. गणिताच्या साधनांमध्ये तुळशीमाळांचाही उपयोग झाला.

शंखशिंपल्यांचे तर संग्रहालयच केले. त्या एका लहानशा किनारपट्टीवर पन्नास प्रकारचे शंख मिळायचे. भोके पाडून माळा, तुरमुऱ्या शंखांचे हार, पैंजण बनवायचे. शंखशिंपल्यांची माहितीपुस्तकेही मिळविली. त्याखेरीज लोकगीतांचा, साहित्याचा संग्रह करण्याचा, खेड्यातील मुलांना रुचतील, पटतील अशा बालगोष्टी तयार करण्याचाही प्रयत्न झाला.

एकूण गांधीजींच्या कल्पना प्रत्यक्षात उतरविण्यात बोर्डीच्या बालवाडीला यश आले. या साधनांची निर्मिती कशी करावी ते शिकविण्याचा मग प्रशिक्षणाच्या अभ्यासक्रमात समावेश करण्यात आला. अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर आपण केलेली साधने बरोबर नेण्याची विद्यार्थ्यांना मुभा असे.

बोर्डीच्या बालवाडीत अग्रस्थान द्यावे लागले स्वच्छतेच्या, अंगसफाईच्या कार्यक्रमाला. शहरातल्या मुलांच्या बाबतीत त्यांच्या पालकांनी घरी केलेले स्वच्छतेचे, आरोग्याचे संस्कार पुन्हा गिरवून घेणे एवढेच काम करावे लागे. इथे परिस्थिती निराळी होती. या मुलांची राहणी गलिच्छ; कपडे—म्हणजे अंगातला फाटका सदरा किंवा ढगळ पोलका सतत धुळीने भरलेला. केसांना तर पाण्याचा, तेलाचा फणीचा किती दिवसांत स्पर्श झालेला नसे. त्यातून हरिजन मुलांचे अवतार म्हणजे तर हातापायांवर खरूज, त्वचारोग, पिकलेल्या जखमा आणि वाहणारी नाके; पोटात जंत आणि डोक्यात उवा!

अशा स्थितीत अभ्यंगस्नाने स्वच्छ कपडे आणि स्वस्त परंतु उपयुक्त अशा देशी औषधांचा पुरवठा व वापर हे बालवाडीचे पहिले उद्दिष्ट ठरवावे लागले. प्रत्येक मुलाला कपडेजोड, टॉवेल आणि स्वतंत्र हातरुमाल पुरविण्यात आला. हे कपडे दररोज साबण-सोड्याच्या पाण्यात उकळले जात. मुलांनी व्यवस्थित आंघोळी कराव्यात म्हणून शिक्षक जातीने या आंघोळीच्या कार्यक्रमात भाग घेत. केस रोज तेल लावून विंचरण्यात येत. उवांचे औषध लावून नहायला घातले जाई. खरजेवर लोशन, मलम यांचा मारा सतत चालूच होता.

या सगळ्यामुळे मुलांना स्वच्छता व स्वावलंबन यांची गोडी कळली. खरजेसारखे त्वचारोग खूपच कमी झाले. आंघोळीची तर नुसती संवय नव्हे, चटक लागली.

उवांचे उच्चाटन मात्र शंभर टक्के यशस्वी झाले नाही. कारण घरी, मुलांच्या आयांच्या डोक्यांत उवांच्या कायमच्या वसाहती होत्या! त्यांनी केस रोज विंचरले, नेमाने औषध वापरले तरच त्यांचा नायनाट होणे शक्य होते. परंतु त्यांना या गोष्टीचे महत्त्व पटविणे बालवाडीला जमले नाही. कारण दररोज केस विंचरणे, आंघोळी करणे,



या गोष्टींना, या बायकांचा नैतिक विरोध होता. रोज वेणी घालणे म्हणजे उगाच नखरे करणे अशी त्यांची धारणा होती आणि संपूर्ण वस्तीचा दृष्टिकोन बदलणे बालवाडीच्या आवाक्यातले नव्हतेच.

साध्या आंघोळीच्या उपक्रमानेसुद्धा इतिहास घडवला!

प्रथम केवळ हातपाय धुणे, केस विंचरणे सुरू केले. परंतु खेड्यातला पुरुषवर्ग दिवसभर कामाच्या जागी— कोळी असतील तर समुद्रावर— व उरलेला वेळ दारूच्या गुत्त्यावर घालवायचा. बायकांना मासे विकणे, लाकूडफाटा जमविणे इ. उद्योग असत. अशा स्थितीत मुलांपुढे सतत धुळीत खेळण्यावाचून मार्ग नसे. आठ–आठ दिवसांत त्यांच्या अंगांना पाणी लागत नसे. मुले बालवाडीत आली की घामाचा भपकारा येई.

तेव्हा या वरवरच्या स्वच्छतेने काहीच साधणार नव्हते. शाळेत विहीर होती. तेथे रोज प्रथम आंघोळी उरकायच्या ठरले. परंतु थोड्याच दिवसांत घरून तक्रारी आल्या— "थंड पाण्याने मुलं आजारी पडतायत."

कार्यकर्त्यांनी धीर सोडला नाही. गरम पाण्याची व्यवस्था केली. परंतु कपडे रोज तेच तेच. मग खरूज कशी मिटणार? तेव्हा मग मुले आणि शिक्षक रोज कपडे धुऊ लागले. या पद्धतीमुळे खरूज, डोळे येणे बरेच आटोक्यात आले. मुले नजरेलाही स्वच्छ, नीटनेटकी दिसू लागली. कार्यकर्त्यांना स्वतःची पाठ थोपटून घ्यावीशी वाटते, तेवढ्यात— शहरातले एक अधिकारी बालवाडी पाहण्याकरता आले.

ते म्हणाले, "अरेरे, या मुलांचे कपडे किती घाणेरडे! यांना स्वच्छ नाही ठेवता येणार?"

"हे कपडे धुतलेलेच आहेत! मुलं दररोज आमच्यासमोर आंघोळी करतात. रोज इथेच आम्ही त्यांचे कपडे धुतो."

"तर मग तुमच्या स्वच्छतेचा दर्जा फारच कमी दिसतो!" शेरा मिळाला, "छे, छे. अजून कितीतरी स्वच्छ कपडे हवेत." ते मान हलवीत निघून गेले.

ताराबाई विचारात पडल्या. इतके करून आपण कमीच पडतोय? आता शहरातल्या-प्रमाणे परीटघडीच्या कपड्यांचे उद्दिष्ट ठेवले तर त्याच्याकरता पैसा कुठून आणू? रोजचा गरम पाण्याचा, साबणाचा, तेलाचा खर्चच अजून संघाकडून मंजूर झालेला नाही. पदरचेच पंचवीस रुपये त्यासाठी खर्ची पडले आहेत.

आणि पालकांजवळ तरी काय मागायचे?— ह्या मंगीची आई टोपल्या विणते, त्या बाजारात नेऊन विकते, त्याच दिवशी रोख पैसे मागितल्याबद्दल मारवाड्याच्या शिव्या खाते, मग राळे विकत आणून दळते. तेव्हा कुठे भाकरीचा चतकोर मंगीच्या पानात पडतो.

आता या आनंदी-आनंदात मंगीचा परकर परटाकडे द्या, म्हणायचे?

नाही, आपण कपडे वाफवून, पाण्यात जंतुनाशके घालून धुतो. उन्हात वाळवतो. आरोग्यदृष्ट्या ते स्वच्छ असतात. खेड्यात त्यांच्यावर मातकट कळा येणारच. परीट-घडीची सफेदी हा केवळ डोळ्यांचा विलास आहे. शेवटी ठरवले, चिरपैशाने होईल तितके करावे आणि अधिकारी मंडळीने " स्वच्छता फार कमी " म्हणून दिलेला शेरा हसतमुखाने स्वीकारावा.

—आणि मुलांना द्यायला कपडे कुठले आले ? तोही एक स्वतंत्र अनुभवच ठरला !

उद्‌घाटन समारंभाच्या वेळी बाहेरगावाहून काही प्रतिष्ठित मंडळी आली होती. मुलांमध्ये वेडाचांभाराची होती, खाटकांचीही होती. गावातली वाण्याविण्यांचीही होती. पण पाहतात तो अर्ध्याहून अधिकांची दिगंबरावस्था !

" यांना कपडे नाहीत काय ? "

" आपण दिले तर ? "

तिथल्या तिथे वर्गणी गोळा करून त्यांनी तीस चाळीस रुपये हातावर ठेवले.

" हे पैसे घ्या; मुलांना कपडे शिवा. "

ताराबाई विचारात पडल्या. असे कपडे मुलांना द्यावेत की नाही ? दानावर जगण्याची सवय त्यांना लावावी की नाही ? बरे हे दानही कसे ? अर्धे दयेपोटी आणि अर्धे मोठ म्हणून अंगावर टाकलेले.

ताराबाई विचारच करीत होत्या.

पुन्हा काही दिवसांनी आणखी श्रीमंत लोक आले. त्यांनी कपडे बरोबरच आणले होते.

ताराबाईंनी विचार केला, त्यांच्या नशिबात आहेत तर द्यावेत झाले. गावातून येणारी मुले मुंबई धर्तीचे चमकदार कपडे अंगभर घालून येतात आणि ही झोपडीतली उघडीच ! एका शाळेत एवढा फरकही योग्य नव्हे.

कोणी सुचविले, " —द्यावेत; पण इथे घालण्यापुरते द्या. जाताना काढून ठेवावेत त्यांनी. "

पण तेही बरे वाटेना. द्यायचे तर देऊनच टाकावेत. घरी घाणेरडे राहा. रस्त्यावर उघडे फिरा नि शाळेत मात्र स्वच्छ कपडे घाला म्हणायचे ?

कपडे दिले. रोज रूप मळत होते, रोज धुतले जात होते. अशाने ते लौकर फाटतील ? फाटू द्या. त्यातून त्यांना स्वच्छ राहण्याची सवय लागेल.

एक जोड फाटला.

आता ? आता पालकांकडून त्यांच्या ऐपतीप्रमाणे आणा–दोन आणे घ्यावे. संस्थेने त्यात भर घालावी आणि नवे शिवावेत.

शिंपी बसवला. मापे घेतली. अर्धी चड्डी नि अर्धा सदरा. मुले खुश झाली; अंगभर



कपडे ल्याली होती ! पण आईबापांकडून पैसे कुठे आले ? त्यांची प्रतिक्रिया कशी ?

" काय झालं दिले कपडे मुलांना एकदा तर ! दरमहा एक–दोन आणे द्या म्हणतात, भीक लागली काय ह्यांना ! "

पुन्हा पुन्हा मागण्याची ताराबाईंनाच लाज वाटू लागली. मागे एकदा कपड्यांसाठी आलेले पैसे शिल्लक होतेच. त्यांनी वसुलीचा नाद सोडला.

सहा महिन्यांनी कपडे परत फाटले. धुणारी बाईही सोडून गेली. धुण्याचे काम शिक्षिकांनी आणि प्रशिक्षणाच्या विद्यार्थ्यांनी करायचे ठरले.

पण फाटलेले शिवायचे कोणी ?

" आयांना सांगू या ! "

आयांनी मुळीच दाद दिली नाही. " इथे कोणाला वेळ आहे ठिगळं लावीत बसायला ! "

काही आया येऊन उलट शिक्षिकांनाच जाब विचारू लागल्या,

" हल्ली कपडे नीट धुतले का जात नाहीत ? माझ्या मुलांचे पाहा ना, किती घाणेरडे आहेत ! "

ताराबाई थक्कच झाल्या.

मुले बिचारी आपल्या हाताने कपडे धूत होती. ट्रेनिंगच्या विद्यार्थिनी खळबळून देत होत्या नि आता आम्हांलाच ...

सुरुवातीला जे वाटले होते की हे धर्मादाय कपडे हितकारक होणार नाहीत, यांना स्वाभिमानशून्य बनवतील, —ते खरे झाले !

ताराबाईंनी अनुभवाच्या पोतडीत हा मुद्दा जमा केला. प्रत्येक अडचण एकेक स्वतंत्र पाठ देत होती !

बालवाडीच्या कार्यक्रमात नास्त्यालाही विशेष महत्त्व होते. नास्त्याची तयारी करणे, पदार्थ वाढणे, मागची आवरासावर हे सर्व मुलेच करीत. या कामातही शैक्षणिक दृष्टिकोन असे. सांडासांड न करता वाढावे कसे, द्रव पदार्थ कसे प्यावे, सारे शिकविले जाई. हा आहार विनामूल्य देण्यात येई. मुलांना कमीत कमी खर्चात चौरस आहार देण्याचा बालवाडीचा प्रयत्न आर्थिक अडचणीमुळे पूर्णांशाने सफल झाला नाही. तरीही मुलांना कच्ची फळे, भाजीपाला, मोड आलेली कडधान्ये, कोशिंबिरी इ. आहार देण्यात येई. बकरीचे दूध सात सात वेळा उकळून (साथीच्या दिवसांत) मुलांना पाजले जाई. दही-केळे, चुरमुरे उसळ, गूळ–कणकेचे लाडू असे पदार्थ मुलांना पुरवले जात. अमेरिकन ' केअर ' संस्थेकडून दुधा–तुपाचे डबे मिळवून तेही उपयोगात आणले जात. शिवाय नास्ता मिळावा म्हणून बालवाडीत यायचे, अशी मुलांची समजूत होऊ नये म्हणून मधून एखाद्या दिवशी नास्ता रहितही केला जाई.

बालवाडीबरोबर बुनियादी पद्धतीची प्राथमिक शाळा चालविण्याचे कामही ताराबाईंनी करून पाहिले.

ग्राम–बाल–शिक्षा केंद्राच्या मागच्या बाजूला आवारात लागूनच लोकलबोर्डाची एक प्राथमिक शाळा होती. ह्या शाळेत एकूण पन्नास मुले होती. एकात एक मिसळलेले चार वर्ग होते. आणि एक शिक्षक. या शाळेचे नाव होते हरिजनशाळा ! या एकखणी शाळेत आतापर्यंत ज्ञान–दान–संपादनाऐवजी चिक्कूच्या व्यापाराचेच काम अधिक तन्मयतेने केले जात असे ! मुलांची हजेरी फार कमी असे. शिक्षक स्वतः हरिजन. तो हरिजन बायकांकडून टोपल्या विणून घेई आणि मग त्या व्यापाऱ्यांना विकत असे.

ताराबाईंनी या शाळेकडे लक्ष पुरवायचे ठरविल्यानंतर प्रथम राज्याच्या शिक्षणखात्याकडून तशी मंजुरी मिळविली व खर्चही मंजूर करून घेतला. त्यानंतर लोकलबोर्डाकडे अर्ज करून शाळेची खोली व तिच्यापुढचे आवार यांभोवती चांगली आठनऊ फूट उंचीची एक भिंत बांधून घेतली. शाळेत गुरे शिरेनाशी झाली. शाळेला बंदिस्तपणा आला. खोलीला मागील बाजूला एक दार पाडून घेऊन एक मांडव घातला. तेथेही काही वर्ग बसू लागले. अंगणात थोडा भाजी–पाला लावला. सूतकताईकरता थोडी जागा राखून ठेवली. शिवाय पूर्वी या शाळेत फक्त हरिजन मुले येत असत. आता ताराबाईंनी शाळेचे नाव बदलून शाळा नं. २ असे करून घेतले. त्यामुळे गावातली मुलेही येऊ लागली. शाळेचे बदललेले नीटनेटके स्वरूप, उत्साही शिक्षक व नवीन अभ्यासक्रम पाहून पूर्वीची मुलेही अधिक नियमित झाली !

मुलांची उपस्थिती निश्चित करून घेतल्यावर ताराबाईंनी सूतकताई व बांबूच्या टोपल्यांचे विणकाम या दोन उद्योगांचा त्यांच्या अभ्यासक्रमात समावेश केला. या मूलोद्योगांचे शिक्षणाचे माध्यम करण्याचा त्यांचा प्रयत्न होता. या सर्व सुधारणांमुळे मुलांमध्ये थोडीफार शैक्षणिक, सामाजिक प्रगती दिसून आली. सरकारी निरीक्षक व लोकलबोर्डाचे अधिकारी समाधान व्यक्त करीत होते. परंतु ताराबाई मात्र आपल्याला मिळालेल्या यशावर संतुष्ट नव्हत्या. त्यांच्या मनात हळूहळू एक नवीन योजना आकार घेऊ लागली होती.

१९४५ च्या जूनमध्ये बोर्डीची बालवाडी सुरू झाली आणि लगेच १९४६ च्या मार्चमध्ये कस्तुरबा ट्रस्टच्या कार्यकर्त्यांनी अध्यापन मंदिर सुरू करण्याचा आग्रह धरला. कस्तुरबा निधीतून त्या वेळी खेड्यापाड्यात काम करण्यासाठी देशभर ग्रामसेविकांचे वर्ग काढण्यात आले होते. या सेविकांना दोन वर्षे सर्वसामान्य ग्रामसेवेचे प्रशिक्षण दिले जाई व मग त्यांचे तीन गट पाडले जात– ( १ ) ग्रामोद्योग, ( २ ) रुग्णसेवा व ( ३ ) बालशिक्षण. यांपैकी कोणत्याही एका विषयात त्यांना विशेष शिक्षण घ्यावे लागे. पैकी बालशिक्षणाचे प्रशिक्षण घेऊ इच्छिणाऱ्या ग्रामसेविकांना बोर्डी येथे पाठवावे, अशी ही योजना होती. त्याप्रमाणे मार्च ते जून असा तीन महिने पहिला अध्यापनवर्ग चालवला



गेला. या वेळेपर्यंत मुख्य बालवाडीचे काम नीट रुळले नव्हते. त्यामुळे विद्यार्थ्यांना प्रात्यक्षिकातून प्रत्यक्ष अनुभव पुरेसा मिळेना. केंद्रात कार्यकर्ते आधीच मोजके; त्यामुळे एखादा आजारी पडला की अननुभवी शिक्षकाला जबाबदारी निभावून न्यावी लागे. त्यात कस्तुरबा ट्रस्टतर्फे सबंध भारतातील पंजाब, केरळ, बंगाल, राजस्थान मध्यभारत, गुजरात व महाराष्ट्र वगैरे प्रांतांतून विद्यार्थिनी आल्या. या विद्यार्थिनींना हिन्दी माध्यमातून शिकवले जाई. परंतु बालवाडीत येणारी मुले मराठी व गुजराती बोलणारी असत. त्यामुळे प्रत्यक्ष पाठ घेणे, मिसळणे हे त्यांना शक्य होईना. ताराबाईंनी नव्यानेच सुरू केलेले हे ग्रामीण बालशिक्षण केन्द्र पाहायला या काळात बरेच राष्ट्रीय कार्यकर्ते व शिक्षणतज्ज्ञ येऊन गेले व त्यांच्यापैकी काहींनी या सुरुवातीच्या अडचणींना समजून न घेता संस्थेला नावेही ठेवली. परंतु यथावकाश अध्यापनमंदिराचा जम बसला. पहिल्या वर्षानंतर कस्तुरबा ट्रस्टच्या कार्यकर्त्यांना भाषेच्या अडचणीमुळे अन्य प्रांतीय विद्यार्थ्यांसाठी इतर प्रांतात वेगवेगळे प्रशिक्षण वर्ग सुरू करावेत व बोर्डीला फक्त मराठी व गुजराती भाषिक विद्यार्थिनी पाठवाव्यात अशी सूचना करण्यात आली. त्याप्रमाणे १९५५ पर्यंत अशा सुमारे १३८ ग्रामसेविका तेथून शिकून गेल्या व या सर्व जणी पुढे समाधानकारकरीत्या बालशिक्षणकार्य स्वतंत्ररीत्या किंवा नोकरी म्हणून करत राहिल्या.

या प्रशिक्षणाचे बालघर व बालक्रीडांगण असे दोन अभ्यासक्रम ठेवण्यात आले होते. शालान्त परीक्षा उत्तीर्ण झालेल्यांसाठी बालघर, तर त्यापेक्षा कमी शिकलेल्यांना बालक्रीडांगणाचे प्रमाणपत्र मिळे. पुढे महाराष्ट्र राज्याने पूर्वप्राथमिक शिक्षक प्रमाणपत्राचा अभ्यासक्रम सुरू केला तेव्हा ' बालघरा 'ला पहिले वर्ष झाले असल्याची मान्यता मिळे. १९५० पर्यंत या परीक्षा संस्थेकडूनच बाहेरचे परीक्षक बोलावून घेतल्या जात. १९५१ पासून हे विद्यार्थी सरकारी परीक्षेस बसू लागले.

या ग्रामसेविकांना मुलांना स्वच्छता, भाषाविकास, रीतिरिवाजांचे शिक्षण कसे द्यावे याचे शिक्षण देण्यात येई. ' अंगणवाडी 'मुळे त्यांना प्रत्यक्ष कार्याचा सराव होई व साधने बनविण्याचे शिक्षणही दिले जाई. याशिवाय आवारसफाई, श्रमदान, ग्रामसफाई वगैरे उपक्रम होत. ग्रामसेविकांचा सर्व खर्च कस्तुरबा निधीकडून करण्यात येई.

प्रक्षशिण वर्गातून ग्रामसेविकांखेरीज आणखीही सुमारे ९५ विद्यार्थी हा अयभासक्रम पूर्ण करून गेले. बालवाडी चालविणे हे बायकांचे काम अशी एक समजूत महाराष्ट्रात आहे. लहान मुलांना खेळवणे पुरुषांना कसे जमणार ? परंतु गुजरातेतल्या पुरुषांना तशी शंका येत नाही. भारतातले नूतन–बाल–शिक्षणाचे प्रणेतेच मुळी श्री. गिजुभाई होते ! त्यामुळे बोर्डीत बालअध्यापनकार्य सुरू झाल्यावर अनेक गुजराती व मराठी पुरुष येऊन शिकून गेले.

याखेरीज व्ह. फा. झालेल्या विद्यार्थ्यांसाठी ताराबाईंनी ' पूर्व प्राथमिक शिक्षण

प्रमाणपत्र ' हा दोन वर्षांचा अभ्यासक्रम योजला. बालमानसशास्त्र, शिक्षणशास्त्र, गणित, मराठी, इतिहास, भूगोल इ. विषयांचा त्यात समावेश होता. ह्या अभ्यासक्रमाला सरकारी पुरस्कार होता आणि तो पूर्ण करणाऱ्या विद्यार्थ्यांना प्राथमिक शाळेत काम करण्यासही लायक समजले जाई. हे शिक्षण घेणाऱ्यांसाठी सरकारने दहा शिष्यवृत्त्याही ठेवल्या. आठ वर्षे हा अभ्यासक्रम चालू होता.

सातारा, सोलापूर, खानदेश अशा दूरच्या जिल्ह्यांतूनही विद्यार्थी येत. मात्र शासनातर्फे शिष्यवृत्त्या देऊन जे विद्यार्थी या प्रशिक्षणासाठी बोर्डीला पाठविण्यात येत ते लोकल-बोर्डाकडून निवडले गेलेले प्राथमिक शाळेचे अप्रशिक्षित शिक्षकच असत. त्यांना हे काम करणे तितकेसे पसंत नसे. इतर विद्यार्थी येत तेही शहरातील इतर प्राथमिक ट्रेनिंग कॉलेजांमध्ये प्रवेश न मिळालेले असत. या सर्वांचा ओढा शहराकडे असे. संस्थेचा जो ग्रामीण बालशिक्षणासाठी शिक्षक तयार करण्याचा मूळ उद्देश तोच यामुळे बाजूला पडू लागला. त्यातच १९५६ पासून पुन्हा शासनाचे धोरण बदलले. पूर्वप्राथमिक शिक्षणाचे प्रमाणपत्र प्राथमिक शाळांमध्ये मान्य करू नये, असे ठरले. त्यामुळे लगेच अध्यापन मंदिराच्या विद्यार्थ्यांच्या संख्येवर परिणाम झाला. दरम्यान सबंध संस्थेचे आदिवासी भागात स्थलांतरच करावचे वाटत होते. १९५८ साली अखेर बोर्डीचे ग्राम–बाल–अध्यापन-मंदिर बंद करण्यात आले.

अध्यापनमंदिराच्या विद्यार्थ्यांसाठी संस्थेमध्ये दोन वसतिगृहे होती. या वसतिगृहांमध्ये स्वावलंबनाला फार महत्त्व असे. पुरुष व स्त्रिया राहत वेगळे, परंतु काम एकत्रच करीत. सफाई, निवडण, स्वयंपाक इ०, सर्वांच्या सहकार्याने होत. भोजनालयात सर्व विद्यार्थी, ताराबाईसुद्धा सर्व कार्यकर्ते व संस्थेत येणारे पाहुणे हे सर्वजण जेवण घेत. पाहुण्यांची संख्या कधी पन्नास–साठ इतकीही असे. परंतु सर्व कामे विद्यार्थी शिस्तीने पार पाडीत. पहाटे पाच वाजताच्या प्रार्थनेपासून वसतिगृहातला योजनाबद्ध दिनक्रम सुरू होई तो संध्याकाळच्या प्रार्थनेपर्यंत. खादीचा पोशाख बरीच वर्षेपर्यंत सक्तीचा होता. रोज सूतही कातावे लागे. सर्व धर्मांचे सण, राष्ट्रीय सण या ठिकाणी साजरे केले जात.

या वसतिगृहांमधले सहजीवन हाच एक स्वतंत्र अनुभव व शिक्षणाचा भाग असे. पाहुणे मंडळी वसतिगृहातल्या वातावरणाबद्दल आवर्जून कौतुकोद्‌गार काढीत. अर्थात नेहमीच या वसतिगृहातले कार्यक्रम सुरळीत पार पडत असत किंवा विद्यार्थी तेथे पटकन् रुळत असत अशातला भाग नव्हे! अडचणी येतच—कार्यकर्त्यांच्या दृष्टीने आणि विद्यार्थ्यांच्या दृष्टीने—परंतु ताराबाईंच्या कुशलतेमुळे, खंबीरपणामुळे या निरगाठी सोडविल्या जात.

...१९५६ साली दोन तरुण अविवाहित शिक्षिका ताराबाईंच्या संस्थेतील बाल-अध्यापन मंदिरात नोकरी करण्यासाठी म्हणून बोर्डीला हजर झाल्या. घोलवड स्टेशनवर उतरून टांगा करून त्या संस्थेत पोचल्या. बोर्डी गावातले वातावरण एकूण खेडेगावी, हवाही खरखरीत होती. वसतिगृहातली ती पहाटेची प्रार्थना, स्वावलंबी जीवन, बिनतिखट जेवण आणि सारी माणसे सदैव कामात ! त्यातही अर्धी गुजराती !



पहिले सत्र या शिक्षिकांना जरा जडच गेले, आणि त्या तेथल्या वातावरणाला रुळतात तेवढ्यात एक भानगड उद्‌भवली.

ताराबाईंना कुणीतरी एक घागरभर काकवी भेट पाठविली होती. आजारामुळे पथ्य सुरू करावे लागेपर्यंत ताराबाई वसतिगृहातच जेवत. त्यांनी काकवीची कळशी वसतिगृहात पाठवून दिली. सगळ्यांना एकदा जेवणात काकवी वाढून झाली आणि कळशी ' रखोड्या 'च्या ( स्वयंपाक घराच्या ) कपाटात गेली. चार दिवसांनी पाहतात तो मुंगळ्यांनी ये–जा सुरू केली आहे. अनुताईंनी काकवी विहीरीजवळच्या उन्हात नेऊन ठेवली.

थंडीचे दिवस असल्यामुळे काही प्रशिक्षणाचे विद्यार्थी तेथेच आसपास अभ्यास करीत बसले होते. जेवण झाल्यावर भोजनमंत्र्याने कळशी आत नेली व त्यात भाजलेली कणीक घालून मधल्या वेळेसाठी लाडू तयार केले. शिक्षकांनी, मुलींनी ते आवडीने खाल्ले. परंतु काही विद्यार्थ्यांनी मात्र लाडू तसेच्या तसे उकिरड्यावर फेकून दिले. ते आपल्याच गुर्मीत होते. रात्री जेवणाच्या वेळी प्रार्थना होताच त्यांनी शिक्षिकांविरुद्ध तक्रार गुदरली, " त्या काकवीत कुत्र्याने तोंड घातले होते. तरी ताईंनी ती तशीच लाडूत मिसळून आम्हांला खायला घातली. "

या दोन नव्या शिक्षिकांवर प्रकरण शेकणार असे दिसू लागले. त्या गोऱ्यामोऱ्या झाल्या. तशी विद्यार्थ्यांची कावकाव आणखीच वाढली. " ...आम्हाला काय माहीत...मुद्दाम थोडीच... ? " त्यांनी खुलासा करायचा प्रयत्न केला, परंतु त्या गांगरल्याच होत्या. मुलांचे धोरण चढाईचे होते. ताराबाईंना त्यांचेच खरे वाटले तर? आपल्या बाजूने पुरावा काहीच नाही. ठपका आला तर ?

ताराबाई शांतपणे तेथून निघून गेल्या. जाताना त्यांनी म्हटले, " बरं, मी उद्या बघेन. आज आता सगळी शांतपणे झोपायला जा. "

दोन दिवस वातावरण तंग होते. कुंदाताई, शकुताईंची झोप उडाली होती. त्या हळव्या पोरसवदा शिक्षिका मनाने राजीनाम्यापर्यंत पोचल्या !

दुसऱ्या रात्री प्रार्थनेनंतर ताराबाईंनी विचारले, " काकवीच्या कळशीत कुत्र्याने तोंड घातलेलं कोणी पाहिलं ? "

पाचसात विद्यार्थी उभे राहिले. " तुम्ही जर बघितले होते, तर ही गोष्ट तुम्ही जबाबदार व्यक्तीच्या कानावर का घातली नाही ? कुत्र्याला हाकलले का नाहीत ? "

आता विद्यार्थी चुळबूळ करू लागले. एकमेकांवर ढकलू लागले. ताराबाईंनी एका

मुलीला ती रिकामी कळशी आणायला पाठविले. ती पाहिल्यावर त्या म्हणाल्या, "कळशीच्या एवढ्याशा तोंडातून कुत्र्याचे तोंड आत गेले कसे ? आणि जेमतेम अर्ध्या-पर्यंत काकवी होती, ती त्याला खाता तरी कशी आली ?"

अखेर 'कुत्र्याने काकवी खाल्ली' ही सारीच दंतकथा ठरली ! विद्यार्थी खजील झाले. ते गेल्यानंतर ताराबाईंनी दोन्ही शिक्षिकांना जवळ बोलावून म्हटले, "आता निश्चित-पणानं निजायला जा. न बोलता दोन दिवस शांत राहिलात म्हणून बरं वाटलं. चावरून जाण्याने, संतापण्याने गुंता जास्तच वाढतो ..."

—वसतिगृहामध्ये एकेका खोलीत चार-चार विद्यार्थिनींना गटाने राहावे लागे. दरमहा समूहरचना बदले, चौकडया फुटत. शहरातल्या एका सुखवस्तू कुटुंबातल्या सुविद्य विद्यार्थिनीची गोष्ट.—संस्थेतली श्रमी, आश्रमी राहणी तिला जड जात होती. ती आपली खोलीतल्या एका प्रौढ विद्यार्थिनीचा पदर धरून असे.

दुसऱ्या खोलीत जावे लागले तेव्हा ती ओक्साबोक्शी रडलीच ! ताराबाईंना हे समजले तशी त्यांनी धारदार प्रतिक्रिया व्यक्त केली,

"या पदवीधर मुली आणि अशा रडतात कशा ?"

विद्यार्थिनीला त्या कठोर शब्दांतले आव्हान जाणवले.

पुढे वर्ष संपत आले. त्या विद्यार्थिनीचे लग्न ठरले. लग्नाच्या आदल्या दिवशीपर्यंत परीक्षेचे पेपर्स होते. म्हणून ती घरी न जाता परस्पर लग्नाला जाणार होती. आता तेथून ती एकदम सासरीच जायची होती ! आणि 'ताई' त्या सौभाग्यकांक्षिणीचे पोटच्या लेकी-चे करावेत तसे कोडकौतुक करीत होत्या. तिला जिलबी आवडे म्हणून त्या रोज स्वयंपा-कीणबाईंना थोडे पीठ भिजवायला सांगून जिलब्या करून घेत आणि तिला त्या खायला लावीत !

—एखादी लग्न करून गेलेली विद्यार्थिनी भेटायला आली की त्यांनी म्हणावे "अग, आलीस की इथेही दोनतीन दिवस राहत जा ! हेही तुझं माहेरच आहे." आणि तिसऱ्या कुणी त्यांच्यावर केलेली कविता वाचून दाखवली की त्या हसून म्हणत, "असले उप-द्व्याप करायला वेळ आहे वाटतं तुला !"

अनुताई तर गृहमाता या नात्याने विद्यार्थ्यांच्या माऊलीच बनलेल्या. विद्यार्थी आणि गृहमाता असे वेगळेपण नसे. रविवारी धान्य निवडण्याचे काम असे; अनुताई स्वतः ताटात धान्य घेऊन निवडायला बसत. महिन्यातून एक दिवस अनुताईंसह सारे पाणी भरण्यापासून फरशी पुसण्यापर्यंत, स्वयंपाकापर्यंत सारी कामे करीत. विद्यार्थी त्या दिवशी फक्त जेवायला येत. खर्च जास्त झाला म्हणून एखाद्या महिन्याला दूध कमी घेऊ म्हणून



मोजनमंत्र्याने सुचविले की अनुताई मोडता घालीत; "माझ्या तरुण मुलींच्या खाण्या-पिण्यात काटकसर मी करू देणार नाही." कॅम्पला मुलींना नेले तरी तेथे दुधा-ताकाची व्यवस्था हटकून करीत. स्वतःच्या पोळ्यांना तूप आहे, पण मुलींच्या पोळ्यांना लावलेले नाही असे दिसले की अनुताईंनी पोळ्या पानांतून काढल्याच !

१९५० च्या मे मध्ये म्हणजे, बोर्डीचे काम सुरू झाल्यावर पाच वर्षांनी ग्राम-बाल-शिक्षा केंद्राने बोर्डी येथे एक सात दिवसांचे ग्राम-बाल-शिक्षण नगर भरवायचे ठरविले.

या कामासाठी डहाणू व उंबरगाव या दोन तालुक्यातल्या जनतेकडून सुमारे रु. १०००/– मिळवण्यात आले. श्री. भाऊ केळकर व संस्थेच्या इतर कार्यकर्त्यांनी घरोघर हिंडून देणग्या मिळविल्या. मुंबई सरकारच्या शिक्षणखात्यानेही रु. ५००/– चे सहाय्य केले. बोर्डीमधील अनेक संस्थांनी नागरिकांनी या कामात चांगलेच सहाय्य केले.

बोर्डी येथील मराठी शाळेच्या आवारात व इमारतीत दोन भव्य मंडप उभारण्यात आले. बालवाडीचे सर्व कार्यक्रम तपशीलवार करून दाखवणारी अनेक केंद्रे तेथे होती. उद्योगा-लय, बालवाचनालय, भाषाशिक्षण, गणितशिक्षण, उपाहारगृह इ. विभाग होते. दररोज गावातली सरासरी दोनशे मुले या मांडवात काम करीत. विशेषतः उद्योगालयात खूपच गर्दी होई. स्थानिक वस्तूंमधून व ग्रामीण दृष्टिकोनातून केलेली मांडवाची सजावटही लक्ष वेधून घेत होती. नगरात एका शैक्षणिक प्रदर्शनाची मांडणी केली होती. याखेरीज रोज एक व्याख्यान व एक रंजन कार्यक्रम असे आणि रोज सुमारे ५००।६०० लोक त्याचा फायदा घेत. अकरा तज्ज्ञ डॉक्टरांच्या सहकार्याने मुलांच्या शारीरिक तपासणीचीही व्यवस्था केली होती व या अर्भक मेळ्यात सुदृढ बालकांना बक्षिसे ठेवली होती. एकूण १६० मुलांची तपासणी झाली. याखेरीज काही मुलांचे बुद्धिमापन करण्यात आले. याखेरीज बोर्डीमधल्या ४२७ कुटुंबांची सामाजिक पाहणी करून आणखीही ३५० मुलांची शारी-रिक तपासणी करण्यात आली. या कामासाठी अध्यापनमंदिराच्या विद्यार्थ्यांनी घरोघर हिंडून त्या भागातल्या पूर्वप्राथमिक वयाच्या मुलांची माहिती गोळा केली.

या नगराचे उद्‌घाटन फलटणच्या राणीसाहेबांच्या हस्ते झाले. मुंबई, अहमदाबाद, इंदूर, बडोदा इ. ठिकाणांहून अनेक पाहुणेमंडळी समारंभाला येऊन गेली.

या बालशिक्षणनगरामुळे लोकांचे मत बालशिक्षणाविषयी अनुकूल झाले. बालशिक्षण म्हणजे नेमके काय हे त्यांना उमगले. त्यामुळे स्थानिक लोकांचे वाढते सहकार्य केंद्राच्या कार्यकर्त्यांना मिळू लागले. बालवाडीच्या एकूण खर्चाचा एकपंचमांश भाग स्थानिक लोकांनी धान्य व रोख पैशांच्या रूपात देण्याचे कबूल केले. लोकांच्या सहकारानेच केंद्रातर्फे बोलवड येथे 'किरण बालवाडी' ही शाखाही निघाली.

अर्थात संस्थेच्या वार्षिक खर्चाचा प्रश्न तेवढ्याने हलका झाला नाही. ताराबाईंना सतत आर्थिक अडचणींना तोंड द्यावे लागत असे. बालवाडीच्या मुलांकडून फी घेतली

जात नसे, आणि खर्च सतत वाढता. त्यामुळे प्रतिवर्षी दोन–तीन हजारांची तूट येई. अकरा वर्षांच्या संस्थेच्या आयुष्यात अशी एकूण पंचवीस–तीस हजारांची खोट आली. त्यामुळे ही संस्था आजूबाजूच्या दहाबारा खेड्यांचे केन्द्र बनावी व संस्थेशी संलग्न अशा पन्नास बालवाड्या आजूबाजूच्या परिसरात चालवाव्यात हा संघाच्या कार्यकर्त्यांचा मूळ संकल्प पुरा होऊ शकला नाही.

आरंभी सरलादेवींनी पहिल्या वर्षाच्या प्रयोगाचा खर्च रु. १०,०००।– द्यायचे कबूल केले होते. प्रत्यक्षात खर्च सातआठ हजारच झाला. त्यांनी सर्व रक्कम दिली. त्यानंतर संस्थेचा निर्वाह भिक्षांदेहीतून होई. संस्था सरकारमान्य असली तर अनुदान मिळते. परंतु त्यासाठी आगली तेवढी रक्कम संस्थेने देणे आवश्यक असते. शिवाय खाणे, औषधे, तेल, साबण, कपडे इ. कितीतरी गोष्टी कुठल्याही नियमात न बसणाऱ्या. पैशाचे पाठबळ कोण देणार ? प्रांतिक सरकार, ग्रामपंचायत, लोकलबोर्ड, म्युनिसिपालिटी –कुणाचीच हे विकतचे श्राद्ध घ्यायची तयारी नव्हती.

संस्था सरकारमान्य असल्यामुळे तिला एक चतुर्थांश भाग अनुदान मिळत असे. व पाव भाग अध्यापनमंदिराचे विद्यार्थी आपल्या फीच्या द्वारे उचलीत असत. उरलेला निम्मा वार्षिक खर्च दानदेणग्यांनी भरून काढायच्या प्रयत्नात संस्था सदैव असे. गावाची आर्थिक शक्ती लहान; गावातल्या कोणत्याही जातीधर्माच्या अडीच ते नऊ वर्षांपर्यंतच्या मुलाने संस्थेत यावे आणि त्याबद्दल गावाने यथाशक्ती मदत, रोख पैसे, भाज्या, भात, कापड, केळी, चिक्कू अशा कोणत्याही रूपाने करावी असे ठरले होते, परंतु तेवढ्याने तत्त्व सिद्ध होत असे, एवढेच.

पैशाची व कार्यकर्त्यांची अशा दोन्ही अडचणी संस्थेला सतत व जोडीने जाणवत, भोवत राहिल्या. एकात एक गुंतलेले असे अनेक प्रश्न ताराबाई आणि त्यांच्या सहकाऱ्यांना एकाच वेळी सोडवावे लागत होते. खेड्यातील बालशिक्षणाला हात घालण्यापूर्वी ताराबाई असा विचार करीत असत की एक हे बालशिक्षणाचे कार्यच इतके मोठे आहे की, तेवढेच आपण करीत राहावे. इतर सामाजिक, धार्मिक, राजकीय बाबतींत गावकऱ्यांच्या आयुष्यात आपण ढवळाढवळ करायची नाही. कारण सर्वच बाबतींत सुधारणा आरंभल्या तर ' एक ना धड ' पैकी व्हायचे ! मुले मुले तेवढी वेचून काढून आपण त्यांना घडवू , सुधारू. परंतु प्रत्यक्षात एवढे माफक उद्दिष्ट ठेवणे, अलिप्त राहणे अशक्य झाले. बाल-शिक्षकाला खेड्यातले इतर प्रश्नही सोडवावे लागतात, असा अनुभव आला.

सुरुवातीलाच मुलांना स्वच्छ करून घेणे आले, स्वच्छतेचे हे लोण घरोघर पोचवणे आले, त्यांच्या अर्धपोटी अवस्थेवर उपाय शोधणे आले. कधी एकदम आजारपण येई आणि वस्तीला बेजार करून सोडी. गावभर एखाद्या साथीच्या रोगाचे थैमान सुरू होई. एकदा देवीची साथ आली आणि यांच्या आदिवासी भागातल्या हलपत निवास या बालवाडीतली कितीतरी मुले पटापट मरून गेली.



शिक्षक हे सारे पाहत स्वस्थ कसा बसणार ? पोरांच्या पोटातली उपासमार, अतृप्ती त्याला जाणवत असे. सरकारच्या शिक्षणखात्याच्या अंदाजपत्रकात चरखे घ्यायला वाव होता, परंतु मुलांच्या न्याहारीची सोय अजिबात नव्हती ! शिक्षकाला मात्र हा प्रश्न सोडवावाच लागे. या लोकांच्या दारिद्र्याच्या मुळाशी असलेली मद्यपान, कर्जबाजारीपणा लग्नमर्तिकाचे अवास्तव खर्च इ. कीड त्याला दिसत असे. यावर उपाय करायचा म्हणजे मुळाला हात घातलाच पाहिजे. कारण बाहेरून पैसा मिळवून यांना अन्नवस्त्र पुरवली तर फुकटेगिरी, भिकारी वृत्तीच वाढीला लागायची !

आणखी एक म्हणजे श्रम हा शिक्षणाचा पाया हवा, ते शिक्षणाचे माध्यम व्हावे असा ताराबाईंचा दृष्टिकोन होता. त्यांचा भर कृतिशील शिक्षणावर होता. तर या श्रम-जीवी लोकांना श्रमाचे हे महत्त्व म्हणजे आपले अवमूल्यन वाटायचे. श्रम अटळ असले तरी श्रमाची प्रतिष्ठा त्यांच्या मनात नव्हती. श्रमांची काहीशी नावड, नाराजी– किंचित लाजसुद्धा त्यांना वाटत असे. त्यामुळे काही वेळा शिक्षक काम करताहेत, विटा उचलता-हेत आणि मुले स्वस्थ बसून पाहताहेत अशीही दृश्ये दिसत. आम्ही गरीब म्हणून आम्हांला असली हलकी कामे सांगतात, अशी भावना !

शिवाय त्यांची संस्कृती केवढी निराळी ! अस्पृश्यतेचा प्रश्न तर मोठा होताच, परंतु एरवीही खोटे बोलणे, चोरी, मारामाऱ्या, शिवीगाळ—पांढरपेशा समाजात दुर्वर्तनाच्या सदरात मोडणारे हे सारे...त्यांच्या जीवनकलहात जगायची तीच एक पद्धत म्हणून मंजूर होते. बालवाडीत इतके सारे कांदे दिसतात. मग त्यातून चार कांदे घरी कोरड्यास नेले तर काय बिघडते, असा अत्यंत सीधा विचार त्यांच्या डोक्यात असे.

बालवाडीच्या द्वारा अडीच-तीन वर्षांचे कोवळे नागरिक हाती येत. सात वर्षांच्या मुलांना सुधारत बसण्यापेक्षा या बालवयात त्यांच्यात सुसंस्काराचे, सुविचाराचे बी पेरणे सोपे जाईल असा ताराबाईंचा दृष्टिकोन होता. परंतु प्रत्यक्षात पुष्कळदा बाहेरच्या कुसंस्कारांचा गढूळ लोंढा येई. सुसंस्कार मूळच धरत नसत. पुन्हा पुन्हा सारे वाहून जाई. वाळूवरच्या पावलांसारखे पुसले जाई. मुले पुन्हा अस्वच्छ सवयी, उवा, शिव्या घेऊन बालवाडीत येत. बालवाडी पुन्हा नव्या नेटाने त्यांची मने–शरीरे धुऊ–पुसू लागे !

अशा परिस्थितीत गावकऱ्यांच्या खाजगी बाबतींत ढवळाढवळ करणे आलेच. प्रौढ-शिक्षण हवे, आर्थिक सुधारणा हवी, सामाजिक सुधारणा हवी, धार्मिक थोतांड हाकला-यला हवे. हे सारे कितीही हलक्या हाताने केले तरी काही लोक सुधारणार तसे काही बिथरणार. त्याचा परिणाम लगेच मुलांच्या उपस्थितीवर होणार ! परंतु मुलांच्या घरची स्थिती सुधारत नाही तोवर त्यांना शिकवणार काय आणि कसं ? मुळापासून बदलले नाही तर हा समाज सुधारणार कसा ?

परंतु साधना वाया गेली नाही. मुलांमध्ये धिमा परंतु निश्चित फरक दिसू लागला. त्यांची राहणी सुधारली. डोक्यावरच्या जटा लुप्त झाल्या. नजरेतला गावंढळपणा कमी झाला! त्याची जागा उत्सुकतेने, नव्या जाणिवेने घेतली. आरंभी वीस मिनिटेही स्वस्थ शाळेत टिकू न शकणारी मुले रास–गरबे, गाणी–गोष्टी, बागकाम, हस्तव्यवसाय यांत रस घेत गेली. कुठलीही वस्तू सापडली की हिचा रंग कुठला, हा विचार त्यांच्या मनात येऊ लागला. अनुताईंना विचारायला येत! खतासाठी घातलेल्या शेंगांच्या सालांचे ढीग त्यांचे आकार लक्षात घेऊन 'हा गोल', 'हा चौकोनी' असे वर्णिले जाऊ लागले. एरवी खडूने फळ्यावर चित्र काढायचे व दर सात दिवसांनी ड्रॉइंगबुकात एक चित्र काढायचे. मुलांच्या चित्रकलेत निश्चित फरक पडू लागला. शहरी मुलांपेक्षा ही मुले बुद्धीने बराही कमी वाटली नाहीत. लेखन, वाचन, गणित यांत त्यांना तुलनेने कमी रस असे. परंतु प्राकृतिक गोष्टींबाबतचे सामान्य ज्ञान आणि व्यवहारज्ञान यांत ही मुले वरचढच ठरली. घरकामाची सवय असल्यामुळे हस्तव्यवसायातही ती कुशल होती. ब्रश, कात्री, डिंक, सुई, दोरा, पेन्सिल या वस्तूंचा खरा उपयोग कळला व वापर करण्याची संधी मिळाली तेव्हा त्यांनी फार मौलिक काम करून दाखवले. नाचाची अवघड पावले त्यांनी आत्मसात केली; हिशोबही त्यांना समजू लागले.

नवरात्र, वाढदिवस, आनंदमेळा इ. कार्यक्रम, समारंभ करून त्यावेळी पालकांना व इतर गावकऱ्यांना आवर्जून बालवाडीचे काम पाहायला बोलविले जाई. सणाच्या दिवशी विशेष कार्यक्रम असत. अशा वेळी बालवाडीचे सर्व व्यवहार उघड्यावर केले जात. ही बिनभिंतीची बालवाडी पाहायला मंडळी थव्याने येत. मुले मात्र आपल्या कामात रंगून गेलेली त्यांना दिसत. तेव्हा साहजिकच त्यांना कोण कौतुक वाटे!

हळू हळू ग्राम–बाल–शिक्षा केंद्र ही संस्था गावातल्या सांस्कृतिक चळवळींचे केंद्र बनली. खेडेगावातल्या श्रमिक लोकांना आपल्या खाजगी कामांतही संस्थेचा सल्ला हवासा वाटू लागला. बालवाडीतल्या शिक्षणाची चमक बरोबर पोचली होती. गावात फेरी मारताना आता शिवीगाळीऐवजी बालवाडीचीच गाणी ऐकू येत. पालक आता आपण होऊन मुलांना बालवाडीत आणून पोचवू लागले. आपल्याकडल्या पाहुण्यांना मुद्दाम बालवाडीच्या अंगणात आणून त्यांना ते आपल्या ओबडधोबड शैलीने, संस्थेची माहिती देत, 'या आमच्या ताई' म्हणून अपूर्वाईने 'ओळख'ही करून देत!

बोर्डी गावातली पारशी, मारवाडी, ब्राह्मण, व्यापारी, वाडीवाले, कोळी, मांगेला, चांभार, धेड, शेतकरी सगळी पंचमेळ वस्ती बालवाडीने आपलीशी केली. बालवाडीची कीर्ती आपोआप सगळीकडे पसरली. इतरत्रही बालवाड्या निघू लागल्या. बालवाडीच्या साऱ्या उपक्रमांना गावकरी जाणीवपूर्वक व आस्थेने सहकार देऊ लागले.

उद्‌घाटनाच्या दिवशी गांधीजींनी संदेश धाडला होता—



"तुम्ही बोर्डीला जो बालशिक्षणाचा प्रयोग सुरू केला आहे त्यासाठी माझे आशीर्वाद तर तुम्हाला मिळतीलच; पण लाखो खेडुतांचे आशीर्वाद तुम्हाला मिळतील."

गावकऱ्यांचे हे 'बोबडे आशीर्वाद' गाणी गात, चिटुकलेपणाने अभिनय करीत, काळ्या हातांनी मातीच्या बोळक्यांचे मनोरे रचीत, कवड्या मोजीत आणि वाळूची अक्षरे जुळवीत ताराबाईंच्या बालवाडीत, तिला फुटलेल्या पारंब्यांमधून शिकत होते, वाढत होते, घडत होते...

ताराबाईंचे लक्ष मात्र आदिवासी भागातल्या बालकांकडे वेधू लागले होते. बोर्डीतल्या गावकऱ्यांना सरपण, गवत, सागाची पाने इ. विकण्यासाठी रानातल्या वस्त्यांमधून बरीच आदिवासी जमातीची माणसे गावात येत असत. वस्तीच्या आधाराने परंतु गावाबाहेर छोटे छोटे 'पाडे' वसवून ही वन्य माणसे राहत. त्यांचा मुख्य उद्योग होता, मजुरी. "मुलांना बालवाडीत का पाठवत नाही?" म्हणून विचारले की ही माणसे पुटपुटायची, "क्या नाही यायाची?"

—का नाही येणार? प्रत्यक्षात येत मात्र नसत. त्यांच्या या न येण्यामागे त्या जंगली माणसांना शब्दांतून प्रकट न करता येणाऱ्या अशा काही—खास त्यांच्या अशा कौटुंबिक आर्थिक समस्या होत्या.

एकीकडे ग्रामीण बालशिक्षणाची घडी बसविताना दुसरीकडे ताराबाई ह्या आदिवासी मुलांच्या शिक्षणसमस्येबद्दल विचार करू लागल्या होत्या.

# १६. आणखी एकदा प्रभा आणि केव्हीं

सुमारे तीन वर्षे ( १९४५ ते १९४८ ) ताराबाई आठवड्यातील तीन दिवस मुंबई आणि तीन दिवस बोर्डी अशा दोन्ही आघाड्या सांभाळीत होत्या. दोन्हीकडच्या संस्थांमधल्या कुरगाठी, निरगाठी सोडवीत होत्या. रात्री–अपरात्री गाडी गाठीत होत्या, प्रवासातच लेखन, वाचन उरकीत होत्या. इंदिराताईंचे कुटुंब १९४९ सालापर्यंत मुंबईतच होते आणि घरात सतत पाहुण्यांची वर्दळ असे. शिवाय तळमजल्यावरचे देवधरांचे कुटुंब घरच्यासारखेच; आणि त्यातही सरलाताईंचे आणि प्रभाचे विशेष जमे. त्यामुळे प्रभाची तशी त्यांना काळजी नव्हती. परंतु हळूहळू शिशुविहारच्या व्यापातून पूर्णपणे सोडवणूक करून घ्यायची आणि बोर्डीलाच वास्तव्य करून तेथल्या शिक्षणकार्यावर आपले प्रयत्न केन्द्रित करायचे असा त्यांचा दृष्टिकोन होता. आणि त्या दृष्टीने त्या प्रभालाही आपल्याबरोबर बोर्डीला चलण्याचा, तेथल्या कामात रस घेण्याचा आग्रह करीत होत्या.

परंतु प्रभाला आईचा हा नवा उपक्रम अजिबात पसंत पडला नाही; तिने खेड्यात जाणे साफ नाकारले. बोर्डीला ती आईबरोबर मधूनच एखादी खेप करीतही असे. परंतु तेथले वातावरण, ताराबाईंचे तेथले काम यात तिचा जीव बिल्कूल रमत नसे. कंटाळून ती मुंबईला निघून जाई. खेड्यातली ती धुळीने भरलेली, लक्तरे पांघरणारी काळीबेंद्री पोरे तिला मुळीच आकृष्ट करीत नसत. तिला वाटे, आईला जे काही कार्य करायचे असेल ते तिने मुंबईत आपल्याजवळ राहून करावे, खेड्यातच कशाला जायला पाहिजे ? ताराबाईंना वाटे, एरीतेवी ही कुठल्याही व्यवसायात रमत नाही, शिशुविहारातही तिला रस नाही, तर मग तिने आपल्याबरोबर का राहू नये ?

सहज सुटण्यासारखी ही निरगाठ नव्हतीच. खरी गोष्ट म्हणजे प्रभा आपल्या आयुष्यातच रमत नव्हती...

प्रभाचा कुठलाच प्रश्न सुटण्यासारखा नव्हता. शिक्षण, नोकरी, व्यवसाय, लग्न, प्रकृती एकाही समस्येला होकारार्थी उत्तर तिला आणि ताराबाईंना सापडू शकले नव्हते. खरे प्रश्नचिन्ह होते तिच्या प्रवृत्तीमध्ये.

१९४५ साली मे मध्ये झालेल्या बंगलोरच्या शस्त्रक्रियेनंतरही सुमारे ५ वर्षांनी तिच्यासाठी आणखी एक इलाज सापडला होता. कलकत्ता येथे डॉ. रे नावाचे एक मेंदूतज्ज्ञ होते. ते परदेशातून विशेष शिक्षण घेऊन आले आहेत, तेव्हा त्यांच्याकडून प्रभावर उपचार करून घ्यावेत, असा डॉक्टरी सल्ला ताराबाईंना देण्यात आला होता.



ताराबाईंनी मोठ्या आशेने त्यांच्याशी पत्रव्यवहार सुरू केला. प्राथमिक तपासणीकरिता प्रभाला त्या कलकत्त्याला घेऊनदेखील गेल्या. डॉक्टरांनी तिची तपासणी केली. एक किंवा दोन शस्त्रक्रिया तिच्यावर करण्यात येणार होत्या आणि त्यासाठी ओळीने काही महिने कलकत्त्याला मुक्काम करावा लागणार होता.

ताराबाई जन्मभर सत्त्वपरीक्षाच देत आल्या होत्या. पुन्हा एकदा एक अवघड, गणिताचा पेपर त्यांच्या पुढ्यात टाकला गेला. एवढी मोठी शस्त्रक्रिया म्हणजे पैशांची व्यवस्था करणे आले; वर्ष, सहा महिने कलकत्त्याला बिऱ्हाड करून राहणे आले. धोका तर होताच आणि पुन्हा यशाची खात्री नव्हती. शिवाय ताराबाई इतके दिवस दूर राहिल्या की त्यांचे कार्य डळमळणार, हे ठरलेलेच होते. संस्था आणि कन्या दोन्ही त्यांचीच अपत्ये होती; दोघींना त्यांची तितकीच गरज होती आणि दोघींचाही त्यांच्यावर तेवढाच हक्क होता. दोघींना त्यांनीच जन्म दिला होता. तीव्र निराशेच्या, दुःखाच्या काळातही त्यांना त्यांच्या कार्याने सावरले, तारले होते, हात दिला होता; आणि प्रभा तर त्यांच्या काळजाचा तुकडाच होती...ताराबाईंना निर्णय घेणे फार जड जात होते.

स्वतःच्या दोलायमान मनःस्थितीत त्यांचे प्रभाच्या प्रतिक्रियेकडे थोडे दुर्लक्षच झाले. परंतु प्रभा स्वतः कमालीची घाबरलेली होती. एके रात्री अचानक एवढी मोठी, तिशीला आलेली प्रभा अंधारातच आईजवळ गेली आणि तिला मिठी मारून ओक्साबोक्शी रडू लागली.

" आई, दुसरं काय वाटेल ते कर. मी नाही बरी झाले तरी चालेल पण माझं ऑपरेशन करू नकोस ग. मला कलकत्त्याला जायचं नाही, त्या हॉस्पिटलमधे मी राहणार नाही. मला तू बळजबरीने तिथे नेलंस तर मी खरंच वेडी होईन, कायमची वेडी होईन. मी वेडी नाही आई, त्या वेड्यांच्यात मी राहणार नाही... "

कलकत्त्याच्या रुग्णालयाचा, तेथल्या वातावरणाचा, उपचारांचा प्रभाने विलक्षण धसका घेतला होता. लहान मूल होऊन ती पुन्हा पुन्हा आईला विनवीत राहिली आणि ताराबाई तिची समजूत घालीत राहिल्या. पण प्रभाचे हुंदके आणि शहारे कमी झाले नाहीत. प्रभाच्या मनःस्थितीचा हा एक नवाच मुद्दा उपस्थित झाला होता !

अखेर ताराबाईंनी डॉक्टरांना पत्र लिहून विचारले,

" शस्त्रक्रियेनंतर प्रभा सुधारेल अशी निदान पन्नास टक्के खात्री देऊ शकाल काय ? तेवढी हमी देत असलात तरी मी सगळी जमवाजमव करीन. प्रभाचे ऐकणार नाही. मन घट्ट करीन... "

पण डॉक्टरांचे उत्तर आले, " नाही, तशी काहीच — कसलीच गॅरंटी देता येणार नाही. प्रयत्न करून पाहायचा तर पाहा. यशाचे मी काही सांगू शकत नाही. तुम्हांला चान्सच घ्यावा लागेल... "

ताराबाईंनी चान्स घ्यायचा नाही असे ठरविले. प्रभा आता उपचारांना पूर्णपणे कंटाळलीच होती. कशाचा उपयोग होतच नाही, तर कशाला प्रयत्न करायचे, असे तिला वाटू लागले होते.

प्रभाची बरे होण्याची शेवटची संधी हुकली.

आता एकच पर्याय शिल्लक होता. प्रभाला लग्न करून संसार थाटण्याची, गृहिणी व माता होण्याची आतून विलक्षण आस होती, इच्छा होती हे आता उघड झाले होते. लग्न झाले तर ती सुधारू शकेल असे डॉक्टरांचेही मत होते.

ताराबाईंनी मग हाही प्रयत्न करून पाहायचे ठरवले.

प्रभा गोरी नव्हती, देखणी तर नव्हतीच परंतु तिच्या चेहऱ्यावर गोडवा होता. केव्हींकडून आलेले उमदेपण होते. शिवाय आकर्षक राहणी, टापटीप आणि गोड वागणूक. पण जमेची या सर्व बाजू वजा करून टाकील असे मनोदौर्बल्य लहानपणापासून जाहीरपणे खात्यावर जमा होऊन बसलेले!

तरीदेखील काही काळ तिच्या लग्नाचा विचार झाला. प्रभा मनाने दुर्बल असली तरी तशी ठार वेडी नव्हती. १९४९ सालानंतर गद्रे कुटुंब इंदोरला जाऊन स्थायिक झाले. त्यानंतर प्रभा मुंबईत बऱ्याच वेळा एकटी असे ताराबाई घेऊन जाऊन असत आणि कोणी ना कोणी येणारे, जाणारे असेच. तिला झटका आला तर जवळच्यांपैकी कोणी तरी तेवढी वेळ निभावून नेई. अनुताईसुद्धा किती तरी वेळा प्रेमाने तिचा सांभाळ करीत आणि त्याबद्दल त्यांना सासूबाई, अंबाबाई, म्हैस इथपर्यंत अहेरदेखील सोसावे लागत. पण अशी वेळ वर्ष सहा महिन्यांनी केव्हातरी येई. एरवीच्या, चांगलेपणाच्या काळात ज्यांना तिचा प्रत्यक्ष सहवास घडे त्यांना तिच्याबद्दल केवळ अनुकंपाच नव्हे तर प्रेम, ओढसुद्धा वाटू लागे. अल्प काळ सहवासात येऊन गेलेल्या व्यक्तींच्याही प्रभाबद्दल गोड आठवणी असत. तिच्या या लाघवीपणाचा जवळून अनुभव घेतलेले एक-दोन तरुण तिच्या वैगुण्यांसकट तिचा स्वीकार करायला तयारही झाले.

ताराबाईंचे स्वतःचे प्रभाच्या लग्नाविषयीचे धोरण समंजसपणाचे होते. डॉक्टरांचा अंदाज खोटा ठरेल, लग्नानंतरसुद्धा ती सुधारणार नाही, कदाचित अधिकच दुबळी होत जाईल अशी एक शक्यता होतीच.

"—तसे झाले तर माझी प्रभा मला जड नाही. मी तिला परत घेईन." असे ताराबाई मुलाकडच्यांना स्पष्ट सांगत. जावयाच्या मार्गातून प्रभाला घेऊन बाजूला होण्याची, एवढेच नव्हे तर स्वतः पुढाकार घेऊन त्याचे दुसरे लग्न लावून देण्याची— तसा त्याला शब्द देण्याची— त्यांची तयारी होती. एक प्रयोग म्हणून त्या या विवाहाकडे पाहत होत्या. 'माझी मुलगी आजारी आहे, मी कुणाला फसवणार नाही,' असे त्या म्हणत असत.



परंतु प्रभा आपले हित-अहित समजण्याइतकी शहाणी नव्हती आणि आईचे सांगणे निमूटपणे ऐकून बोहल्यावर चढेल इतकी भोळी किंवा लहान नव्हती. आईने आणलेली सर्व स्थळे, मुलगे ती नापसंत करीत गेली.

कोणत्याही समस्येचे मळेबुरे कंगोरे समजून घेऊन, कोणत्याही कृतीचे परिणाम लक्षात घेऊन योग्य तो निर्णय घेऊ शकण्याइतका समतोलपणा तिच्या वृत्तीत होता कुठे?— मरीला परिस्थितीमुळे अधिक, अधिक कुढा होत गेलेला स्वभाव. तारुण्यसुलभ एकाकीपणा, कुचंबणा, आणि त्यामुळे वृत्तीत शिरलेला एककल्लीपणा, दुराग्रह, मत्सरसुद्धा. आणि या सर्वांच्या भरीला एकीकडे अभिरुचिसंपन्न, दर्जेदार जीवन जगायची स्वप्ने.

—पण म्हणून तिला लग्नाला सक्तीने उभे करता येणे शक्य नव्हतेच.

प्रभाने आपल्या जोडीदाराची प्रतिमा घेतली होती ती आपल्या वडिलांचा 'आदर्श' डोळ्यांसमोर ठेवून! तल्लख बुद्धीचा, सुस्थितीतला, रसिक आणि रूपवान, आपल्या साऱ्या हौशीमौजा पुरवू शकणारा साथीदार तिला अपेक्षित होता. जन्मल्यापासून तिला परिस्थितीशी तडजोडच करावी लागली होती. आता लग्नासारख्या बाबतीत ती तडजोड करायला बिलकूल तयार नव्हती. केव्हींच्या तुलनेत तिला आईने शोधून काढलेले सारे उपवधू तरुण बेरूप, थिटे व सामान्य वाटले, 'ओंगळ' वाटले. प्रभाच्या डोळ्यांदेखत तिच्या मावस, चुलत बहिणींची, मैत्रिणींची लग्ने होत होती; त्या थोरामोठ्यांच्या घरी पडत होत्या. तसेच एखादे 'तोलामोलाचे' स्थळ प्रभाच्या कल्पनेत होते.

"प्रभा, आपली बाजू पडती आहे हे तू लक्षात कसे घेत नाहीस?" ताराबाई तिला पुन्हा पुन्हा म्हणत, "तुझ्यासारख्या मुलीनं थोडी तडजोड करायला नको का? अशाने उद्या जन्मभर एकटं राहायची पाळी आली तर तू माझ्यासारखी राहू शकशील? तुझा तो पिंड नाही. मी माझ्यापुरते पाहायला खंबीर होते, समर्थ होते. माझ्या या कार्यात मी स्वतःचा एकलेपणा बुडवू शकले. तू असं उभं आयुष्य एकाकी काढू शकशील? संधी आहे तोवर लग्नाला तयार हो. हे तरुण सामान्य असले तरी तुझ्या व्यंगासकट तुला 'आपली' मानायला तयार झाले आहेत, यातच त्यांचा मोठेपणा सिद्ध होतो. बाकी सगळं तू गौण मानलं पाहिजेस. मिळेल त्यात समाधान मान. उद्या मी गेल्यावर काय करशील?"

परंतु हा सारा उपदेश प्रभाच्या बाबतीत 'पालथ्या घड्यावर पाणी' ठरत होता! एकेक मुलगा, स्थळ ती नापसंत करत गेली—

"शी आई! हा कसातरीच आहे, आणि काळाकुट्ट पुन्हा!"

"अहं, मुळीच नको! सारखा तोंडात पानाचा तोबरा!..."

"नको ग आई, मला कल्पनेनंच मळमळायला लागतं, मी नाही!..."

तिची एवढी अनिच्छा पाहिल्यावर ताराबाईंचाही नाईलाज झाला, त्यांनी तिच्यावर

सक्ती केली नाही.

प्रभाच्या आयुष्यातली लग्नाची अंधुक शक्यतादेखील मावळली. तिच्या बरोबरीच्या सान्या बहिणींची लग्ने झाली होती. आपल्यापेक्षा लहान वयाच्या बहिणींची, मैत्रिणींची छोटीछोटी मुले खेळवीत प्रभा हळू हळू तिशीकडे सरकत होती. नाही म्हटले तरी या सगळ्यामुळे ती जास्त जास्त चिडचिड करू लागली होती. तिचा लहरीपणा, त्रागा वाढत होता आणि त्याला तोंड द्यावे लागे ताराबाईंना.

इतरांच्या विवाहसमारंभातून भर्जरी वस्त्रे नेसून मिरविताना, करवल्यांच्या घोळक्या-मधून लग्नसोहळे पाहताना हौशी प्रभाच्या मनात दर वेळी असूयेची विषादाची कळ उमटून जाई. बहिणींच्या, मावसभावंडांच्या लग्नाचे दागिने घडविताना कलात्मक, चोखंदळ प्रवृत्तीची प्रभा मनापासून सराफाच्या दुकानातल्या भाग्यवान धक्काबुक्कीत सामील होई, मोठ्या चिकित्सेने घाट ठरवी, तास निवडी. आणखी कुठल्याशा बहिणीच्या डोहाळे-जेवणाची किंवा बहिणीच्या केळवणाची आखणी स्वतः पुढाकार घेऊन तीच करी. चांदीची समई घासून ठेवी, पक्वान्न ठरवी. मनापासून रांगोळ्या घाली. बहिणीच्या भावी पतीचे नाव मधुकर, मधु हे कळताच उत्साहाने बाजारात जाऊन, त्या काळात मिळणारा खास 'मधु राइस' पैदा करी, पानात तो भात वाढताना त्या सौभाग्यकांक्षिणीला चिडवी, उखाणेदेखील पुरवी... परंतु हे सगळे मनःपूर्वक करीत असताना एकीकडे तिच्या मनात तीव्र असंतोष दाटून आलेला असे. आपण केवळ वाळूवर चित्रे काढून त्यात रमतो आहोत, यांतले एकदेखील सुख, भाग्य, स्वप्न आपल्या नशिबात नाही, हे तिला प्रखरतेने जाणवू लागे. मग ती सर्वांचाच राग-राग करी आणि अखेर पुन्हा धारेवर धरी आपल्या आईला!

"का नाही माझं लग्न लावून दिलंस? मी ढीग 'नाही' म्हटलं असेल! तू का माझं ऐकलंस? मी होतेच, आहेच अडाणी; तुला तर समजत होतं ना?"

उत्तर नसलेल्या या प्रश्नाला ताराबाई तरी काय उत्तर देणार? मोठमोठ्या संस्था त्या सांभाळीत होत्या, कार्यकर्ते घडवीत होत्या, समाज वळवीत होत्या; परंतु आपल्या एकुलत्या एका लाडक्या कन्येच्या भावविश्वाचा जो विचका झाला होता त्याची कारणे उमगत असूनही त्यावर इलाज मात्र त्या करू शकत नव्हत्या. सगळ्या जगातल्या लेकरांचा प्रश्न सोडविणाऱ्या ताराबाईंना आपले स्वतःचे एक लेकरू मार्गी लावता येत नव्हते...

कधी कधी मग त्यांचाही तोल सुटे. प्रभाला लहान मुलांची फार आवड होती आणि त्यांच्यात ती फार रमे. परंतु एवढ्या मोठ्या वयात बाहुल्या घेऊन खेळत बसायचाही तिला नाद होता. ताराबाई मग मात्र तिला रागावत. जे सुख मिळण्याची शक्यता असून आपण होऊन नाकारले त्याच्या प्रतिमा हिने आता का कवटाळाव्या? हिचा मनस्ताप



होऊ नये म्हणून संक्षिप्त स्वरूपात करायची ठरलेली डोहाळजेवणे नि केळवणे हिने अशी साग्रसंगीत ओढवून का घ्यावीत —आणि मग निभले नाही की पुन्हा आईलाच आरोपीच्या पिंजऱ्यात उभे करावे?

ताराबाई प्रभाला स्वावलंबी बनवायचा प्रयत्न करीत होत्या आणि ती मात्र वय वाढेल तसतशी आईवर आणखी आपली रेलत, अधिकार गाजवीत चालली होती. आईचा आधार ती जास्त जास्तच गृहीत धरू लागली होती. आईचे लक्ष सतत आपल्यावरच केंद्रित असायला हवे; आपल्याशिवाय दुसऱ्या कुणाला, कशाला ताराबाईंनी महत्त्व देऊ नये हा तिचा हट्ट वाढतच चालला होता आणि आपली मुलगी मनोरुग्ण आहे, दुर्दैवी आणि एकाकी आहे या जाणिवेमुळे एका ठराविक मर्यादेपेक्षा अधिक कठोरपणाने तिच्याशी त्यांना वागता येत नव्हते; तिला त्यांना झिडकारता येत नव्हते.

आईच्या आपल्यावरच्या प्रेमात वाटेकरी निर्माण झालेले तिला सहन होत नसत. आईच्या मर्जीतली माणसे एकीकडे तिला आवडत असत; परंतु आपल्या आईची त्यांच्यावर असलेली मर्जी मात्र तिला पसंत नसे. मग सुशीला (जागिरदार–जोशी) येताना दिसली अन् प्रभा तारेत असली की तिने म्हणावे, "ती आली बघ, तुझी मुलगी! तूच उघड जा दार."

ताराबाई मलूल हसत. प्रेमाचे, स्नेहाचे सगळे धागेदोरे प्रभाखातर कापून टाकणे शक्य नव्हते आणि योग्यही नव्हते. प्रभा मनाने पांगळी होत चालली आहे हे त्यांना दिसत होते पण त्यांचादेखील इलाज नव्हता. केव्हींना तर त्या दोघींच्या आयुष्यात कधीच आधारभूत होता आले नव्हते. त्यांची या बाबतीत काही मदत होण्याऐवजी काही त्यांचेच निस्तरावे लागण्याची वेळ ताराबाईंवर येण्याची शक्यता कायम होती. १९५१ च्या अखेरीस प्रभाने केव्हींना भेटायला जाण्याचा–शेवटचा–ध्यास घेतला. केव्हींची परिस्थिती या वेळपर्यंत अगदीच भणंग झाली होती. प्रभाखातर त्यांना मुंबईला आणणे किंवा त्यांच्याकडे प्रभाला पाठविणे या दोन्ही गोष्टी सारख्याच अवघड होत्या. ताराबाईंनी आपल्या अमरावतीच्या नागपूरच्या स्नेह्यांना, त्या दृष्टीने जातीने केव्हींच्या परिस्थितीचा मनःस्थितीचा अंदाज घेण्यास सांगितले. त्यांचा अंदाज बरोबर होता.

अमरावतीच्या स्नेह्याने लिहिले—

"...काल मी श्री. केव्हींना पाच मिनिटे भेटून आलो. ते बाहेर फिरायला जायला निघतच होते. वयोमानानुसार थकलेले असले तरी ते पुष्कळ हिंडत फिरत असतात व क्वचित मिळणारे कोर्टाचे कामही करतात.

मात्र प्रभाला त्यांना भेटायचेच असले तर माझ्या मते मुंबईला अगर नागपूरला भेटावे, अमरावतीला नाही. साहजिकच त्यांच्या खोलीवर ती जाईल आणि मग तिचे मन हळवे असल्यामुळे त्यांची राहणी, दुःस्थिती तिला बघवणार नाही. तसेच ती त्यांना इतरत्र

कोठेही भेटणार असली तरी ती आपल्याला भेटायला येणार आहे अशी केव्हींना आधी कल्पना दिलेली असावी..."

नागपूरहून पत्र आले—

"...केव्हींची प्रकृती चांगली आहे. काळजी करण्यासारखे काही नाही असे मला वाटते. कारण मागील आठवड्यात मी अमरावतीस त्यांना एकदा कोर्टात भेटलो व दुसऱ्यांदा ते माझ्या घरी अमरावतीस आले होते. तीन दिवसांपूर्वी इथे दीक्षितांकडे येऊन गेले.

केव्हींच्या सध्याच्या जीवनप्रवाहाविषयी मला प्रत्यक्ष काही कल्पना नाही. विचाराविषयी काय म्हणता येईल ? पण त्यांना तुमच्या आजारीपणाची बातमी कळल्यावर त्यांनी केलेल्या तारेला उत्तर तुम्ही दिले नाही म्हणून त्यांना तुमचा राग आला असल्याचे ते मला बोलले.

...प्रभाला आमच्याकडे राहाण्याची कसलीही अडचण नाही. ती फार अधीर झाली असली तर केव्हाही येऊ शकते. पण मला वाटते मी पुढील महिन्यात काही कामानिमित्त मुंबईत येत आहे तेव्हा मी समक्ष तुम्हाला भेटून परिस्थिती सांगीन, तोपर्यंत थांबावे.

मला वाटते १५ ऑगस्टपर्यंत कालिंदीची आई गावाहून परत येईल...ती आल्यावर मग प्रभाला अमरावतीस धाडावे. आठ दिवस ती आमच्याकडे राहील, केव्ही तिथे केव्हाही येऊन तिला भेटू शकतील. प्रभाने त्यांच्या निवासस्थानी जाणे तिला प्रशस्त वाटणार नाही व कालिंदीची आई आली तरच ते तिला न्यायच्या भानगडीत पडणार नाहीत —एरवी ते दबणार नाहीत..."

एकंदर परिस्थिती पाहून ताराबाईंनी प्रभाला अमरावतीला पाठविणे रहित केले. केव्हींची आणि प्रभाची शेवटची भेट हुकली.

याच सुमारास केव्हातरी ताराबाईंनी आपले मृत्युपत्र करून ठेवले व आपल्या खात्यावर असलेली रु. दहा ते पंधरा हजार ही रक्कम प्रभाला आपल्यानंतर मिळावी अशी व्यवस्था त्यांनी करून ठेवली. एरवी, केव्हीच ते बळकावून बसतील व उडवून टाकतील अशी त्यांना भीती वाटत होती. प्रभाच्या आयुष्याचा फासाच तिरपगडा पडला होता; ताराबाई असहाय्य होत्या.

नलमेसारख्या चिखलात गेलेल्या प्रभाच्या आयुष्यात अखेर निर्णायक वेळ उगवली, ती १९५२ साली ताराबाईंना हृदयविकाराचा झटका आला, तेव्हा.

ताराबाईंची प्रकृती मुळात दणकट आणि मनानेही त्या खंबीर. लहानपणी त्यांना फिट्स येत असत, तो आजार तरुणवयापर्यंत टिकला. डोकेदुखीची व्याधी त्यांना प्रथमपासून होती. आणि मानसिक अस्वास्थ्याच्या काळात आणि एरवीही अधूनमधून ती डोके वर काढी. एवढे दोन विकार सोडल्यास जिवापाड मेहनत घेऊन कार्यांचे डोंगर पार करीत त्यांनी मध्यमवय ओलांडले होते. तरीही, दणकट शरीरसुद्धा सततच्या धावपळीला केव्हा ना केव्हा तरी उत्तर देतेच. वयोमानानुसार हळूहळू काही छोट्या-मोठ्या व्याधी ताराबाईंची संगत धरू पाहत होत्या.



१९५१ च्या सुमारास ग्लॉकोमा या गंभीर नेत्रविकाराने त्यांना गाठले आणि त्यातून बराच त्रास होऊन त्या बाहेर पडल्या. त्यानंतर मूत्राशयाचा काही आजार सुरू होऊन दोन शस्त्रक्रियांतून त्यांना जावे लागले आणि हा त्रास काही वर्षे सतत चालू राहिला.

बोर्डी येथे ग्रामीण भागात काम करू लागल्यावर त्यांना टायफस नावाचा हजारात एखाद्याला होणारा रोग झाला. हा आजार एक प्रकारच्या पांढऱ्या ऊ पासून होतो व ती ऊ सापडेपर्यंत मनस्वी डोके दुखते. कित्येक दिवस ही असह्य डोकेदुखी सोसल्यावर एके दिवशी सरलाताईंना ती ऊ सापडली. एरवी हा आजार बरा होणे कठीण.

त्यानंतर कुणाला तरी पदार्थ वाढताना पाय घसरून पडल्याचे निमित्त होऊन त्यांची दोन मोठी फ्रॅक्चर्स झाली. एक हात, एक पाय व कमर तिन्ही ठिकाणी दुखापत झाली, त्यापैकी हाताचा पंजा तर बरेच महिने दुखावलेल्या स्थितीतच होता.

याखेरीज मधुमेह आणि रक्तदाब ही दोन मातबर दुखणी हळू हळू सोबत करू लागली होतीच.

ताराबाईंना हृदयविकाराचा त्रास सुरू झाला तो १९४८ च्या बाल-शिक्षण-नगराच्या धामधुमीत एका कॉन्फरन्समध्ये. हा झटका सौम्य होता, परंतु त्यानंतर ताराबाईंना आवश्यक त्या प्रमाणात विश्रांती घेणे शक्य झाले नाही. बालशिक्षणनगराच्या निमित्ताने इतर नेहमीच्या व्यापांबरोबर अनेक कामे त्यांनी अंगावर घेतली होती. विशेषतः पैसे मिळविण्यासाठी त्यांना या काळात जिन्यांचे चढउतार फार करावे लागले. त्यानंतर लगेच १९४९ साली आठव्या आंतरराष्ट्रीय मॉन्टेसोरी सम्मेलनाच्या निमित्ताने त्यांची साडेतीन महिन्यांची परदेशवारी झाली, त्या प्रवासाहून परत येताच बोर्डी येथील बालशिक्षणनगराची धावपळ सुरू झाली. एकीकडे शिशुविहार व बोर्डी येथील संस्थांचे दैनंदिन व्याप, नूतन बाल शिक्षण संघ, शिक्षणपत्रिका इ. विविध जबाबदाऱ्या होत्याच. त्यातच १९५१—१९५२ हे नूतन बालशिक्षणसंघाचे रौप्यमहोत्सवी वर्ष, म्हणून ठिकठिकाणी बालशिक्षण नगरे भरवायचे ठरले आणि संस्थेच्या मुख्यमंत्री या नात्याने ताराबाईंनी त्यात उडी घेणे—पुढाकार घेणे क्रमप्राप्त ठरले.

अखेर देहाने घंटा वाजविलीच—आणि ती दुसरी घंटा ठरली !

१९ एप्रिल १९५२ या दिवशी ताराबाईंच्या वयाला साठ वर्षे पूर्ण होत होती. त्यांची तब्येत बरी नसल्यामुळे वाढदिवस साजरा करायचा नाही असे ठरले होते आणि विश्रांतीसाठी म्हणून त्या बोर्डीला जाऊन राहिल्या होत्या. वाढदिवसाच्या दिवशी अचा-

नक श्रीमती सरलादेवी साराभाई त्यांना शुभेच्छा देण्यासाठी बोर्डीला जाऊन पोचल्या आणि त्यांनी सगळ्यांना आनंदाचा धक्का दिला. ताराबाईंचा वाढदिवस अगदी साध्या, घरगुती समारंभाने साजरा करण्यात आला. पण नाही म्हटले तरी थोडीफार धावपळ झालीच. आणि तेवढेही ताराबाईंना झेपले नाही. त्याच रात्री त्यांना हृदयविकाराचा झटका आला आणि हा दुसरा झटका तीव्र स्वरूपाचा ठरला. कसेबसे त्यांना मुंबईला हलविण्यात आले.

ताराबाईंच्या परिवाराला त्यांच्यावर औषधोपचार करणाऱ्या डॉक्टरमंडळींनी इशारा देऊन ठेवला, " यांचा काही भरवसा देता येत नाही, मनाची तयारी ठेवा. "

ताराबाई आणि प्रभा दोघीही साहजिकच या दुखण्यामुळे अतिशय अस्वस्थ झाल्या, हादरल्या. दोघींच्या बेचैनीमागची कारणे मात्र भिन्न होती.

या आजारात ताराबाईंच्या प्रकृतीएवढीच त्यांची मनःस्थितीसुद्धा नाजूक झाली होती. कधी नव्हे इतक्या त्या या दुखण्यात मनाने खचल्या; स्वतःला त्यांनी फार मनस्ताप करून घेतला. स्वतःच्या मृत्यूच्या – जीवन संपण्याच्या भीतीपेक्षा त्यांना घोर लागला होता तो प्रभाच्या भवितव्याच्या विचाराने. आपल्यामागून प्रभाचे कसे होणार, तिला कोण सांभाळणार या काळजीने त्यांच्या मनाची नुसती घालमेल होत असे. त्यांना त्यामुळे धड झोपदेखील लागत नसे.

त्यांचे अशक्त मन प्रभावर चिडले होते.

" प्रभा, तू कमालीची हट्टी आहेस. धड शिशुविहारात लक्ष घाल म्हटलं ते घालत नाहीस, बोर्डीला चल म्हटलं तर तीं पण तयारी नाही. मुंबई सोडायला तयार नाहीस आणि ' लग्न कर ' म्हणत होते तर त्यालाही तयार झाली नाहीस. आपल्या हिताची गोष्ट ऐकायचीच नाही अशी तू शपथ घेतली आहेस का ?...

" आता माझं काही नेमाचं नाही. फट् म्हणता मला काही झालं उद्या, तर तुझा हा आजार, तुझा खर्चिक स्वभाव, हे असं मनाला लावून घेणं, संतापणं, कुढणं ... कोण तुला जवळ करणार, तुझी जबाबदारी घेणार ? कसं होणार तुझं माझ्यानंतर ? तुझ्या काळजीने रात्र-रात्र माझा डोळा लागत नाही; प्राणदेखील माझा पटकन् जायचा नाही. तुझ्यामुळे मी मरायलादेखील मोकळी नाही... ! "

प्रभाही मग वैतागून उलट उत्तरे देई. कधी एकसारखी रडत असे. तिच्यापुढे धड कोणताच पर्याय नव्हता. वैफल्य, निराशा, दुःख, अनिश्चितता याशिवाय तिला काही दिसत नव्हते. आईच्या पश्चात आपले काय होणार, ही धास्ती तिच्याही मनाला कुरतडत होती. या सगळ्यामुळे रसिक, हौशी प्रभाचे मन जगण्यालाच कंटाळत चालले होते. भोवतालच्या दऱ्या ओलांडायला तिला मार्गच दिसत नव्हता. नशिबात नसलेल्या सौख्यासाठी जन्मभर आसुसलेली प्रभा आता मनाने खचत, ढळत, ढासळत चालली होती.— आणि हा मार्ग परतीचा नव्हता.



प्रभा वेडाच्या भरात पुष्कळ वेळा जीव देण्याची भाषा करीत असे, धमक्या देत असे. एकदोनदा तिने गॅलरीतून बाहेर पाय टाकून उडी टाकण्याचा अयशस्वी प्रयत्न-सुद्धा केला होता. ती एखादे वेळेस खरोखरच जिवाचे काहीतरी बरेवाईट करून घेईल म्हणून ताराबाई घरातल्या आयोडीन, काऱ्या, औषधे अशा सर्व वस्तू खाली, देवधरांकडे नेऊन ठेवीत असत. ताराबाईंच्या आजारात रोज दोन झोपेच्या गोळ्या त्यांना द्याव्या असत. ही झोपेच्या गोळ्यांची बाटलीदेखील सरलाताईंच्या ताब्यात असे. रोज रात्री त्यांच्याकडून दोन गोळ्या मागून आणाव्या लागत आणि ते काम प्रभाच करीत असे.

त्या दिवशी प्रभा अत्यंत समंजस सुरात सरलाताईंना म्हणाली, " सरलाताई, तुम्हाला रोज त्रास—बाहेर जाण्यापूर्वी आठवणीने आईच्या गोळ्या काढून ठेवायच्या; त्यापेक्षा बाटली बाहेरच ठेवत जा ना ! मी खाली येऊन घेऊन जात जाईन आपली आपण. तुम्ही काळजी करू नका. मी ' तसलं ' काहीएक करणार नाही. माझ्यावर विश्वास ठेवा. "

प्रभावर अविश्वास ठेवला गेला नाही ! बाटली बाहेर काढून ठेवण्यात आली.

एकीकडे प्रभा ताराबाईंची शुश्रूषा फार परिश्रमपूर्वक व प्रेमाने करीत होती तिच्या या परिश्रमांमुळे ताराबाई दुखण्यातून सावरणार असा रंग दिसत होता. प्रभा त्यावेळी शिशुविहारमधला प्रशिक्षणाचा अभ्यासक्रम करीत होती. नेमाने कॉलेजात जात होती. साधने, व्यवसाय करून नेत होती. नवीन, आवडती भजने आपल्या भजनवहीत उतरवून घेत होती– आणि मनातली आंदोलने यशस्वीरीत्या लपवीत होती.

एके दिवशी अचानक तिने सरलाताईंना विचारले, " सरलाताई, समजा आईला काही झालं आणि मी हा कोर्स पूर्ण केला असला तर मला शिशुविहारात नोकरी द्याल ना ? "

सरलाताईंनी आश्वासन दिले, " जरूर देऊ. का नाही ? "

पण प्रसाधन करता करता मध्येच थांबून प्रभा स्वतःशीच पुटपुटल्यासारखी म्हणाली, " पण तिथल्या पगारात माझं कसे भागेल ! आतापासूनच मला माझ्या या सेंट, पावडरीच्या सवयी कमी करायला पाहिजेत. "

सरलाताई कळवळल्या.

" आतापासून हे विचार कशाला प्रभा ! ताई सावरतील. आणि आम्ही सगळी आहोत ना ! तुला काही आम्ही वाऱ्यावर सोडून नाही देणार ! "

पण हा दिलासा प्रभाला कितपत पुरला, पोचला कुणास ठाऊक !

" एका दिवसात नोटिस देऊन रजिस्टर्ड लग्न करता येतं का हो ? "

बाहेरून अर्थहीन, संदर्भशून्य वाटणारा असा आणखी एक प्रश्न तिने विचारला होता. बिचारी प्रभा धीट होण्याचा, सुटी होण्याचा केविलवाणा प्रयत्न करीत होती. मनातल्या मनात तिने सगळ्या शक्याशक्यता पारखून, पडताळून पाहिल्या असाव्यात.

—आणि एक दिवस प्रभा घरी आली ती बायाळ होऊनच. " प्रभा, तुला कोणी

काही म्हणालं का ?... काय झालं ? " ताराबाई दिवसभर तिची समजूत घालीत होत्या, सांत्वन करीत होत्या. पण प्रभा पुढे आठ पंधरा दिवस भयंकर अस्वस्थ होती. प्रभाचे दुःख त्या दोघींच्या खोलीबाहेर गेले नाही पण प्रभा पुन्हा पुन्हा म्हणत होती " मी पुन्हा त्यांचं तोंड बघणार नाही. आई, तू त्यांना निरोप धाड ... "

प्रभाची कोणीतरी चांगलीच फसवणूक, निराशा केलेली दिसत होती.

" प्रभा, तू आपल्या भावंडांना, नातेवाईकांना धरून राहा. त्यांच्याशी जुळवून घ्यायला शीक. काही झालं तरी ती ' आपली माणसं ' आहेत. माझ्यानंतर तुला ती अंतर देणार नाहीत " ताराबाई तिला समजावीत होत्या.

" नाही ग आई, तुझ्यानंतर कोणी मला विचारणार नाही ! " प्रभा स्फुंदत होती.

२५ ऑगस्ट १९५२ चा दिवस. देवधरांकडे दीड दिवसांचा गणपती होता. बाहेर सगळीकडे उत्सववारे होते. ताराबाईंच्या ब्लॉकमध्ये मात्र वातावरण कुंद, दाटून भरल्या-सारखे होते. पावसाने बाहेर सकाळपासूनच कंटाळवाणी रिपरिप लावली होती.

प्रभा खालून गणपतीचा प्रसाद घेऊन वर आली आणि लगबगीने तयारीला लागली. ताराबाईंचे सकाळचे सारे आटोपून, स्वतःचे आवरून तिला आपल्या भावंडांबरोबर विमानतळावर जायचे होते. तिची मावसबहीण शारू ( कु. शारदा गद्रे–सौ. कपितान ) त्या दिवशी आफ्रिकेहून सहकुटुंब यायची होती, तिला आणायला जायचे होते. प्रभाच्या आयुष्यातली ती शेवटची लगबग आणि शेवटची आनंदवेळा. आल्यावर मग दिवसभर इतक्या दिवसांच्या साचलेल्या गप्पागोष्टी, फराळ, चहापाणी होणार. भाचेमंडळींचे लाड करायला मिळणार. सामानाचा पसारा पडणार, प्रत्येकाच्या नावची, भेटवस्तूंची पुडकी उघडली जाणार...

प्रभाही इतरांबरोबर उत्साहाने हिंदकळत होती. तेवढ्यात, विमानतळावरून परत येताना वाटेत कुणीतरी टूट काढला हिंदू कॉलनीतल्या ताराबाई–प्रभाच्या बिऱ्हाडी जाण्याऐवजी नवरंग्यांच्या घरी जावे. " मावशीही तेथे आजारीच आहे. तिला विश्रांती हवी. त्यापेक्षा पाच मिनिटं तिला भेटू आणि तसेच पुढे जाऊ. काय ? "

प्रभाचे मत, मन, सोय, इच्छा कोणीच विचारात घेतली नाही. सर्वांची सम्मती गृहीत धरली गेली. प्रभाला हा बदल अनपेक्षित होता. उभ्या उभ्या सारी भाचेकंपनी ताराबाईंशी बोलली, भेटली आणि संध्याकाळी परत यायचे ठरवून सगळी हसतखेळत जिना उतरून निघून गेलीसुद्धा ! प्रभालाही त्यांच्याबरोबर जायचे होते. फार जायचे होते पण तिला कुणीच ' चल ' म्हटले नव्हते. तिला आपल्या आजारी आईच्या सेवेला ठेवून बरोबरची सारी भावंडे निघून गेली होती. ते वगळले जाणे प्रभाच्या हळव्या मनाला फार लागले, अपमानाचे वाटले. ती एकदम खचली.

ताराबाई नेहमी प्रभाच्या बरोबरीने आपल्या भाचेमंडळींचे करत असत. प्रभाने त्यांना



धरून राहावे, असे तिला शिकवीत असत.

" बघितलंस ! तुलाच सगळ्यांचा पुळका असतो ! उगाचच म्हणतेस. गेली ना आताच मला सोडून ! तुझ्यानंतर तुझी ही लाडकी भाचरं मला विचारणार आहेत ? "

" अग, माझ्याजवळ कुणी नको का दुपारी ? म्हणून नसेल तुला म्हटलं. मुद्दाम का कोणी तुला वगळेल ? तुला सवयच आहे काहीतरी डोक्यात घेऊन उगाळत बसायची. "

दोघी एकमेकींवर शेवटचे टपके ठेवून घेत होत्या. ताराबाई आजारी पडल्यापासून सरलाताईच रोज त्या दोघींचे जेवण तयार करून वर पाठवीत असत. त्याप्रमाणे त्या दिवशीही त्यांनी सारे वर धाडले. परंतु दोघी मायलेकी अशा मनःस्थितीत होत्या की जेवणाकडे त्यांनी ढुंकून पाहिले नाही. त्यांच्यातल्या ताणलेल्या संबंधांची सरलाताईंना कल्पना आली होती. त्यांना एकूणच त्या दिवसाचे लक्षण ठीक वाटत नव्हते. अखेर त्यांनी वर जाऊन दोघींना समजाविले. बळे बळे दोन घास खायला लावले " आज दिवसभर या दोघींचं हे असंच चालू राहणार असलं तर उद्या इथून दोन प्रेतयात्रा निघतील ! " घरी येऊन सरलाताई म्हणाल्या.

पण दुपारपर्यंत प्रभा पुन्हा थोडी सावरलेली दिसली. खाली येऊन ती सरलाताईंना म्हणाली,

" सरलाताई, ती गडबडीत विसरली असतील मला बोलवायला. आपणच जाऊ या का आता त्यांच्याकडे ? त्यांची विश्रांतीही होईल तोपर्यंत. तिच्या मुलांना खेळवायला जाऊ या. "

" बरं, जाऊ या. पण आधी आम्ही आमचा गणपती पोचवून येतो. मग बघू. आज आमचा गणपती जायचा आहे ना ! "

प्रभा तशीच वर आली. भर पावसात दुपारी तीन–साडेतीन वाजता देवधरांचा गणपती निघाला. ताराबाईंना शांत झोप लागली होती. प्रभानेही शांतपणे निर्णय घेतला होता. तिच्या दुखण्यावरच्या गोळ्या खालीच तर होत्या.

प्रभा कशाला तरी खाली जाऊन आली.

" गेल्या का ग सरलाताई ? "

" हो...आई, मी निजते बरं का ग. मला कुणी उठवू नका. "

" अग, चहा घेऊ या ना आता ? वेळ झालीच आहे. तू जरा पडत असलीस तर मी पण थांबते. मगच घेऊ बरोबर. "

प्रभा समतोल आवाजात म्हणाली, " नको, तुझा होऊन जाऊ दे. मी घेईन मग उठल्यावर. "

त्याच शब्दांत ताराबाईंना निरोप होता.

प्रभा आणि ताराबाईंचे पलंग एकाच खोलीत समोरासमोर होते. आपल्यापैकी कोण

आधी गेले म्हणजे जीवनाचा प्रश्न सोपा होईल, असा जणू त्या दोन पलंगांमधला प्रश्न होता; प्रभा भिंतीकडे तोंड घेऊन निजली. तिने चिरनिद्रा स्वीकारली.

ताराबाई तशाच विचार करीत पडून राहिल्या. प्रभा पुन्हा शांत झाली आहे, हे पाहून त्यांना बरे वाटत होते. थोड्या वेळाने गड्याने चहाबद्दल विचारले तशी ताराबाई म्हणाल्या, " माझा एकटीचा कर. नको उठवू तिला, दमली आहे ती फार आज ! "

संध्याकाळी पाच वाजून गेले तरी प्रभा जागी होईना तेव्हा मग गडबड उडाली. देवधर कुटुंबीय गाडीतून उतरतात तोच त्यांना निरोप गेला, " तसेच्या तसे आधी वर या. "

" बघा हो सरलाताई, प्रभा कशी करतेय ! जागीच होत नाही आहे, किती हाका मारतेय तरी ! "

ताराबाई कापऱ्या स्वरात म्हणाल्या.

सरलाताईंनी पुढे होऊन प्रभाला हलविले. हातापायांना बुळेपण आले होते. तोंडाला फेस आला होता. प्रभाला आकडी आलेली दिसत होती. सरलाताई एकदम दचकल्या ...ती बाटली ! !

" ताई, हिनं काही घेतलं तर नाही ? "

" नाही हो, असं कसं होईल ? इथे माझ्यासमोरच तर— "

कुणीतरी धावत खाली जाऊन आधी ती बाटली शोधून काढली. बाटली अगदी रिकामी होती ! ' ॲमिटॉल 'च्या पस्तीस गोळ्या प्रभाने गिळविल्या होत्या !

मग ॲम्ब्युलन्समधून तत्काळ के. ई. एम्. मध्ये नेणे. स्टमकवॉश. रात्रभर प्रभाची वरवर शांत चेहऱ्याने मृत्यूशी, नव्हे जगण्याशी चाललेली झटापट...

दवाखान्यात जवळची सारी मंडळी श्वास रोखून थांबली होती.— आणि ताराबाई ? प्रभाच्या खोलीपासून कॉरिडॉरपर्यंत, हृदयरोग्याने घालू नयेत अशा शेकडो फेऱ्या त्या रात्री ताराबाईंनी घातल्या. पुन्हा पुन्हा त्या प्रभाजवळ जाऊन प्रभाच्या चेहऱ्यावर जागृतीचे चिन्ह शोधत होत्या, " प्रभा, बेटा एकदा तरी डोळे उघडून बघ ! ही ××× आलीय बघ तुला भेटायला ! " म्हणून हाका मारत होत्या. त्यांच्या तब्येतीच्या दृष्टीने या येरझारा योग्य नाहीत हे जाणवत असूनसुद्धा त्यांना थोपविण्याची कुणाची हिंमत झाली नाही.

नंतरचा दिवसभर डॉक्टरांचे प्रयत्न चालू होते. परंतु दोनतीनदा औषधांचा वॉश देऊनही काही उपयोग झाला नाही. शेवटी शेवटी उपचारांचा परिणाम होईनासा झाला आहे हे लक्षात घेऊन ताराबाई अत्यंत दिङ्मूढ होऊन बसल्या होत्या. मधून मधून " आता कुणाकरता मी जगायचे ? " असा आक्रोश करीत होत्या. दुपारच्या सुमारास प्रभा काळीनिळी पडली. आणि संध्याकाळी साडेपाच वाजता अखेर ते दिव्य



संपले. इतरांचे मानसिक आणि प्रभाचे शारीरिक. शुद्धीवर न येताच प्रभा गेली. अखेर प्रभाच जिंकली !

प्रभाने आपल्या आयुष्याचे अवघड गणित सोडवून टाकले होते— निदान संपवून फाडून टाकले होते.

घरी आल्याबरोबर आधी सरलाताईंनी गणपतीचे रिकामे मखर आत नेले. भिंतीवरच्या पताका काढून टाकल्या.

ताराबाई आल्याबरोबर पलंगावर आडव्या झाल्या होत्या. अश्रूंना बांध घालीत त्यांनी सरलाताईंना म्हटले,

" सरलाताई, भजनं म्हणा बरं जरा. "

भजने म्हणायला सुचत होते कुणाला ? पण ताराबाईंच्या शिष्येने निमूटपणे भजनांची वही उघडली. आणखीही एक दोघींनी आपले सूर मिसळले. थोड्या वेळाने पडल्या पडल्या ताराबाईंनी टाळी धरली. त्यांचे डोळे मात्र मधून मधून झिरपतच राहिले...

प्रभाच्या भडक वेदनेला असा भडक शेवटच मंजूर असावा. २६ ऑगस्ट १९५३ रोजी प्रभाचा देहान्त झाला.

नुकताच एवढा मोठा आजार होऊन गेलेला असताना ताराबाईंना हा कठोर आघात सोसतो की नाही, अशी भीती त्यांच्या परिवारातल्या माणसांना पडली होती. परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे आत्मबळाच्या जोरावर ताराबाईंनी हा प्राणांतिक वाटत असलेला घालादेखील हळू हळू पचविला. अर्थात या धक्क्यातून बाहेर पडायला ताराबाईंनी बरेच महिने घेतले. या दुर्घटनेनंतर त्यांनी मुंबईत एकटे राहू नये या सदिच्छेने त्यांच्या अनेक आप्तस्वकीयांनी त्यांना आपल्याकडे बदल-विश्रांतीकरता बोलाविले. या पत्रांमध्ये गुजरातेत आंबळा येथे राहणाऱ्या ताराबाईंच्या ज्येष्ठ गुरुबंधूचे, पू. नानाभाई भटांचेदेखील पत्र होते. नानाभाईंनी कळकळीने लिहिले होते,—

' बेन ताराबेन,

तमारो पत्र मळता तेना शब्दे शब्दे मधु हृदय रडे छे.

...तमे थोडा दिवस आंबळा आवशो तो तमारा मनने थोडी एक शांति थशे, अने अमने सौने तमारा दुःखमां अमे भाग लई शक्या एम संतोष थशे. मारे लखवानी जरूर नथी के भावनगरना दक्षिणामूर्तीमां जे नानाभाई हतो तेज नानाभाई हुं छुं अने एज दक्षिणामूर्तीमां जे ताराबेन हता तेज ताराबेन मारा मनथी तमे आज पण छो... "

परंतु ताराबाई आपल्या सुहृदांपैकी कुणाकडेच गेल्या नाहीत. मागची सारी निरवानिरव सरलाताई व इतर निकटवर्तीयांवर सोडून त्या बोर्डीला जाऊन राहिल्या. तेथूनच सूचना देऊन, पत्रे लिहून त्यांनी हळूहळू मुंबईच्या बिऱ्हाडाची आवरासावर केली. प्रभाच्या साऱ्या किंमती वस्तू, दागिने, भांडी त्यांनी नात्यातल्या, परिचयातल्या मुलांना भाच्या-नातवंडांना प्रभाच्या स्मरणभेटी म्हणून वाटून टाकल्या. दागिने मोडले तेव्हा आपल्या

चार सोन्याच्या बांगड्यासुद्धा त्यांनी त्यातच घालून टाकल्या.

" राहू देत ना तेवढ्या. कशाला मोडता ? केव्हातरी वापरा. " कुणीतरी प्रेमाने म्हणाले.

" कशाला ?– नको. मला कुठे दागिन्यांची हौस आहे ? ' तिचा 'च हट्ट म्हणून घडवल्या होत्या, एवढंच. वापरत तीच असे ! ह्या माझ्या विरक्तीवर तर तिचा मोठा राग होता. " ताराबाईंनी डोळे पुसत म्हटले.

बोर्डीला जाण्यापूर्वी प्रभाची वह्या–पुस्तके आवरून, बांधून ठेवावी लागली. प्रभाची ट्रंक आवरत असताना ताराबाईंच्या एका शिष्येला पेटीच्या तळाशी कुटुंबनियोजनाची साधने सापडली; तेव्हा ती विलक्षण चमकली. तिने काही न बोलता ताराबाईंच्याजवळ ती आणून ठेवली. ताराबाईंना ती पाहून धक्का बसला तरी त्या म्हणण्यासारख्या हादरल्या नाहीत. ताराबाईंची शिष्या त्यांना पुरेशी जवळची, प्रौढ व समंजस होती. तिने त्यांना काहीच विचारले नाही. ताराबाई स्वतःशीच बोलल्याप्रमाणे उद्गारल्या.

" मला कल्पना होती— परंतु इतकी कल्पना नव्हती. मात्र तिचं फार काही चुकलं असं मला वाटत नाही; तेव्हाही वाटलं नाही...

" प्रभा अखेर शूर ठरली. तिचा तिनेच अखेर निर्णय घेतला आणि सगळेच प्रश्न सोडवून टाकले. एरवी तिच्या आयुष्याचं गणित होतंच कठिण ! "

प्रभाला ताराबाईंनी किती समजून घेतले, कुठल्या टोकापर्यंत समजून घेतले, कोणतीही सामान्य आई समजून घेऊ शकणार नाही अशा पराकोटीच्या पातळीवरून समजून घेतले, हे त्यांच्या या प्रतिक्रियेवरून स्पष्ट होते...

प्रभाच्या निधनानंतर ताराबाईंनी मुंबईचा एकेक व्याप उतरवून ठेवला. नूतन बालशिक्षण संघाच्या अध्यक्षपदाचा त्यांनी राजीनामा दिला. शिक्षणपत्रिकेचे संपादन सोडले. शिशुविहारच्या संस्थाप्रमुखत्वाच्या जबाबदारीतूनही त्या मुक्त झाल्या. त्यांच्यानंतर श्री. शेष नामले त्यांची ही कामे पाहू लागले.

प्रभाच्या स्मरणार्थ ताराबाईंनी प्रार्थनासमाज ( मुंबई ), दक्षिणामूर्ती ( भावनगर ) आणि अनाथाश्रम ( पंढरपूर ) अशा तीन संस्थांना प्रत्येकी रु. १०००। — च्या देणग्या दिल्या. तिच्या स्मरणार्थ त्यांनी तिचे सर्वांत आवडते फळ, आंबा सोडले. तिचा एक फोटो त्यांनी सतत आपल्या नजरेसमोर राहील अशा तऱ्हेने भिंतीवर लावून ठेवला.

मात्र प्रत्येक दुखण्यावर आपले आपण औषध शोधून काढायचे, प्रत्येक जखमेवर कार्याची मलमपट्टी करायची आणि नव्या दुःखाच्या पायावरच नवीन कार्य उभारायचे हा ताराबाईंचा स्वभावधर्म होता. प्रभाच्या वियोगाची सवय करून घेताना त्यांच्या मनाची विलक्षण तडफड झाली परंतु हळूहळू त्यांच्या मनाने नवी ' विकासवाडी योजना ' आकारायला सुरवात केली. ती गणिते, आकडेमोड, पत्रव्यवहार, पाहणी यांत



त्यांनी आपले दुःखी मन गुंतवून टाकले. प्रभाच्या मृत्यूचे दुःख अर्थात पूर्णपणे निवू शकले नाही... पुढे पंचवीस वर्षांनंतरसुद्धा ते हिमनगासारखे एक अष्टमांश पृष्ठभागावर व सात अष्टमांश मनात, ओलेच राहिले.

परंतु प्रत्यक्षात मात्र त्यांच्या जीवनातला एक मोठा संघर्ष प्रभाच्या मृत्यूमुळे संपला.

प्रभाच्या दुःखद निधनानंतर श्री. शेष नामले यांनी शिक्षणपत्रिकेच्या सप्टेंबर १९५३ च्या अंकात जाहीरपणे दुखवटा व्यक्त करताना लिहिले,

" कु. प्रभा कृ. मोडक हिच्या आकस्मिक मृत्यूमुळे, पूज्य ताराबाई मोडकांच्या कौटुंबिक जीवनाचा ज्यांना ज्यांना परिचय असेल त्या सर्व लहानथोर व्यक्तींची अंतःकरणे दुःखद आश्चर्य व करुणेमुळे उचंबळून आली असतील यात शंका नाही. कारण ताराबाईंचा परिचय असलेला वर्ग फार मोठा आहे. ताराबाईंच्या वैयक्तिक जीवनाच्या सर्व आशा व अभिलाषा या कन्येत केंद्रित झाल्या होत्या.

दक्षिणामूर्तीत दाखल झाल्यावर प्रभाचा व ताराबाईंच्या कर्तृत्वाचा विकास बरोबरच होत होता. गिजुभाई, ताराबाईंच्या साहित्यनिर्मितीला प्रभा व तिचे सवंगडी यांच्यापासून जणू स्फूर्ती मिळत होती. बालशिक्षणाचे प्राथमिक धडे त्यांनी या बालकांकडूनच मिळवले होते. संघाच्या इतिहासात गिजुभाई व ताराबाईंच्या कर्तृत्वाला समाजाने मोठे श्रेय दिले असले तरी त्या श्रेयात प्रभासारख्या बालकांचा फार महत्त्वाचा वाटा होता.

सुरुवातीला संचालकांच्या कर्तृत्वाला मर्यादित अपत्यभावनेतून स्फूर्ती मिळत होती, परंतु कालांतराने हीच अपत्यभावना व्यापक आणि सामाजिक बनून त्यातून नू. बा. शि. संघाची निर्मिती झाली. थोर व्यक्तींच्या भावना जेव्हा अशा अमर्याद बनतात अथवा सामाजिक बनतात तेव्हा त्याचा एक अनिष्ट परिणाम म्हणजे त्यांचा परिवार किंवा अपत्य यांचे स्थान दिवसेंदिवस गौण बनून सर्व समाजाच्या अपत्यांच्या दृष्टीने त्या विचार करू लागतात. त्यांच्या या कार्याचा स्वाभाविकपणे त्यांच्या परिवाराकडून, अपत्यांकडून परिपोष होत गेला तर त्यांच्यात विसंवाद दिसत नाही. परंतु हा परिवार व ही अपत्ये ही जेव्हा भिन्नदिशाभिमुख आढळतात तेव्हा थोर मंडळी त्यांच्याकडे दुर्लक्ष करूनही सामाजिक ध्येयवादाचे कार्य करीत राहतात— प्रभासंबंधी अथवा स्वर्गीय गिजुभाईंच्या बालकांबाबत असे कितपत घडले हे सांगणे कठीण आहे, परंतु अशी विसंगती जेव्हा उत्पन्न होते तेव्हा तिच्या वेदना प्रभासारख्या बालकांनाच सहन कराव्या लागतात. थोर लोकांच्या श्रेयाचा बराचसा वाटा याही दृष्टीने समाजाने या बालकांनाच दिला पाहिजे. "

प्रभाच्या मृत्यूची बातमी केव्हींच्या कानावर घालण्याचे काम ताराबाईंनी आपल्या एका जवळच्या परंतु वयाने लहान अशा संबंधितावर पत्राने सोपविले होते. त्या गृहस्थांना एकट्याने जायचे धाडस होईना म्हणून त्यांनी केव्हींच्या रोजच्या बैठकीतल्या एका

त्यांना बरोबर घेतले आणि ते केव्हींकडे गेले. दोघांनी कशीबशी केव्हींच्या कानावर ही बातमी घातली. आधी, बराच वेळ केव्हींचा त्या घटनेवर विश्वासच बसेना.

"नाही रे, असं व्हायचं नाही! यात काहीतरी घोटाळा आहे. ताराबाईंनी स्वतः तिला पाहिलं का?" पुन्हा पुन्हा ते विचारीत राहिले.

निरोप सांगणाऱ्या जोडीने बातमी सांगताना प्रभाच्या आत्महत्येचा तपशील वगळून धक्का सौम्य करण्याचा प्रयत्न केला होता. परंतु पुढे काही दिवसांनी केव्हींना ताराबाईं-कडून सारे तपशीलवार समजले. त्यानंतर त्या गृहस्थांना एकदा वाटेत गाठून केव्ही उद्गारले,

"अरे, Do you know, it was not a natural death! Prabha committed suicide! तुला माहीत नाही पोरा, एक क्षण असा आला होता की मी, ताराबाई आणि प्रभा तिघांनी बरोबर हे जग सोडून जायचं ठरवलं होतं! Ultimately the child did it!"

प्रभाच्या रोजच्या वापरातली एक अबोली रंगाची तिची आवडती साडी ताराबाईंनी कुणातरी येणाऱ्या जाणाऱ्याबरोबर केव्हींकडे आठवण म्हणून पाठवून दिली.

केव्हींच्या आयुष्यातून अशी एकेका प्रियजनाची वजाबाकी होत चालली होती; पाश सुटत, तुटत चालले होते. सुलोचनाबाई आपल्या स्मृती ठेवून गेल्या; आता प्रभाही रंगमंचावरून नाहीशी झाली. ताराबाई होत्या परंतु त्यादेखील दुरावलेल्याच होत्या. एक मद्याखेरीज केव्हींना आता कुणाचीच, कशाचीच साथसोबत नव्हती. आणि बाह्यात्कारी त्यांना ती पुरत होती. त्यांचे काही मोजके मित्र या काळातही त्यांच्याकडे येत-जात; परंतु केव्हींना काही मदत करणे आकाशाला ठिगळे लावण्यासारखे होऊन बसले होते.

एकीकडे केव्हींची दुर्दशा त्यांना बघवत नसे अन् एकीकडे त्यांचे व्यक्तिमत्त्व त्यांना स्तिमित करत असे. लौकिक न मानणारा एक बेजबाबदार जीवनक्रम केव्हींनी निवडला होता. ज्या बेछूटपणाने ते जगले होते त्याच बेछूटपणे अंगावर फाटके कपडे वागवीत, उपासमार सोसत ते आता विनाशाच्या दिशेने वाटचाल करीत होते. एकेकाळी दोन दोन मोटरी ठेवणारा हा संपन्न, रुबाबदार वकील अशा जर्जर अवस्थेतही तितकाच प्रसन्न, दिलखुलास राहू शकतो हे लोकांना अगदी विलक्षण वाटत होते.

पैशाविषयीची केव्हींची बेफिकिरी, औदासीन्य या निष्कांचन अवस्थेतही कायम होते. आता अर्धे सगेसोयरे सोडून गेले होते, यश-वैभव इतिहासजमा झाले होते. शरीर व्यसनांनी आणि व्याधींनी पुरे किडले होते— त्यांना धड चालतासुद्धा येत नसे.

सर्व प्रकारची कमतरता, वेदना व एकाकीपणा हीच आता नेहेमीची झाली होती... परंतु केव्हींना कधीही कोणी केविलवाणे, अगतिक झालेले, पश्चात्तापाने मोडलेले पाहिले नाही. निराशा, दुःख, वैफल्य यांना जणू त्यांनी आपल्या झोपडीकडे फिरकूच दिले



नाही. लौकिक अर्थाने वैभवाच्या कळसापर्यंत पोचलेल्या एखाद्या व्यक्तीची जेवढी म्हणून अधोगती शक्य होती तेवढी त्यांची झाली. त्यांचा एके काळचा दिमाख आणि अखेरच्या दिवसांतली ही भणंग स्थिती यातली विसंगती पाहून बघणारेच दीनवाणे होत. परंतु स्वतः केव्हींना मात्र त्यांचे चैतन्य, त्यांची प्रफुल्लता त्यांचा विनोद आणि त्यांची प्रतिभा या गोष्टी कधीही सोडून गेल्या नाहीत.

त्यांची अशिले आता त्यांना उचलून न्यायालयात घेऊन जात. दारूने त्यांच्या शरीराचा चोळामेळा करून टाकला होता तरी बुद्धीची तरतरी आणि मनाची उभारी कायम होती. दारूपायी आपली कोर्टातली केस त्यांनी कधी खराब केली नाही.

एखादा देखणा मनोरा डोळ्यांदेखत पायातून खचत जावा...

एके काळी ज्या माणसाची राहणी, अभिरुची इतकी चोखंदळ आणि रसिक होती, दिवसाला रु. ३००/- पर्यंत ज्याची फी होती, तो तीक्ष्ण बुद्धीचा वकील आता देशी दारूची एक बाटली पुरवली की विनातक्रार आणि तृप्तपणे खटला चालवायचा जात असे, आणि पूर्वीप्रमाणेच कौशल्याने आणि मन लावून खटला लढवीत असे!

"संध्याकाळी एक बाटली आणून दे म्हणजे झालं!" ही या वकीलसाहेबांची मागणी उभयपक्षी फार सोयीची होती. केव्हींची त्या दिवसाची गरज फक्त एका बाटलीची होती आणि दुसऱ्या दिवसाचा विचार करण्याची त्यांची पद्धत नव्हती!

असे म्हणतात की केव्हींचे ते तरट नेसून, दारूच्या भपकाऱ्यासहित न्यायालयात खटला चालवायला उभे राहणे असह्य होऊन काही तरुण वकिलांनी एकदा या प्रकाराला हरकत घ्यायचे ठरवले. दुपारच्या एका सुटीत तावातावाने चर्चा झाली की कोर्टाची आणि व्यवसायाची यात बेइज्जत होते; तेव्हा या महाशयांना येथे येण्याची बंदी करण्यात यावी...

परंतु दुपारचे कोर्ट भरले; वकिलांचा तो गट कोर्टरूममध्ये शिरला आणि अवाक्‌च झाला. केव्ही मोडकांचे आर्ग्युमेंट सुरू झाले होते. ज्या कौशल्याने ते आरोपीचे निर्दोषत्व सिद्ध करीत होते ते केवळ अपूर्व होते! मोडक वकिलांना बंदी करण्याचा मुद्दा त्यानंतर कोणी काढलाच नाही!

केव्हींची प्रकृती मात्र झपाट्याने ढासळत होती. प्रभाच्या मृत्यूनंतर १९५२ साली त्यांची प्रकृती बरीच बिघडली तेव्हा तेथल्या सिव्हिल सर्जनने ताराबाईंच्या मुंबईच्या पत्त्यावर पत्र लिहून त्यांना केव्हींची देखभाल करण्यासाठी अमरावतीस येण्याची सूचना केली. ताराबाई त्या वेळी मुंबई सोडून, बोर्डीला जाऊन राहिल्या होत्या. हृदयविकाराच्या झटक्यातून आणि प्रभाच्या आत्मघाताच्या धक्क्यातून त्या अजून सावरल्या नव्हत्या. सरलाताईंनी केव्हींच्या संबंधातले ते पत्र बोर्डीच्या पत्त्यावर रवाना केले आणि केव्हींना मुंबईला आणण्याची काही व्यवस्था करायची का, असेही विचारले. सरलाताईंच्या या

पत्राला लिहिलेल्या उत्तरातून ताराबाईंची केव्हींविषयीची भूमिका अगदी नेमक्या आणि स्पष्ट शब्दात व्यक्त झाली आहे. त्या पत्रात ताराबाईंनी लिहिले—

"...स्वहस्ते सर्व व्यवहार दोनच दिवस व तेही अर्धवट झाले. अजून आजारी लिस्टातच आहे, हेच खरे! मन धावते पण शरीर थिजून बसले आहे, त्याला काय करणार? परावलंबनाचे दुःख अनुभवल्याशिवाय कळत नाही. उपयुक्त जीवन जगावे, नाहीतर उगाचच काय लोळत रहायचे —असे विचार मनात येतात. अर्थात काही अनन्वित प्रकार करण्याचा विचार नाही. पण आयुष्य निरर्थक वाटते. असो. हा गादी-तक्क्याचा राजयोग किती काळ चालू राहतो ते बघायचे.

"...आता हे असेच चालायचे. पासपोर्ट घेऊन बसल्यावर केव्हातरी तारीख लागायचीच आणि त्यापूर्वी अशा घंटा वाजत राहायच्याच.

"...केव्हींबद्दल तुम्ही लिहीलेत ते बरोबर आहे. परंतु त्यांच्या सध्याच्या मूडमध्ये त्यांना मुंबईस आणण्यात काही अर्थ नाही. हाताशी असेल ती वस्तू विकून टाकणे, रिक्षा मागवून अशा आजारपणातही बाहेर जाणे व सेवा करणाऱ्यासच वाटेल तसे बोलणे— मुंबईत तुम्हा सर्वच माणसांना त्रास होईल. घरातल्या वस्तू नाहीशा होतील आणि रिक्षाऐवजी टॅक्सीची बिले चुकवण्याची पाळी येईल. पण या सर्वांपेक्षा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे त्यांच्याकडे बघायचे कोणी? भाऊ तरुण आहे, त्याच्या या उमेदीच्या, धडपडीच्या काळात त्याला या कामात बांधून ठेवणे मला criminal वाटेल. त्याचे आयुष्य तो स्वतःला व लोकांना अधिक उपकारक रीतीने घालवू शकेल. केव्हींच्या या स्थितीत ते चार सहा वर्षे अधिक जगले काय व न जगले काय, त्यांना अथवा कोणालाही ते भारभूतच होणार. इतक्या स्पष्टपणे व भावनाशून्य रीतीने लिहिल्याने तुम्हाला आश्चर्य वाटेल; पण त्याचा अर्थ भावना नाहीत असा नाही. पण भावनेने माझी बुद्धी बधिर झाली नाही, इतकेच. मी स्वतः बरी असते, स्वतः खस्ता खाऊ शकत असते, तर गोष्ट निराळी होती. त्यावेळीही तारतम्याने काय करणे योग्य ठरले असते, कोण जाणे!

"...त्यांची काय व्यवस्था केली वगैरे भाऊ सविस्तरपणे सांगेलच..."

यापूर्वी, केव्हींची स्थिती यापेक्षा थोडी बरी असताना, त्यांच्या हालांची वर्णने ऐकू येऊ लागली तेव्हा त्यांच्या मुंबईच्या पुतण्याने त्यांना पत्र लिहून कळविले की तुम्ही आता असे एकटे अमरावतीला राहू नका; माझ्याकडे या. तुमची जरूर ती सारी बडदास्त मी ठेवतो. परंतु केव्हींनी त्याला धुडकावून लावले.

"I don't live on anybody's charity!" असे उत्तर पुतण्याला मिळाले.

आणि कुणाच्या दयेची भीक न घेणारे केव्ही भुकेकंगालपणाचा कळस झाला की खुरडत खुरडत खुशाल एखाद्या मित्राकडे जात आणि मागणी करीत—"जरा दोन पायल्या गहू दे रे! आज दाणासुद्धा शिल्लक नाही घरात." केव्हींचे मित्रसुद्धा कळवळून



तातडीने, तत्परतेने त्यांची मागणी पुरी करीत. त्यांच्या कुत्र्यांसह त्यांना मनापासून आत बोलावीत. जिव्हाळ्याने त्यांचे स्वागत करीत. घरातल्या बायकांनी मात्र हळूच केव्हींसाठी चहाची वेगळी कपबशी करून ठेवलेली असे. या माणसाला झालेले आजार संसर्गजन्य तर नसतील ना, अशी भाबडी भीती त्यामागे असे!

दुसऱ्या एखाद्या परममित्राच्या दारावरून जाता जाता खालूनच केव्ही साद घालीत, "दिवाळीचं फराळाचं ताट घेऊन या हो खालीच!...नाही; मला आता तुमचे हे जिने चढणं शक्य नाही."

इकडे आणखी एका पत्रात ताराबाईंनी सरलाबाईंना बजावले,

"...अमरावतीस केव्हींचे जे गृहस्थ सर्व करीत आहेत ते आज मला भेटायला म्हणून कदाचित मुंबईस येतील. मला कोल्हटकरांनी तसे कळविले आहे. ते शोध करीत आले तर त्यांना मला भेटण्याची जरूर नाही वगैरे सांगावे. तुमचा व माझा पैशाचा व्यवहार असतो वगैरे कळू देऊ नये. 'आम्ही कुठून, कसे देणार?' अशा प्रकारे बोलून घालवावे. तसेच 'माझ्याजवळही आता देण्यासारखे पैसे कोठून असणार' वगैरे सांगावे, कारण आता केव्हींकडून वरचेवर मागणी सुरू झाली आहे. दर महिन्याला मी श्री. कोल्हटकरांकडे पैसे पाठवते. त्यांतून ते जरूरीप्रमाणे त्यांना देतात. शंभर पाठवले. आता मार्चमध्ये पुन्हा पाठवीन. K. V. च्या हातात गेले की उडूनच जातात..."

केव्हींच्या अखेरच्या दिवसांत 'मालवीय मोटर सर्व्हिस'च्या मालकाने आपले विविध खटले चालविण्यासाठी केव्हींना अक्षरशः पाळले! सुलोचनाबाईंनी बांधून दिलेले झोपडीवजा घरसुद्धा केव्हींनी दारूपायी विकून टाकले होते; इतर सर्व चीजवस्तू उडाल्या गेल्या होत्या. त्या अशिलाने आता एका गॅरेजमध्ये त्यांची राहायची व्यवस्था करून दिली होती. हातभट्टीची एक बाटली, शेवचिवडा आणि थोडेसे जेवण एवढ्यावर त्यांचे सारे ज्ञान, बुद्धी कौशल्य, अनुभव, तो खरेदी करून होता!

केव्हींच्या जरा बऱ्या स्थितीत त्यांचे मित्र त्यांना समजविण्याचा प्रयत्न करीत, "केव्ही! अरे बाबा, असं वागू नकोस. थोडी तरी शिल्लक राहू दे! माणूस आहे, लागतात!"

"कशाला? कुणासाठी शिल्लक ठेवू म्हणता?" ते त्यांच्या नेहमीच्या चिरप्रसन्न स्वरात विचारीत, "माझी पोरगी गेली, बायको स्वतःपुरतं मिळवायला समर्थ आहे. आता पैसा साठवून त्याचं करायचं काय?"

"दुसऱ्या कुणासाठी कशाला, स्वतःकरिता तर काही ठेवाल?" मित्र हताश होत म्हणायचे, "अहो, असं पाहा मोडक; उद्या समजा तुमचं काही बरंवाईट झालं तर तुमच्या उत्तरक्रियेसाठी तरी पैसे हवेत की नकोत?"

यावरही केव्हींचे उत्तर तयारच असे, "हे पाहा! मला असं सांगा— तुम्ही शेजारधर्म पाळाल की नाही?"

"अं ऽ हो."

"—पाळाल ना ? बस झालं तर मग ! तुम्ही फक्त एकच काम करायचं, नागपूरच्या मेडिकल कॉलेजला एक फोन करायचा की केव्ही वैकुंठाच्या गाडीत बसला परंतु सदेह नव्हे ! तेव्हा त्या देहाचं काय करायचं ते पाहून घ्या. बस एवढा फोन कुणीतरी केला की माझी उत्तरक्रिया झाली ! पुढली सगळी व्यवस्था आपोआप होईल. ती मंडळी व्हॅन घेऊन येतील अन् बॉडी पेटीत घालून घेऊन जातील. संपलं. It is as easy as that ! No problem ! "

केव्हींची मृत्यूबद्दलची ही उपेक्षा, ही सहजता, सिद्धता व हा बेट्टपणा पाहून ऐकणारे चक्रावून जात. बाहेरगावी जाताना देखील माणूस जरा जास्त गंभीर होत असेल ... आपले मरण ही केव्हींच्या मते बुडबुडा फुटून जाण्याइतकी सहज, मामुली आणि चुटकीसारखी होऊन जाणारी घटना असणार होती ...

केव्हींच्या मृत्यूपूर्वी काही दिवस त्यांचे एक निकटचे मित्र रावबहादूर खरे एकदा त्यांना भेटायला गेले होते. आपला अंत जवळ आल्याचे केव्हींना आतून जाणवले असावे. एखाद्या आनंदयात्रेला जाणार असल्याप्रमाणे केव्ही सर्वांना सांगत होते,

" Friends, I am going to kick my bucket soon !... ध्यानात आहे ना तुम्हा लोकांच्या ? मला एखाद्या कपाटात पॅक करून ठेवायचं आणि नागपूरला फोन करायचा ! "

खरोखरच त्या निःसंग लोकविलक्षण माणसाने आपला देहसुद्धा मरणापूर्वीच मेडिकल कॉलेजला विकला होता.—केवळ पंचवीस रुपयांना !

केव्हींची अखेरही शेवटी त्यांच्या या बेवारशी जीवनाला सुसंगत अशीच झाली.

ज्या माणसाच्या ( कपूरमामा ) गॅरेजमध्ये ते राहत असत त्यांच्या आठ वर्षांच्या मुलीला ते जागेच्या भाड्याच्या बदल्यात इंग्रजी शिकवीत असत. ते कुटुंब तीन दिवसां-करता कुठेतरी बाहेरगावी लग्नाला गेले होते. याच तीन दिवसांत केव्हातरी केव्हींचा देहान्त झाला. मुलीच्या बापाच्या लक्षात हा प्रकार आला तेव्हा फार उशीर झाला होता. कुत्र्यांच्या भुंकण्यामुळे कुणाचे तरी लक्ष गेले. गॅरेजचे दार फोडून अखेर केव्हींना बाहेर काढण्यात आले, तोवर त्यांच्या देहाची नुसती दुर्दशा झाली होती. प्रेत सडून दुर्गंधी सुटली होती. त्यांच्या कुत्र्यांनी भुकेपोटी पिसाळून त्यांचे नाक गाल कुरतडून टाकले होते ... गॅरेजचा मालक कुणाला कळवायच्या बोलावण्याच्या भानगडीतच पडला नाही. दुपारच्या दुपारीच त्याने आजूबाजूची मोजून चार माणसे गोळा केली आणि केव्हींची बोळवण केली.

केव्हींच्या मित्रपरिवाराला जेव्हा हे कळले तेव्हा अर्थातच त्यांना फार हळहळ वाटली.

" आम्हाला वेळेवर समजलं असतं तर आम्ही अवश्य गेलो असतो. अरे, अख्खी बारलम लोटली असती केव्हींच्या अंत्ययात्रेला ! "



बेफिकीर परंतु दिलदार, दुर्व्यसनी तरीही निर्मळ मनाचा, आयुष्याला कस्पटासमान लेखून ते मनःपूत उपभोगणारा, पैशाची कदर न करता तो शेवटच्या पैपर्यंत उपभोगणारा, मैत्रीला विलक्षण पक्का परंतु कुटुंबियांना मात्र क्लेशकारक ठरलेला, तीन सुंदर आयुष्ये असुंदर होण्यास कारणीभूत झालेला— उमदा, प्रसन्न, प्रज्ञावंत आणि राजबिंडा असा या केव्हींसारखा मद्यपी लोकांनी पूर्वी कधीही पाहिला नव्हता. त्यांच्या बेजबाबदार बेधडक आयुष्याचे काहीच समर्थन करता येत नसूनही " असा माणूस आम्ही कधी पाहिलाच नाही ... " ही पावती मात्र लोक पुन्हा पुन्हा देतच राहिले.

प्रभाच्या मृत्यूनंतर ताराबाईंचे कौटुंबिक जीवन जवळजवळ संपलेच होते. आता केव्हींच्या मृत्यूमुळे त्यांचे घरगुती जीवनातले अपयश पूर्ण झाले. त्यांच्या आयुष्यातल्या त्यांना सर्वांत प्रिय अशा दोन्ही व्यक्ती जाता जाता त्यांच्या हातात अपयशाची पावती ठेवूनच गेल्या होत्या. घराबाहेरील क्षेत्रात असामान्य यश मिळविणाऱ्या पुष्कळशा थोर व्यक्तींच्या खात्यावर घरगुती आघाडीवर भडक आणि ठळक अपयशच नोंदले जाते. एक प्रकारची मानवी असमर्थताच याच्या मुळाशी असावी.

ज्या शरीराला मान देऊन केव्ही आपल्या आयुष्याला बेदरकार वळणे देत गेले होते त्या शरीराने त्यांचे कौटुंबिक सौख्य, त्यांचा व्यवसाय, त्यांचा पैसा त्यांची प्रकृती असा एकेकाचा घास करीत अखेर स्वतःचा स्वतःच घास करून टाकला होता. ते हरवू शकले नव्हते केवळ त्यांच्या चिरप्रसन्न मनोवृत्तीला. एकीकडे ताराबाईंनी " शरीराला कष्ट देऊन देशसेवा होत असेल तर शहरी सुखसोयींना चटावलेले जीवन सोडून खेड्यात का जाऊ नये ? " म्हणून मनुष्यवस्तीच्या टोकापर्यंत, खेड्यात—जंगलात जाऊन लोकसेवे-साठी देह झिजविला—सत्कारणी लावला, आणि दुसरीकडे केव्हींनी विषयोपभोगाला वाहिलेले आपले शरीर अखेर मद्यापायी विकून टाकले, हा त्या दोघांच्या वृत्तीतला विरोधाभास मोठा भडक आणि करुण म्हटला पाहिजे.

केव्हींच्या मृत्यूची बातमी ताराबाईंना कळविण्याचे कष्टदेखील कुणी घेतले नाहीत. केव्हींना नेहमीप्रमाणे पाठविलेली मनीऑर्डर अदा न होता परत आली तेव्हा ताराबाईंना शंका आली. त्यांनी कुणाला तरी पत्र लिहून चौकशीला पाठविले. त्याला जेवढा तपशील समजू शकला तेवढा त्याने ताराबाईंना कळविला. ताराबाई साहजिकच फार अस्वस्थ झाल्या.

' फार दुःख सोसावं लागत होतं त्यांना. सुटले बिचारे ! बरं झालं ... माझ्या डोळ्यां-समोरून मात्र आज माझं जीवन चित्रपटासारखं पसार होत आहे. ' ही ताराबाईंची हार्दिक प्रतिक्रिया. त्यांनी भिंतीकडे तोंड करून अश्रूंना वाट दिली ...

दुसऱ्या दिवसापासून त्या नित्यक्रमाप्रमाणे कामाला लागल्या.

' केव्हींचा अंत्यविधी कोणत्या पद्धतीने झाला, एवढे, कृपा करून, नीट चौकशी करून मला कळवा ...'

—पत्नीने पतीविषयी जी अखेरची चौकशी केली, त्या पत्रात हे वाक्य होते.

# १७. चांदोबाची धोंड

**दि.** २६ ऑगस्ट १९५२ या दिवशी प्रभाने केलेल्या आत्महत्येमुळे ताराबाईंच्या मनाला साहजिकच फार मोठा धक्का बसला. ‘ प्राणांतिक फटका ’ असे ताराबाईंनी स्वतः त्याचे वर्णन केले आहे. प्रभाच्या मृत्यूनंतर त्या मुंबई सोडून त्यांचे ‘ दुसरे घर ’ बनलेल्या बोर्डी येथील आपल्या संस्थेत जाऊन राहिल्या. या काळात त्यांचे शरीर हृदय-विकाराशी झगडत होतेच परंतु त्यांचे मन केवढे हलाहल पचविण्याचा प्रयत्न करत होते त्याची नोंद त्या काळात देवधरमंडळींना लिहिलेल्या काही पत्रांमध्ये झाली आहे.

प्रभाच्या मृत्यूनंतर दोन महिन्यांनी लिहिलेल्या एका पत्रात ताराबाईंनी लिहिले आहे,

“ …आज २६ तारीख. माझ्या डोळ्यांसमोर सर्व चित्र उभे राहत आहे. तसे म्हणा, दिवसातून अनेक वेळा, रात्री व स्वप्नातही ती भयंकर रात्र व तो दिवस येतच असतो. तारखेने एवढेच भान होते की काळाचा प्रवाह अव्याहत चालू आहे व सर्व भयंकरता, क्रूरता—सर्व काही काळाच्या पोटात गडप होत आहे.

“ …सुखाच्या धुंदीत मस्त असण्याची कधीच फारशी वेळ आली नाही. दुःखाचे सपाटे खातच आले आहे. तेव्हा सहन करून तोंडात कडू चव बाळगूनच जगायची सवय झाली असूनही हा फटका प्राणांतिक वाटतो. अजून कळ वळत नाही. तिची शेवटच्या दिवसांतली तडफड व तिचे असह्य दुःख मनातून जाईल का ?— तरीही मनाला कामाला लावायचा प्रयत्न करीत आहे. बालवाडी, अध्यापनमंदिर, शिक्षणपत्रिका, संघप्रचार कशातच मन घालावेसे वाटत नाही. आजारपणात जसे अन्न नकोसे वाटते तसे होते. तरी ऑफिसचे काम किंवा तसेच काही यांत्रिक काम मनावर घ्यावे असे वाटत आहे. ”

आणि त्यानंतर चार महिन्यांनी श्री. भाऊ देवधर यांच्या एका पत्राला लिहिलेल्या उत्तरात त्यांनी लिहिले आहे,

“ …तुमची प्रेमाची आज्ञा मानता येत नाही म्हणून वाईट वाटते. माझ्या प्रकृतीचे हे असेच चढउतार चालणार असे दिसते. Face the Devil हे तुमचे म्हणणे बरोबर आहे. पण त्यालाही जरा शारीरिक व मानसिक बळ यायला हवे व ते यायला काळ हाच उपाय आहे…माझ्या पायात जोर आल्याशिवाय कशी निघू ? माझी इच्छा दुःखास छातीशी धरून बसण्याची मुळीच नाही…‘ बाऊ ’ घालवून टाकायचीच आहे… परंतु मला जे मधून मधून छातीत धाबरणे वगैरे होते ते थांबले म्हणजे इकडे तिकडे



करणे शक्य होईल असे वाटते. त्याशिवाय मानसिक रीतीने रोज एकदा तरी तो हॉस्पिटलचा सीन डोळ्यांसमोरून जातो तो बंद झाला म्हणजे मी हिंडायला फिरायला योग्य होईन… ”

या काळातले त्यांचे आणखी एक पत्र निराळ्या अर्थाने बोलके ठरेल. प्रभा गेली म्हणजे आपला परिवार, कुटुंबच संपले, या भावनेने त्यांनी मुंबईचे बिऱ्हाड—एकूणच संसार आटोपता, आवरता घेण्यास सुरुवात केली. दागिने, चांदी विकणे चालू असताना एकीकडे ताराबाईंनी एका पत्रात सरलाताईंना लिहिले,

“ …तो पांढरा शालू तिने फार आवडीने घेतला होता व तो तिच्या विशेष आवडीच्या माणसाजवळ असावा या दृष्टीने तुमचे नाव मी सुचवले होते. बाकी या सर्व गोष्टी आता अर्थहीनच आहेत; उगाच भावना खालपरांभोवती गुंतविणेच आहे ते.

“ …माझ्या मनात अनुताईंच्या भावाला शेतीसाठी पाच हजार रुपये उसने, ६ टक्के व्याजाने द्यावयाचे आहेत. त्याच्या घरची ७५–८० एकर जमीन आहे. विहिरीची दुरुस्ती करून एंजिन व इतर सुधारणा करून स्वतः लक्ष घातल्यास शेती होईल, असे आहे. सध्याच्या दिवसांत पडित जमीन लागवडीस आणणे व लागवडीची जमीन अधिक उत्पन्न होइल असे करणे हेही एक देशकार्यच आहे, शिवाय केळकर-मोडकांप्रमाणेच बाघ कुटुंबीयच आहेत. तशी या प्रसंगी खरी आप्त व जवळची कोण याची परीक्षाच झाली जणू काही. नाते ईश्वरदत्त असते. पण मैत्री व भावना ( दोन्ही बाजूंनी ) या नंतर मनुष्याच्या स्वेच्छेने व त्यांच्या हृदयातून उत्पन्न झालेल्या असतात… आता वार्षिक वर्गणीदार मिळवण्याचा विचार आहे. द. व. १००, ५०, २५, १० व ५ असे वर्गणीदार करून हिंगण्याप्रमाणे दरवर्षी पत्र पाठवण्याचे ठरवले आहे. सुरू केलेली संस्था बंद करणे म्हणजे कार्याला १० वर्षे मागे ढकलणे असते. तेव्हा शक्यतो प्रयत्न करून पाहावा असे वाटते. त्यातून यश न आल्यास बंद करण्याची संपूर्ण तयारी मनाची आहे. हृदय थोडेही धडधडणार नाही. ” ( १७–११–५२ )

—प्राणांतिक आघाताने खचल्यासारख्या झालेल्या ताराबाईंनी पुनश्च नवीन कार्या-करिता कंबर कसली. दागिने विकून पडित जमीन लागवडीस आणणे हे देशकार्य मान-णाऱ्या ताराबाईंनी आपल्या दारुण खाजगी व्यथेवर उतारा आणि आपल्या देशातल्या आदिवासी बालकांच्या शिक्षणसमस्येवर इलाज म्हणून या काळात एक विस्तृत शिक्षण-प्रकल्प आखायला घेतला. त्यांचा हा आगामी प्रकल्प, त्यांची ही ‘ विकासवाडी योजना ’ त्यांच्यातल्या शिक्षणतज्ज्ञाच्या कर्तृत्वाचा उच्चांक ठरणार होती.

जंगलपट्टीतल्या वारली, आदिवासी जमातीच्या मुलांच्या शिक्षणसमस्येचा अभ्यास करण्याच्या हेतूने ताराबाईंनी उन्हाळ्यात तीन महिनेपर्यंत जंगलात ठिकठिकाणी सुमारे पंधरा अंगणवाड्या चालवून पाहिल्या. या प्रयोगातून जो तपशील हाती लागला त्यावर

विचार केल्यानंतर त्यांच्या ध्यानात आले की आदिवासींचे काही विशिष्ट कौटुंबिक आर्थिक व सामाजिक प्रश्न त्यांच्या मुलांच्या शिक्षणाच्या आड येत आहेत; आणि हे प्रश्न जाणीवपूर्वक विचारात न घेतल्यामुळे त्या लोकांना शिक्षित करण्याचे शासनाचे प्रयत्न तोकडे ठरत आहेत, वाया जात आहेत.

वारली मुलांच्या शिक्षणाची घडी व्यवस्थित बसवायची असेल तर त्यांचा विशिष्ट जीवनक्रम लक्षात घेऊन त्याप्रमाणे त्यांच्या शाळेचे स्वरूप बदलले पाहिजे. त्यांच्यासाठी पाळणाघर, बालवाडी व प्राथमिक शाळा असे तीन विभाग असलेली साखळीवजा संयुक्त संस्था काढली पाहिजे या निष्कर्षापर्यंत ताराबाई येऊन पोचल्या आणि प्रयोग म्हणून १९५३ च्या जुलैमध्ये बोर्डीच्याच परिसरात गावापासून दीड मैलावर असलेल्या 'दर्जीच्या वाडी'त एका पारशी कुटुंबाच्या साहाय्याने त्यांनी या धर्तीवर 'विकासवाडी' नावाची शाळाही सुरू केली. ताराबाईंच्या संस्थेतले एक कुशल कार्यकर्ते जयंतभाई शुक्ल या उपक्रमाचे संचालन करू लागले. सुमारे तीन वर्षे हा प्रयोग चालू राहिला व त्याने चांगलेच मूळ धरले.

ग्राम–बाल–शिक्षा केंद्राच्या या विभागात ताराबाईंच्या मूळ कल्पनेनुसार पाळणाघर, बालवाडी व प्राथमिक शाळा अशा तीन शाखा संलग्नरीत्या चालविल्या जात. बालवाडीच्या मुलांसाठी स्नान व दुपारच्या भोजनाची थोडीफार व्यवस्था करण्यात येई. याखेरीज दिवसा गुरे चारायला जाणाऱ्या मोठ्या वयाच्या मुलांकरिता रात्रशाळाही सुरू करण्यात आली. त्यांच्या घरात झोपायला जागा नसल्यामुळे ही मुले झोपायलाही शाळेतच येऊ लागली आणि त्यामुळे सुके ( भोजनाशिवाय ) वसतिगृहही सुरू झाले.

या तीन वर्षांच्या प्रत्यक्ष अनुभवाच्या आधाराने मग ताराबाईंनी आदिवासी मुलांच्या शिक्षणासाठी एक निश्चित व सविस्तर योजना आखायला घेतली. आदिवासींची एकजिनसी वस्ती असेल अशा एखाद्या जंगलातल्या ठिकाणी जमून आदिवासी मुलांकरता या धर्तीवर एखादी शिक्षणसंस्था काढावी, त्याकरिता शासनाकडून पैसा व पाठिंबा मिळवावा, असे त्यांच्या मनात होते. पहिल्या पंचवार्षिक योजनेचे ते शेवटचे वर्ष होते. तेव्हा दुसऱ्या पंचवार्षिक योजनेत आपल्या या कार्यप्रकल्पाला मान्यता मिळाल्यास पाहावे या दृष्टीने त्या या संस्थेची रूपरेषा आखीत होत्या. माहिती मिळविणे, आकडेवारी गोळा करणे, टंकलेखन, पत्रव्यवहार अशी खटपट सुरू झाली, सारी चक्रे वेगाने फिरू लागली.

विकासवाडी योजनेचा आराखडा आखीत असताना ताराबाईंच्या समोर ठाणे जिल्ह्यातील वारली जमातीची आदिवासी मुले होती, तरी हा प्रश्न केवळ प्रादेशिक किंवा एका संस्थेपुरता मर्यादित नसून अशी आदिवासी माणसे देशभर विखुरलेली आहेत आणि सुमारे तीन कोटी वन्य, मागास जनतेचा विकास ही आपल्या देशापुढची एक जटिल समस्याच आहे, हे ताराबाई जाणून होत्या. आज परकी चलन मिळणे,



आर्थिक उन्नती साधणे, शेतीचे उत्पन्न वाढविणे इ. गोष्टींच्या मानाने ही समस्या भेडसावणारी वाटत असली तरी अशा लहान जखमा पुढे चिघळतात, गंभीर स्वरूप धारण करतात हेही त्या जाणून होत्या. आणि म्हणून या प्रश्नाकडे त्या व्यापक दृष्टिकोनातून पाहत होत्या. आदिवासींच्या शिक्षणसमस्या देशभर जवळजवळ सारख्याच आहेत; तेव्हा येथल्या मुलांच्या शिक्षणाची घडी बसविण्यात आपल्याला यश आले तर आपण देशाच्या प्रगतीच्या दृष्टीने एक राष्ट्रव्यापी समस्या थोडीफार सोडविल्यासारखे होईल, अशा भूमिकेतून ताराबाईंनी आयुष्यभर केलेल्या शिक्षणकार्याचा शेवटचा अध्याय रचायला सुरवात केली होती.

या कामाच्या पूर्वतयारीचे स्थूल मानाने तीन भाग होते. भोवतालच्या परिसराची, त्या भागात चाललेल्या शासनाच्या शिक्षणप्रयत्नांची पाहणी करून एकूण परिस्थितीचा अंदाज घेऊन एक विस्तृत अहवाल तयार करणे, या समस्येवरची योजना—त्यासाठी लागणारी जागा, पैसा हे सारे नेमकेपणाने शब्दांकित करणे आणि या कार्यासाठी योग्य असे ठिकाण निवडणे—हे ते तीन टप्पे.

अनुताई वाघ नावाची आपली हुकमी शक्ती ताराबाईंनी भोवतालच्या वस्त्या, त्यांतल्या शाळा यांची पाहणी करण्याच्या कामी नेमून टाकली. जांभूळपाडा, असवली जवळबाई अशी एकूण दहा गावे त्यांनी अनुताईंना नेमून दिली. या भागातल्या शाळा कशा प्रकारच्या आहेत, त्या कशा चालतात, तेथील शिक्षकांना कोणत्या प्रकारच्या समस्यांना तोंड द्यावे लागते याचा तपशील गोळा करण्याचे काम अनुताई करीत असत. आठवड्यातले पाच दिवस अनुताई हे भ्रमंतीचे काम करीत व शनिवार–रविवार बोर्डीचे काम पाहत. मिळाली तर बैलगाडी, दिसला तर टांगा; नाहीतर मग पायीच अनुताईंची ही भ्रमंती चाले. क्वचित कधी या भागात असलेल्या कृषि-विद्यालयाच्या गाडीची 'लिफ्ट' मिळे. अनुताईंची पायपीट पाहून ती माणसे कौतुकाने उद्गारत, "वा ! तुम्ही तर इथे अमेरिका आणलीत !"

असा अनेकदा अनुताईंनी हा टापू विंचरून काढला, नजरेखाली घातला.

शासनाने यापूर्वीच आदिवासींच्या सर्वांगीण विकासाचा प्रश्न हाती घेतला होता, त्यात शिक्षणाचा प्रश्नही होता. परंतु त्यावेळी एकंदर कल्याणकार्याला प्रामुख्य देण्यात येत असे. अन्न, वस्त्र, निवास यांना अग्रक्रम देणे जरूरीचेही होते. तरीही शासनाने खानेसुमारी करून, या भागात शाळेच्या वयाची किती मुले आहेत याचा अंदाज घेऊन त्यांच्याकरिता दर अर्ध्या मैलावर प्राथमिक शाळा काढल्या होत्या. शिवाय आश्रमशाळा*

* आश्रमशाळेत वसतिगृहासह विद्यालय, त्याच्याशी संलग्न असा शेतजमिनीचा तुकडा किंवा धंदेशिक्षणाची ( Craft )ची सोय यांचा समावेश होतो.

म्हणून एक सर्वमान्य व आकर्षक योजनाही होती.

शासनाची शाळा म्हणजे २०'×२०'ची, मध्ये एक खांब. आजूबाजूला आठ खांब व चहू बाजूंनी उतरते पालथ्या द्रोणासारखे छप्पर, अशी एक बिनभिंतीची झोपडीच असे. दारे-खिडक्या वगैरे अवयव या नऊ-खांबीला नसत. खालच्या अंधाऱ्या जागेत पहिली ते चौथी असे चार वर्ग गोपाळकाला करून भरलेले. या सर्व शाळा एकशिक्षकी असून अशा प्रत्येक शाळेमागे शासनाला दरमहा कमीतकमी रु. १००|– खर्च येत असे.

अनुताईंनी वारंवार, वेळी अवेळी या शाळांना भेटी दिल्या तेव्हा त्यांच्या ध्यानात आले की या शाळा केवळ सरकारी कागदोपत्रीच उत्तम चाललेल्या आहेत! प्रत्यक्ष शालेय शिक्षण तर दूरच, शालेय शिक्षणाला पोषक, पूरक वातावरणसुद्धा या शाळा निर्माण करू शकलेल्या नाहीत.

कुठे मुलांना बसायला पोती नसत तर कुठे फळाच नसे. मास्तरांच्या हातात छडी-माळली मात्र हटकून असायचीच! मुळात कुठे कुठे मुलेच नसत– आणि मास्तरदेखील नसत. एखादी शेळी किंवा म्हसरू तेथे लेंड्या टाकीत, विहार करताना दिसे. मास्तर बापडा जवळच्या बाजारपेठेत चिक्कूच्या टोपल्यांचा व्यापार करून आपल्या पगाराला पुरवणी जोडण्याच्या प्रयत्नात गुंतलेला असायचा. दिवसभरात केव्हातरी तो सायकलवरून येऊन चक्कर मारून जाई; कधी तेवढेही कष्ट तो घेत नसे. शाळेच्या गावात राहायला तो नाखुश असे. अनुताईंनी झोपड्यांमध्ये फिरून "शाळेत का नाही जात?" अशी मुलां-जवळ चौकशी केली तर उत्तर येई, "मास्तर कुटतो; म्या घाल्तो, आमी नाही जात."

काही शाळांतून मुलांची वर्दळ दिसे परंतु पटावरची नावे आणि वर्गातले चेहरे यांच्यात पुष्कळदा काही ताळमेळ नसे. पटावरच्या संख्येचे आणि उपस्थितीच्या आकड्यांचे नातेही असेच—सावत्र! कारण सारेच विद्यार्थी हंगामी. समाचाराला यावे तसे ते आपल्या सोयीने दिवसभरात केव्हातरी शाळेत डोकावून, घटकाभर बसून जात. त्यांच्यापैकी कोण कितवीत आहे याची कल्पना मास्तरांनाही जेमतेमच असे. आज काय, पोरगा ओहोळीला गेला, पोरगी बकरीशी गेली. कुणी शेतात पेरलेल्या दाण्यांची राखण करीत असे, कुणी नव्याने शाकारलेल्या आपल्या झोपड्यावरची गवत–पाने भटकी गुरे ओढून खात नाही ना, यावर लक्ष ठेवीत असे. शाळा बुडल्याची खंत कुणालाच नसे. असा कुठलाच व्याप एखाद्या दिवशी नसला आणि बाहेरही कुठे कामधंदा मिळाला नाही तर दुपारचा थोडा वेळ ही मुले शाळेत येऊन र ट फ गिरवीत. तेवढ्यात गवत कापायला जाणे, पळसाच्या पानांचे शंभराचे गठ्ठे करून हॉटेलवाल्याला ते पुरवणे–असा काहीतरी उद्योग आठवे आणि पाट्या टाकून ती कामाच्या दिशेने चालती होत. ऐच्छिक अशी फक्त शाळा!

एकीकडे मास्तर असे रानात येऊन पडल्याबद्दल स्वतःच्या करंट्या नशिबाला दोष देत बदली करून घेण्याच्या खटपटीत असायचा; रोज बदलीच्या हुकुमाची वाट पाहत असा-



यचा. रतीब घालायला यावे तसा तो लांबून, दुचाकीवरून केव्हातरी शाळेच्या गावी येई आणि वाटेत दोन खाजगी कामे आटोपून सूर्यास्तापूर्वीच घरी पोचावे या इरादाने पुन्हा लौकरच शाळा आवरून, पोरांना पिटाळून स्वतःही निघून जाई. तपासनीस किंवा इतर कुणी पाहुणे शाळेत आले तर ज्या मोठ्याशा पोराच्या ताब्यात शाळा असे, तो पढवि-लेले उत्तर देई. "मास्तर आताच गेलेत, पाच मिनिटांत येतील. बसा."

तेवढ्यात मागच्या दाराने दुसऱ्या मुलाने हळूच निसटायचे आणि धावत जाऊन मास्तरांना बोलावून आणायचे. मास्तरांनी ऱ्हावगीने सोगा सावरीत, चष्मा चाचपीत वर्गात प्रवेश करायचा!

हजेरी–पुस्तकात जी नावे असत ती वर्गात कधीच आढळत नसत. अनुताईंनी वस्ती-वर जाऊन त्यांचा शोध घेतला की प्रकाश पडे — ही मुले केव्हाच मिसरूड फुटून, बाप्ये बनून शहराकडे रोजगाराला निघून गेली आहेत! काही जण तर दोनदोन पोरांचे बाप झालेले असत, तरी इकडे शाळेत त्यांची नावे झळकत आहेतच!

मास्तरांना क्षेमकुशल विचारायला जावे तर त्याला गहिवरून येई.

"अहो, अडचण काय एक का आहे? शाळा काय रडणार, यांच्यापुढे? हजेरीचा हा असा आनंद! त्यातून जी चार पोरं त्यांतल्या त्यात येतात नेमाने, त्यांची डोकी अशी पक्की आहेत की दोनदोन वर्षं झाली तरी 'बे'चा पाढा काही ध्यानात राहत नाही. सणवार आहे, कुणाचं लग्न आहे, खळ्यातलं भात कापायचं आहे—केला सुट्टाल्या! नाही म्हणायला पावसाळ्यात निवाऱ्याला येतात शाळेत! कारण त्यांच्या झोपड्यात कोरडी जागाच नसते. पण मधले नाले भरले की यायचा मार्गच बंद होतो. एकूण हा सगळा एक यक्षप्रश्नच आहे पाहा! आम्ही तरी गेल्या जन्मी काय पाप केलं असेल..."

अनुताईंनी हा सारा तपशील टिपून ताराबाईंच्या हवाली केला.

आपल्या या शैक्षणिक प्रयोगाला योग्य असे एक ठिकाणही ताराबाईंनी आपल्या सह-कार्यांच्या व हितचिंतकांच्या सल्ल्याने हेरून ठेवले होते. बोर्डीपासून सुमारे पाच मैल अंतरावर असलेली, जंगलातली एक टेकडी त्यांच्या नजरेत भरली होती. डहाणू तालुक्या-तल्या कैनाड नावाच्या गावाचे हे एक आदिवासी उपखेडे होते. वीज, पाणी, रहदारीचे रस्ते, दळणवळणाची साधने सर्वांचाच अभाव होता; परंतु ताराबाईंच्या दृष्टीने मोलाचा तपशील म्हणजे या परिसरात आदिवासींचे एकूण आठ पाडे किंवा वस्त्या होत्या. त्यामुळे बालवाडीच्या वयाची सुमारे शंभर तरी मुले तेथे एका मुठीने उपलब्ध होणार होती. ताराबाईंच्या या नव्या ओबडधोबड कार्यभूमीचे नाव होते – कोसबाड!

ताराबाईंनी जी योजना सरकारपुढे मांडली तिचा संसार एकूण साडेतीन ते चार लाखांचा होता. (प्रत्यक्षात तो त्याहूनही वाढला.) पाळणाघरापासून ते वसतिगृहापर्यंत वेगवेगळ्या विभागांसाठी स्वतंत्र इमारती, विद्यार्थ्यांसाठी वसतिगृहे व कार्यकर्त्यांसाठी

निवासस्थानेही बांधावयाची होती. ताराबाईंनी आपली समग्र योजना शब्दांकित करून भारत-सरकारकडे पाठवून दिली. परंतु शासकीय कार्यपद्धतीनुसार योजना प्रांतिक सरकारने म्हणजे मुंबईच्या राज्य-सरकारने पुढे पाठविणे आवश्यक होते. केंद्राकडून ताराबाईंना अनौपचारिकरीत्या उत्तर आले की " योजना विचारात घेण्यासारखी आहे परंतु तुम्ही ती ' through proper channel ' पाठवल्याखेरीज आम्ही काही करू शकत नाही. "

प्रांतिक सरकारला त्याप्रमाणे रीतसर विनंती केली तर अधिकाऱ्यांकडून टोलवाटोलवी होऊ लागली. ते काही केल्या योजना पुढे सरकवायला तयार होईनात. राज्यसरकारच्या या निरुत्साहाचा अर्थ लावता येण्याजोगा होता. केन्द्राकडून योजनेला मंजुरी मिळाल्यास योजनेच्या एकूण खर्चापैकी काही भाग ( matching contribution ) राज्यसरकारला द्यावा लागणार होता. राज्यसरकारला हे नवे ओझे नको होते !

मग पुन्हा पुन्हा पत्रव्यवहार, संबंधित अधिकाऱ्यांच्या भेटी, मुंबई-दिल्लीच्या मंत्र्यांची दारं ठोठावणे... " तुम्ही एका पैशाचीही मदत करू नका, खर्चाचे आम्ही बघून घेऊ. दुसरी काहीतरी व्यवस्था करू. तुम्ही नुसते कागद तर पुढे पाठवा ! "—असा प्रांतिक सरकारचा अनुनय करणे—हे सारे ओघाने आले.

तेवढ्यात आणखी एक ठेच लागली, " बोर्डीला आधीच एक ट्रेनिंग कॉलेज आहे. नियमानुसार पाच मैलांच्या आत दुसरे ट्रेनिंग कॉलेज निघू शकत नाही ! "

मग श्वास रोखून मधले अंतर मोजणे; ते पाच मैलांहून काही फूट जास्त भरताच मोठा निःश्वास !

संस्थेचे विद्यालय बेसिक एज्युकेशन पद्धतीने चालविण्यात येणार असल्यामुळे त्यासाठी मग सूतकताई बेसिक ठेवायची की शेती, याबरही असाच घोळ झाला !

असे अनेक गुंते सोडवीत, ठेचा खात, दिल्लीच्या-मुंबईच्या शेकडो फेऱ्या करणे—खटपटी, भेटीगाठी, हुज्जती, विनवण्या, ओळखी, दूरध्वनी...

अखेरीस एकदाची शासनाकडून योजनेला मंजुरी मिळाली. द्वितीय पंचवार्षिक योजनेत तिचा समावेश करण्यात आला. उत्स्फूर्त संस्थांना शैक्षणिक प्रयोग करण्यासाठी उत्तेजन म्हणून सरकारी सहाय्य मिळू शकते. या प्रकारात ' विकासवाडी योजना ' बसली.

—आणि मग प्रश्न आला पैसा नामक जीवनसत्त्वाचा !

ताराबाईंच्या योजनेला शासनाच्या द्वितीय पंचवार्षिक योजनेत स्थान मिळाले याचा अर्थ एकूण खर्चापैकी दोन तृतीयांश खर्च केन्द्र सरकारकडून केला जाणार होता. मात्र त्यासाठी उर्वरित खर्चापैकी १७% खर्च राज्यसरकारने व १७% खर्च संस्थेने करणे आवश्यक होते. ' खर्चाचे आम्ही बघून घेऊ ' म्हटले असले तरी ताराबाईंच्या मनातच केवळ कुबेर होता आणि राज्यसरकार तर सुरवातीपासूनच नाकबूल होते. मग राज्यसरकारचा हिस्सा केंद्रानेच द्यावा म्हणून केंद्रसरकारची मनधरणी करण्यात आली, आणि



संस्थेचे १७% टक्के द्यावयाचे, ते तरी नूतन बाल शिक्षण संघाकडे कुठे होते ? तेही केंद्रानेच पण उसने-व्याजाने द्यावेत, अशी खटपट करण्यात आली.

अखेरीस त्यावेळच्या अंदाजाप्रमाणे ६६% कायमी खर्चाला अनुदान भारत सरकारकडून मिळाले व दोन वर्षे संस्थेच्या चालू खर्चाला म्हणून ६०% अनुदान मिळाले. केंद्राकडून एकूण अशी रु. ६०,००० ची ग्रॅन्ट व रु. ५६,००० चे कर्ज एवढे पदरात पडले. त्यापैकी कर्ज रु. १७६६ दरसाल अशा ३० हप्त्यांनी व ५ टक्के व्याजाने फेडावयाचे ठरले होते. याखेरीज गांधी स्मारक फंडाकडून रु. २५,००० मिळाले. अंथरुण पाहून हातपाय पसरायचे म्हटल्यावर ठरलेल्या इमारतींपैकी एक रद्द करावी लागली. तरीही अजून बराच खड्डा भरायचा होता.

ज्या नूतन-बाल-शिक्षण संघाची शाखा म्हणून ही विकासवाडी काढायची होती, त्या संघाचे पदाधिकारीदेखील प्रकल्पाची ही अवाढव्य व्याप्ती पाहून कच खाऊ लागले. हे काम संघाच्या आवाक्याबाहेरचे आहे, असा सूर निघू लागला. ' त्यातून करायचेच असले तर तुमचे तुम्ही काय ते बघून घ्या; परंतु उतारवयात आता एवढी मोठी जबाबदारी तुम्हीसुद्धा शिरावर घेऊ नये ' असा पोक्त सल्ला देऊन संघाची मंडळी हात झटकून मोकळी झाली.

एकूण, ताराबाईंना या साहसापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न तर सारेच करीत होते ! शहरात आणि खेड्यात राहून केलेले काम पुरेसे नाही म्हणून वयाची पासष्टी जवळ आलेली असताना, हृदयविकाराचा दुसरा झटका येऊन गेलेला असताना ह्या म्हातारीने आता जंगलातल्या झोपडीत, आदिवासींच्या वस्तीत जाऊन राहायचे नवे खूळ डोक्यात घेतलेय ! कुणी त्यांना वेड्यात काढीत होते, कुणी त्यांना ' आवरण्या 'चा प्रयत्न करीत होते, आणि पुष्कळांना तर हेही समजत नसे की मागासलेल्या भागात जाऊन त्या लंगोटीवाल्या रानमाणसांची ती उघडीवाघडी पोरे मांडीवर घेऊन त्यांना शिकवायचा हा खटाटोप कशासाठी ? मुळात सरकारने इतक्या सोयी करूनसुद्धा जी माणसे शाळा ओस पाडतात त्या रानटी लोकांना शिक्षणाची गरज वाटत नाही आणि महत्त्व पटत नाही, हे उघडच आहे. त्यातून तुम्ही अगदी भगीरथ प्रयत्न करून त्यांना शिकवलेत तरी शाळा सोडून कामधंद्याला लागली की त्यांचे मागचे सारे सपाट होते ! अशा परिस्थितीत पालथ्या घड्यावर पाणी घालायला त्या रानात जायचेच कशाला ?

काही जण तर ताराबाईंना सरळच विचारीत,

" पासष्टी जवळ आली असताना अशी अंधारात उडी घेताय, एवढी मोठाली कर्जं काढताय, लोकांकडून पैसे घेताय, हे सारं करायला, कर्ज फेडायला आपण जिवंत राहू अशी तरी खात्री आहे तुमची ! "

ताराबाई त्यांना खंबीरपणे आश्वासन देत. " मी इतक्यात मरत नाही खास ! '

उरलेला सगळा आर्थिक भार आपल्या खांद्यांवर उचलायचे ताराबाईंनी ठरविले. अर्थात ताराबाईंचा परिवार मोठा होता आणि आपल्या सहकाऱ्यांवर अनुयायांवर, भिस्त ठेवूनच त्यांनी हे आव्हान स्वीकारले होते. सर्वांनी चौफेर नेट लावला, आघाडी उघडली. ताराबाईंचा लौकिक मोठा. नातलग स्नेही, चाहते, परिचित, शिष्य, संबंधित, शेजारी असा आपला अफाट लोकसंग्रह टिपायला त्यांनी सुरवात केली. हळूहळू छोट्यामोठ्या रकमा खात्यावर जमा होऊ लागल्या. कुठे ताराबाई स्वतः एवढे जिने चढून मागायला आल्या म्हणून देणगी मिळून जाई, कुठे सत्तरी जवळ आली तरी एखाद्या तरुणीला लाजवेल असा उत्साह आहे, या वस्तुस्थितीला पावती मिळून जाई. सरोजबेन घोष यांच्यासारख्या ताराबाईंच्या हितचिंतकांनी भरीव सहाय्य केले. अपार परिश्रम घेतले. तीन वेळा चित्रपट घेतले. प्रत्येक वेळी सुव्हेनियर्स काढण्यात आली, त्यासाठी प्रत्येकी रु. ५०००|– च्या अनेक जाहिराती मिळविण्यात आल्या आणि अशा प्रकारे ढोर-मेहेनत करून कार्यकर्त्यांनी चाळीस चाळीस हजार रुपये तीन वेळा उभे केले. पुढे १९६२ साली ताराबाईंच्या सत्तरीनिमित्त थैली फिरवण्यात आली त्यावेळी एक लाख रुपयांचा निधी जमला.

हितचिंतकांनी चहू बाजूंनी मोडते घातले तरी ताराबाई ढळल्या नव्हत्या. ताराबाईंच्याच शब्दांत वर्णन करायचे म्हणजे, “ त्यावेळी मला कसल्या भुताने पछाडले होते कोण जाणे! त्यावेळी मी जणू मी नव्हतेच. खरोखरच मी एक झपाटलेली कार्यकर्ती होते. ‘ ती जबाबदारी माझ्याकडे लागली,’ असे म्हणून मी तबकातला विडा उचलला. ”

अखेर एके दिवशी खरोखरच रानातल्या एका टेकडीवर फुलामुलांचा बगीचा फुलवायचे स्वप्न उराशी धरून ताराबाईंमधल्या झपाटलेल्या कार्यकर्तीने आपल्या एका सहकाऱ्याबरोबर कोसबाडची टेकडी गाठली. टेकडीवरच्या एका कातळावर टेकून भोवतालच्या आसमंतावर, शुकशुकाटावर नजर फिरवीत त्या संतोषाने उद्‌गारल्या, “ तर मग ही आपली जागा ! ” संस्थेच्या इमारतीच्या जागा निश्चित करण्यासाठी त्या आल्या होत्या. टेकडीच्या मधोमध कच्ची सडक आखून दुतर्फा बांधकाम होणार होते. कोसबाड येथे ताराबाईंच्या मनाने आखलेल्या या विकासवाडीचा तोंडावळा बराचसा भावनगरच्या दक्षिणामूर्ती-सारखा होता...

कोसबाड या अधिकृत नावाखेरीज ताराबाईंनी निवडलेल्या या गावाला आणखीही एक आल्हादकारक नाव होते,— आनंदवन.

बोर्डीसारखा येथे समुद्र हाकेच्या अंतरावर नव्हता. तरीही जंगलपट्टीतला हा परिसर मोठा रमणीय होता. दूर क्षितिजावर आवाज न करता लोळत पडल्यासारखी समुद्रघडी; तिच्या काठावर ताडाची–नारळाची मुग्ध बने. सूर्यास्ताच्या वेळी पश्चिमेचा हा पाणकाठ उन्हाने चमकत राही. मधल्या भागात मग अजगरासारखी सुस्त पडलेली लांबट तांबट



टेकाडे आणि हिरव्या वनश्रीचे पुंजके आलटून-पालटून कोसबाड टेकडीच्या मागे, पुढे आणि भोवती पसरलेले. कुठे सुन्न रान, कुठे शेतमळे आणि कुठे कच्च्या मातीच्या खोपटांचे पुंजके. वरच्या सलग निळ्या आकाशाशी सारे रान खजुरीच्या, पळसाच्या, सागाच्या भाषेत काही काही बोलत असे. मधूनच त्यातून खाऱ्या वाऱ्याच्या लकेरी उमटत. दिवसातून मोजक्या वेळा रानातून धिटुकलेपणाने लपाछपी करत जाणारी तांबडी बस आणि झाडींपलिकडून पश्चिम लोहमार्गावरून जाणाऱ्या आगगाडीची केव्हातरी ऐकू येणारी अणकुचीदार शीळ; हे दोनच काय ते सुधारलेल्या जगाशी दळण दुवे.

आदिवासींच्या खेरीज, इतर पांढरपेशांची वस्ती या भागात नव्हती. परंतु यापूर्वी १९४९ सालीच गोखले एज्युकेशन सोसायटीचे कृषि-विद्यालय टेकडीवर येऊन बसले होते. या शेतकी संस्थेतल्या कार्यकर्त्यांची मोठीच सोबत व मदत ताराबाई व त्यांच्या सहकाऱ्यांना होणार होती. कृषिविद्यालयाच्या कार्यकर्त्यांना ताराबाईंचा झपाटा माहीत होता. त्यांचा – श्री. हरिश्चंद्र पाटील, आचार्य भिसे इ. चा सल्ला घेऊनच ताराबाईंनी ही जागा पसंत केली होती, आणि या सर्वांनी ताराबाईंची कल्पना उचलून धरली होती.

शेतकी कॉलेजला लागून असलेली सुमारे अठरा एकर जमीन ताराबाईंनी संस्थेच्या नावाने खरेदी केली. कमी पडला तेवढा तुकडा जंगलखात्याकडून मिळविला, आणखी थोडा उत्साहाने शेजारधर्माला जागलेल्या कृषिविद्यालयाकडून उसना घेतला. टेकडीच्या मागील बाजूस पूर्वेकडे एक चंद्राकार डोंगरलाट होती. ’ हे डोंगर आणि कोसबाड टेकडी यांच्यामध्ये एक लहानसे, सपाट खोरे होते. या भागात विकासवाडीने आपली भातशेती फळबागा, डेअरी व विहिरी आखल्या.

“ पावसाळ्यानंतर आम्ही येऊ आणि कामाला सुरुवात करू. ” ताराबाई कृषिविद्यालयाच्या कार्यकर्त्यांना म्हणाल्या, परंतु शेजाऱ्यांनाही आता घाई झाली होती.

“ नाही, नाही. आधीच सुरू करा ना ! तुमच्या इमारती बांधून होईपर्यंत बालवाडीसाठी आणि राहण्यासाठी अशा दोन स्वतंत्र इमारती आम्ही तुम्हांला सध्यापुरत्या रिकाम्या करून देतो, मग तर झालं ? ”

अखेर २० जून १९५६ रोजी ‘ गरिबांची मॉन्टेसोरी ’ —एक खूप मोठे मनोराज्य, भरपूर जबाबदारी आणि थोडाफार पूर्वानुभव घेऊन जंगलात राहायला आली.

१९५५ च्या एप्रिलमध्ये ताराबाईंनी आपली योजना भारत सरकारच्या शिक्षणखात्यापुढे मांडली आणि १९५६ च्या नोव्हेंबरला ती मंजूर होऊन त्यांच्या हाती आली. योजना मंजूर होणार असा रंग दिसताच ताराबाईंनी कोसबाडच्या कामाला आरंभ केला. पुढे ५ जानेवारी १९५७ ला इमारतीचा कोनशिला–समारंभ करण्यात आला आणि त्यानंतर सुमारे सहा महिन्यांनी बोर्डीच्या संस्थेचे स्थानांतर झाले. बोर्डी येथील सांस्कृतिक जीवना

वर आपल्या बारा वर्षांच्या वास्तव्याचा ठसा ठेवून ताराबाईंचे ग्राम–बाल-शिक्षा केन्द्र कोसबाडच्या टेकडीवर नवा आकार धारण करू लागले.

विकासवाडीच्या कामावर ताराबाईंनी अनुताईंची नेमणूक केली होती. पाळणाघर व बालवाडी हे दोन भाग प्रथम सुरू करण्यात आले, त्यासाठी घरोघर जाऊन भेटी देऊन बाळे मिळविण्यात आली. पाळणाघरात बारा मुले व बालवाडीत अठरा मुले पहिल्या तीन महिन्यांत स्थिर झाली. लोकलबोर्डाची एक प्राथमिक शाळा एका लहान झोपडीत भरत असे. पटावर मुलांची संख्या ३१, रोजची उपस्थिती ७–८, आणि शिक्षक या कामाला कंटाळलेले व निराश झालेले –असे या शाळेचे स्वरूप होते. अनुताईंनी ती लोकलबोर्डाकडून चालवायला घेतली आणि ती सुधारण्याच्या कामाला हात घातला.

पुढे सर्व इमारतींचे बांधकाम पूर्ण झाल्यावर १० फेब्रुवारी १९५८ रोजी श्रीमती इंदिरा गांधी यांच्या हस्ते विकासवाडी योजनेचे औपचारिक उद्घाटन करण्यात आले.

ताराबाईंनी आपल्या अनुयायांना म्हटले, " लक्षात ठेवा, आपले कार्य सरकारच्या पुढाऱ्यांच्या दृष्टीने चैन, विलासाच्या सदरात गणले जाते. आपण श्रीमंतांची बांडगुळे समजली जातो. का ? कारण आपण बालमंदिराची फी देऊ शकतील अशाच आर्थिक थरातील बालकांसाठी आजवर काम केले आहे. आता आपण गरिबांची सेवा करून हे कार्य देशसेवेच्या पंक्तीत नेऊन बसवायला पाहिजे. आता आपल्याला आदिवासींच्या भूमीत जाऊन बालवाडी चालवायची आहे. बालवर्ग हे कोणत्याही प्रगतिशील जनतेच्या जीवनाच्या पुनर्रचनेचे रामबाण साधन आहे, हा माझा विश्वास आहे. ही शेवटची खेळी मी खेळले नाही तर तो कोणत्या निकषावर खरा मानला जाणार ? "

या उद्घाटन समारंभाची तयारी होत असताना अचानक ताराबाईंना आठवण झाली. "अरे एवढा मोठा समारंभ आणि प्रभा इथे नाही ?" गडबडीत प्रभाचा फोटो आणणे राहूनच गेले होते. अनुताईंनी त्वरेने जाऊन तो अनुताईंच्या कॉटसमोरच्या भिंतीवरील त्याच्या जागेवरून काढून आणला आणि झाडाच्या एका फांदीवर त्याची योजना केली. फोटोला रानफुलांची माळ चढली.

प्रभाने रिकाम्या केलेल्या मांडीवर ताराबाई आता जगतातली आदिवासी बालके दत्तक घेणार होत्या. प्रभा गेल्यावर त्यांच्या मातृभावनेचे उदात्तीकरण होऊन ती अधिक सर्व-स्पर्शी व व्यापक झाली होती. ' वसुधैव कुटुंबकम् ' न्यायाने त्यांची माया थेट जंगलातल्या या आदिवासी बालकांपर्यंत पोचली होती. पोसणार होती. एक कळी कोमेजली होती, तिच्या जागी आता लाख फुले फुलणार होती...

" आज खरंच तुमची प्रभा हवी होती ... " कुणी तरी हळहळले.

ताराबाई मंद हसून म्हणाल्या, "अहो, प्रभा नसली तरी अनुताई आहेत. सरलाताई आहेत. सरलाताई माझी मुलगी, त्या माझी मुंबईची संस्था सांभाळताहेत. अनुताई माझा



मुलगा; त्या इथला संसार आपल्या खांद्यावर पेलणार आहेत ... "

" मुलगी म्हणता, मुलगा म्हणता; आणि सारख्या तर आम्हाला रागावत असता ! अनुताईंवर तर किती चिडता ! " सरलाताईंनी मजेने म्हटले, " आमच्यापेक्षा या कुत्र्या मांजरांच्या जोडीवर ताईंचं खरं म्हणजे जास्त प्रेम असेल ... ! "

" अहो, मग बरोबरच आहे ते ! त्यांची नावं काय आहेत ती ऐकलीत ना ? "

सगळे हसू लागले.

ताराबाईंच्या कुत्र्याचे नाव होते ' विकास ' आणि मांजरीचे ' योजना ' !

अनुताईंना ताराबाईंनी आपला ' मुलगा ' म्हटलेले पाहून खास उद्घाटन समारंभासाठी आलेल्या रामभाई पाठकांना बोर्डी येथे काम करीत असतानाचा एक हृद्य प्रसंग आठवला. त्यांनी तो श्रोत्यांना ऐकवला आणि पुढे शिक्षणपत्रिकेत प्रसिद्धही केला—

...बोर्डीच्या ग्राम–बाल–शिक्षण प्रयोगाचे ते आरंभीचे दिवस होते. त्या भागातल्या झोपड्या बहुधा शाकारलेल्या असतात. कुडाच्या भिंती, गवताची छपरं आणि खिडकी नाहीच अशा एका झोपडीत अनुताई आहेत असं रामभाईंना कळलं. पावसाळा होता, पाऊल पाऊल चिखल तुडवीत रामभाई आणि भाऊ केळकर झोपडीच्या दारापर्यंत पोचले.

आत अनुताई मुलांना घेऊन बसल्या होत्या. छप्पर ठिकठिकाणी ठिबकत होतं, भिंती पावसाच्या थपडांनी हुंदके दिल्यासारख्या थरकत होत्या. जमिनीवर पाण्याची थारोळीच होती, एक कोपरा तेवढा कोरडा वाटत होता. अनुताई आणि मुलं तेथे वळचणीला बसलेल्या भिजल्या पाखरांसारखी दाटीवाटीनं बसली होती. आजूबाजूला वाळत टाकलेल्या मासळीचा दुर्गंध सुटला होता. दार पाऊसवाऱ्याच्या धडकांमुळे हादरत होतं. शेजारच्या झोपडीतल्या भांडणाचा बदसूर अनुताईंच्या बाळगाण्यात घुसत होता. पण अनुताईंना यातलं काहीच जाणवत नव्हतं. त्यांनी आपल्या स्वतःला आणि आपल्या बालवाडीला या सगळ्या कोलाहलात मस्त कालवून घेतले होते. एखादा भक्त देवापुढे बसावा तशा मुलांपुढे बसून त्या पावसापेक्षा मोठा आवाज काढून म्हणत होत्या,

" कोल्होबा ऽ कोल्होबा !

बोरे पिकली ऽ "

मुलं म्हणत होती, " नको नको म्हातारे ऽ ... "

दारात येऊन उभ्या राहिलेल्या नवागतांकडे अनुताईंचं लक्ष देखील गेलं नाही. हातवारे करून त्या आपल्या विचारीत होत्या, " कोकणचा फणस इथे कापू ? "

मुलं म्हणत होती " इथे नको ! "

बोर्डीची ही आठवण सांगून रामभाई म्हणाले, " हिंदी लोकांचा महान शिक्षणशास्त्री

बुकर टी. वॉशिंग्टन याने आपल्या पहिल्या शाळेतल्या दिवसाचे वर्णन केले आहे, ‘ एक-झोपडीत शाळा चालवायला गेलो. तिथे पाणी भरलं होतं तेव्हा आम्ही उभ्या उभ्याच वर्ग चालवला. ’ आमच्या ग्राम–बाल–शिक्षा केन्द्राच्या अनुताई वाघसुद्धा असंच वाक्य किंचितही अतिशयोक्ती न करता उच्चारू शकतील ! ”

अनुताई हसल्या परंतु आदिवासींचा शिक्षणप्रश्न कागदोपत्री सोडवून सरकारी फाइल-मध्ये जमा करून ठेवण्याइतके आपले काम सोपे नाही याची जाणीव त्यांना होतीच. त्या उद्‌गारल्या “ बघू या काय काय, कसं कसं जमतंय ते ! ”

वारली मुलांच्या शिक्षणप्रश्नाचा विचार करताना एक महत्त्वाची गोष्ट ताराबाईंच्या ध्यानात आली होती. या मुलांच्या मनात शिक्षणाची गोडी उत्पन्न करायची असेल तर प्रथम त्यांचे जीवन आणि त्यांचे प्रश्न आपण समजून घेतले पाहिजेत. त्यासाठी या बिचकलेल्या जमातीला चुचकारून तिच्या पोटात शिरले पाहिजे, तिला आपलेसे केले पाहिजे. आणि मग मुलांच्या गैरहजेरीमागची, अनियमितपणामागची कारणे शोधून काढून त्यांच्या शिक्षणमार्गातला एकेक अडथळा दूर केला पाहिजे. त्याकरिता प्रथम त्यांच्यात नि आपल्यात असलेली परकेपणाची भिंत फोडली पाहिजे.

आदिवासी मुलांना शाळेबद्दल कसा दुरावा वाटतो हे पहिल्याच दिवशी त्यांच्या व अनुताईंच्या लक्षात आले.

... भोनार पाड्यावरच्या ‘ वनशा ’ला त्या दिवशी रानामध्ये एक शिरीचा वेल सापडला होता. शिरीचा वेल म्हणजे वारल्यांचा कल्पवेल. कारण त्याची पाने, फुले, फळे, मुळे सर्वच खातात. शिरीच्या वेलाचे ते करंगळीएवढे जाड, रताळ्यासारखे परंतु अगोड मूळ चघळत तो झोपडीकडे परतत होता. तेवढ्यात त्याला एक नवल दिसले. शाळेच्या झोपडीपाशी तीन बैलगाड्या थांबल्या होत्या आणि त्यातून झाऱ्या, कुदळी, पाळणे काय वाटेल ते सामान उतरत होते. सामानापाशी उभ्या असलेल्या दोन बाया हसून मुलांना बोलावीत होत्या आणि मंगळी, बावल्या रडक्या आणि शिनवाऱ्या ही पोरे एका उंचवट्यावर उभी राहून ही ‘ मजेशार ’ शाळा पाहत होती.

“ ही ढवळी ढवळी माणसं हितं कशाला आली ! ”

पांढऱ्या पातळातल्या बाईकडे पाहून आयाबाया अचंबा करीत होत्या,

“ अग, यो गोहोलाच आहं ! ”

( अग, हा तर पुरुषच आहे ! )

तेवढ्यात मुलांचे परिचित मास्तर शाळेच्या दारात आले आणि त्या ढवळ्या बायां-शेजारी उभे राहिले. तेवढा खुलासा मुलांना पुरला.

“ मास्तर मास्तर ! पळा पळा ! ”

आणि सारी पाठीला पाय लावून सैरावैरा पळत सुटली. ताराबाई, अनुताई आणि



त्यांचा परिवार खूप हसला.

बालवाडीची माणसे ओळख करून घेण्यासाठी रोज निरनिराळ्या पाड्यांत जाऊ लागली. पहिले काही दिवस कुणी उत्तरच देत नसे. दहापंधरा दिवसांनी अनुभव थोडा बदलला. “ कोणी आहे का घरात ? ” म्हटले तर आतला अंधार आणखीच चिडीचूप होई; परंतु त्या दिवसापुरता त्या घराचा नाद सोडून चार पावले पुढे गेले की झोपडीतून हळूच उत्तर येई, “ मला ताप आला आहे— ”

“ मुलाला किरीम झाले आहे. ”

अपरिचित शिक्षक पाहिला की मुले आणि पालक दोघेही बावचळत. ‘ हा बाबा इथं कशाला आलाय ! ’ ... ‘ गोड गोड बोलून नेईल आणि बाटवील ! ’ ... ‘ बुळाखाली तर घालणार नाही ! ’

हळू हळू आठवड्यातून एकदा एकेका घरी बसायला जायचा परिपाठ पडला. आदिवासी लोक तसे एकलकोंडे. परंतु त्यांना आदरातिथ्य माहीत होते. गेले की बसायला घोंगडी देत, प्यायला पाणी आणून देत. शेंगा, चिक्कू– काय असेल ते समोर आणून ठेवत.

संस्थेच्या आवारात विहीर खोदण्याचे काम चालू होते. तेथल्या पन्नाससाठ कामकऱ्यां-साठी संस्थेत सामुदायिक प्रार्थना योजण्यात आली. प्रथम कुणी वाऱ्यालाही उभे राहीना. शेवटी कामातलीच दहा मिनिटे आज वेगळी काढली, तेव्हा हे ऽ पंचवीस हात लांब जाऊन उभी राहिली ! बसा, बसा सांगितले तर पाठ करून बसली. एक छोटीशी प्रार्थना, मग एक गोष्ट—असा क्रम ठेवला होता. गोष्टी ऐकणेदेखील त्या रानमाणसांना ठाऊक नव्हते. कोरे चेहरे करून गोष्ट सोसत राहत, एवढेच. पुढे पुढे मात्र ‘ गोष्ट सांगा ’ म्हणून आग्रह धरू लागली. मात्र रोजच्या रोज त्याच त्या गोष्टी सांगूनही साधी रामा–कृष्णांची नावेसुद्धा त्यांच्या लक्षात राहत नसत.

सकाळ-संध्याकाळ शिक्षिका झोपड्यांमधून गप्पा मारायला जाऊ लागल्या. पटकुरावर बसून आदिवासी बायांशी त्या मैत्री जोडत. कधी बालवाडीची ताई बावल्याच्या आईला भातपोहे कांडू लागे; कधी मधीच्या आईबरोबर चिंचेचा पाला वाळवू लागे. चिंच, लिंबू हे आंबट पदार्थ आदिवासींना कसे परवडणार ? त्याऐवजी ते चिंचेचा पाला वाळवून कुटून त्याचे पीठ करून ठेवतात. पळसाच्या पानाचा एक त्रिकोणी पुडा बांधून त्यात हा चिंचोरा भरून झोपडीच्या वळचणीला खोचून ठेवायचा. भर पावसातसुद्धा एकही थेंब पाणी शिरणार नाही, अशी ही ‘ चिंचोऱ्याची पेटी ’ बांधतात कशी हे ताई मन लावून पाही. भिंती सारवायच्या, त्यांच्यावर तांदळाच्या पिठाने चित्रे काढायची, दिवाळीत त्यांच्या ‘ तारपा ’ या वाद्याच्या सुरांवर त्यांच्यातलेच एक होऊन रात्री बारा बारा वाजे-पर्यंत नाचायचेसुद्धा !

एखादी रमाताई खोपटाखोपटातून त्यांची गाणी गोळा करीत फिरे. दुसरी शकूताई त्यांच्या उखाण्यांचा संग्रह करी; त्यांनी गाणे, उखाणे सांगावेत म्हणून त्यांच्या मनधरण्या करी. त्या बाया हसून तिला पळसाच्या द्रोणात चहा प्यायला देत आणि म्हणत,

" ताई, तुवा कशाला होवीत हामची गाणी ? "

दिवस भरत आलेल्या एखाद्या बाईला ताई रोज आठवण करी, " तुझ्या पोटात दुखायला लागलं की मला बोलवायला विसरू नकोस ग. मला बाळंतपण बघायचं आहे. मी तुला लाडू करून आणीन मेथीचे. "

मग एखाद्या फेरीत त्या बाईचे बाळंतपण चालू असतानाच ताई तेथे पोचत. सगळा प्रकार कोंबड्याकुत्र्यांप्रमाणे उघड्यावरच !

बालवाडीच्या काही ताई आणि भाऊ ' फिरते दवाखाने ' होऊन वस्त्यावस्त्यांतून हिंडत. आव, हगवण, हिवताप वगैरे साथींच्या दुखण्यावर उपचार करीत. त्यांच्यापाशी त्वचा-रोगावर मलमे असत, काढे उकळून, चाटणे उगाळून बरोबर आणलेली असत. घरोघर गोळ्या, औषधे वाटायची, पाजायची मोठी माणसे वेळेवर औषध घेतात की नाही, हे पाहण्यासाठी पुन्हा पुन्हा खेपा घालत राहत. हळूहळू लोकांचा त्यांच्यावर विश्वास बसला.

" पळा ग पळा, तो आला पुरुष " या ऐवजी, " आपू ताईंले गीत सांगू चला ! " " चला गो, आपल्याला त्ये ताई गोळ्या देत आहेत की काय देत आहेत ते पाहू" अशी वाक्ये कानावर पडू लागली. थंडीच्या दिवसात ताई पाड्यावर गेली की मुलं म्हणत, चल ताई, आपण निंबरात ( उन्हात ) बसू. "

त्या मुलांचे कुडकुडणे पाहून ताई आपल्या अंगावरच्या लोकरीच्या कपड्यांचा विचार करीत राही. ताई रोजच्यापेक्षा जास्त रमली की आयाबाया आठवण करून देत " ताई जा लव्हा ( लौकर ). आता रात व्हायाची. "

कुणी म्हणे, " ताई, लगीन करशील तर आम्हाला वढार जोस ( आमंत्रण कर ). " त्यातली एक ताई पुढे लग्न होऊन गेली तेव्हा या वारल्यांनी आपल्या फाटक्या खिशांतून पैसे गोळा करून तिला अहेरही केला ! " ताई एखाददिवस ये जो हो ! " म्हणत पोचवायला आले.

सुगीच्या दिवसात रोज एकेका घरी जेवायला जायचा पायंडा पाडला. प्रथम अनुताई आपण होऊन एका घरी जेवायला गेल्या. वारल्यांना हा मोकळेपणा आवडला. मग चढा-ओढीने आमंत्रणे येऊ लागली. ' तुमचं रोजचं जेवण द्या,' हा ताईंचा आग्रह असे. मोठ्या भक्तिभावाने नव्या तांदळाचा भात, वरण व परसातली भाजी घरची बाई शिजवी. सर्व मांडी ताईसमोर ठेवून सगळी भोवती बघायला बसत ! फारच आग्रह केला तर घरचा पुरुष तेवढा बरोबर जेवायला बसायचा. असे पंचेचाळीस भोजनभाऊ त्या वर्षी



जोडले गेले. परतभेट म्हणून ताई येताना घरच्या मुलांसाठी साखरेचा पुडा ठेवून येई.

याशिवाय पाड्यापाड्यावर जाऊन अंगणवाड्या चालविल्या जात. करवटपाडा हा एक असाच, दहापंधरा झोपड्यांचा गुच्छ.* मोठी माणसे पहाटे उठून कामावर गेली की मग गावभर मुलांचेच राज्य.

ताराबाईंच्या बालवाडीतली माणसे— त्यांची मोहीम आता तशी बहुतेकांना अर्धवट ठाऊक झाली होती. ही मंडळी कुठेही दिसली की ' बालवाडी आली – बालवाडी आली ' म्हणून धावपळ सुरू व्हायची. दयाळभाई ज्योतीभाई, विमलताई, अशी त्या दिवशी करवटपाड्यावर गेली तेव्हा दुपारचे दोन वाजले होते.

आदल्या दिवशी तर खूप मुले दिसली होती पण आता पाहतात तो शुकशुकाट, झोपड्या बंद. आदिवासींची दारे कधीच बंद नसतात; घरात असतो सगळा असंग्रहच; तो कोण चोरणार ! मंडळी चुळबूळ करीत राहिली. थोड्या वेळाने हळूच एक दार किलकिले झाले. फटीतून एक पिंगा सागरगोटा लुकलुकू लागला. आपण लुकलुकतोय हे त्या सागरगोट्याला ठाऊकच नव्हते— एखाद्या चांदणीसारखेच !

मुले लपून बसली होती वाटते. मग अंदाजानेच हाका मारणे सुरू केले. " ए शनवारि, ए मंगळ्या, ए सोमी —"

आदिवासींच्या कुठल्याही पाड्यावर ही अशी नावे भेटतात ! परंतु त्या दिवशी कोणताच वार हाकेला ओ देईना.

" अरे बाहेर या तर ! आम्ही काय, काय आणलंय बघा ! "

मंद वाऱ्याने झाडाची फांदी हलावी तशी आवाज न करता एका झोपडीची झडप जरा हलली, एवढेच.

अखेर जवळच्या थैलीतल्या वाट्या आणि मणी काढले. प्रत्येक दाराशी मण्यांची एकेक वाटी आणि दोरा नेऊन ठेवला आणि सगळे लांब एका झाडाखाली जाऊन बसले. बालवाडीसाठी नेमून घेतलेला वेळ संपल्याखेरीज जायचे नाही, असे ठरले.

इकडे हळूहळू एकेक वाटी गुप्त झाली. ' बालवाडी ' डोळ्यांच्या कोपऱ्यातून सगळे पाहत होती. जरा वेळाने एकेक वाटी परत बाहेर आली. मणी ओवून, त्यांच्या माळा करून त्यात ठेवलेल्या होत्या. बालवाडी हसली ! मुलांनी बाहेर न येता आपली खुशी, पसंती कळवली होती. बालवाडीदेखील मग माळा गोळा करून निघून गेली.

काही दिवस हा क्रम असाच चालू राहिला. जयंतभाई, दयाळभाई, शकूताई मुलांच्या कलाने घेत होती. हळूहळू दारांचे कोन वाढू लागले, एक-दोन दारे उघडीच राहू लागली. मुले हळूहळू वाट पाहू लागली. या लोकांना उशीर झाला तर ' बालवाडी येते

* शिक्षणपत्रिका, १९६०.

की नाही ' हे पाहायला मुले अर्ध्या रस्त्यापर्यंत येऊन थांबू लागली !

—करवटपाड्यावर मुलांनी अशी नकळत आपली बालवाडी वसवून घेतली.*

इकडे विकासवाडीच्या बालवाडीत चार दिवस नावीन्य म्हणून आलेली मुळे अगदीच येईनाशी झाली. कार्यकर्त्यांच्या तोंडचे पाणी पळाले. मुलेच पळाली ! शिकवणार कुणाला ?

एके दिवशी ताराबाई म्हणाल्या, " आज मी स्वतः येते बरोबर. बघू बरं का येत नाहीत पोरं ! "

बालवाडीच मुलांचा शोध घेत निघाली आणि वाटेतच थबकली. समोरचे दृश्य करुण तेवढेच अर्थपूर्ण असे होते.

ताराबाई थांबल्या होत्या तिथपासून सुमारे वीस फुटांवर एक सुकलेले तळे होते; डबकेच. कुणी काठी, कुणी पहार, कुणी बाळकी फांदी घेऊन त्या डबक्यातल्या वाळत आलेल्या चिखलात खणत होती, जवळजवळ पाऊण तासाच्या प्रयत्नानंतर काहीतरी त्यांच्या हाती लागले– एक बोराएवढे मातीतले फळ, कंद होता तो. तो तसाच मातीसकट तोंडात टाकून मुले पुन्हा हावरटपणाने खणू लागली.

" हे पाहून माझ्या डोळ्यात झणझणीत अंजन पडले, " ताराबाईंनी लिहून ठेवले आहे;

" ...ती मंडळी आमच्या गाण्याचा तिरस्कार करतात, त्यांना आमचा कार्यक्रम आवडत नाही यात काय नवल ? भुकेने त्यांचे प्राण कासावीस होत आहेत ! ' खायला कोठे मिळेल ? खायला कोठे मिळेल ? ' त्यांचे डोळे चारी बाजूंस भिरभिर फिरून शोधीत आहेत... अशा वेळी त्यांच्या भुकेची काहीही व्यवस्था न करता आम्ही त्यांच्यासाठी ' आमची मोटर पों पों करते, डायव्हर बंदरावर बेऊन फिरायला जातो ' अशांसारखी गाणी म्हणायची, म्हणजे त्यांची आम्ही निर्दयपणे थट्टाच करतो असे नाही का ? माणुसकीचा अंशही आमच्यात नसल्याचे हे निदर्शक आहे... आम्ही जाऊन स्वच्छता आणि सामाजिक सुधारणेच्या गप्पा मारू लागतो तेव्हा ती मंडळी आमच्या अंगावर मारायसाठी धावून आली तर मला त्यात काहीसुद्धा नवल वाटणार नाही... "

त्यांचा रोजचा प्रश्न जो भूक त्याला ज्यात उत्तर दिसत नाही ते शिक्षण घेण्यासाठी दिवसातले ५–६ तास ही मुले कशी घालवतील ? ताराबाईंच्या मनात आले, पोटातल्या भुकेला उत्तर म्हणून ज्या शाळेत कोरडी अक्षरे आणि आकडेच फक्त काढून दिले जातात त्या शाळेतून त्या मुलांनी पळ काढला तर त्यात त्यांचे शहाणपणच दिसून येत नाही का ?

गांधीजींनी तो मार्मिक प्रश्न उगाच विचारला नव्हता—

बालवाडी कशी चालवावी ? —ले. श्रीमती अनुताई वाघ



" त्यांना खाण्यासारखे गवत कोठे मिळेल, ते कसे शिजवावे आणि कसे खावे हे शिकवाल काय ? "*

...मग ऑगस्ट महिना आला. मुसळधार पाऊस पडू लागला, मजुरीची कामे बंद पडली. झोपड्यांमध्ये आता तांदळाचा दाणा नव्हता; उधार काही मिळत नव्हते. दुष्काळाचे वर्ष होते ते. पोरापासून थोरापर्यंत सगळे उपाशी; अशी पाड्यापाड्यातून अवस्था होती. पाऊस थोडा उघडला की पुरुष मंडळी बाहेर डोकावत. मग निस्तेज डोळ्यांनी दारात उकिडवी बसून राहत. मुले तशीच उपाशी पोटांनी झोपडीभोवती साचलेल्या गढूळ पाण्याशी खेळत.

ताराबाई व्हरांड्यातल्या खुर्चीत बसून सचिंत मुद्रेने पावसाकडे पाहत होत्या.

" अनुताईंना म्हणावं, तुमचं हातातलं काम आटपलं की जरा बाहेरच या. "

" का हो ताई, कसला विचार करताय ? "

" हे बघा, भाऊंनाही जरा इकडेच बोलवा. या लोकांची अवस्था मला आता बघवत नाही. खर्च्यासाठी म्हणून आपण चांगल्या तांदळाची पोती घेऊन ठेवली होती ना, त्यातली किती शिल्लक आहेत ? "

" काय ताई, बेत काय आहे ! दामाजीपंत संचारले का अंगात ? वाटून टाकायचा विचार दिसतोय. "

" हो, जवळजवळ तसाच... आपण असं करू या– "

" ताई, तुम्ही म्हणता ते खरं आहे. पडवीत आलं की या लोकांची तोंडं बघवत नाहीत; आत गेलं की तो सुवासिक भात खाववत नाही. पण अगदीच व्यवहार सोडून पण चालणार नाही. आधीच आपली संस्था कर्जावर चालू आहे; ती बंद पडली तर सगळंच मुसळ केरात– "

" आपण मधला मार्ग काढू या. आता आहेत त्या तांदळातले आपल्यापुरते काढून घेऊन बाकीचे या लोकांना वाटून टाकावेत. मात्र बोली करायची की त्यांच्या शेतात भात पिकल्यावर आपलं भात त्यांनी परत करावं. आता आपल्या वाट्याला हलकं भात येईल; पण तेवढी झीज आपण सोसू. "

भात द्यायचे ठरले. वारल्यांना हाका मारल्या तशी ते धावत आले; तासाभरात तांदळाची वाटणी उडाली ! विकासवाडीकरांना पोती रिकामी करताना पाहून पुष्कळांनी त्यांना वेड्यात काढले !

परंतु त्या वर्षी पाऊस चांगला पडला, वारलींनी पेरणाऱ्याशी इमान राखले आणि चांगली पिके आली. उपासमार तात्पुरती संपली. आणि ताराबाईंना आदिवासी माणसांच्या

* पाचगणी भेट, १९४९.

प्रामाणिकपणाचा पुरावा मिळाला. शेते पिकली तशी प्रत्येकाने न मागता तांदूळ परत आणून दिले; हेही भात ताराबाई-अनुताईंना सुवासिकच वाटले !

हळूहळू मग दिवाळी आली. या दिवसांत आदिवासी लोक त्यांचे 'तारपा' नावाचे विशिष्ट वाद्य वाजवून नाचतात. दुधी भोपळा कोरून, वाळवून केलेले हे वाद्य. अचानक केव्हातरी या तारप्याचा पुंगीसारखा गुळचट आवाज झाडीतून मंजुळ वाटा काढत शिरू लागतो.

रात्रीची वेळ होती; रान थंडीने ओसंडत होते. वारल्यांच्या हसऱ्या, काळ्यासावळ्या 'पोरन्यां'ना गोळा करून एक पासष्टीची दुबळी आजी आणि तिची पंचेचाळीशीची हसतमुख सावली एका झाडाच्या पारावर बसल्या होत्या.

"तुमची गाणी म्हणा ग !"

मुलींना लाज वाटत होती. त्या नुसत्याच हसत सुटल्या. हे हसणे आता थांबायचे कधी ? तेवढ्यात अचानक तारप्याचे सूर रानातून वळणे घेत आले आणि त्यांनी त्या मुलींच्या पावलात ठेका भरला.

"ताई, नाचाया जाऊ ?"

रानातल्या वेलींनी एकाएकी उठून नाचायला लागावे तसे झाले. झटकन् त्यांनी एकमेकींच्या कमरांना विळखे घालून वेरदार फेर धरला. तारपेवाला बाबा आता झाडीतून बाहेर पडून, त्यांच्या पुढ्यात येऊन उभा राहिला होता. त्यांना झुलवीत होता. तारप्याची गती वाढू लागली. तारप्याचे सूर बदलले की त्यांचा नृत्यप्रकारही बदले.

पाहता पाहता अनुताईसुद्धा उठून त्या फेरात सामील झाल्या. हा नाच बघण्यासाठी नसून करण्यासाठी आहे, हे त्यांना जाणवले होते. ताराबाईही मुंबईची अर्धविलायती संस्कृती विसरून त्या जंगलाच्या ठेक्याशी एकरूप होऊन गेल्या होत्या.

गाणे सुरू झाले—

"वयवर दिवा, वयवर दिवा.
अंगणात चांदणं ग पडऽऽ
अंगणात दिवा ग अंगणात दिवा
ओट्यावर चांदणं ग पडऽऽ ग पडऽऽ
ओसरीत चांदणं ग पडऽऽ"

अनुताईंच्या मनात आले, रिकाम्या पोटांनी यांचे चेहरे असे सूर्यफुलांसारखे फुलतात कसे ? उपाशी पोटी ही माणसे अशी नाचू शकतात कशी ?

मुलांनादेखील पोटभर खाण्याची गाणी आणि पोटभर खाण्याच्याच गोष्टी प्रिय होत्या, यात नवल नव्हते. शेतांचा भात आणि शेतांचीच कढी गाण्यातसुद्धा उतरे.



"बारडच्या खिडकीत गाजाहुंब पिकला.
गाजाहुंब पिकला ये दादुनं नांगला
ये ऽ दादुनं नांगला ते मला यून सांगला
मला यून सांगला ते दादू गेला
सर्कन् चढला ते भर्कन् पाडला
भरकन् पाडला ते दादूनं खाल्ला
ये दादुनं खाल्ला ते दादु फुगला..."

रानातल्या एका वखळीत गाजाहुंब हे फळ पिकले ते एका दादूनं-मुलानं सर्कन् चढून नि भर्कन पाडून कसे मटकावले त्याची ही पद्यगोष्ट. इतके मटकावले, इतके मटकावले की दादूचे पोटच फुगले !

शाळेच्या वयाची बरीच मुले दिवसभर गुरे चारीत रानात हिंडायची. ताईंच्या मनात पर्याय आला; प्रत्येकाच्या एक दोन शेळ्या किंवा एखादी गाय इतपतच गुरे असतात. पाळीपाळीने गुरे राखायचे ठरले तर ? —मुलांपुढे हा तोडगा मांडायचा ठरविला.

त्यासाठी मग एके दिवशी भरवले बकऱ्यांचे संमेलन ! सगळ्या मुलांना शेळ्यांसह यायचे आमंत्रण दिले होते. दिवसभर ही गुरे मुलांबरोबर असायची आणि रात्रीही वाघाच्या भीतीमुळे पुन्हा त्यांच्याच उशापायथ्याशी बांधलेली असायची. मुलांना आपल्या भावंडांइतकाच त्या चतुष्पाद भावंडांचाही लळा असे ! आपले शेपूटवाले सवंगडी घेऊन सगळी हौसेने आली. समस्त बकरीसमाज टेकडीवर उपस्थित झाला. तेथे त्यांच्यासाठी हिरवा, लुसलुशीत चारा टोपल्यांमधून भरून ठेवला होता. शेंदराच्या सहाय्याने मग त्यांच्या अंगावर टिळे लावले, खुणा केल्या. एकीकडे बकऱ्यांची पंगत बसवली आणि ढोलक्याच्या खमंग साथीबरोबर खास बकऱ्यांचीच गाणी म्हटली. शेळ्यांच्या छोट्या मालकांना हे सारे फार पसंत पडले. मग ताराबाईंनी विचारले, "सांगा बरं, इतक्या साऱ्या बकऱ्यांना चारायला न्यायचं तर किती मुलं लागतील ?"

'दोघादोघांनी जाऊनदेखील काम भागू शकेल' असे उत्तर आले.

"मग आपण जोड्या ठरवल्या तर ? पाळीपाळीने दोघादोघांनी रानात जायचं. बाकीच्यांनी इथे अभ्यास करायचा, चालेल ?"

कुणी विचारात पडले, कुणाचे डोळे चमकले. उत्साहाने जोड्या ठरल्या.

पण चार दिवसांतच पुन्हा ये रे माझ्या मागल्या !

"अरे निंग रं, सुरें नारायन कुटं आला नांग !"

की पुन्हा एकेक पोर आपापली शेळ्या-करडे पुढे घालून निघाले. रानच्या वाटेने, शाळेला पाठमोरे.

—त्या दृष्टीने बकरी-परिषद फसलीच.

तेव्हा मग ताराबाईंच्या शिक्षकशिक्षिका स्वतःच निघाले मुलांबरोबर रानात. त्यांच्या-बरोबर रानात भटकायचे, ओढ्यात उतरून मासे पकडायचे, चिंचा पाडून त्यांचे वाटे करायचे आणि एकीकडे त्यांना नवे नवे खेळ शिकवायचे, त्यांना माहिती द्यायची, त्यांची कल्पनाशक्ती चेतवायची...

एके दिवशी झाडाच्या शेंड्यापर्यंत दगड कुणाचा लागतो, हा खेळ चालला होता. एकेकाला दहा, दहा दगड वाटले होते. कुणाचे चार, कुणाचे नऊ झाडाच्या माथ्यावरून अलगद पलिकडे उतरले. ताईंचा मात्र एकही नेम लागला नाही.

मथी आज खेळात भाग घेत नव्हती. तिच्या मांडीवर होते तिच्या बकरीचे नवे बाळ. बाकीची मुले घटकेत खेळ विसरून एका डबक्याच्या काठी काहीतरी उकराउकरी करायच्या मागे लागली होती. ताईंना ठाऊक होते, आता एखादा लहानसा कमळकंद खोदून काढण्यासाठी तीन-तीन फूट चिकाटीने खणतील! ताई मग मथीपाशी बसल्या.

" याचं नाव पाडू या ?"

ही कल्पना नवी होती. मथीला आवडली.

" काय ठेवायचं, तुम्हीच सांगा बरं."

" आपण ठरवू या."

" पापडी ठेव, ताई."

" का ग ?"

" तिचे कान पापडीसारखे आहेत."

ठरले, पापडी.

ही आता किती दिवस दूध पिईल ?

पक्के ( पुष्कळ ) दिवस.

तू किती वर्षांचा रे ?

कोण जाणं!

तू ग ?

पक्क्या वरसांची.

ताईंनी बकरीचे बाळ मांडीवर घेतले. त्याला नावाने हाक मारली; त्याला चिंचेचे कोवळे पान भरवले.

मुलांना हा सोहळा आवडला.

" माझ्याजवळ ही डबी आहे. हिच्यात मी एक खडा टाकते. रोज एक टाकू. ते मोजले की पापडी केवढी झाली ते कळेल!"

ताई कॅलेंडरचे बी पेरतात.

" हो! असंच करायचं."



" ताई, उद्या माझ्या शेळीचं नाव ठेवणार!"

" ताई, माझ्या ?"

पण दुसऱ्या दिवशी निघाला साप! झाडाची सावली कुठपर्यंत पोचली हे मुलांना कळावे म्हणून ताईंनी जमिनीत त्या ठिकाणी एक खुंटा ठोकला होता. मुलांनी पावले टाकून मोजली, ती शंभर भरली.

तेवढ्यात ओरडाआरडा ऐकू आला. बनशाने सापाला नेमका चेचला होता. चांगला मनगटभर जाड आणि सहासात फूट लांब होता. पण मुलांनी त्याच्याभोवती फेर धरून धिंगाणा घालायला सुरवात केली. तो अर्धमेला साप अजूनही थरथरत होता. पोरांनी त्याला एका काठीवर लोंबता ठेवला, त्याची शेपटी एका सोपटाने बांधून टाकली.

ताई तो धाडसी सोहळा पाहत दूर झाडाखाली बुजून उभी होती.

मग पुन्हा झाडाची सावली मोजली; ती पन्नास पावलेच भरली! सापावरूनच मग गोष्टी सुरू झाल्या. कुणी कोणते साप पाहिले; कुणाच्या ' बा ' नं केवढा साप मारला...

सापांच्या जाती, अवस्था, ते कात केव्हा टाकतात—सगळेच साप माणसाचे शत्रू नसतात...साप उलट शेतात धान्याचे नुकसान करणाऱ्या उंदरांना खातात.

" बालवाडीत सापांचा तक्ता आहे. मी काही साप औषधात घालून ठेवले आहेत. याला पण आपण ठेवू या. उद्या बघायला याल ना ?"

" सापाच्या अंगात हाडं असतात ?"

मग तो साप झाडावर टांगून त्याला सुकू दिला. सुकलेल्या सापाचे मणके काढून ते डब्यात ठेवले. दुसऱ्या एकाला जमिनीत पुरून टाकला. बऱ्याच दिवसांनी त्याचेसुद्धा मणके मिळाले.

पुढे मुलांनी एक बोटभर जाडा हिरवा साप जिवंतच धरून आणला. त्याची मानगूट धरून त्याला काचेच्या नळीनं दूध पाजून मुलांनी त्याला बरेच दिवस जिवंत ठेवला होता.

इकडे झाडाची सावली पंचवीस पावलांवर आली...

" आज लांब उडीचा खेळ खेळायचा का रे ?"

हा तर मुलांना माहीतच नव्हता.

कुणाची उडी किती लांब जाते ?

" मंगळे, तुझी किती गेली ?"

" पक्की लांब!"

" अंहं! आपण मोजू या. पावलं आहेत की."

मग एक जण म्हणतो,

" हतं काय उडायचं, ए ताई, वड्यावर चल."

दहा फूट रुंदीचा ओढा. एकेका ढांगेत म्हणता म्हणता पार!

इथे मास्तरीणच नापास व्हायची वेळ आली! तेवढ्यात गाय चरत चरत तेथे आली. तिला पण मारमारून उडी मारायला लावली!

पण आता उडी मोजायची कशी? ओढ्याच्या रुंदीवर पावलं कशी घ्यायची?

धनशानेच मग लांब काठी आणली आणि ओढ्यावर आडवी घातली. काठीवर पावलं घातली; ती पंधरा भरली.

आता मुलांना मोजायचाच नाद लागला आहे. शेताचा बांध मोजला, दोन झाडांमधले अंतर मोजले. कुणाचे खळे कुठून किती लांब?-मग हळूच ताईंनी 'फूटपट्टी' बाहेर काढली, इंच दाखवले, आणि परत सगळे पट्टीने मोजले.

—आज घड्याळ पण आणले आहे. "काय रे, चिंचेचं झाड आपल्याला वेळ सांगतंय; पण इथून कुठे जायचं तर काय सावली खाकोटीला मारून न्यायची का?—हे बघा काय ते."

आज नुसतीच मुलांना पाळीपाळीने टिक् टिक् ऐकवायला घड्याळ आणले आहे... अनुताईंनी एक दिवस मग काढली सहल.

मंडळी 'चांदोबाची धोंड' पाहायला निघाली होती. वाटेत कुणी ताईंना आवळे आणून देत होते; कुणी काठी. आणखी कुणी झुडपाआड दडून ताईंना घाबरवत होते. "ताई, दमलीस का? जरा टेकू – मग जाऊ."

मध्येच कुणाला तरी एक उडता पक्षी दिसला...आकाशात, पण आवाक्यात. लगेच ते पाखरू टिपायचे ठरले, सणसण दगड सुटले. खमंग न्याहारी फडफडत पुढ्यात येऊन पडली देखील.

रडक्या धावतच गेला.

"काय रे, एकटाच खाणार?"

"नाही."

"कसा खाणार?"

"भुजून खाऊ."

"कोण कोण खाणार?"

"अजगे (सगळे) खाऊ."

लगेच गवत, काटक्या गोळा झाल्या. तो गुबगुबीत पक्षी जाळावर भाजला गेला. ताईंनी देखील मग बरोबरचे खाणे काढले.

"चला रे खायला."

"गोल करा. पानं जमवा."

"हात कशाला पुसाल? माझ्याकडे हा एक रुमाल आहे."

हातपुसणे झाले.



पाने पिशवीला पुसून घेतली. मंगळ्याने सर्वांना वाढले. रडक्या प्रत्येकाच्या पानात वनभोजन मस्त रंगले.

पण चांदोबाची धोंड अजून लांब होती. अजून तीन डोंगर ओलांडायचे होते. वारली लोकांचे देव म्हणजे नारण देव, वाघ्या देव. आणखी म्हणजे मग हिरवा देव, खळ्या देव, हिमाई देवी...

चांदोबाची धोंड हे एक त्यांचे रानातले तीर्थस्थान आहे.

अखेर मंडळी पोचली.

चांदोबाची धोंड म्हणजे एक भली मोठी शिळा होती. या धोंडेला माथ्यावरती आपोआप दोन बाजूला दोन मोठाले कोनाडे पडले होते. या कोनाड्यात पुन्हा त्याच आकाराचे पण लहान असे दोन दगड होते. त्या पत्थराचा जसा कुणी भांगच पाडला होता! धोंड होती मात्र सहज कुणाला चढता येणार नाही अशी अवघड, उंच.

कुणी तरी रोज येतो आणि या धोंडीवर दिवा लावून जातो अशी वारली लोकांची श्रद्धा होती.

मुलांनी भक्तिभावाने चांदोबाच्या धोंडीवर माथी ठेवली. अनुताईंनीही श्रद्धेने हात जोडले.

सहल सफळ झाली होती.

# १८. विकासाच्या मार्गावर

भारताच्या एकूण लोकसंख्येपैकी ७ टक्के लोक आदिवासी आहेत. महाराष्ट्रात सुमारे चाळीस लाख म्हणजे एकूण लोकसंख्येच्या सहा टक्के आदिवासी आहेत. त्यांपैकी केवळ ठाणे जिल्ह्यात आठ लाख आदिवासी आहेत. या आदिवासींपैकी चाळीस टक्के म्हणजे तीन–सव्वातीन लाख आदिवासी वारली जातीचे आहेत. काथोडी, माडीया या दोन जाती सोडल्यास वारली सर्व आदिवासी जमातीत मागासलेले समजले जातात.

या वारली लोकांची स्वतःबद्दलची कल्पना किती हीन आहे हे त्यांच्या नावावरून किंवा नावापासूनच सिद्ध होते. आपण सर्वांत निकृष्ट जमात असून परमेश्वराने आपल्याला सगळ्यात शेवटी निर्माण केले अशी त्यांची समजूत आहे. 'आम्हांला निर्माण करून देवाने पीडा वारून टाकली म्हणून आम्ही वारली' असा अर्थ ते स्वतःच लावतात.

१९५९ साली ठाणे जिल्ह्यातील वारली आदिवासींच्या मुलांसाठी शिक्षणसंस्था काढायचे ठरवून ताराबाई मोडक व त्यांचे सहकारी रानातल्या या टेकडीवर राहायला आले व त्यांच्यापैकीच एक बनून त्यांच्या जीवनपद्धतीचा जवळून अभ्यास करू लागले. तेव्हा त्यांना दिसून आले की मुंबईपासून केवळ ऐंशी मैलांवर असलेली ही वारली जमात पांढरपेशा जीवनक्रमापासून नुसती अंतरानेच दूर नाही तर सुधारलेल्या जगाच्या किमान काही शतके मागे आहे.

— या रानमाणसांची एक निराळीच दुनिया होती. वस्तीपासून सुरक्षित अंतरावर परंतु रानाचीच कूस धरून कळकीच्या, बांबूच्या झोपड्या बांधून एखाद्या पाणवठ्याभोवती पुंजका करून अशी ही माणसे राहत. पोट भरण्यासाठी पैसा मिळविण्यासाठी व तुरळी, जीवनावश्यक वस्तूंची खरेदी करण्यापुरती जवळच्या खेड्यात जात. भाताच्या शेतात, चिकूच्या मळ्यात, विटांच्या भट्टीवर मिळेल तशी मोलमजुरी करीत आणि रात्र पडण्यापूर्वीच रानाची वाट धरीत. गावातल्या माणसांशी कमीत कमी संबंध ठेवण्याकडे त्यांचा कल असे, आणि आपल्या मुलांनीही गावातल्या मुलांमध्ये मिसळलेले त्यांना आवडत नसे. वारली लोकांची स्वतःची अशी एक संस्कृती होती. एक तुटपुंजी का होईना, परंतु बोलीभाषाही होती आणि त्यांच्या रीतिरिवाजांचे व कायदेकल्पनांचे एक कुणीच न लिहिलेले 'पुस्तक' होते. त्यांची नाचगाणी, खाणी–राहणी, औषधपाणी देव–वाणी, सारेच निराळे होते.

मात्र तरीदेखील एक प्रकारचे प्रगतिहीन, खुंटलेले, वठलेले जीवन ही माणसे कंठीत



होती. निसर्गाच्या निरागसपणाबरोबरच दारिद्र्य, अंधश्रद्धा, अस्वच्छता आणि अज्ञान यांनी या आदिवासींचे जीवन ग्रासलेले होते. कसलीच शैली, आकार, दिशा, भवितव्य नसलेले एक प्रकारचे उच्च प्राणिजीवनच म्हणा ना!

घरातल्या पाच वर्षांच्या पोरापासून ते पंचाहत्तर वर्षांच्या म्हातारा-म्हातारीपर्यंत सारे दिवसभर रोजच्या भाकरीचे अटळ गणित सोडविण्यात गुंतलेले. शेती करणे त्यांना ठाऊक होते. जवळच्या जमिनीच्या तुकड्यावर बहुधा भाताचे पीक काढत. पिके हाती आली की दोन–चार महिने भरपूर भात खायचा. अगदी लहान मुलांपुढे देखील भाताचे ढीगच्या ढीग वाढायचे आणि घरच्या जमिनीत पुरलेल्या मातीच्या रांजणातले भात संपले की मग उरलेले महिने कामाच्या, अन्नाच्या शोधात वणवण करीत घालवायचे. मिळाली तर कंद-मुळे नाहीतर मग केवळ पाणी पिऊन, न कावता, न कुरकुरता उपासमार सोसायची. लग्ने, आजारपणे, मर्तिके इ. निमित्तांनी सावकाराची कर्जे करून ठेवायची आणि ती फेडण्यासाठी आयुष्यभर त्याचे कष्ट उपसत राहायचे! त्यांच्या दरिद्री जीवनाला ग्रासून असणारा आणखी एक दुष्ट रोग म्हणजे 'सूर' किंवा दारू. दारूशिवाय जन्मही साजरा होत नसे आणि अंत्यविधीही पार पडत नसे.

ढवळ्या माणसाबद्दल त्यांच्या मनात एक प्रकारची धास्ती भरून असे. "वाघापुढे टाकू!" या धमकीने मूल गप्प राहिले नाही तर वारली आई त्याला विचारी, "ढवळ्या माणसापुढे टाकू?" आणि खरोखरीच वारली मुले वाघाला काठीने हुसकून लावीत, पण पांढऱ्या कपड्यातल्या माणसाला पाहून धूम ठोकीत; कारण त्यांचे आईबापही तेच करीत असत.

वारली माणसाने ढवळ्या माणसाची एवढी दहशत घेतली यालाही कारणे होती. व्यापारी, कंत्राटदार, सावकार, दुकानदार, पोलीस, सरकारी अधिकारी साऱ्यांनीच त्यांना आजवर केवळ लुबाडले होते. आदिवासी माणसाचा स्वभावच एकूण भोळसट, त्याच्या वृत्तीत बंडखोरी कमी. त्याचा गैरफायदा सुधारलेले लोक पिढ्यान् पिढ्या घेत आले होते. साहजिकच या गरीब श्रमजीवी माणसाच्या मनात एक प्रकारचा न्यूनगंड, भीती निर्माण झाली होती.

एकूण, रानातले भूत आणि शहरातला ढवळा माणूस यांच्या धाकात, त्यांना चुकवीत सगळे आयुष्य काढायचे.

शासनातर्फे आलेल्या किंवा समाजसेवेसाठी आलेल्या शहरी माणसाकडेसुद्धा ही माणसे संशयाने पाहात. काहीतरी स्वार्थ, आंतरिक हेतू असल्याखेरीज उगाच कुणी आपल्यासाठी काही करणार नाही अशी आदिवासींची खात्रीच असे. या सर्वांमुळे त्यांच्यात व ढवळ्या कपड्यांत अनेक कुंपणे पडलेली असत. आणि कुंपणापलीकडे

पाहायची त्यांची दृष्टी नव्हती !

अशा परिस्थितीत, 'श्रीमंताला मन आहे, त्याच्या मनाचा विकास व्हायला पाहिजे; मग खेड्यातल्या, रानातल्या बालकांना काय फक्त शरीरच असते? त्यांची मने अविकसितच राहायला हवीत ?' असे म्हणून 'माणसाला योग्य समाजव्यवस्था निर्माण करता आली नाही म्हणून जन्म पावलेल्या अन्यायाची परंपरा' दूर करायला आलेल्या ताराबाई मोडकांची भूमिका त्यांना कशी समजावी?

शाळेतला मास्तर परका, तसा तालुक्याचा डॉक्टरही परकाच. घरात कुणी आजारी पडले की त्याच्या गळ्यात व हातापायांना चामड्याच्या दोरीत एकेका इंचाच्या अंतराने ओवलेल्या बिब्ब्यांच्या माळा बांधायच्या. भगताला बोलावून मंत्रतंत्र करायचे. तालुक्याच्या डॉक्टराने 'गोळ्या' दिल्या तर त्या फेकून द्यायच्या. रोग्यावर 'वारं' पडू नये, (त्याला भूत लागू नये) म्हणून मोराच्या पिसादला सर्वांत जाड तंतू शोधून काढून तो दोऱ्यात ओवून त्याच्या गळ्यात अडकवायचा. अतीच झाले तर मग डॉक्टरकडे न्यायचे आणि रोगी खलास झाला की मग अर्थातच त्याचे भूत बनवायचे !

भुतांच्या दृष्टीने तर ही जमीन सुपीकच. वाऱ्याची झुळूक आली, पाने जरा सळसळली, मांजर गेले तरी लगेच त्याचे 'भूत' होई !

"माणूस जाळल्यावर राखेतनं भूत कसं येईल ?" विचारले तर उत्तर मिळे,

"माणूस 'टाकला' (मेला) की भूत राखेतनं येतं. आम्ही नांगेल. (पाहिलं.)"

"आम्हाला कसं दिसत नाही ?" म्हणून सवाल केला की ठाम उत्तर येई,

"ढवळ्या कपड्याला ते दिसत नाही !"

शिवाय आजारपण, उपासमार, साथ, निष्काळजीपणा कशानेही मूल मेलं तरी 'त्याला कुणी तरी भूत केलं' ही श्रद्धा !

तशी ही जमात भाबडी, लाजाळू, हसरी. खुशीचा आनंद व्यक्त करण्यासाठी मनसोक्त नाचत अंगावर चिंध्या पांघरतील, परंतु डोक्यात फुलाचे झुबके घालतील ! कुणाच्या अध्यात ना मध्यात असा स्वभाव. इतका, की दुसऱ्या पाड्यावरच्या वारल्यांशी संबंध ठेवणेही त्यांना नको असे.

त्यांच्या या वृत्तीचेच त्यांच्या विश्वाभोवती अदृश्य कडे पडल्यासारखे झाले होते. त्यांची सारी जिद्द, रोजच्या भुकेला उत्तर शोधण्यातच गुंपलेली असे आणि आपले जीवन, परिस्थिती, राहणीमान सुधारण्यासाठी काही केले पाहिजे हे समजण्याइतकी दूरदृष्टी, आच, विचारशक्ती त्यांच्याजवळ नव्हती. आपले पराकाष्ठेचे दारिद्र्य, अवहेलना, पिळवणूक त्यांनी इतकी अंगळवणी पाडून घेतली होती की उपाशी पोटांनी, दुखऱ्या पायांनी ही माणसे तास न् तास नाचत. 'उद्या' असा त्यांच्या आयुष्याला नव्हताच. आयुष्य हे असेच खडतर असायचे हा पिढ्यापिढ्यांचा अनुभव एखाद्या अबाधित सत्यासारखा



स्वीकारून, आपल्या दारिद्र्याचा आपल्याभोवती एक कोष करून ही माणसे जगत होती.

त्यातच लग्ने, बाळंतपणे, जन्म आणि मृत्यू होत. आदिवासींमध्ये लग्न झाल्याखेरीज मुलीने पदर घ्यायचा नसतो. पंचांसमक्ष लग्न नक्की केले की तरुण-तरुणी एकमेकांजवळ राहू लागतात. याला 'बोल लावणे' म्हणतात. एकत्र कुटुंबपद्धती त्यांच्यात फारशी नाही. त्यांची झोपडी म्हणजे एकच अंधारी, खिडक्या नसलेली मोठी खोली असते व तिच्या चार कोपऱ्यांत चार प्रकारचे व्यवहार चालू असतात. नव्या जोडप्यासाठी शेजारीच नवा खण बांधला जातो; तेथे ती स्वतंत्रपणे कमावून राहतात. पुढे जेव्हा पैसे जमतील तेव्हा मग थोडे विधी करून गावजेवण घालायचे की लग्न लागले. लग्न हा आदिवासींमध्ये ब्राह्मणामधील बोडणांप्रमाणे एक सवडीने उरकण्याचा संस्कार असतो. त्यामुळे कितीदा तरी लग्नाची तयारी होईपर्यंत एकीकडे घरात पाचसात पोरेही झालेली असतात, अर्धा संसार उरकलेला असतो. कधी कधी तर बापाचे आणि मुलाचे लग्न बरोबरच होते. एखाद्या पुरुषाची पहिल्या लग्नाची बायको मरून त्याने दुसऱ्या मुलीबरोबर बोल लावलेला असतो. अशा वेळी त्याचे पूर्वी एकदा लग्न झालेले असल्यामुळे त्याचे पुन्हा लग्न होत नाही. एकट्या बाईचेच लग्न होते मग !

"पण कुणाशी ?" म्हटले तर ती माणसे गोंधळून म्हणतात, "कुणाशीच नाही ! तिचं एकटीचंच लग्न आहे. नवऱ्याचं एकदा झालं आहे, पुन्हा कशाला ?"

आणि या वारल्यांना जी पोरे होतात त्यांचा जीवनक्रम, दिनक्रमही त्यांच्या वडील माणसांच्या जीवनकलहाशी, जीवनसंग्रामाशी जखडलेला असे.

महिना–सव्वा महिन्याचे मूल झाले की त्याला पटकुरावर टाकून घरातली सगळी माणसे रोजगार शोधण्यासाठी पहाटेच्या अंधारातच बाहेर पडत; ती मग पार अंधार पडायच्या वेळी एकेक जण परतत. मोठ्यांसाठी रात्रीच मीठ घालून भात उकडून ठेवलेला असे. मडक्यातला तो गार भात खाऊन ती कामाला जात. मुलांसाठी दुसऱ्या मडक्यामध्ये भाताचीच पातळ पेज किंवा नाचणीची आंबील करून ठेवलेली असे. पाचसहा वर्षांची मुले तान्ह्या भावंडाचा सांभाळ करण्यासाठी घरी राहत. भूक लागली की डलकीने (नारळाच्या करवंटीला दांडा लावून केलेली पळी) पेज काढून संपवायची. तोंडी लावायला एखादा कांदा, मिळालाच तर एखादा बोंबील ! खरे जेवण रात्रीच– तांदुळाच्या पिठाच्या भाकरी आणि तांबड्या भोपळ्याच्या वेलाची पाने घालून शिजवलेले चवळीच्या डाळीचे तिखटजाळ वरण किंवा चिंचेचे फुळकवणी सार !

पेज संपली की मग दुपारभर भावंडे कडेखांद्यावर घेऊन आसपासच्या रानात भटकायचे. झाडांवर जो कच्चा–पक्का–तुरट–आंबट मेवा मिळेल तो तोंडात टाकीत राहायचे. गुरे चारण्याचे आणखी एक कामही त्यांच्याच गळ्यात असे. एखादी शेळी किंवा गाय अशी त्यांची गुरे असत. व ज्यांच्या घरी स्वतःची गुरे नसत ते आदिवासी इतर सधन

मळेवाल्यांची, शेतकऱ्यांची गुरे चारून महिना तीनेक रुपये कमाई करीत.

" अय राम्या, निंग, नांग, असगी ढोबी आल्या. "

(" अरे राम्या, नीघ, चल, सगळी गुरं आली. ")

" सुरैनारायण कुठं आला नांग ! "

की सगळ्या छोट्या लंगोट्या काठ्या आणि चिंधोट्या आपापल्या गुरांना पुढे घालून निघाल्या तुरुतुरू रानाच्या वाटेने ! हातात सागाच्या किंवा बांबूच्या हिरव्यागार काठ्या असत. काठ्यांच्या टोकांना बांधलेले घुंगुरांचे झुबके, खुळुक खुळुक करणारे ! एखाद्याच्या कमरेला थेट कृष्णासारखा पावासुद्धा !

एखादे टेकाड पार केले की पाडा दृष्टिआड होई. वनातली पाणवठ्याजवळची हिरवळ मुलांनी हेरून ठेवलेली असे. त्या हिरव्या कुरणात मनाने एक लक्ष्मणरेषा आखून घ्यायची आणि गुरांना सोडायचे चरायला. मावंडांना झाडाच्या सावलीत बसवायचे, खेळत ठेवायचे. रडायला लागली तर कोरड्या भाकरीचा तुकडा चघळायला द्यायचा, त्यांना कडेवर घ्यायचे आणि एकमेकांशी धावपळीचे खेळ खेळायचे, झाडांवर चढायचे. वाटेत ओढा लागला तर त्यात उतरून मनसोक्त डुंबायचे, अंगावरची लंगोटी चुबकून चुबकून टाकायची. गुरे लांब जाऊ लागली की त्यांना मधून मधून चुचकारुन, ढोसून परतवायचे.

—आणि एकीकडे पोटातल्या भुकेवर उत्तर म्हणून भोवतालच्या रानात सतत पूरक अन्नाचा शोध घेत राहायचे. कधी बिळातले खेकडे हुडकून काढायचे आणि मांस साफ करून जाळावर भाजून फस्त करायचे ! कधी ढोपरभर पाण्यात मातीचे बांध घालून, कामठ्यांच्या चौकटी टाकून मासे धरायचे, गोफणीने पक्षी पाडायचे, घरटी शोधून शोधून त्यांची अंडी मिळवायची, ससे आणि उंदीरसुद्धा !

याशिवाय मग शिंदोळ्या, वाघोट्या, खजुऱ्या शोधून त्या खायच्या. पिकलेल्या असल्या तर, गर फारसा नसला तरी गुळचट लागतात, त्या चोखून चोखून खायच्या. कच्च्या असल्या तर घरी आणून उकडायच्या. काही कडू कंद तर उकळून उकळून कडूपण घालवून मग मीठ लावून खायचे. सीताफळे, चिक्कू, पपया, कैऱ्या, आवळे, लिंबोण्या— कुठलेही फळ तुरट, कच्चे, हिरवेच खाऊन टाकायचे. झाडावर त्याला मोठे होऊ द्यायला, पिकून गोड होऊ द्यायला सवड कुणाच्या जिभेला आहे ? आपल्याला मिळालेली फळे, कंद, जमिनीत, ढोलीत पुरून, एकमेकांपासून दडवून ठेवायचीही या मुलांना सवय होती.

याखेरीज वडाची, उंबराची फळे, अंबाडीसारखा पाला, गवताच्या कोवळ्या काड्या, वडाच्या पारंब्यासुद्धा !

दिवसभर वनातच ही पोरे अशी जीवनरस, जीवनसत्त्व मिळवीत राहात.

एकीकडे झाडांना झुले बांधणे, चिखलात लोळणे, झरे शोधणे हे चालूच.



दुपारचे ऊन रणरणू लागले की मध्ये एकदा घरी चक्कर टाकायची. शेतात राखणीचे काम असे, घर शाकारायचे असे. किंवा असे काहीच काम नसले तर तेवढ्या वेळात हॉटेलातून, मळ्यातून फुटकळ कामधंदा मिळतो का ते पाहायचे. यापैकी काहीच जमले नाही तर त्या दिवशी टेकडीवरच्या शाळेत जरा डोकवायचे. ' एकू 'चा धडा गिरवायचा, चार अक्षरे घोटायची आणि ' मास्तरचे आठवत नाही ' म्हटल्यावर मास्तराच्या चार शिव्या खायच्या, मार चुकवायचा की पाटी तिथेच टाकून रानाकडे पळायचे. शाळेत जाणे म्हणजे फुकट वेळ दवडणे, असेच आईबापांनाही वाटत असे. त्यामुळे तीही पोरांना सारखी कामावरच पिटाळत.

या साऱ्या आनंदीआनंदात शिक्षणासारख्या ऐच्छिक आणि भरल्या पोटी करावयाच्या सुखवस्तू छंदाकडे लक्ष पुरवायला या मंडळींना सवडही नव्हती आणि त्यापासून आपला काही फायदा होईल, आज ना उद्या आपल्या परिस्थितीत त्यामुळे फरक पडू शकेल हे त्यांना उमगूही शकत नव्हते. मुंगीसारख्या कीटकांमध्येही असणारे दूरदर्शित्व या वन्य माणसांकडे नसते, हा जगातल्या बहुतेक आदिवासी जमातींच्या लोकांना सरसकटपणे लागू पडणारा सिद्धान्त या लोकांनाही लागू पडत होता. त्यातून त्यांची स्वतःबद्दलची कल्पना इतकी हीन होती की पांढरपेशांची मुले जे ज्ञान पचवू शकतात ते पेलण्याची, शोषण्याची बौद्धिक ताकदच आपल्या मुलांमध्ये असणार नाही, अशीही एक त्यांची समजूत होती. समाजकल्याणासाठी येणारी शिकलेली माणसे त्यांना अन्न, कपडालत्ता पुरवू लागली, माहितीपट दाखवू लागली तरी यात आपले हित किंवा भले आहे यावर त्यांचा विश्वासच नसे.

आदिवासी माणसांचे हे सारे स्वभावविशेष, त्यांची जीवनशैली, त्यांचे मागासलेपण, त्यांचे विशिष्ट गुणदोष हे सारे अभ्यासून, लक्षात घेऊन त्यांच्या अर्थव्यवस्थेशी, कुटुंबव्यवस्थेशी सुसंगत असे स्वरूप त्यांच्या शिक्षणसंस्थेचे ठेवायचे होते. त्यांना शिक्षणाचे महत्त्व पटवून, अभिमुख करून घेऊन त्यांच्या जीवनपद्धतीला पूरक, सुसंगत अशा प्रकारचे शालेय शिक्षण त्यांच्यासाठी आखायला पाहिजे होते. आणि त्यासाठी पहिला टप्पा म्हणजे त्यांच्या मनात विश्वास निर्माण करायला हवा होता. असे टप्प्याटप्प्यानेच या भागात कार्य होणार होते व त्यासाठी बरीच पूर्वतयारी, मशागत करणे आवश्यक होते.

हे कार्य हाती घेताना ताराबाईंचा दृष्टिकोन स्पष्ट होता. देशापुढे आदिवासी बालकांच्या शिक्षणाचा जो बिकट प्रश्न होता त्याचे उत्तर आपल्या बालशिक्षणविषयक सिद्धान्तात त्यांना दिसले, म्हणून ताराबाई कोसबाडला आल्या. रानातले हे छोटे माणूसबळ, ही राष्ट्रीय संपत्ती त्यांना वेचून घ्यायची होती. किडामुंगीसारखे जीवन जगणाऱ्या, मलिन दारिद्र्यग्रस्त, असंस्कारित आदिवासींच्या नव्या पिढीला त्यांना सुसंस्कारित, सुशिक्षित व

स्वावलंबी बनवायचे होते. आणि त्यांचा हा दृष्टिकोन त्यांनी आपल्या लेखन–भाषणांतून वेळोवेळी प्रकट केला होता.

ताराबाईंनी म्हटले आहे, “ हा प्रश्न मानवी भू–भाग परत मिळवण्याचा आहे. आपली पडीक जमीन परत मिळवण्यासाठी आपण जशा योजना आखतो, विचार करतो त्याप्रमाणे मागासलेल्या जमाती म्हणून ओळखल्या जाणाऱ्या– कधीच वापरल्या न गेलेल्या– मानवी समाजाच्या भू–भागाला सुपीक व फलदायी बनवण्यासाठी आपण प्रयत्न केला पाहिजे आणि या प्रयत्नांची सुरुवात मानवी मनाच्या प्रभातकाली, बालवयातच झाली पाहिजे ...

“ ...मागास भागात आर्थिक, औद्योगिक व आरोग्यविषयक सुधारणा व्हाव्यात म्हणून अनेक राष्ट्रीय व सामाजिक योजना काम करीत आहेतच. पण खरे जिज्ञासू, संस्कारक्षम, मोकळे असे जे बालवय ते इथे वाया जात आहे. याच वयात संस्काराची मुळे खोलवर जाऊन रुजतात. मोठ्या वयात ते कठीण असते. ”

आणि म्हणून ताराबाई, अनुताई व त्यांच्या सहकाऱ्यांनी ते लंगोटीत वावरणारे आदिवासी बालवय हाती धरले.

...बालवाडीत सामुदायिक बारसे करायचे ठरले. सकाळपासून विकासवाडीतल्या बालवाडीच्या समोर, अंगणात धांदल उडालेली दिसत होती. बारसे एकाचे, परंतु तान्ही मुले किती तरी. त्यातही बारा दिवसांचे मूल एखादेच. कुणी महिन्याचे, कुणी दोन महिन्यांचे. काही पावले टाकणारी सुद्धा! प्रशिक्षण–विद्यालयाच्या विद्यार्थिनींनी आठ दिवस पाड्या-पाड्यांतून हिंडून नवी नवी बाळे कुठे जन्मली आहेत याचा शोध घेऊन यादी केली होती व आयांना बाळांसह यायचे आमंत्रण दिले होते. रात्री जागून मशीनवर बसून झबलीटोपडी शिवली होती. इंदूताई, प्रभाताई, शकुताई सगळ्याच जणी गडबडीत होत्या. कुणी झोळ्या फुलांनी सजवीत होते. कुणी निवडुंगाचे दिवे तयार करीत होते. माडावर रांगोळ्या काढणे, चुलीवर घुगऱ्या शिजत लावणे...

पंधरा मुले यायची होती. एक वाजता बारसे होते. गावातल्या एका प्रतिष्ठित मातेच्या हस्ते बारसे व्हायचे होते. पाहुण्याबाईही आल्या. पण बाळांचा पत्ता नव्हता.

अखेर एकदाच्या पाच जणी आल्या!

—आणि शेवटी तर पस्तीस मुलांची बारशी त्या दिवशी साखळीने पार पडली. सर्वांना साखर वाटली.

“ आपल्या समाजाचा हा ठेवा आहे. त्याला चांगला वाढवा. ” पाहुण्या मातेने आदेश दिला.

—अगदी ‘ गोविंद घ्या, गोपाळ घ्या ’ पासून विकासवाडीने आदिवासींची नवी पिढी फुलवायला घेतली होती.



आदिवासी लोकांमध्ये मुलाला पाळण्यात घालायची चालच नाही, मूल हाका मारायच्या वयाचे होईपर्यंत ते ‘ दादू ’ किंवा ‘ बाई ’ असते! पुढे सोयीसाठी काहीतरी नाव शोधून काढायचे किंवा त्याच्या जन्मवाराचेच नाव त्याला द्यायचे चिकटवून! आता विकासवाडीत दरवर्षी असे बारसे साजरे होऊ लागले. पहिल्या वर्षी एकच मूल आले, पुढे पुढे तर ७०–७० मुले येऊन समारंभपूर्वक आपले बारसे करून घेऊन गेली!

आदिवासींना आपलेसे करावे, त्यांना आपली आत्मीयता कळावी, त्यांची आपापसात जवळीक वाढावी, या दृष्टीने अशा समारंभांचे महत्त्व होते. बारशाप्रमाणे संस्थेत वाढदिवसही साजरे होऊ लागले.

वाढदिवस सामुदायिकच होत. अशा वेळी विकासवाडीचा सारा परिवार अंगणात जमा होई. ज्यांचा वाढदिवस असे ती मंडळी नटून–थटून येत. अंजू वाढाण— आठ, लक्षिम मसरा—आठ, रामचंद्र खाडे—दहा, ...सर्वांना मध्यभागी उंचवट्यावर बसवून औक्षण केले जाई. एखादे शिक्षक मग त्या मुलांची माहिती सांगत. कुणाचे अक्षर चांगले, कुणाची चित्रकला चांगली, कुणी झाडावर चढण्यात पटाईत...काही विशेषांचा आवर्जून उल्लेख केला जाई. दुसऱ्या एखाद्या ताई मग मंगल आशीर्वादाचे कवन वाचून दाखवीत. संस्थेकडून या मुलांना खाऊचे पुडे बक्षीस मिळत. याखेरीज त्यांचे सखेसोबती त्यांना भेटी आणत. रुळ, फुलांचे गुच्छ, गवताची परडी, कागदी होडी, पतंग, फुगा, मोरपीस...

मानकऱ्यांचे चेहरे नुसते फुलून जात. त्यांच्या मुखावर उजळणारा मधुभाव कॅमेऱ्याला टिपता येईच असे नाही!...अखेर राष्ट्रगीताने कार्यक्रम संपे.

शिमग्याच्या नाचाच्या निमित्ताने क्वचितच एकत्र होणारी आदिवासी माणसे या ना त्या निमित्ताने विकासवाडीत एकत्र येऊ लागली. आपल्या मुलांच्या भल्यासाठी ही माणसे केवढी झटत आहेत हे त्यांना जाणवू लागले. बालवाडी, पाळणाघर व प्राथमिक शाळा असे तीनही विभाग आता सुरू झाले होते. कधी विकासवाडीत वडाच्या पारावर मुलांच्या चित्रकामाचे, मातीकामाचे प्रदर्शन भरविले जाई– कधी आनंदबझार तर कधी नवरात्र, हळदीकुंकू–समारंभ होई. निरनिराळ्या निमित्ताने पालकसभा घेतल्या जात. आदिवासी पालक अशा वेळी आवर्जून हजेरी लावीत. “ हे आमच्या मंगीने काढले चव! ” म्हणून एकमेकांना दाखवीत. तेथे मुलांना जबाबदारीने पदार्थ तोलताना, हिशेब करताना पाहून, इथे येऊन मुलांचे भलेच होते हा त्यांचा विश्वास दुणावे.

आदिवासी लोकांमध्ये एकमेकांमध्ये ‘ पाहुणेरे ’ जाण्याची चाल आहे. एका सप्ताहाच्या अखेरीस ताराबाईंनी पन्नास आदिवासी स्त्रियांना पाहुणेरे बोलावले. खरे म्हणजे होते शिबिर; पण त्याचे नाव आदिवासींना समजेल असे ठेवले होते. दिवसभराची कामे आटपून सगळ्या आयाबाया आपल्या मुलाबाळांसकट संध्याकाळी हजर झाल्या. सगळ्यां-

साठी अंथरुणा-पांघरुणाची व्यवस्था अनुताईंनी ठेवली होती. मुलांसाठी झोळ्या बांधून ठेवल्या होत्या. रात्री चांदण्यात गोल बसून जेवणे झाली. सकाळी शिकेकाई लावून समारंभाने न्हाणी झाली. खेळ, गाणी, खाणी. अखेर माहेरवाशिणी तृप्त होऊन घरी गेल्या!

जेवणे झाल्यावर त्या गायला बसल्या! कुठलेही गाणे साधारणपणे आपल्या आवडत्या व्यक्तीचे नाव घालून म्हणायचे, ही त्यांची पद्धत– आपल्या ओव्यांसारखी.

आपल्याकडून आपलेपणाने त्यांनी सुरुवात केली—

…"ताराताई दारू पिऊन माजली.
पोलीसपार्टी आली.
तिने ताराबाईस ठाण्यावर नेली
तेव्हा कुसुमताई रडली
सजा भोगून ताराताई परतली
—तेव्हा पद्माताई हसली!"

आदिवासींच्या प्रेमगीताचा हा आशय समजला तेव्हा अनुताई–ताराबाईंना हसावे की रडावे ते समजेना!

बालवाडी सुरू केल्यावर काही दिवसांनी नावीन्य संपले तशी मुले येईनाशी झाली. नेमाने रोज शाळेत जायची त्यांना सवयच नव्हती. बोर्डीप्रमाणे येथेही शिक्षिक घरोघर त्यांना बोलवायला जात. 'मुलांना पाठवा' म्हटले की पालक उलट विचारत,

"आहे काय तुमच्या बालवाडीत?"

"भात तर (सध्या!) आम्हीसुद्धा देतो. काहीतरी गोड खायला देणार असशील तर पाठवतो."

आईबापच अशा अटी घालायला लागल्यावर मुले कसली दाद देताहेत?

त्यांच्यातले काही जण कधी सीताफळे पाहून ती कुठे आणि कशी लपवावी या विवंचनेत असत. काही झाडांवरून चिंचांचे आकडे खाली फेकताना दिसत. बालवाडीच्या ताईही मग चिंचा झेलू लागत, सीताफळे शोधू लागत. त्यांच्याबरोबर, त्यांच्या कलाने घेत हुंदडायचे. गोळा केलेल्या चिंचांचे सारखे वाटे करायला म्हणून बालवाडीत घेऊन यायचे. मीठ द्यायचे. कधी, "अरे खाऊन जा; उसळ केली आहे" म्हटले, तर थोडा वेळ बालवाडीत रेंगाळत, पण फराळपाणी आटोपले की पसार होत!

दोन-तीन महिने हा क्रम चालू ठेवल्यावर हळूहळू मुले बालवाडीत जरा रमू लागली, खेळू लागली. मग त्यांच्यासाठी व्यवसाय काढले. गेरूने भिंतीवर चित्रे काढणे, मातीकाम, वाळक्या फळांची तोरणे करणे, सारवणे, लिंपणे, त्यांच्या रोजच्या पाहण्यातले हे उद्योग होते. त्यांत मुले चटकन् रस घेऊ लागली. गाणी आवडायची, गोष्टी फारशा आवडत



नसत. सारली चुळबूळ करीत. मात्र गोष्टीतल्याप्रमाणे अभिनय करायला सांगितला की खुश होत!

…पावसाळा आला, तशी घरात कोरडी जागा नाही म्हणून जास्त मुले येऊ लागली. दळणे, कुटणे, रंगकाम, वडीकाम —असे व्यवसाय वाढत गेले.

परंतु ताराबाई पाहत होत्या— एका जागी बसून एखादे काम करणे हेच या मुलांना जड जाते आहे. शहरी मुलांना हमखास आवडणारे — बाटलीत रंगीत पाणी भरायचे कामही त्यांना आवडत नाही. कारण एखाद्या कृतीवर, गोष्टीवर लक्ष केंद्रित करणे, चित्तवृत्ती स्थिर ठेवणे, त्यासाठी एका जागी बूड स्थिर ठेवणे या गोष्टींचा त्यांना शीण होतो. मातीकामात सुद्धा कुठे कौशल्य दिसत नसे. नुसता राडा व्हायचा, नाहीतर गोळे.

पावसाळा असाच संपला आणि मुले खळ्याकडे जाऊ लागली. मोठी माणसे आता भात कापून त्याचे भारे खळ्यावर आणून टाकायच्या धांदलीत असायची. आता मुलांचा उद्योग म्हणजे सारखी त्यांची पाठ धरायची. भाताच्या लोंब्या गळल्या की त्या गोळा करून खायच्या!

याला आता काय करायचे? शिक्षिका गोंधळून गेल्या. पण ताराबाई म्हणाल्या, "हा त्यांचा जीवनव्यवसाय आहे आणि त्यांच्या मते तो शाळेपेक्षा जास्त महत्त्वाचा आहे. भाताची कापणी मळणी होईपर्यंत धीर धरा. येतील तेवढ्या मुलांवर समाधान माना. आपली शाळा शहरासारखी नेमाने चालणार नाही; इथे मुलांच्या कलाने घ्यायला हवे."

मग खुल्या अंगणातच काही व्यवसाय सुरू केले. रेती चाळणे, झोपाळे, मातीच्या विटा पाडणे, कृत्रिम विहिरीतून पाणी काढणे … छोटी बैलगाडी होती ती उलगडायची, पुन्हा जोडायची. मुले एकेका व्यवसायात पाच-दहा मिनिटे टिकायची. हळूहळू मग बालवाडीची सर्व साधने मांडून ठेवण्यास सुरुवात केली. मुले त्यांच्याशी व्यवस्थित खेळू लागली.

…आणि एके दिवशी विमलताई नावाची एक पोरसवदा शिक्षिका बालवाडीचे काम आटोपून ताराबाईंना भेटायला आली, ती धावतच!

"ताई ताई! माझ्या वर्गातला मंगळ्या आहे ना चार वर्षांचा? त्याने आज जनावरांच्या चित्रांचा अल्बम मागितला बरं का! आणि त्यारी कोपऱ्यात जाऊन बसली एकटीच. मांडी घालून. मी आपली गुपचूप बघत होते, हा काय करतोय? त्याने पहिल्यापासून शेवटपर्यंत सगळे प्राणी नीट पाहिले. एकेक पान हाताने धरून उलटायचा आणि ताई त्यानं आज असा पंधरा वेळा अल्बम पाहिला!"

शिक्षिकेचा तो आनंद आणि उत्साह पाहून ताराबाईंचाही चेहरा उजळला शिक्षिकेचे यश मोठे होते. कारण बालवाडीचे संस्कार मुलांवर होऊ लागल्याची ती पहिली निश्चित खूण होती!

हळू हळू शिवणकार्डावर टाके घालणे, तराजूत पदार्थ तोलणे अशी चिकाटीची, एकाग्रतेची कामे मुले आवडीने करू लागली. मातीकामाला, घडीकामाला निश्चित आकार व अर्थ आला. मुले मातीच्या झोपड्या, झाडे, बैल, गुराखी त्यांना दिसणारी भुतेसुद्धा करू लागली! 'या आमच्या शकुताई!', 'हे ना, दयाळभाई.' माणसांच्या प्रतिकृतीही दिसू लागल्या. एस. टी. बस, बुलडोझर हे आधुनिक आकार साधण्याचे प्रयत्नही दिसू लागले. तसे लेखनवाचनादी प्रत्यक्ष शिक्षण अजून दूरच होते. पण पार्श्वभूमी तयार होऊ लागली होती.

…पहिल्यापासून शाळेत येणाऱ्या काही मुलांना तर बालवाडीचा, शिक्षिकांचा लळाच लागल्यासारखे झाले. अनुताई एकदा दोन-तीन दिवस मुंबईला कामाकरता गेल्या. परत आल्यावर त्यांनी बालवाडीत पाऊल टाकले तशी छोट्या लक्ष्मीने धावत येऊन त्यांचा पदर धरला.

"ताई, तू आलीस?"

"मी यायचीच होते. तुम्हांला सांगून गेले होते ना?"

"मला तर सपन आले तू गावाला गेली. आता यायाचीच नाही. बिजी ताई (दुसरी ताई) यायाची. मग जाग आली तर मी आयशी ठाकले (निजले) होते. आईला चिकटून-चिकटून निजले. बिजी ताई आम्हाला नको. आली तर डोकीत धोंड घालू."

"अं हं:, असं नाही बोलू. दुसरी ताईही चांगली असते." असे म्हणत अनुताईंनी लक्ष्मीला उचलून घेतले.

…आदिवासी लोकांमध्ये भात घरी आणताना खळ्याला नैवेद्य दाखवायचा समारंभ असतो. अशीच वर्षाची शकू झोपडीच्या दाराव बसून ताराबाईंची वाट पाहत होती. ताराबाईंना बघून तिने धावत पुढे जाऊन त्यांचा हात धरला.

"ताई चल, माझ्या घरी चल."

ओढत ओढत तिने ताईला आईकडे चालवले.

"ताई, बस. कालपासून शकू तुझी वाट पाहते आहे. आमच्याकडे खळं झालं. खा हे लाडू."

तांदळाच्या पिठाचे हे लाडू असतात. पिठाची उकड काढून त्यात गूळ-मीठ घालून. लाडू करून पुन्हा उकडतात. जवळचे नातेवाईक बोलावून खातात.



ताईंनी एक तुकडा खाल्ला आणि उरलेले लाडू पानात गुंडाळून बरोबर घेतले, बालवाडीत नेले.

"हे शकूच्या खळ्याचे लाडू, बरं का! घ्या सर्वांनी तुकडा-तुकडा."

ताई लाडू वाटत असताना शकूचा चेहरा अभिमानाने फुलला होता.

…आणि हसरा, खेळकर रमण एक दिवस बालवाडीत आलाच नाही. दुसऱ्या दिवशी आला तो ताईंच्या हाताला झोंबू लागला.

"ताई, चल. माझ्या घरी. आत्ता चल तू."

रमणची आई बाळंतीण झाली होती.

"ही नांग (बघ) माझी बाई." आपल्या तान्ह्या बहिणीच्या अंगावरून हात फिरवून रमण म्हणाला. ताईंनी बाळाला मांडीवर घेतले.

"ताई, बाईला आपण बालवाडीत नेऊ."

"बाई अजून लहान आहे. बसायला लागली की न्यायची तिलापण."

"मी नाही यायाचा बालवाडीत. मी तर हिते बाईपाशीच ऱ्हायाचा."

"बरं बरं, तू बाईशीच खेळ हां!"

चारपाच दिवसांनी रमण बालवाडीत येऊ लागला.

पुढे बाई बसू लागली. तीही बालवाडीत येऊ लागली.

रमणची बाई चैत्र महिन्यात झाली होती. तिला हळूहळू 'चैती' हेच नाव चिकटले.

…भाषेमुळे माणसे पाहता पाहता जोडली जातात. मुलांच्या मनात आपलेपणा, जवळीक निर्माण करण्याचे मोठे साधन म्हणजे त्यांची वारली भाषा आत्मसात करणे. बालवाडीच्या लोकांचा मुलांची भाषा शिकायचा, शक्य तेवढे त्यांचे शब्द वापरून त्यांच्याशी बोलण्याचा प्रयत्न असे. ताई आपल्याच भाषेत गोष्ट सांगताहेत म्हटल्यावर मुलेही फुलत!—

'…घलाड (छोटंसं खोपटं) मध्ये राहणारा जिव्या नि देवली आज सकाळी उठली तेव्हा त्यांची आई किटा (सरपण) आणायला रानात गेली होती. मुलांनी हंडीतला घान (भात) उलकीने (करवंटीची पळी) काढून घेतला. पाणी पिथेळ. हात धोवला आणि मग लागली एकानशी-तेकानशी हिंडायला. जिव्याने मग एक चिमणी (खेकडा) कुदळून (उकरून) काढली. देवलीने जाळ भपकून ती भाजली. बापुस तवर खिरकडीत मासे घेऊन आला. देवली मग आपल्या जोडवालीबरोबर निघाली ढोबी घेऊन रानात…'

वारली लोकांचे वास्तव्य गुजरात-महाराष्ट्राच्या सीमेवर, त्यामुळे त्यांच्या भाषेत या

दोन्ही भाषांचे शब्द मिसळलेले असतात.

तुझी धाकली ( मावशी ) कुठे आहे ?
कुणाचा मामुस जांभुळपाड्याला राहतो ?
याची फुई ( आत्या ) कोण ?
ही उगवत, ही मावळत.
बरोबर, ही पूर्व ही पश्चिम...
मुले ताईंना उखाणे घालीत—
'जय जातो तय पाटीच येतं...
बळक बगू ताई !'
उत्तर होते : साहोडी ( माणसाची सावली ).
'बारा वर्षांचा बोकूड, त्येच्या काळजाला लव.'
छे, याचेही उत्तर ताईला नाही येत.
'अग, ती आंब्याची बाठ !'
'आखा दिस लोळे, सांजचे खोपाला बसे.'
हा वाहरा —म्हणजे केरसुणी.
'लेकीस दूद निंगत, आयसला दूद नाय निंगत.'
हां, हे मात्र बाईंनी ओळखलं– करवंद !
'मोठी माळा, दोन ढेपा.' —( म्हणजे मोठ्या माळावर दोन ढेपा– )
हे चंद्र आणि सूर्य.

वारल्यांच्या मुलांचा पोशाख म्हणजे एखादी मळकी चिंधी–लंगोटीसारखी लपेटलेली. कधी एका घरातल्या सर्व पोरांना मिळून एकच कपडा असे. शाळेत येताना ती त्याच धुळीने माखलेल्या कपड्यात येत. एखादा ढगळ पोलका किंवा मळके जाकीट !

विकासवाडीतून मुलांना स्वच्छ कपडे देण्यात आले पण ते मुलांना घालवेचनात ! संकोच एवढे एकच कारण नव्हते––आपल्या फाटक्या चिरगुटांचा त्यांना अभिमानही होता ! फारच आग्रह केला तशी स्वतःच्या कपड्यावरच नवे ढगले चढवून बसली. पुढची बटणे न लावता आपले आतले कपडे दिसतील, अशी व्यवस्था केलेली ! हाताशी गळ्यापाशी आतली चिरगुटे डोकावताहेतच ! काही जण शाळेचे कपडे घरी घालून जात आणि पुरेसे मळवून आणीत ! कुणी नवे कपडे घरीच ठेवीत आणि पुन्हा पहिल्या कफन्या घालूनच शाळेत येत ! एके दिवशी मग धुवायला पाठविलेले कपडे दिलेच नाहीत त्यांना ! सगळी मुले बालवाडीत आली आणि ताईंकडे पाठ करून बसली. बाबापुता केले तरी तोंडे फिरवायला काही तयार होईनात ! कपडे न दिल्याबद्दल तो रुसवा होता !



"आम्हाला ढगली होवीत."
"स्वच्छ धुणार का पण ?"
"हो !"
"कुठे धुणार ?"
"––ओहोळात."

मग पुन्हा कपडे दिले. हळूहळू कपडे स्वच्छ ठेवणे मुलांना जमू लागले, आवडू लागले. आता ज्याचे कपडे मळके दिसतील त्याला तीच एकमेकांत चिडवू लागली.

त्यांचा पहिला घरच्या कपड्यांचा स्वाभिमान आणि आताचा कपडे स्वच्छ ठेवण्याचा आग्रह दोन्ही ताराबाईंना महत्त्वाचीच वाटली !

परंतु कपडे स्वच्छ झाले तरी मुले केस कापत नसत; त्यामुळे अस्वच्छ, ओंगळच दिसत. केस कापायला त्यांच्यापाशी पैसेही नसत. एका शिक्षकाने मग एके दिवशी एक आरसा आणि कात्री मागवली आणि एका पोराला पुढ्यात घेऊन त्याचे केस कापून, टाकटीक करून दिले. त्यांचे पाहून मग बाकीचे शिक्षकही हे कर्तनकार्य करू लागले. मुलांचे स्वरूप त्यामुळे कितीतरी बदलले. पुढे ताराबाईंनी त्यांना केस कापण्याची सर्व जरूर ती साधने आणून दिली व मुलेच हळूहळू एकमेकांचे केस कापू लागली.

—त्यासाठी विकासवाडीचा शिक्षक न्हावीसुद्धा झाला !

आदिवासी मुलांच्या आयुष्यातले निसर्गाचे स्थान ओळखून विकासवाडी त्याला महत्त्व देत होती. शाळेत ताईंनी आणि मुलांनी मिळून एक संग्रहालय बनवले होते. फुलपाखरे, पतंग, टोळ, नाकतोडे, सापांच्या काती व सापळे.

तशीच चित्रे असलेले माहितीकोश संस्थेत ठेवलेले असत. मुले पुस्तकात चित्रे शोधत. ताई त्यांना माहिती वाचून दाखवीत. मुले कुतूहलाने चित्रांवरून, अक्षरांवरून बोटे फिरवून पाहात...आपल्याला हे वाचता आले तर ?...

फुलपाखरांच्या चारही अवस्था, शंखशिंपल्यांचे प्रकार, वाळलेली भूछत्रे, पिसे, शिंगे, मुंग्यांचे एक वारूळसुद्धा जसेच्या तसे उचलून आणले होते. मुंबईच्या म्यूझीयममधल्या नॅचरल हिस्टरी सोसायटीचे अभ्यासक श्री. राऊत यांचे सहाय्य व सहकार्यही मिळवले होते. ते आठवड्यातून एकदा येत आणि मुलांना बरोबर घेऊन निसर्गभ्रमणाला जात. नुसत्या फुलपाखरांच्या नमुन्यांनीच दोन पेट्या भरल्या होत्या.

वेगवेगळी धान्ये पेरणे, त्यांना कसे, किती पाणी व माती लागते, त्यांची कशी प्रगती होते याचा अभ्यास करणे—असे शंभरावर प्रयोग झाले. मुलांपुढे एक अद्भुत व अभिनव दालन उघडले गेले. ती या सर्वांतून उत्साहाने कुतूहलाने लुडबूड करीत. आजवर भोवती मांडलेला निसर्ग त्यांनी असा 'वाचला' कुठे होता ?

संग्रहालयात कुणी केव्हा काय आणले याची माहिती तारीखवारासकट चिठ्ठयांवर लिहून ठेवली जाई.

एकदा तिथे गवताचे प्रदर्शन भरवले. वेगवेगळ्या प्रकारचे गवत लहान लहान फुल-दाण्यांतून उभे केले होते. नावे होती—' रोहडा, फुलझारी, सोटा, कासर, बगडी, धूब, शिन ' अशी,

ताराबाईंचे म्हणणे होते, " अक्षरांच्या बेडीत मुलांना अडकवणं म्हणजेच शिक्षण असं कुणी सांगितलंय ! निसर्ग आपलं मोठं थोरलं पुस्तक उघडून या मुलांसमोर बसलेला आहे. छापील ज्ञानच कशाला ? झाडं, पानं, फुलं, फळं, बेडूक, मासे... झालेच तर पाऊस, ढग, इंद्रधनुष्य, धुकं—हे पुस्तक आपण त्यांना वाचायला शिकवायचं. त्यांचा ज्ञानचक्षू उघडून द्यायचा. भांडार तर त्यांच्या पुढ्यात ओतलेलंच आहे..."

मधल्या गोलात बिया पेरल्या होत्या. गहू, हरभरा, मूग, तूर, मटकी, खजुरी, दगड-सुद्धा ! टोपल्यांत माती भरून त्यातही मूग, चवळ्या पेरल्या होत्या. खिडकीत ठेवून रोज फिरवल्या तरी रोपे पुन्हा उन्हाकडे झुकत !

' सपुष्प, अपुष्प, एकदल, द्विदल...'

मुले चर्चा करत होती, ' दगड उगवेल का नाही ? '

जोरजोराने वाद चालू होता.

" पाहा, कालच्यापेक्षा मोठा झाला आज ! "

" दगड कधी उगवतो का ? त्याला जीव आहे वाटतं ? "

" मग चिंचोक्याला तरी जीव आहे का ? "

ताईंनी हसून नुसतेच म्हटले, " पाहू या काय काय होतंय ते ! "

वादाचा निकाल निरीक्षणानेच व्हायचा होता...

वारल्यांची ही मुले कायमच अर्धपोटी राहत असल्यामुळे सतत अन्नाचा शोध घेत राहणे हा त्यांचा स्वभावच बनलेला ! तसे कुणी खात असले तर हावरेपणाने बघत राहणे, हात पुढे करणे या सवयी नव्हत्या. पोटात पडले असेल त्यात समाधान मानून आपले खेळ खेळत राहात. परंतु विकासवाडीतल्या झाडांवर मात्र ती फळे टिकू देत नसत. दिसेल ते कच्चे फळ, कोवळा पाला तोडायचा आणि तोंडात टाकायचा ही खोड ! भूक नसली तरीही तोडायचे आणि प्राण्यांप्रमाणे पानाच्या ढिगान्याखाली किंवा झाडाच्या ढोलीत दडवून ठेवायचे ! अनुताई नेहमी बजावत, " पिकल्याशिवाय तोडू नका. चांगली पिकू द्या. एकत्र करून सगळे खाऊ ! " परंतु डोळ्याला फळ दिसले की त्या मुलांना भानच राहत नसे !

सुंदर एके दिवशी कच्च्या पपया पाडत होती. ताईंनी काही म्हणायच्या आत पपई पाडली, परकरात गुंडाळून पळालीसुद्धा ! ' विचारून तोडावं ' वगैरे शिकवणी एकीकडे



ऐकतच करकर खाणे चालू असे. एके दिवशी तर शकू आणि मंगळी एका झाडाची फांदी धरून तिचे टोकच चोखत होत्या.

" काय खाताय ग ? "

उत्तर मिळाले,

" वडाची फांदी ताई ! बघा ना कशी गोड लागते ! "

दोन पायाच्या बकऱ्याच या ! ताईंनी कपाळाला हात लावला.

परंतु याच सुंदरवर पुढे एकदा परसातल्या मेंढ्या तोडून आणण्याचे काम आले. पिशवी घेऊन सुंदर धावत गेली. पाहता पाहता टोपलीभर मेंढ्या जमल्या.

सुंदर सावकाश परत आली. मेंढ्यांच्या ढिगान्यात आपल्या हातातली पिशवी रिकामी करत तिने हळू आवाजात म्हटले,

" ताई, मी एक मेंडी खाल्ली ! "

अनुताईंना ही कबुली मोठी महत्त्वाची आणि गोड वाटली. मेंढ्या तोडायला त्यांनीच तिला पाठवले होते. एका मेंडीचा हिशेब दिला नसता तर कुणाला कळलेही नसते. परंतु संस्कार होत असल्याची ती खूण होती !

' ताई, मी एक मेंडी खाल्ली —'

' विकासाच्या मार्गावर ' या आपल्या पुस्तकात अनुताईंनी ते वाक्य कोरून ठेवले !

एव्हाना या डोंगरी मुलांचे स्वभावविशेष, छटा, आवडीनिवडींचा अंदाज शिक्षक-मंडळींना आला होता. वारल्यांची ही मुले अंगाने किरकोळ, तोंडावर गरीब व भोळी वाटत. श्रमाचा त्यांना कंटाळा नव्हता. गाण्याची व अभिनयाची उपजत आवड त्यांना होती आणि या साऱ्याबरोबर त्यांच्या स्वभावांना बालसुलभ खट्याळपणाची किनारही होती ! प्राथमिक शाळेतली, वसतिगृहातली मुले कोणत्या वेळी कोणती वस्तू लागेल ते नेमके हेरून ती लपवून ठेवीत. एकदा पुस्तक कपाटाखाली सापडले तर दोरी दारामागे निघाली ! आणि कात्री तर कोळशाच्या पोत्यात मिळाली ! एक जागा ताराबाईंना समजली की दुसरी जागा शोधून काढण्याची हिकमतही ह्या मुलांमध्ये होती !

एकदा संस्थेच्या मदतीसाठी मुंबईला कार्यक्रम योजिला होता. त्यात आदिवासी लोकांचे तारपानृत्यही दाखवायचे ठरले. मुलांमधलाच एक जण तारपा वाजवणार होता. परंतु अनुताईंना धाकधूक वाटत होती. ऐन वेळी तारपेवाला आलाच नाही तर ? कारण दिवाळी-खेरीज हे वाद्य वाजवायचे नाही, असा एक या लोकांचा संकेत असतो.

सगळी मुले जमली.

" काय रे, तारपा कुठे आहे ? "

" ताई, माझा भाऊ मग आणून देणार आहे. "

भाऊ काही आला नाही. निघायची वेळ झाली. पुन्हा अनुताईंनी विचारले, तर—

" वाटेत आमचे शेत आहे, तिथे बहीण येऊन येईल. "

शेतही मागे पडले. स्टेशन आले. गाडी यायची वेळसुद्धा झाली. ताईंचा आता मात्र धीर सुटला. तारपाच नसला तर मुंबईला जाऊन वाजवायचे तरी काय ?

—शेवटच्या क्षणी ताई पुरेशा धायकुतीला आल्यावर तारपेवाल्या बाबाने खाळखुदसे हसत उत्तर दिले,

" तारपा ना ?– हा काय ताई, इथंच तर आहे, माझ्या पिशवीत. "

जणू मधले काही संभाषण झालेच नव्हते !

विकासवाडीत मुले आणि मुली दोघेही झोपायला येत. मुलांपेक्षा मुलींची बडबड, चकबक जास्त असे ! मुले पटकन् झोपून जात. मुलींचे सारखे जागा बदलणे, कुसे बदलणे चालत असे. कधी कुजबुज, कधी गाणी, कधी हसणे. कधी एखादीला ' भूत 'च दिसायचे ! एखाद्या दिवशी मुली उठून नाचाचा फेर धरीत.

" आवाज कराल अन् बाकीच्यांची झोपमोड कराल " म्हटले तर " नाही, आम्ही अगदी हळू हळू नाचू. " म्हणत खरेच मंद आवाजात गात आणि तासाभराने तृप्त होऊन निजत.

" घाटावरूनी ग, वरूनी ऽ ग
उतरेला जोगी घाटावरूनी ग
बापा मी जाते ना रं ऽ जाते ना रं
लेकी तू जाऊ नको ग, जाऊ नको ग
जोगिया सांगाती लेकी तू जाऊ नको ग
काय खाशी ग लेकी तू जाऊनी ग
वडाची वडफळ बापा मी खाईन
लेकी तू जाऊ नको, नको जाऊ ग,
काय नेसशीला, लेकी तू जाऊनी ग,
बापा मी नेसन र ऽ नेसन र ऽ
केळीचं केळपान......

त्या मुलींमध्ये वनशी नावाच्या दोन मुली होत्या. एक मोठी वनशी, दुसरी छोटी वनशी.

मोठ्या वनशीला कहाण्या रचून सांगायची फार हौस.

" कुठे ग शिकलीस ? " विचारले तर म्हणायची, " सपनात पाह्यलं ! "

तिच्या प्रत्येक गोष्टीत ' दाणा, दुव्वा, बंगला, सुखकाळ झाला ' ही वैभवाची व्याख्या ठरलेली !– म्हणजे घर धनधान्याने संपन्न होते.



छोटी वनशी रागावून म्हणायची, " तिचं जाऊ दे ! खाऊन पिऊन नुसती फुगली तर आहे. आम्हाला किती काम पडतं घरी. "

एका अपरात्री मोठ्या वनशीच्या कानातून कळा येऊ लागल्या. तिने अनुताईंना उठवले, " ताई कान दुखतो. "

आता एवढ्या रात्री हिला काय देणार ? अनुताई म्हणाल्या,

" आता नीज तशीच. सकाळी देईन मग काहीतरी औषध. "

वनशी परत झोपायला गेली. अनुताईंना मात्र झोप येईना. वनशीची आई असती तर ' सकाळी बघू ' म्हणून अशी झोपून गेली असती का ? रात्रभर बिचारी मुलगी काय करील ? अंधारात तळमळत, ठणका सोसत राहील ?

अनुताईंनी पटकन उठून लसूण ठेचली. तेल गरम करून त्यात घातली. वनशीच्या कानात चार थेंब घातले.

मग वनशीला शांत झोप लागली. अनुताईंना पण.

मुलांनी त्यांच्या नैसर्गिक जीवनपद्धतीपासून फार दूर जाऊ नये असा ताराबाईंचा दृष्टिकोन होता. हरणासारखी चपळता, ससाण्यासारखी तीक्ष्ण दृष्टी, आणि उन्हापावसाला दाद न देणारी काटकुळी तरीही काटक प्रकृती — ही या डोंगरी मुलांच्या आयुष्यातली मिळकत असते. शालेय पाठ गिरवताना त्यांचे हे धन हरपू नये, त्यांचे नैसर्गिक गुण लोप पावू नयेत याची काळजी विकासवाडी घेत असे. तरीही कधी कधी शहरी भित्रेपणा, पोशाखीपणा मुलांचा कबजा घ्यायला बघे.

एकदा होता रविवार. कोसबाडच्या पूर्वेस एक मैलावर एक लहानसा रानाचा डोंगर आहे. त्या डोंगरावर जाऊन आवळे आणायचे ठरले. सर्व नक्की ठरवून अनुताई डहाणूला गेल्या. संध्याकाळी परत आल्यावर त्या चौकशी करताहेत तर काय, मुले गेलेलीच नाहीत ! का ? तर ' मोठं कुणी बरोबर नव्हत, आम्हाला भीती वाटली ! '

वास्तविक त्यांच्यातले दोघेचौघे तर चांगले चौदा-पंधराचे होते.

ताईंनी जरा उपरोधाने म्हटले, " उद्या मी चारपाच डझन बांगड्या आणणार आहे बरं का. आणि प्रार्थनेच्या वेळी त्या शूर मुलांना बक्षीस देणार आहे ! "

चारपाच मुले मागच्यामागेच निसटली. शिपाई सांगायला लागला, " डोंगराकडे धावली पार ! "

ताई हसत्या खऱ्या, पण त्यांना काळजी वाटू लागली. दिवस कलला होता. त्यातून हे दिवस लहान. पाहता पाहता सारे रान अंधारात बुचकळले जाते, पायाखालची वाट दिसेनाशी होते ! शेवटी त्यांनी शिपायाला पाठवले.

" बघ रे, दिसतायत का ? हाक मार; म्हणावं, ' आता पुढच्या रविवारी. ' "

पण मुले गेली तशीच सुसाट परत आली. एका तासात कोसबाडची टेकडी उतरून, मधला मैल धावून, दुसरा डोंगर चढून-उतरून त्यांनी आवळे तोडून आणले होते. पिशवीभर आवळे –घ्या !

प्रार्थनेच्या वेळी ताईंनी त्यांना शाबासकी दिली. ताईंनी डिवचले, त्यामुळे मुलांना आपली मूळ शक्ती पुन्हा सापडली होती ! " अरे, तुमच्या घरापुढच्या या हिरव्या कुरणात का तुम्ही पाहुणी आहात ?......"

हे आवळे-प्रकरण पुढे वाढतच गेले. तिकडे इतके आवळे मिळतात म्हटल्यावर शिक्षक, मुले, मुली प्रत्येकच सुटीच्या दिवशी त्या आवळेगडाकडे धाव घेऊ लागली. ताई ती सारी आंबट-तुरट हिरवी लूट पदरात घेत.

" ताई, तुम्ही तर खात नाही, मग एवढ्या आवळ्यांचं काय करता ? "

एक दिवस मग त्यांच्यासमोरच आवळ्याच्या वड्या केल्या. त्यांच्या मदतीने मोरावळा केला. लोणचे घातले. मुले कुतूहलाने भाग घेत होती. लगेच चट्टामट्टाही होत होता.

" काकड नावाची फळं रानात मिळतात. त्याचंही लोणचं करता येईल. "

" डिंक तर झाडांचा, आम्ही तिथेच खाऊन टाकतो ! त्याचं काय करता येतं ? "

" —कोवळ्या बांबूचं लोणचं ?... "

आवळाच शिक्षणाचे माध्यम झाला ! रानमेव्यातूनही चार काव्या शिक्षण देता येते, हे ताईंनाही शिकायला मिळाले.

–अशी ही आवळ्यांची कथा !

परंतु सगळेच चढ इतके सोपे नव्हते. प्रथम मुले स्थिरावत नव्हती; आणि नंतर हरप्रयत्नांनी त्यांना स्थिरावून घेतले तरी ज्ञानाचे बी रुजत नव्हते. शालेय शिक्षणाचे सारे प्रयत्न पालथ्या घड्यावरचे ठरत होते. ही मुले मुळापासून आणि कायमचीच, मठ्ठ म्हणायची का ?

अशाच दमछाकी झालेल्या एका क्षणी अनुताई उद्वेगाने म्हणाल्या, " ताई, आपण इथे आलो तेव्हा वाटलं होतं — फुकटचं खाणं, पिणं, चांगलं नहाणं, नवे कपडे खेळ, गाणी, गोष्टी – ढीगभर मुलं मिळतील आपल्याला. थोड्या दिवसांतच दुसरी शाखा उघडायची वेळ येईल. पण इथे आपला चांगलाच भ्रमनिरास झाला !... आणि आता एवढं सारं करून उपस्थिती साधली तरी पुन्हा मुलांच्या प्रगतीच्या नावानं शून्यच ! काहीच कसं यांच्या लक्षात राहत नाही ? इथे ' आयात ' तरी आता कसली कसली करायची ? कितीही जीव तोडून शिकवा, निरनिराळ्या पद्धती वापरून पाहा, पुन्हा आपली पहिल्यापासून सुरुवात ! –या मुलांच्या डोक्यांत खरोखरच बटाटे भरले आहेत की काय ? "



पण ताराबाई खंबीर होत्या. " अनुताई, बटाटेच म्हणालात ना ? बटाट्याचं पीक कसं काढतात माहीत आहे की नाही ?–खणून, उकरून ! अहो, या मुलांची डोकी मुळात सुपीकच आहेत. बुद्धीवर गंज चढला की तीसुद्धा नापीक होते. असंच धीरानं, चिकाटीनं प्रयत्न चालू ठेवू या. अहो, सुपीक जमिनीतून पीक काय कुणीही काढील ! इथे बालवाडी रुजवू तरच आपण खऱ्या ! "

...अर्थात अनुताईंचा उद्वेगदेखील त्या घटकेपुरता होता. ' बटाट्याचे पीक काढण्याच्या कामात ' सिंहाचा वाटा ताराबाईंचा असला तरी वाघाचा वाटा अनुताईंचा होता याची साक्ष त्यांनी एका बालशिक्षिकेला लिहिलेल्या पत्रात मिळते—

" . लहान मुलांचे अंग रोज ओल्या फडक्याने पुसून काढते. कधी कधी त्यांनाही नदीवर घेऊन जाते. नाहीतर तळ्याचे पाणी गाळून आणून मडक्यात थोडे गरम करून आंघोळ घालते... ( खरजेसाठी ) लिंबाचे औषध मात्र रोज लावते.

" वेण्यांसाठीही असाच नेट धरला आहे. रोज सगळ्यांच्या वेण्या झाल्याच पाहिजेत. तेलात कापूर घालून ठेवला आहे. मधून मधून गेल्याबरोबर मुलींच्या डोक्यात शिपीचंद घालून ठेवते आणि तास-दोन तासांनी सगळ्यांची डोकी धुऊन काढते, कधी कधी तंबाखूचे पाणी पण घालते.

" नदीला गेले होते, तेथून उवांसाठी एक औषध शिकून आले. –एक रत्तल तेलात एक तोळा मायफळ कुटून घालायचे– हे तेल रोज लावायचे. त्याने लिखा मरतात, म्हणे."

दुसऱ्या एका पत्रात अनुताईंनी लिहिले आहे– " हल्ली एक नवेच संकट आमच्या बालवाडीवर आले आहे. सगळी मुले मलेरियाने आजारी पडली आहेत. एका दिवसाआड अथवा रोज थंडी भरून बिचाऱ्यांना ताप येतो तेव्हा झोपडीच्या कुडाच्या तरी एका बाजूला कुडकुडत, कण्हत पडून राहतात...

" त्यातल्या त्यात आमची सोमली तर खूप आजारी झाली आहे. अगदी उठत नाही, बसत नाही, की वर डोळा करीत नाही. मी वैद्यांना घेऊन आले. त्यांनी सांगितलेले औषध सोमलीला मी स्वतःच देत असते. आता तर दिवसभर सोमलीच्याच घरी माझा मुक्काम आहे, म्हटले तरी चालेल..."

# १९. विकासवाडी

वारली मुलांच्या शिक्षणमार्गातल्या एकेका अडथळ्याचे, अडचणीचे स्वरूप समजून घेऊन त्यावर ताराबाई तपशीलवार आणि क्रमाक्रमाने उपाय पुरवीत गेल्या. किंबहुना, विकासवाडीचा प्रत्येक विभाग म्हणजे अशा एकेका समस्येवर ताराबाईंनी शोधलेला एकेक तोडगाच होय. विकासवाडी प्रकल्पाच्या मूळ कल्पनेपेक्षा त्यामुळे विकासवाडीचे कार्य कितीतरी जास्त प्रमाणात विकसित, व्यापक आणि मूलगामी झाले.

सर्वांत प्रथम ताराबाईंनी प्रश्न विचारात घेतला तो मुलांच्या धाकट्या भावंडांचा; आदिवासी माणसांच्या तान्ह्या व रांगत्या बाळांचा. आदिवासी मुलांच्या कडेखांद्यांवर असणाऱ्या तान्ह्या व रांगत्या बाळांसकट त्यांना शाळेत घेतले तरच ती शाळेत येऊ शकतील हे त्यांच्या लक्षात आले व या लहान बाळांचे संगोपन योग्य रीतीने व्हावे या हेतूने जन्मले ते विकासवाडीचे पाळणाघर. साहजिकच विकासवाडीत पहिले महत्त्वाचे ‘ साधन ’ आले; ते पाळणे ! पहिल्या दिवशी हा पाळणाच आदिवासी माणसांच्या कुतूहलाचा स्वतंत्र विषय ठरला. दोन–तीन धीट आयांनी गोल गोल फिरून, बघून अखेर आपली बाळे त्यात निजवूनसुद्धा बघितली. आणि दुसऱ्या दिवसापासून बोर्डीप्रमाणेच येथेही ताराबाईंच्या शिक्षिका घरोघर मुले गोळा करीत हिंडू लागल्या. सुरुवातीला साहजिकच आदिवासी आया आपली अल्पवयीन बाळे अशी परक्यांच्या हाती सोपविण्यास राजी नव्हत्या. मुलांनाही आपल्या भावंडांचा लळा, काळजी होती आणि ही ढवळी ताईमंडळी त्यांना नीट सांभाळतील की नाही यांची शंका त्यांना होती. परंतु हे लक्षात घेऊनच ताराबाईंनी विकासवाडीतले पाळणाघर मुद्दाम बालवाडीला जोडून उभारले होते. आपली भावंडे सुरक्षित आहेत हे बालवाडीतल्या मुलांना दिसावे, त्यांचे अभ्यासात, खेळात लक्ष लागावे, जरूर पडली तर लहान मुलांना सांभाळण्यात त्यांची मदत घेता यावी, आणि आपण सारे एकाच मोठ्या घरात खेळत आहोत असे त्यांना वाटावे म्हणून ही योजना होती. शिशुघरातले आपले भावंड रडू लागले की त्याचा मोठा भाऊ किंवा बहीण चटकन् जाऊन त्याला उचलून घेई. पुढे पुढे मात्र, येथे बाळाची आबाळ केली जाणार नाही असा त्यांना विश्वास वाटू लागला. त्यानंतर कुठलेही मूल रडताना दिसले, पडले की मुले पुढे होऊन त्याला गप्प करू लागली ! सुरुवातीला आदिवासी आयादेखील अधून मधून चक्कर टाकून पाहून जात. पुढे पुढे मात्र, अगदी बावीस दिवसांची बाळेसुद्धा पाळणाघरातल्या रमाताईकडे सोपवून आदिवासी आया निःशंकपणे रानात कामाला जाऊ लागल्या. सवड झाली तर मध्ये येऊन आई बाळाला



पाजून जाई. ते शक्य नसेल तर ताई त्याच्या दूधपाण्याची व्यवस्था करी. त्याचे आंघोळ, कपडे, औषधपाणी, तीट–काजळ – सारे तीच करी. बाळाची आई बाळाला या ‘ ताई-मावशी ’ कडे सोपवून जाताना शेजारणीला समजावू लागली,

“ ताईशी देस गो पोयरीला. ती बेस करत आहे. ”

आता पाळणाघरातले पाळणे कमी पडू लागले !

वारल्यांची मुले आपल्या भावंडांना सांभाळत जरी, परंतु त्यात अर्थात पद्धतशीरपणा नव्हता. कडेवर घालायचे, रानात न्यायचे; रडायला लागले तर काहीतरी चघळायला द्यायचे एवढेच ती जाणत होती, आता येथे त्यांची नीट निगराणी होऊ लागली. तेव्हा, विशेषतः बालसंगोपन हे मुलींकरता एक शिक्षणाचे माध्यम करता येईल, असा विचार ताराबाईंच्या मनात आला आणि त्याप्रमाणे बालवाडीतल्या मुलांना जाणीवपूर्वक बाल-संगोपनाचे पाठ देण्यात येऊ लागले.

पाळणाघराचा कार्यक्रम साधारण पुढीलप्रमाणे असे— केस विंचरणे, आंघोळी. त्यानंतर मुलांच्या लहानसहान दुखण्यांवर औषधे देणे, मलम लावणे वगैरे चाले. त्या-नंतर काही मुले झोपत. काही तिथेच किंवा बालवाडीतल्या मुलांबरोबरच नाश्ता करीत. अगदी तान्ह्या मुलांचे दूध पिणे, मधल्या वेळची पेज वगैरे निराळे होई. दुपारी मग मोकळ्या हवेत झोपाळ्यावर बसणे, वगैरे चाले.

विकासवाडीत पाळणाघराला स्थान मिळाले ते वारल्यांच्या कुटुंबव्यवस्थेत ढवळाढवळ न होता त्यांची मुले शाळेकडे वळावीत, वळवावीत म्हणून; परंतु या पाळणाविभागाचे आनुषंगिक सुपरिणाम व फायदेसुद्धा लौकरच दिसून येऊ लागले. स्वच्छ राहणी, नियमितपणा, पद्धतशीर निगा यामुळे मुलांच्या प्रकृत्या चांगल्या राहू लागल्या. बाह्यरूप तर सुधारलेच; पण डोळे येणे, त्वचारोग, उवा इ. अस्वच्छतेमुळे पसरणाऱ्या रोगांचे देखील बऱ्याच प्रमाणात उच्चाटन झाले. त्यातून जुलाब, कान वाहणे, खोकला असे काही झालेच तर पाळणाघरात त्यांच्यावर योग्य उपचार योग्य वेळी होऊ लागले.

यापूर्वी आदिवासी बालकांना बालपणी सांस्कृतिक वातावरण असे काही मिळतच नसे. त्यामुळे संस्कार, मानसिक विकास या दृष्टीने ही कोवळी वर्षे वायाच जात असत. परंतु येथे त्यांना स्वच्छतेचे, नीटनेटकेपणाचे धडे काही मोजक्या महिन्यांच्या आयुष्यातच मिळू लागले.

पाड्यांवरून एकदम प्राथमिक शाळेत येणाऱ्या आदिवासी मुलांची भाषाशक्ती गावातल्या मुलांपेक्षा नेहेमीच कमी पडे, याचे कारण आदिवासी लोकांची भाषा मुळातच तुटपुंजी आहे. त्यातून आपापसात गप्पा मारणे, संवाद करणे ही सवयही या लोकांना नसते. ‘ हो ’ आणि ‘ नाही ’ मध्येच दिवसभराचे संभाषण मावते ! पण पाळणाघरात येणाऱ्या मुलांच्या कानावर शालवयातच जास्त शब्द पडू लागले. साहजिकच पाड्यावरून

परस्पर प्राथमिक शाळेत येणाऱ्या मुलांपेक्षा ह्या मुलांची शब्दसंपदा वाढलेली असे. उच्चारांचे विविध प्रकार, खोल अर्थच्छटा त्यांना समजू लागत. शिवाय बालवाडीचे कार्यक्रम शेजारच्या ओसरीत चालत असल्यामुळे तेथील गाणी, गोष्टी, बडबडगीते हेही त्यांना बोबड्या वयातच ऐकून ऐकून पाठ होई.

दुसरे म्हणजे पाळणाघरातल्या मुलांना प्रत्यक्ष अभ्यासाच्या दृष्टीनेदेखील एक प्रकारची समज येते, असे लक्षात आले. यापूर्वी वारल्यांची जी मुले एकदम वयाच्या सातव्या-आठव्या वर्षी शाळेत दाखल होत, त्यांच्या अंगात शालेय दिनक्रमासाठी आवश्यक असलेली स्थिर वृत्ती, एकाग्रता अजिबात निर्माण झालेली नसे. तेथवरचे आयुष्य रानात मोकाटपणे हिंडण्यात गेलेले असल्यामुळे शरीराला तसेच मनालाही फक्त उनाडक्यांची सवय लागलेली असे. बुद्धी, हस्तकौशल्य यांचा वापर न करता सात–आठ वर्षे अशी रानोमाळ टिवल्याबावल्या करीत भटकल्यानंतर शाळेचा अभ्यास करणे, शिकलेले लक्षात ठेवणे वगैरे त्यांना जड जाई. मग शाळेच्या बंदिस्त वातावरणापासून व बांधील दिनक्रमापासून त्यांना क्षणाक्षणाला पळून जावेसे वाटे; त्यातून शाळेचे स्वरूपही अनाकर्षक असे. विषय त्यांच्या रसप्रदेशाच्या बाहेरचे असत. आता पाळणाघरात संस्थेत वाढणाऱ्या मुलांमध्ये मात्र शालेय जीवनक्रमाकरिता आवश्यक अशी मानसिक बैठक आपोआपच तयार होते, असा सुखद अनुभव कार्यकर्त्यांना आला.

पाळणाघरानंतरचा विकासवाडीचा दुसरा महत्त्वाचा विभाग म्हणजे बालवाडी. पूर्व-प्राथमिक वयातले शिक्षण म्हणजे मुख्यतः पूर्वतयारीचे, अप्रत्यक्ष शिक्षण. बोर्डीप्रमाणेच येथेही शक्य तितक्या कमी खर्चात आजूबाजूची परिस्थिती लक्षात घेऊन, साधने बनवून बालशिक्षण आखायचे होते. वेगवेगळ्या व्यवसायांद्वारा मुलांना त्यांच्या ज्ञानेंद्रियांचा व कर्मेंद्रियांचा सुयोग्य वापर व विकास शिकवायचा; हस्तव्यवसाय व इतर निर्मितिप्रधान कामांमधून त्यांची कल्पनाशक्ती, स्नायुसंचलन, भाषाविकास, विचारशक्ती इ. चेतवायची; थोडक्यात, म्हणजे शिक्षणाच्या व बालमनोविकासाच्या मूलभूत सिद्धान्तांना धरून पुढील प्रगतीस आवश्यक असे संस्कार चहूबाजूंनी मुलांवर करायचे. प्रत्यक्षात, या रानातल्या मुलांच्या बाबतीत मुलांची स्वच्छता हाच प्रमुख विषय बनवावा लागला. किंबहुना, सुरुवातीपासून संयुक्तपणे चालवायला घतलेल्या पाळणाघर, बालवाडी व प्राथमिक शाळा या तिन्ही विभागांच्या अडचणी इतक्या सारख्या आणि एकत्रितपणे सोडवाव्या लागणाऱ्या होत्या की विकासवाडीची मूळ कल्पना अनुभवातून अधिकाधिक सिद्ध होत गेली. तिन्ही विभागांच्या समान समस्यांपैकी प्रमुख समस्या म्हणजे भूक, अनारोग्य आणि हजेरीच्या बाबतीतला अनियमितपणा.

शासनातर्फे चालविल्या जाणाऱ्या शाळांकडून हे तीनही प्रश्न जवळजवळ पूर्णपणे उपेक्षित व दुर्लक्षित राहिलेले होते. विशेषतः मुलांच्या क्षुधाशांतीच्या बाबतीत ताराबाईंची प्रतिक्रिया तीव्र होती. उपाशी मुलांना प्राथमिक शिक्षण सक्तीचे करून त्यांना शाळा नामक कोंडवाड्यात पाढे घोकीत बसवायचे प्रयत्न त्यांना नुसतेच अविचाराचे नाही तर क्रौर्याचे वाटले. त्यांच्याच शब्दांत सांगायचे तर, ‘सरकारकडे मुलांच्या चित्रकलेसाठी पैसे होते, त्यांच्या अंदाजपत्रकात चरख्यांसाठी सोय होती, परंतु न्याहारीसाठी बजेट कुठल्या सरकारी खात्यात असते का? शाळाखात्यात तर नाहीच!’



‘आपल्यापुढील खरा प्रश्न’ या १९४९ साली लिहिलेल्या लेखात त्यांनी लिहीले—

‘...अन्नाचा प्रश्न! होय, अन्नाचा प्रश्न! चार वेळा पोटभर जेवणारी आम्ही माणसं अन्नाचा प्रश्न सोडवायला निघालो आहोत. आमचा ग्रामोद्धार! आमचे सक्तीचे शिक्षण! शाळेत उद्योगाला महत्त्व देण्याचा आमचा प्रयत्न! आमचे प्रौढ शिक्षण! आणि सर्वांत वरताण, आमच्या बुनियादी शाळा! आमच्या खेड्यांतील लोकांना शिक्षण देण्यासाठी निघणारे चित्रपट—ज्यामध्ये शांघाय शहराची माहिती आणि प्लॅस्टिकच्या वस्तू कशा बनतात हे दाखवले जाते, अशी प्रत्येक योजना हास्यास्पदच आहे. त्यांना खाता येईल अशा वस्तूंची निर्मिती त्यांना शिकवणे हे सर्वप्रथम. गणित, सफाई, मूलोद्योगसुद्धा नंतर!’

आता विकासवाडीने मुलांच्या बुद्धीबरोबर पोटाला खाद्य पुरवायचे प्रयत्न केले. वारली मुलांना त्यांचे आईवडील जरी पोटभर अन्न देऊ शकत नसत तरी दिवसभर रानात भटकून मिळेल ते किडूकमिडूक ती तोंडात टाकीत राहात. या मुलांनी शाळेत यायचे तर त्यांचा हा हक्काचा रानमेवाही बंद होणार होता. विकासवाडीत भात किंवा भाकरी मुलांनी घरून आणायची व उसळ भाजी, कोशिंबीर असे एखादे पूरक तोंडीलावणे शाळेने द्यायचे, अशी योजना करण्यात आली. मुलांना रोज पावडरचे दूध देण्याचीही सोय झाली. आठवड्यातून एकदा काही तरी विशेष पदार्थ शाळेत तयार करून मुलांना देण्यात येई. मात्र त्याबरोबरच शहरातल्या मुलांना जिभेचे चोचले शिकवणारे जे अन्न असते त्याची येथे गरज नाही, अशी रेषही ताराबाईंनी आखून घेतली.

डॉक्टरांकडून सर्व मुलांची शारीरिक तपासणी करून घेण्यात आली तेव्हा दिसून आले की आपल्या वाढीला पोषक अशी द्रव्ये ही मुले रानातल्या झाडपाल्यातून, कच्च्या व तुरट फळांच्या सालींमधून मिळवीत असत; परंतु एकूणच अपुरा व असमतोल आहार, यामुळे त्यांची वाढ खुरटलेली होती. आता संस्थेत त्यांच्या वजनाचे व उंचीचे तक्ते ठेवले जाऊ लागले.

स्वच्छतेच्या बाबतीतसुद्धा मुलांचे नाक, कान, त्वचा, कपडे, केस यांची साप्ताहिक तपासणी करून प्रत्येक मुलाला समजेल अशा प्रकारे नोंदणी करण्यासाठी तक्ते आखण्यात आले. वाटेल तेथे लघवी करणे, नाक शिंकरणे, थुंकणे, न चावता मकामक अन्न खाणे, शौचाच्या वेळी पाणी न वापरणे इथपासून मुलांच्या घाणेरड्या सवयी कटाक्षाने

मोहून काढण्यात आल्या. रोज मंजनाने दात घासणे, तेल लावून केस विंचरणे, साबणाने हात–पाय धुणे, उवांचे औषध लावून नेमाने नहाणे, कपडे स्वच्छ ठेवणे या सवयी त्यांना लावण्यात आल्या. डोळे येणे, बारीक ताप, जुलाब, आव, जंत, खरूज वगैरे विकारांवर औषधयोजना सुरू केली; त्या करिता चिकाटीने पाड्यापाड्यांवर हिंडून घरच्या मंडळींचा सहकार मिळविण्यात आला. संस्थेत एक लहानसा दवाखाना काढून बोर्डाच्या एका डॉक्टरांना तेथे आठवड्यातून एकदा बोलविले जाई. इतर दिवशी सकाळ-संध्याकाळ बालवाडीचे शिक्षक घरोघर हिंडत.

" ताई, याला बेस दवा दिजो होऽ " आपले तापाने फणफणलेले पोर मांडीवर घेऊन बसलेली वारली आई म्हणे, " अगो, कल एक सायेब इयेल, तेनी मरायच्या गोळ्या दीघेल, तो म्हनंऽ पोरास्नी देहो. आम्हाला पोरं पक्की ( पुष्कळ ), खाया काय नाय म्हणून काय पोरां मारून टाकायच्या काय ! "

मग रमाबाईंनी समजवावे, " अग, त्या मरायच्या गोळ्या नव्हत्या, मलेरियाच्या होत्या ! त्या घेतल्या की हिवताप थांबतो, समजलं ? "

आपल्या हाताने औषध तर मुलेच काय, मोठी म्हातारी माणसेसुद्धा घेत नसत ! भक्तिभाव असा अगाध की सत्तर वर्षांचा म्हातारासुद्धा " ताई, तूच देजो " म्हणून आपला पुढे बसून ' आ ' करी.

रमाताईंनी पुढे होऊन औषध पाजले की लगेच गोठ्यातला बैल पुढे केला जायचा, " याला पण दिजो "... !

त्यांच्या समजुतीखातर शिक्षिकेने मग भीत भीत पुढे व्हायचे आणि या रोग्यालाही तेच औषध पाजायचे !

बालवाडीतील साधनांच्या बाबतीत बोर्डाच्या बालवाडीचा अनुभव गाठीला होताच. अनुताई आणि त्यांच्या सहकाऱ्यांना आता त्या जंगलपट्टीत साधनेच साधने विखुरलेली दिसली.

मोगलीची, एरंडाची, सुरूची फळे, रिठ्याच्या, खजुराच्या बिया जमविल्या. त्यांच्या रांगोळ्या काढायच्या, माळा ओवायच्या. शंख ओवायचे. कवड्या, शिंपल्या, पांढरी पिसे, रंगविलेली किंवा रंगीत पिसे, कडब्याच्या आतील मऊ भागाचे मणी करून त्यांचे दशक शतक, करायचे. रानातली निरनिराळ्या रंगांची आकारांची पाने–फुले वहीत, ब्लॉटिंग पेपरमध्ये दाबून मूळ रंगासह सुकवायची आणि वहीत चिकटवायची. रानभेंडीची फळे घेऊन कागदावर पिवळे ठसे उमटवायचे, किंवा पळसाच्या फुलांचा केशरी रंग कागदांना द्यायचा आणि त्या रंगीत कागदाच्या चटया, पताका, हार करायचे. शिंदीच्या पानाच्या वेण्या गुंफायच्या, तोरणे ओवायची. खजुरीच्या पानांच्या चटया, केळीच्या सोपटाच्या वस्या... समुद्रकाठची रेतीसुद्धा उचलून आणली. ओल्या रेतीच्या मुदी पाडता येत.



वर्तमानपत्रे रंगवून होडीकामाकरता वापरली जात. आलेल्या पोस्टकार्डांना पांढरे कागद चिटकवून शिवणकार्डे केली. रद्दीतूनच चित्रपोथ्या तयार केल्या. मुलांचे रंगज्ञान पक्के करण्यासाठी रंगीबेरंगी चिंध्या, बांगड्यांचे तुकडे इ. गोळा करून जोड्या काढण्याचे खेळ तयार केले. याचप्रमाणे वासाच्या डब्या, आवाज-डब्या, स्पर्शपुठे, स्पर्शकपडे, वाण्याचे दुकान, पोस्ट–ऑफिस इ. व्यवसायजन्य खेळ तयार केले. कागदाच्या घिशव्या करणे, घडीकाम, कातरकाम, चिकटकाम, काडेपेट्यांची घरे बनवणे, लहानमोठ्या विटा पाडणे, गुंड्या शिवणे, काजी व ठिगळे लावणे, कपडे-दुरुस्ती या सर्वांचा व्यवसायात समावेश केला. मातीकामाचा आवाका तर मोठा; कोसबाडची माती कोसबाडच्या मुलांची प्रतिभा फुलवू लागली.

विकासवाडीत आजही सकाळी ८ ते ११ पाळणाघर व बालवाडीचे काम चालते.

विकासवाडीचा तिसरा भाग म्हणजे प्राथमिक शाळा. कोसबाड येथे एका झोपडीत भरणारी लोकलबोर्डाची प्राथमिक शाळा संस्थेने १९५६ साली, तेथे गेल्याबरोबरच स्वतःच्या देखरेखीखाली चालवायला घेतली होती.

कोसबाडच्या या शाळेची अवस्था या भागातील शासनाच्या शाळांप्रमाणे, प्रातिनिधिक होती, असे म्हणायला हरकत नाही.

एकही मुलगी या शाळेच्या हजेरीपटावर नव्हती. तीन इयत्तांच्या या शाळेत पहिलीची सरासरी हजेरी दोन होती व या वर्गाला मुळाक्षरांची व आकड्यांची अस्पष्ट कल्पना तेवढी होती. दुसरीत सरासरी उपस्थिती चार मुलांची. या मुलांना फळ्यावरचे लिखाण रेखीव अक्षरात उतरवून काढणे जमे; दोन अंकी बेरजांचीही कल्पना होती. बाकी पाढे, हातचा, शंभरापर्यंतचे आकडे यांचे ज्ञान नव्हते. तिसरीची मुले बहुधा गैरहजरच असत. लोकल बोर्डाचे एक शिक्षक ही शाळा चालवीत होते; परंतु इथल्या एकूण परिस्थितीमुळे ते कामाला कंटाळलेले व निरुत्साही असे होते.

आजूबाजूच्या वस्तीची पाहणी करता प्राथमिक शाळेच्या वयाची शंभर मुले त्या भागात उपलब्ध होती असे सिद्ध झाले होते. परंतु अगदी जवळच्या पंचवीस-तीस मुलांपैकीसुद्धा फक्त सहा मुलांची नावे पटावर होती. मग मुलांची उपस्थिती वाढविण्यासाठी पालकांच्या सभा घेतल्या, विशेष कार्यक्रम योजून पालकांना संस्थेत बोलाविण्यास सुरवात केली. मुलांना बोलाविण्यास शिक्षिका रोज त्यांच्या घरी जाऊ लागली. कधीच न येणाऱ्या मुलांची नावे काढून टाकली. तिन्ही विभाग संलग्न असल्यामुळे कुटुंबातली सर्व मुले बरोबरच शाळेकडे वळतील; ती रुळली की वयोगटानुसार त्यांना हळूहळू अलग करावे, ही मूळ कल्पना थोडीफार सफल होऊ लागली. शिवाय प्रशिक्षण वर्गाच्या दृष्टीने तीन्ही विभाग मिळून संस्थेत निदान पंचवीस-तीस मुले स्थिर होणे आवश्यक होते. त्यासाठी जवळच्या चिंबावे या गावची शाळा जोडून घेण्याचा प्रयत्नदेखील झाला, पण तो

असफल ठरला, ही गोष्ट वेगळी. याखेरीज मुलींना येते करण्यासाठी विशेष प्रयत्न करण्यात आले. परंतु पहिली दोन वर्षे नवीन मुली आणण्याच्या प्रयत्नात जुन्या निघून जाव्यात, हाच खेळ चालू राहिला. मात्र शासनाच्या एक-शिक्षकी शाळेप्रमाणे विकासवाडीत केवळ पुरुष शिक्षक नव्हते. त्यामुळे मुलींना शाळेत पाठविण्यास तसा नैतिक विरोध राहिला नव्हता. अखेर विद्यार्थ्यांची संख्या नियमित होण्याच्या दृष्टीने समाजकल्याण खात्याकडून अनुदान घेऊन मुलांचे एक व मुलींचे एक अशी दोन वसतिगृहे काढण्यात आली.

प्राथमिक शाळेसाठी शेतकी हा मूलोद्योग संस्थेने निवडला होता. भातशेतीच्या माध्यमातून शाळेच्या कार्यक्रमात व दिनक्रमात खूपच नावीन्य आले. विज्ञान, गणित, भाषा अशा बऱ्याच विषयांचा परिचय या उद्योगातून होऊ लागला. याशिवाय मुलांच्या प्रचलित खेळांना शाळेच्या चालू कार्यक्रमात स्थान दिले. प्रत्येक मुलाच्या अभ्यासाकडे वैयक्तिक लक्ष देण्याची पद्धत सुरू केली. सूतकामदेखील मुलांना आवडू लागले. शाळेविषयीची त्यांच्या मनातली अढी निवळू लागली यात नवल नव्हते.

परंतु उपस्थितीच्या बाबतीत अजूनही काही समस्या ताराबाईंच्या पुढे हात जोडून उभ्या होत्या. पालकांची उदासीनता कमी करण्याच्या आणि मुलांची हजेरी निश्चित, नियमित करण्याच्या दृष्टीने तीन मोठे प्रश्न आपल्याला सोडवावे लागणार आहेत हे हळूहळू त्यांच्या लक्षात आले— ( १ ) गुरे वळायला जाणाऱ्या मुलांचा प्रश्न, ( २ ) कमाईचा प्रश्न, आणि ( ३ ) दिवसभर रोजगार मिळवायला जाणाऱ्या मोठ्या मुलांचा प्रश्न.

या तीन प्रश्नांची तीन स्वतंत्र उत्तरे त्यांनी शोधून काढली— ( १ ) कुरणशाळा ( २ ) उद्योगालय व ( ३ ) रात्रशाळा.

यापैकी १९५८ साली सुरू केलेल्या कुरणशाळेच्या प्रयोगाची शिक्षणक्षेत्रातील एक खास व मौलिक शोध म्हणून कायमची नोंद झाली आहे.

आदिवासी मुलांना वर्षातून सहा महिने गुरांना रानात चारायला नेण्याचे काम करावे लागे. या लोकांकडे गायी, म्हशी, बकऱ्या प्रामुख्याने असत. आईबाप दिवसभर मजुरीच्या कामावर जात असल्यामुळे हेही काम बहुधा घरच्या मुलांवरच सोपविलेले असे. विशेषतः धान्याची पेरणी झाल्यावर गुरांनी शेतांची नासाडी करू नये म्हणून त्यांच्यावर विशेष लक्ष ठेवावे लागे. कुणाच्या शेतात ती शिरली तर शेताचा मालक त्यांना पकडून पांजरपोळात पाठवी व त्याबद्दल रु. ५० दंड होई. शिवाय ज्या मुलांकडे गुरे नसत ती मुले दुसऱ्यांची गुरे चारण्याचे काम करून कमाई साधत व ही कमाई शाळार्पण करणे त्यांना आणि त्यांच्या पालकांनाही परवडणारे नव्हते. साधारणपणे सहा ते दहा या वयाची मुले व काही मुलीही या उद्योगात असत. गुरे चारण्याचे काम सकाळपासून सायंकाळपर्यंत चालणारे असल्यामुळे ही मुलेसुद्धा दुपारी १२ ते २ या वेळात जेमतेम शाळेत



येऊन जात. दोन तासांच्या या तुकड्यात काय शिकवायचे व कसे? काही मुलांकडे एखादेच जनावर असे. हे काम एकत्र व पाळीपाळीने केल्याने प्रश्न सुटू शकला असता परंतु याला आदिवासींची विशिष्ट एकलकोंडी वृत्ती आड आली. संयुक्तपणे, सहकाराने काही काम वा मौज करणे तर दूरच; पण एका पाड्यावरची मुले दुसऱ्या पाड्यावरच्या मुलांमध्ये फारशी मिसळतसुद्धा नसत. भोनारपाड्याची मुले दिसली की बाबापाड्याच्या मुलांनी पळून जायचे. लिलकपाडा, वरईपाडा, नारळीपाडा, बंदाळीपाडा, दळवीपाडा वगैरे अनेक ‘ बेटे ’ होती. आणि मोठ्या माणसांचीही प्रवृत्ती याहून वेगळी नव्हती.

नुसते घरोघर बोलवायला जाऊन, शिक्षणपद्धतीत बदल करून, शाळेचा दिनक्रम आकर्षक करून सुटणारा हा प्रश्न नव्हता.

गुराखी पोरांना जास्त वेळ शाळेत कसे आणायचे? त्यांचे हे गुरे वळण्याचे काम कुणी करायचे?

—आणि ताराबाईंना उत्तर सापडले. शाळेनेच मुलांबरोबर जंगलात जावे. अनुताईंनी प्रतिध्वनी काढला, ‘ शाळेने मुलांच्या अंगणातील झाड व्हावे. ’

शाळेतल्या शिक्षक-शिक्षिका मुलांबरोबर रानात जाऊ लागल्या. निराळ्या अर्थाने, शिंगे मोडून वासरात शिरल्या; पावसापाण्यात, उन्हाचिखलात त्यांच्याबरोबर भटकू लागल्या. कधी साडीचा काचा मारून, ओचे खोचून मुलांबरोबर ओहोळात उतरायचे, डुंबायचे. कधी कधी गुडघागुडघा चिखलात उतरून खेकडे पकडायचे, कधी भाजीकरिता कोवळ्या बांबूचे कोंब हुडकीत रानोमाळ भटकायचे. चिंचेच्या वनात जाऊन चिंचा पाडायच्या, ओढ्यात चिखलाचे बांध घालून मासोळ्या पकडायला बसायचे आणि “ असा नाय, कादव ‘ चिखल ’ लाव तथं ” म्हणून मुलांनीच त्यांचे शिक्षक बनायचे.

आणि अशा तऱ्हेने मुलांमध्ये मिसळून त्यांच्यातलेच एक होऊन त्यांच्याशी खेळता-खेळता, हे शिक्षक मोठ्या कुशलतेने, अनौपचारिक पद्धतीने त्यांच्यातली ज्ञानाची भूक चेतवू लागले. गप्पागोष्टी करता करता शिक्षणाविषयी त्यांच्या मनात कुतूहल व गोडी उत्पन्न करू लागले.

ताराबाईंचा शिक्षक गोपाळायीप्रमाणे पाठीवर शाळा घेऊन रानात जाई. तशा या कुरणशाळेत पुस्तके, पाटी, फळा इ. अभ्यासाच्या ठराविक साधनांचा अंतर्भाव नव्हता. एखाद्या पिशवीत कधी टेप तर कधी फूटपट्टी, कधी वर्तुळ, कधी भिंग अशी जुजबी साधने तेवढी शिक्षकाबरोबर असत; खरी पाटी हिरव्या रानाची.

या कुरणशाळेत माध्यम केले गेले मुलांच्या भोवती संपन्नतेने पसरलेल्या निसर्गाचे. इथले ‘ शिशुवाचन ’ म्हणजे ही सृष्टी. निरीक्षणातून, प्रत्यक्ष प्रयोगांतून, तोंडी संभाषणांमधून निसर्गाचा परिचय करून घ्यायचा. निसर्गातल्या लहान-मोठ्या तात्कालिक घटनांचे अवलोकन करायचे आणि त्यातून मुलांच्या अवलोकनशक्तीचा विकास साधायचा. उदा

गोष्टी नेहेमी त्यांच्या पाहण्यात असत त्यांचा कार्यकारणसंबंध त्यांच्या ध्यानात आणून द्यायचा. त्याकरिता गप्पा, गोष्टी, गाणी, खेळ, किरकोळ प्रश्नोत्तरे, प्रत्यक्ष अनुभव यांवर भर द्यायचा आणि या अनौपचारिक शिक्षणाला जोड म्हणून, अभ्यासाला पोषक अशा पदार्थांचे संग्रहालय मुलांच्याच मदतीने तयार करायचे. अशा रीतीने निसर्गपरिचय करून देता देता गणित, भाषा, सामान्यज्ञान, भूगोल, आरोग्यशास्त्र या शालेय विषयांची प्राथमिक ओळखही साधायची.

या निसर्गशिक्षणामागे दोन हेतू होते. हसतखेळत केलेल्या या अभ्यासातून शालेय शिक्षणाकरिता योग्य अशी मानसिक बैठक मुलांच्या मनात तयार होईल, त्यांच्यात वैज्ञानिक दृष्टी व प्रयोगशीलतेचा विकास होईल व हे सर्व योग्य पद्धतीने केले तर एक दिवस मुलांकडूनच पाट्या-पेन्सिलींची मागणी येईल अशी अपेक्षा होती. दुसरे म्हणजे शाळेतले शिक्षण अर्धेमुर्धे टाकून कामधंद्याला लागणारी मुले पुढील आयुष्यात लेखन-वाचनाच्या कृत्रिम क्रिया विसरतीलही; परंतु निसर्गाकडे कुतूहलाने व जाणीवपूर्वक पाहण्याचा त्यात शास्त्रीय दृष्ट्या प्रयोग करण्याची दृष्टी ती विसरणार नाहीत, असाही एक दृष्टिकोन होता.

निसर्गाच्या मांडीवर खेळणाऱ्या निसर्गबाळांसाठी काढलेल्या या निसर्गशाळेमुळे ताराबाईंचे कार्यकर्ते मुलांचे खरेखुरे सखेसोबती बनले. नुसता मैत्रीचा भाव आणून थांबले नाहीत तर त्यांचे मित्र बनून त्यांच्या जीवनात शिरले; आपला शास्त्रीय दृष्टिकोन, अभ्यासू वृत्ती व सहृदयता घेऊन चिकाटीने त्यांच्यात काम करू लागले आणि मग या मुलांना शाळेत येणे का जिवावर येते हे त्यांना उमगले. मुलांच्या स्वच्छंद जीवनक्रमात सामील होऊन, त्यांच्या हातात हात घालून त्यांच्या बरोबर विशुद्धपणे वागताना त्यांना चार भिंती व छप्पर असलेल्या कोंदट शाळेत बोलावून गणिते करायला बसविणे त्यांचे त्यांनाच अस्वाभाविक व चमत्कारिक वाटू लागले. त्यांच्या शाळेत मुलांसाठी होते काय, तर अक्षरे, अंकलेखन, बेरजा व वजाबाक्या. जे विषय मुलांना शिकविण्यात येत त्यांचा त्यांच्या जीवनाशी प्रत्यक्ष संबंध मुलांना कुठेच दिसत नसे. त्यामुळे त्यांना अभ्यास एकदम नीरस व निरुपयोगी वाटत राही. एका जागी बंदिस्तपणे व स्थिर बसून असे अनाकर्षक उद्योग करण्यात त्यांना गोडी किंवा मजा कशी ती वाटतच नसे.

मुलांची ही अडचण लक्षात घेऊन ताराबाईंनी आपल्या कुरणशाळेतून त्यांना कृत्रिम, अनैसर्गिक व परक्या वाटणाऱ्या सर्व बाबी कटाक्षाने काढून टाकल्या. आकडेमोडीऐवजी प्रत्यक्ष कृतीवर भर दिला. लेखनाऐवजी श्रवणावर भर दिला. माहिती मुखोद्गत करणे, तोंडपाठ म्हणून दाखविणे वगैरे बौद्धिक व्यायाम वर्ज्य ठरविले.

परंतु त्याबरोबरच कुरणशाळेचा खरा अभ्यासक्रम कुरणातच ठरला पाहिजे, फुलला पाहिजे, याची जाण शिक्षकाने सतत ठेवायची होती. हे सर्व नियम व पथ्ये अगदी कच्ची, स्थूल व शिथिल समजायची होती. कुरणशाळेचा साचा होऊ द्यायचा नव्हता; तिला ठराविक व औपचारिक स्वरूप येऊ द्यायचे नव्हते.



लहान प्रमाणात परंतु पुरेशी प्रायोगिक वृत्ती ठेवून आणि शास्त्रशुद्ध पद्धतीने नियमित व तपशीलवार नोंदी ठेवून करण्यात आलेला कुरणशाळेचा हा प्रयोग विकासवाडी प्रयत्नात मानाचे स्थान मिळवून बसला. अस्सल कार्यश्रद्धा, मुलांविषयी खरी आत्मीयता व जिद्द यांच्या जोरावर ताराबाईंचे सहकारी या प्रयोगात यशस्वी झाले. एखाद्या योग्याचे तादात्म्य, कलावंताचे कौशल्य, संवेदनक्षमता व हळुवारपणा आणि समाजसेवकाची समर्पण शक्ती, खंबीरपणा हे सारे या प्रयोगामध्ये एकवटले होते असे म्हटल्यास अतिशयोक्ती ठरू नये. पुढे १९७४ साली भारत सरकारने कुरणशाळा ( मराठी ) किंवा Meadow School ( इंग्रजी ) ही, या प्रयोगाचा आढावा घेणारी पुस्तिका ताराबाईंकडून लिहवून घेतली व प्रकाशित केली. या पुस्तिकेच्या प्रस्तावनेत श्रीमती सुलभाबाई पाणंदीकर यांनी ‘ ताराबाई व त्यांच्या सहकाऱ्यांना सापडलेला नव्या शाळेचा हा प्रकार म्हणजे जीवन-शिक्षणाचा एक उत्कृष्ट नमुना ’ असल्याचे मत दिले आहे.

हळू हळू कोसबाडच्या आसपासच्या प्रदेशात गुराखी पोरांचा प्रश्न तितकासा तीव्र राहिला नाही. सगळीकडे मळे, फळबागा झाल्या. व त्यांना कुंपणे घातली गेली त्यामुळे कुरणे अशी फारशी उरलीच नाहीत आणि लोकांकडे गुरेही राहिली नाहीत. शिक्षणाचे महत्त्व आदिवासी लोकांना जाणवू लागले म्हणा, किंवा मुलांनाच त्याची गोडी जाणवू लागले म्हणा, आजूबाजूची बहुतेक मुले शाळेतच जाऊ लागली. गुरे वळण्याचे काम असले तर ते म्हाताऱ्या माणसांकडे आले. कोसबाड येथील प्रशिक्षण वर्गाच्या अभ्यासक्रमात मात्र कुरणशाळेचा अंतर्भाव अजून आहे. कृत्रिम कुरणशाळा तयार करून हे काम विद्यार्थ्यांना शिकविण्यात येते.

आचार्य काकासाहेब कालेलकरांनी ताराबाईंच्या या कुरणशाळेचा गौरव करताना लिहिले आहे—

“ ...मी जर हिंदुस्थानच्या शिक्षणकार्यांचा इतिहास लिहावयास बसलो तर ‘ एका नव्या युगाचा आरंभ ’ म्हणून ताराबाईंच्या कुरणशाळेला एक स्वतंत्र अध्याय देईन. आपल्या लोकांना आजकाल मोठमोठी सूत्रे बोलण्याची सवय लागली आहे. आपण म्हणतो, ‘ आजवर विद्यार्थ्यांना जेथे शिक्षणसंस्था असतील, तिकडे जावे लागत असे. यापुढे शिक्षणप्रवृत्तीने स्वतः होऊन जेथे विद्यार्थी राहतात तेथे पोचले पाहिजे. ’ खरोखर हे सूत्र क्रांतिकारी आहे, युगांतरकारी आहे. पण याचा प्रत्यक्ष प्रयोग करून पाहण्याची हिम्मत ताराबाईंनी केली.

“ असे म्हणण्यात मी अतिशयोक्ती करीत नाही. यात पक्षपातही नाही. मला ठाऊक आहे की पुष्कळशा शाळा आदिवासी क्षेत्रात आज काम करीत आहेत.

" ...पण ताराबाईंची कुरणशाळा इमारतीत बसत नसून गुरे चारणाऱ्या मुलांच्या मागोमाग कुरणांमध्ये हिंडून त्यांच्या जीवनाला आणि जीवन विकासाला उपयोगी असे शिक्षण देते.

" येथे मला गुजरातमधल्या स्वामी नारायण संप्रदायाच्या कित्येक संन्याशांची आठवण होते. संसारसागरात गटांगळ्या खाणाऱ्या मूढ जनांचा उद्धार करणे हे साधूंचे काम आहे. एखाद्या देवळात किंवा मठात बसून रसाळ वाणीने उपदेश करणे किंवा तालासुरावर भजने म्हणणे आणि कीर्तने करणे याहून अधिक भरीव काम झाले तरच धर्माची पाळेमुळे मजबूत होतील असा विश्वास दृढ झाल्यामुळे स्वामी नारायण संप्रदायाच्या काही संन्याशांनी शेतकऱ्यांना उपदेश करण्यासाठी शेतात जाण्याचे ठरवले. बैल नांगर ओढीत चालले आहेत, शेतकरी बैलाच्या शेपटीला पिरगाळून त्यांच्याकडून काम करून घेत आहे आणि शेतकऱ्याच्या मागोमाग एक संन्यासी उपदेश करीत चालला आहे. अशा दृश्याची कल्पना करा. खेडुताला संन्यासी म्हणतो, ' बाबा रे, तुझे शेतीचे काम चालू दे. ते न चालले तर जगाला खायला अन्न मिळावयाचे नाही. तू मागे वळून देखील पाहू नकोस. तू जमिनीत नांगर चालीव, पण मी म्हणतो तिकडे ध्यान दे. ' असे म्हणून संन्यासी महाराज शेतकऱ्याला जीवनाची कृतार्थता कशात आहे हे सांगू लागले. आणि शेतकऱ्याला त्याच्या कामात हातभारही लावू लागले. थोड्याच वेळात शेतकरी सहजानंद स्वामींना शिष्य झाला आणि त्याने पवित्रपणे जगण्याचा संकल्प केला. शेतकऱ्याने जमीन नांगरून धान्याचे पीक काढले आणि संन्याशाने शेतकऱ्याचे हृदय नांगरून त्यातून खऱ्याखुऱ्या धार्मिकतेचे पीक काढले.

" —कुरणशाळा अशाच प्रकारची सामाजिक, शैक्षणिक, राष्ट्रीय शेती आहे... मॉन्टेसोरी व गिजुभाई यांना मागे टाकून ताराबाई कितीतरी पुढे गेल्या आहेत... "*

प्राथमिक शाळेत स्थानिक मुले हजर न राहण्याचे आणखी एक कारण म्हणजे या मुलांना काहीतरी कमाई करून कुटुंबाच्या आर्थिक उत्पादनात भर घालावी लागे. त्यामुळे शिक्षण मोफत असूनही त्यांना शाळेत येणे परवडत नसे. तेव्हा या मुलांना विकासवाडीत येते करायचे झाल्यास त्यांच्या रोजगाराचा प्रश्नही ताराबाईंना सोडवावा लागणार होता. ही मुले साधारण सहाव्या वर्षापासून कमाईसाठी बाहेर पडत. कधी कोसबाडच्या परिसरात असलेल्या मळ्यांमध्ये चिक्कू धुण्याचे काम मिळे तर कधी गवताचे, पळसाच्या पानांचे भारे बांधायचे काम मिळे कधी रेल्वे स्टेशनवर पाणी विकायला जात कधी शेजारच्या कृषि-विद्यालयात मिरच्या तोडण्याचे काम करीत. अशी कामाच्या वासावर ही

* ' ताराबाई आणि बालशिक्षण ' या स. आ. केळकरलिखित पुस्तकाच्या प्रस्तावनेतील काही अंश.



मुले रोज दोन-तीन मैल दूरसुद्धा जात. आईवडील विटांच्या भट्टीवर काम करीत असतील तर मूलसुद्धा एकेक वीट उचलून नेण्याचे काम करी! अशा प्रकारच्या कामातून दिवसाकाठी जी काही मिळकत होई ती दोन ते तीन आण्यांपेक्षा जास्त नसे. परंतु त्यातून कुटुंबाचे मीठमिरची बाहेर पडत असल्यामुळे तेवढी तुटपुंजी मिळकत देखील त्यांच्या पालकांच्या दृष्टीने महत्त्वाचीच होती; तेवढी खोटसुद्धा त्यांच्या लंगड्या अर्थव्यवस्थेला परवडणारी नव्हती. ज्या जिद्दीने ही मुले काम मिळविण्यासाठी धडपडत त्यावरून त्यांची ही कमाईची गरज व निकड समजत असे. त्यातूनही मुले कधी शाळेपाशी थबकली, रेंगाळली तर त्यांचे आईबाप त्यांना " इथं काय वेळ दवडतोस ? कवरीत जा! " म्हणून कामाच्या दिशेने पिटाळत. ( कवरी म्हणजे वाळलेल्या गवताची कव्हरे बनविण्याचा कारखाना ) मुलेही चुळबुळत. " ताई, आता सोडा की, कवरीत जायाची वेळ झाली. " काम करायचे ते मजुरीसाठी हे समीकरण डोक्यात इतके पक्के झालेले की " थोडे शंख वेचून आण रे! " म्हणून म्हटले की चार वर्षांचे मूलसुद्धा पटकन विचारी, ' दिडकी द्याल ? '

या भागात शिक्षण आणि कमाई या दोन्ही गोष्टी साध्य होतील असा काहीतरी कार्यक्रम शाळेनेच योजायला हवा. हे ताराबाईंच्या लक्षात आले आणि त्यांनी शाळेच्या अभ्यासक्रमातच, रोजच्या दिनक्रमातच एखाद्या व्यवसायाद्वारा या दोन्हींची सांगड घालायचे ठरवले. ताराबाई व त्यांचे सहकारी त्या दृष्टीने प्रयत्न करू लागले.

मुलांची अर्थोत्पादनाची ही गरज भागविण्यासाठी उद्योग शोधताना ताराबाईंनी तीन-चार मुद्दे लक्षात घ्यायचे ठरविले. हा व्यवसाय शक्यतो शिक्षणाचे माध्यम होऊ शकेल असा असावा ( उदा. शेती ) पण तसा व्यवसाय ठेवणे शक्य नसले तर केवळ कमाईचा उद्देश ठेवून एखादा व्यवसाय पत्करायलाही हरकत नाही. दुसरे म्हणजे, आतापर्यंत ज्या प्रकारची कामे ही मुले करीत आली आहेत त्या कामांशी मिळतेजुळते या कामाचे स्वरूप असावे. अंगमेहनत आणि कौशल्य यांची सांगड या कामात असावी. या कामासाठी लागणारा कच्चा माल भोवतालच्या डोंगरांत, रानांत; शेतात हिंडून गोळा करता येईल असा असावा. मुलांना झेपणार नाहीत इतके शारीरिक श्रम त्यांत असू नयेत आणि अखेरीस जे भटकंतीचे जीवन जगायची या मुलांना आजपर्यंत सवय आहे त्याच्याआड येणारे हे काम नसावे.

विकासवाडीने प्रथम स्वतःचेच खिसे तपासले. त्यावेळी संस्था नव्यानेच वसत होती. त्यामुळे मजुरीचे काम भरपूर होते. ही मुले न थकता व हौसेने शारीरिक कष्ट करतात; असा अनुभव आला; परंतु हे छोटे मजूर संस्थेला तोट्यात पाडू लागले. शिवाय संस्था काही त्यांना कायम बांधकामाची कामे पुरवू शकणार नव्हतीच. संस्थेकडे मोकळी जमीन बरीच होती. तेथे भाजी काढण्याचा प्रयोग काही काळ झाला. चिक्कूच्या टोपल्या

विणकामाचे काम सुरू करून पाहिले. पण ते 'बायकांचे काम' म्हणून मुलगे हात लावीनात; शिवाय गावकऱ्यांना वाटे, हे लोक आता आपला धंदा बळकावून बसणार! जंगलपट्टीमध्ये लाकडे आणणे, हिरडे-बेहडे, रिठे, आवळे अशी फळे गोळा करणे हे व्यवसाय होऊ शकतात; परंतु ही सर्व कामे मोसमी. जळाऊ सर्पण गोळा करण्याचे लायसेन्स फक्त कंत्राटदारांनाच मिळे. उन्हाळ्याचे चार महिने बरीचशी पळसाची पाने जमवायची आणि पावसाळ्यात, हिवाळ्यात त्यांच्या पत्रावळी लावून त्या विकायच्या—असाही एक उपक्रम झाला. परंतु हे काम मुलांना फार वेळ कोंदट जागी बसवून ठेवणारे वाटले. कंदिलाच्या वाती करणे, अंबर चरखा, वाळलेल्या गवताची झाकणे तयार करणे असे बरेच व्यवसाय करून पाहिले. हा प्रदेश भातशेतीचा असल्यामुळे पावसाळ्यानंतर गवताचा पेंढा पुष्कळ जमतो. त्याचे साचे करून ते औषधाच्या बाटल्यांना वेष्टन म्हणून औषधांच्या कारखान्यांना पुरविणे हा व्यवसायसुद्धा पुष्कळ प्रमाणात यशस्वी झाला. हे काम बारा महिने चालणारे होते. रोज चार तास मुले काम करीत व तीन तास अभ्यास करीत. परंतु पुढे बाहेरच्या व्यापाऱ्यांनी ही कल्पना उचलली आणि मोठ्या प्रमाणावर हा उद्योग सुरू केला. तेथे कामाचे तास जास्त, त्यामुळे कमाईही अधिक; त्यामुळे मुलांनी लगेच विकासवाडीकडे पाठ फिरवून तिकडेच धाव घेतली. तेथे दिवसभर मान मोडून काम करावे लागे. शिवाय, ना खेळ ना रंजन; मोकळी हवासुद्धा नसे. परंतु मालकाकडून त्यांच्या पालकांना कर्जाऊ रकमा मिळत. जे काय चार-सहा आणे मुलांच्या हातावर पडत त्यातून त्यांना भजी खा, हॉटेलात जा, सिनेमा पाहा—अशी मौजमजा करता येई. शासनाने यांच्या प्रयत्नाचे शैक्षणिक, सामाजिक महत्त्व लक्षात घेऊन हा व्यवसाय शाळेपुरता राखीव ठेवावा, असेही प्रयत्न संस्थेने केले परंतु उपयोग झाला नाही. १९६३ साली हा उपक्रम बंद पडला.

एखाद्या धंद्यात स्पर्धा फार, तर एखाद्या वस्तूचा खपच कमी. कधी भांडवल कमी पडायचे तर कधी माल चांगला बनवूनही या लोकांचा संपर्क व साधने तोकडी पडल्यामुळे मालाचा योग्य प्रमाणात उठाव होत नसे. काही व्यवसायांच्या बाबतीत ना हस्तकौशल्य, ना कसब, ना शैक्षणिक मूल्य. त्यामुळे ते बाद ठरले. विकासवाडीचे उद्योगालय पुन्हापुन्हा ओस पडत असे. निश्चित आकार काही ते धारण करीत नसे. नवा व्यवसाय काढला की शंभर-शंभर मुले धावत येत पण ती कमाईच्या वासाने, कामाच्या दिशेने; शिकण्याच्या ओढीने नव्हे, हे कार्यकर्त्यांच्या लक्षात येई परंतु त्यातून कार्यकर्त्यांची जिद्द अधिकच पणाला लागे. मुलांना पैशाची किती जरूर आहे हे त्यामुळे विकासवाडीच्या लक्षात येई आणि मग ते नव्या उद्योगाची चूलबोळकी जमवू लागत, मांडू लागत. ना धंद्यातली गती, ना व्यापाराची आवड, ना व्यवसायाचा काही अनुभव. अशी ही शिक्षणक्षेत्रातली माणसे त्यातूनही कणखरपणाने मार्ग काढण्यासाठी धडपडत होती.



अखेर ठुकतमाकत, ठेचा खात मंडळी योग्य व्यवसायापर्यंत येऊन पोचली.

त्या भागात जंगल खूप, त्यामुळे लाकूड मुबलक प्रमाणात उपलब्ध होते. सुतारकाम, खैरातकाम या मुलांना शिकविले गेले तर ते ज्ञान त्यांना पुढेसुद्धा शेतीला जोडधंदा म्हणून किंवा पोटापाण्याचा व्यवसाय म्हणून उपयोगी पडणार होते. मग सरकारी कुटिरोद्योग खात्याशी पत्रव्यवहार झाला. मुंबई सरकारची मंजुरी व दिल्ली सरकारची पुष्टीही मिळविली आणि अखेर सुतारकाम हा पूरक व्यवसाय म्हणून निश्चित झाला. जानेवारी १९६० पासून एक लेथवर्कचा वर्ग संस्थेत सुरू झाला व प्राथमिक शाळेतील मुले तेथे काम शिकू लागली. या मुलांनी तेथे रोज चार तास याप्रमाणे काम करावे व उरलेल्या वेळात शिक्षण घ्यावे, या कामाबद्दल त्यांना महिना रु. १०।- शिष्यवृत्ती मिळावी अशी ही योजना होती. दोन वर्षांचा हा औद्योगिक अभ्यासक्रम असून त्या वेळात विद्यार्थ्यांनी चौथी इयत्ता उत्तीर्ण करावी असा अंदाज होता. शिक्षण पूर्ण झाल्यावर प्रत्येकाने स्वतंत्र उद्योग सुरू करायचा तर भांडवलाचा प्रश्न येणार, मालाच्या विक्रीचा प्रश्न येणार. तेव्हा या विद्यार्थ्यांनी एकत्र येऊन एक सहकारी सोसायटी स्थापन करावी व खेळण्यांचा, लाकडी सामानाचा एक कारखाना काढावा अशीही कल्पना निघाली. त्याप्रमाणे आरंभीच्या सतरा विद्यार्थ्यांपैकी तेरा विद्यार्थ्यांनी भांडवल गोळा केले. दहा मुलांनी रु. २२५।- समाजशिक्षण खात्याकडून कर्जाऊ मिळविले आणि रु. ७५।- प्रत्येकी जिल्हा परिषदेकडून साहाय्यरूपाने मिळाले.

आज विकासवाडीत टेकडीच्या उतरणीवर वसतिगृहाच्या पिछाडीला असलेल्या एका कौलारू वास्तूत हे बाल-उद्योगालय आहे. सुमारे पंचवीस ते तीस कामगार येथे काम करीत असतात व त्यांना रु. १-७५ पासून ते रु. ३-५० पर्यंत रोजगार दिला जातो. रात्रीच्या शाळेत हे विद्यार्थी शिक्षणही घेतात. नवीन, शिकाऊ कारागीर घेणे चालूच आहे, व त्यांना ग्राम-बाल-शिक्षा केन्द्रातर्फे शिष्यवृत्ती दिली जाते. आता नवीन प्रकारचे विजेचे लेथ तेथे काम करीत असतात व लाकडी वस्तू, खेळणी, रंगीत हॅण्डल्स, बालवाडीची लाकडी साधने, छड्या इत्यादींचे उत्पादन येथे होत असते. तयार माल विकण्यासाठी बाहेरच्या ऑर्डर्स मिळविल्या जातात. येथे शिकून बाहेर पडलेले काही कारागीर डहाणू व मुंबई येथील कारखान्यांतही नोकरीस आहेत.

विद्यार्थ्यांनीच नेमका हिशेब राखून या संस्थेचा विनियोग सांभाळला आहे. येथील आदिवासी कारागीर रंगसंगती व कामाची सफाई या बाबतीत इतर सामान्य कारागिरांपेक्षा वरचढच आहेत असा तज्ज्ञांचा व शिक्षकांचा अभिप्राय आहे. एखादा नमुना दाखविल्यावर ते तंतोतंत तशी वस्तू तयार करून तर दाखवितातच परंतु स्वतःची कल्पनाशक्ती वापरून त्यात नावीन्यपूर्ण सुधारणासुद्धा करून दाखवितात. खुर्च्या, टेबले,

कपाटे वगैरे वस्तू ते हौसेने व चांगल्या बनवितात. सोपविलेले काम जबाबदारीने व जाणीवपूर्वक पुरे करणे, कारखान्याचे नुकसान होणार नाही याची काळजी घेणे, काम वेळेवर, अंगचोरपणा न करता व परस्पर-सहकार्याने करणे इत्यादी गुण त्यांच्यात दिसतात. फार गुंतागुंतीचे काम असेल तर ते मात्र ते करू शकत नाहीत. याच धर्तीवर खडू करणे, उदबत्त्या करणे इ. बेत संस्था आखून आहे.

विकासवाडीचा हा उद्योगवर्ग म्हणजे काम आणि शिक्षण यांची सांगड घालण्याचा एक यशस्वी प्रयत्न म्हणून शिक्षणक्षेत्रातील एक महत्त्वाचा प्रयोग समजला जातो. आदिवासी लोकांसाठी व इतरही तत्सम — आर्थिकदृष्ट्या बिकट परिस्थितीतील वर्गांसाठी हे दोन्ही प्रश्न एकदमच सोडविणेच योग्य ठरेल असे यावरून दिसते.

अर्थात तत्त्व सिद्ध झाले तरी आर्थिक विवंचना संपल्या असे होत नाहीच. उद्योगालय सुरू झाल्याला सहा वर्षे होऊन गेली तरी आर्थिक संकटे येतच राहिली, आणि एक क्षण असा आला की सहकारी सोसायटी बंद करायचा निर्णय घेण्याची पाळी चालकवर्गावर आली. परंतु ' हे कामच नको ताई, आपण दुसरीकडे जाऊ ' म्हणणाऱ्या अनुताईंमधला ' ताराबाईंचा मुलगा ' मधल्या काळात, हातपाय गाळण्याची कला, त्यांच्याइतकीच विसरून गेला होता. चेअरमन या नात्याने त्यावेळी अनुताईंनी मोठ्या निर्धाराने आणि चिकाटीने चालकवर्गाला सांगितले, " ही संस्था माझा आत्मा आहे, तेव्हा ती मी बंद पडू देणार नाही. संस्था बंद करायची तर नाहीच, उलट तिची अधिक प्रगती कशी करता येईल याचाच विचार करायचा. निर्माण झालेल्या अडचणी सोडवण्याचे मार्ग शोधून काढायचे. " त्यांची ही उमेद पाहून व्यवस्था समितीच्या सभासदांचाही आत्मविश्वास वाढला आणि संस्था सर्व प्रयत्नांनिशी पुन्हा आपल्या पायांवर उभी राहिली.

विकासवाडीचे उद्योगालय म्हणजे शिक्षण व कमाई एकत्र करण्याच्या प्रयत्नाचा पहिला भाग. त्यावेळी बारा वर्षांपर्यंतची मोठी मुलेसुद्धा शालेय शिक्षणापासून पूर्णपणे वंचित राहिलेली असत. त्यांच्या पुढे त्यांना मग मुळाक्षरे शिकविली जात. परंतु पुढे हळूहळू यात बदल झाला. मुले योग्य वयात, म्हणजे पाचव्या–सहाव्या वर्षी पहिलीत दाखल होऊ लागली. ही मुले तिसरी किंवा चौथीपर्यंत पोचत आणि मग कमाईचा प्रश्न निघे. या प्रश्नाला उत्तर म्हणून कार्यानुभव किंवा Work Experience Project नावाची एक योजना काढण्यात आली.

पाचवीच्या सुमारास ही मुले शाळा सोडून जातात कारण त्यांनी आता मिळविते झाले पाहिजे अशी त्यांच्या पालकांची अपेक्षा असते. शिवाय वह्या, पुस्तके, पाट्या घेण्याकरता लागणारा पैसा त्यांच्याजवळ नसतो. आणि या आर्थिक अडचणींमधून वाट काढून त्यांनी सातवीपर्यंत मजल मारली, तरी ' आता पुढे काय ' हा प्रश्न सुटत नाहीच. कारण कमाईच्या दृष्टीने त्यांचे हे शिक्षण कुठेच कामाला येत नाही आणि पुढचे



माध्यमिक शिक्षण घेणे त्यांना परिस्थितीमुळे शक्य होत नाही. सात इयत्ता पार केल्यानंतर शेतमजुराचे काम करायची त्यांची तयारी नसते आणि मग टिवल्याबावल्या करणे, उनाडक्या वा उपद्व्याप करणे असा त्यांचा जीवनक्रम होऊन बसतो.

या समस्येवर उपाय काय ?— त्यांचे शिक्षण जीवनशिक्षण व्हावे या दृष्टीने त्यांच्या शिक्षणातच धंदेशिक्षणाचा समावेश करणे, आणि हे शिक्षण घेताना निदान पाठ्यपुस्तकांपुरती कमाई तरी मुलांना त्यातून करता येणे—हा तो उपाय.

त्या दृष्टीने १ ऑक्टोबर १९७५ पासून कार्यानुभवाचा एक लहानसा प्रयोग सुरू करण्यात आला. पाचव्या इयत्तेपासून कार्यानुभवाचा समावेश अभ्यासक्रमातच केला आहे. शेती, सुतारकाम व शिवणकाम अशा तीन धंद्यांचा त्यात अंतर्भाव आहे. रोज सकाळी दोन तास यांपैकी एका धंद्याचे शिक्षण प्रत्येक विद्यार्थ्यास, त्याच्या निवडीनुसार देण्यात येते. दुपारी नेहमीसारखी शाळा असतेच. हे शिक्षण देताना तांत्रिक बाजूंपेक्षा बौद्धिक विकासाकडे लक्ष देण्यात येते. या वयाची मुले स्वतंत्रपणे निर्मिती करू शकत नाहीत, परंतु सातवीपर्यंत हळूहळू ती तयार होतात. त्यांनी बनविलेल्या वस्तूंच्या विक्रीच्या किंमतीतून खर्च वजा जाता उरलेली रक्कम विद्यार्थ्यांना वह्यापुस्तकांसाठी वाटली जाते. काही मुलीही हे शिक्षण घेतात.

कार्यानुभव ही योजना महाराष्ट्र शासनाच्या शालेय अभ्यासक्रमात अंतर्भूत केलेली एक योजना आहे. शारीरिक श्रमाविषयी आवड उत्पन्न करणे व धंदेशिक्षण देणे हे दोन उद्देश त्यामागे आहेत. विकासवाडी येथे १९७५ साली पाचव्या इयत्तेसाठी, १९७६ साली सहाव्या व १९७७ साली सातव्या इयत्तेपर्यंत हा कार्यानुभव वाढविण्यात आला व त्याच्यावर शाळेतल्या विद्यार्थ्यांच्या नापाशी व गळतीवर जादूसारखा परिणाम झाला. या मुलांना त्यांच्या कामाबद्दल ताशी २५ पैसे ( दरमहा सुमारे रु. १० ) कमाई होते. कमाई करून शिक्षण घेत हे विद्यार्थी पुढे कृषिविद्यालयाने चालविलेल्या माध्यमिक शाळेकडे वळतात. आता त्यांना पोटासाठी शाळा सोडण्याची तितकीशी गरज वाटत नाही.

या सर्व प्रयत्नांनंतर प्राथमिक शाळेचा विभाग स्थिर झाला. १९५६ साली जेथून खिडकीतून उड्या मारून मुले पळ काढीत असत तेथे आज सुमारे ३५० विद्यार्थी–विद्यार्थिनी ( २२५ आदिवासी ) शिक्षण घेत असतात. ( मात्र प्राथमिक शाळा, पाळणाघर व बालवाडी संलग्न स्थितीत आज नाही. मूळची संकल्पित शैक्षणिक साखळी त्यामुळे भंग पावली आहे. )

रात्रीची शाळा विकासवाडीने काढली म्हणण्यापेक्षा मुलांनीच ती काढवून घेतली असे म्हणता येईल. बारस्यांच्या मुलांपैकी ७ ते १० वयाची मुले बहुधा भावंडांना सांभाळायच्या, गुरांना चारायच्या कामी गुंतलेली असत. परंतु दहाच्या पुढची मुले राजरोस मळ्यात, कारखान्यात रोजगार मिळविण्यास जात. शाळेतले कच्चे–पक्के शिक्षण

केव्हाच विस्मृतीत जमा झालेले असे व दहा वर्षांच्या आत चार यत्ता संपविणेही शक्य झालेले नसे. शिक्षकांनी घरोघर जाऊन या मुलांचा शोध घेतला तेव्हा काही मोठी मुले म्हणाली, " ए ताई, हामी तं शिकायचे. " " रात्री याल का ? " म्हटल्यावर उत्साहाने ' हो ' म्हणाली. आणि खरोखरच रात्रीच्या वर्गात सुमारे वीस ते पंचवीस मुले नेमाने येऊ लागली. ही रात्रशाळा संध्याकाळी अंधार पडू लागला की भरे व रात्री अकरापर्यंत चालू असे. प्रार्थना, लेखन–वाचन, गणित, गोष्टी, खेळ, गाणी, गोष्टींवरून अभिनय असे या शाळेचे स्वरूप होते. दिवसाच्या शाळेचा अभ्यासक्रम किती लवचिक केला तरी सरकारी धोरणाची बंधने पाळून होता. रात्रशाळेला तशी बंधने नव्हती. निश्चित वेळापत्रक असेही नव्हते. मुलांना शिक्षणात गोडी वाटू लागल्यावर मग रीतसर वेळापत्रक, शिक्षकांच्या रात्रपाळ्या आखण्यात आल्या. दिवसाच्या शाळेतले शिक्षकच रात्रीसुद्धा शिकवीत; त्यासाठी वेगळे वेतन कुणी मागितले नाही. रात्रशाळेमध्ये गैरहजेरीचा प्रश्न कधी फारसा आला नाही, मुले आवडीने येत. काही मुली तर दिवसाची शाळा आटोपून पुन्हा रात्रीच्या शाळेत हजेरी लावत. इतका त्यांना शाळेचा लळा लागला. फी अर्थात नव्हतीच.

रात्री घरी न जाता ही मुले संस्थेतच झोपू लागली. पहाटे उठून परस्पर ती कामावर निघून जात. मुलांच्या अंथरुणाची–पांघरुणाची, दिवाबत्तीची सोय संस्थेतच करण्यात आली. पुढे मुलांच्या ग्रहणशक्तीप्रमाणे मुलांचे वर्गही पाडले. पहिली ते चौथी असा एक वर्ग, पाचवी, सहावी व सातवीचे स्वतंत्र वर्ग होते. रात्रीच्या शाळेतून चौथी पास होऊन बाहेर पडलेल्या काही मुलांना पुढे शिपायाच्या व इतर नोकऱ्याही मिळाल्या, कारण अशा ठिकाणी चौथी पास ही शिक्षणाच्या लायकीची अट होती.

या रात्रशाळेचा एक अनुषंगिक फायदा म्हणजे ही मुले आदिवासी समाजातल्या दारू पिणे, जुगार खेळणे, अशा रात्रीच्या कुळंदांपासून दूर राहू लागली. मुलांच्या रोजच्या सहवासामुळे त्यांचे स्वभाव, चालीरीती, समजुती यांचा अभ्यास शिक्षकांना जास्त जवळून करता आला. पहाटे उठून दंतमंजन करणे, प्रार्थना म्हणणे अशा प्रकारचे वळण या मुलांना लावण्यात आले. या मुलांचे जेवणखाण तेथे होत नसल्यामुळे ही ' सुकी वसतीगृहे ' होती. आजही विकासवाडीच्या रात्रशाळेत ३५ विद्यार्थी शिक्षण घेत आहेत ( १९७८–१९७९ ). यातली बहुतेक मुले चौदा वर्षांच्या वरची आहेत व त्यतली चौथीच्या परीक्षेची तयारी करीत आहेत. काही मोजकी मुले ' सातवी उत्तीर्ण 'चेही स्वप्न पाहत आहेत डोंगरीपाडा येथे आणखी एक रात्रशाळा सुरू केली असून तेथे पटावर ४५ विद्यार्थी असून २५ विद्यार्थी नियमित हजेरी लावतात.

सुगीचे दिवस म्हणजे वारल्यांचा वर्षभरातला आनंदकाळ. या दिवसांत ही मुले रात्री अभ्यास झाल्यावर पाड्यांमध्ये नाचायला जात व मध्यरात्री परतत. विकासवाडीत



कधी एखादी परिषद अथवा तत्सम कार्यक्रम असला किंवा बाहेरच्या पाहुण्यांमुळे जागेची टंचाई होऊ लागली तरी ही मुले घरी जायला तयार नसत ! अनुताईंच्या खाटेखालीसुद्धा ती निजत.

धाकटी भावंडे सांभाळायची सोय झाली आणि शाळेत पुरुषशिक्षकांबरोबर स्त्री–शिक्षिकांच्याही नेमणुका झाल्या. त्यामुळे काही आदिवासी मुली शाळेत येऊ लागल्या होत्या. तरीही मुलींनी शिकणे ही गोष्ट अजून वारली लोकांना नवीनच होती. पण तिकडे मुलांच्या रात्रशाळेला रंग चढला तसा त्याचा गंध मुलींनासुद्धा जाणवला.

एके रात्री अनुताई जेवण आटोपून अंगणात आंचवायला जातात तो पायरीपाशी पंधरा–वीस मुलींची एक हसरी लाट उमी. चौकशी केली तशी म्हणाल्या,

" हामी पण शिकायच्या ! "

—विकासवाडी हसली.

" आणि घरी कशा जाणार मग ? "

याही प्रश्नाचे उत्तर त्या ठरवूनच आल्या होत्या.

" हामी इथंच ठाकायच्या झाले. "

मग मुलींची रात्रशाळादेखील जोरात चालू झाली. मुलांची निजण्याची व्यवस्था एका स्वतंत्र इमारतीत केली होती; आता या मुलींची सोय ताराबाईंच्या राहत्या घरातच करण्यात आली.

रात्रशाळेचा हा प्रयोग पूर्णपणे यशस्वी झाला. कालांतराने त्या परिसरातील मुलेमुली दिवसाच्या शाळेतच अधिक प्रमाणात येऊ लागली आणि सहा ते दहा या वयात चार इयत्ता पार करू लागली.

मुलामुलींच्या या रात्रशाळेबरोबरच आणखीही एका जोडीची खाजगी रात्रशाळा सुरुवातीच्या या काळात विकासवाडीमध्ये भरत असे. बोर्डीचे काम सुरू करताना ताराबाईंनी अनुताईंना शिशुविहार येथील अध्यापनाचा अभ्यासक्रम अर्ध्यावरच सोडायला लावून आपल्याबरोबर ग्रामीण भागात प्रत्यक्ष कामासाठी नेले होते. अनुताई नंतर प्रत्यक्ष अनुभवातून बालवाडीच्या व अध्यापन मंदिराच्या कामात तरबेज झाल्याच परंतु पुढे १९४९ साली सवड मिळताच पुन्हा शिशुविहारात दाखल होऊन अध्यापनमंदिराचा रीतसर अभ्यासक्रम पूर्ण करून त्यात त्या प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाल्या. कोसबाडचे काम करू लागल्यावर त्यांना, आपल्याजवळ पदवी नाही ही गोष्ट व्यवहारात वरचेवर आड येते, हे जाणवू लागले व त्यांनी थेट एम. ए. होऊन जायचे ठरवून अभ्यास सुरू केला ! दिवसभर इतर व्याप-ताप सांभाळून रात्री अनुताईंचे अध्ययन चाले. त्याच वेळी डोळ्यात मोतीबिंदू झाल्यामुळे त्यांना फार कमी दिसत असे. त्यामुळे त्यांना वाचनाचा ताण जाणवत असे. तेव्हा ताराबाईंनी, अप्पा कोसके यांनी वाचून दाखवायचे व अनु-

ताईंनी श्रवणभक्ती करून ते ग्रहण करायचे अशा अभिनव पद्धतीने हा अभ्यास झाला. संस्थेतील अध्यापकवर्गापैकी इतरही काही जण, वेळ मिळे त्याप्रमाणे अनुताईंना वाचून दाखवायचे काम करीत. एक विद्यार्थिनी आणि अनेक शिक्षक असे हे अभिनव विद्यालय होते. अखेर उत्तरपत्रिका लिहिताना अंदाजाने ओळींवर पेन ठेवून त्यांनी सर्व उत्तरपत्रिका लिहून १९६१ साली अनुताईंनी ना. दा. ठाकरसी महिला विद्यापीठाची बी. ए. ची परीक्षा देऊन दुसरा वर्ग मिळविला. आणि या छोट्या रात्रशाळेचा यशस्वी शेवट झाला !

( पुढे त्यांच्या एका डोळ्यावर मुंबईत शस्त्रक्रिया झाली व परत कोसबाडला जाऊन त्या कामालाही लागल्या. त्यातच काही कामासाठी त्यांना तातडीने दिल्लीला जावे लागले. तेथल्या थंडीचा, प्रवासाचा परिणाम होऊन डोळा सुजला परंतु अनुताई दिल्लीचे काम करून परतल्या. कामातून मोकळे होऊन अनुताईंनी डोळ्याकडे लक्ष पुरविले तोवर फार उशीर झाला होता. डोळा काढावा लागला. "एका डोळ्याची किम्मत देऊन अनुताईंनी दिल्लीचे काम पुरे केले !" ताराबाई नेहमी म्हणत. )

वारल्यांच्या मुलांच्या शिक्षणातले असे अनेक अडथळे ताराबाई व त्यांचे कार्यकर्ते दूर करीत होते. जिद्दीने, सतत प्रयत्नाने या मुलांना शाळेत येते करण्यात, शिकते करण्यात त्यांनी बरेचसे यश मिळविले. परंतु पुढे पुन्हा खडक लागला.

आतापर्यंत या मंडळींपुढे ज्या अडचणी आल्या होत्या त्या सान्या बहुतांशी परिस्थितिजन्य, भौतिक स्वरूपाच्या होत्या, सामाजिक होत्या. परंतु यापुढच्या समस्या म्हणजे संचालकांच्या शास्त्रीय ज्ञानाला, शिक्षणपद्धतीला, मानसशास्त्रीय सिद्धान्तांना निश्चितच आव्हान होते.

आदिवासी भागात बालशिक्षणाचा व इतर शिक्षणाचा कार्यक्रम सुरू करून दोन वर्षे होऊन गेली होती. मुलांची संख्या आणि उपस्थिती त्यामुळे आता बरीचशी नियमित झाली होती. मुले बालवाडीच्या, विकासवाडीच्या कार्यक्रमांत भाग घेत होती. तेथले खेळ खेळत होती. तेथे मजा करीत होती. परंतु मुलांना नुसते खेळते ठेवण्याने मुलांचे शिक्षण होत नाही. त्यांची मने एकाग्र झाली पाहिजेत, हातातल्या कामात ती पूर्णपणे रमून गेली पाहिजेत, ती करीत असलेल्या उद्योगातून त्यांच्या बुद्धीला चालना मिळाली पाहिजे, त्यातले सूक्ष्म बारकावे त्यांच्या ध्यानात आले पाहिजेत. त्यांच्या जिज्ञासेला त्यात खाद्य आणि आव्हान मिळाले पाहिजे. मुले आपापल्या उद्योगात इतकी गुंग झाली पाहिजेत, की खोलीत एक प्रकारची सुबुद्ध सक्रिय शांतता नांदली पाहिजे. — बाहेरची मंडळी आत गेली तरी त्यांचे तिकडे लक्ष जाता कामा नये.

या प्रकारचे अपेक्षित Polarization of attention या मुलांमध्ये का निर्माण होत नाही हे आता कार्यकर्त्यांपुढचे शैक्षणिक आव्हान होते.



कुणी म्हणत स्वाभाविकच आहे, या मुलांची कुवतच तेवढी, त्यांच्या बुद्धीचा आवाका व त्यांची लायकीच तेवढी. पिढ्यान् पिढ्या या जमातीवर केवळ शारीरिक श्रम करायचेच संस्कार आहेत आणि लहानपणापासून तशीच दृश्ये त्यांना त्यांच्या घरी व अवतीभवतीसुद्धा दिसत असतात. तेव्हा जे काही साधले आहे तेवढ्यावरच तुम्ही समाधान माना; या क्रियांमधूनही त्यांचा विकास होत आहेच.

परंतु ताराबाईंना हे समर्थन पटले नाही. त्यांचे शास्त्र आणि त्यांची श्रद्धा त्यांना सांगत होती, की शारीरिक व मानसिकदृष्ट्या अव्यंग मुले सगळीकडे सारखीच असणार. सारखीच बुद्धी घेऊन ती जन्माला येतात. शहरी, पांढरपेशा बुद्धिजीवी कुटुंबांतल्या मुलांच्या ग्रहणशक्तीला, जिज्ञासू वृत्तीला, त्यांना मिळणाऱ्या पोषक वातावरणामुळे, वाव मिळतो आणि म्हणून त्यांची ज्ञानेंद्रिये, अधिक लौकर संवेदनाक्षम होतात, इतकेच.

ही मुले एकाग्र होऊ शकत नाहीत याचे कारण त्यांच्यात तेवढी क्षमताच नाही ? ही मुले कशातच समरस एकाग्र होऊ शकणार नाहीत ? तर तसे नाही. अनुभव असे सांगतो की ज्या विषयात त्यांना खरा रस असतो, गोडी असते त्यात ती तासच्या तास गुंग होतात.

एका मुलाला चरखा चालविता येत नव्हता. एक दिवस हा एकलव्य सकाळपासून जो चरखा घेऊन बसला तो फक्त जेवायला उठला. फारच अवघडल्यासारखे झाले की पाच–दहा मिनिटे फेरी मारून येई व पुन्हा बसे. अखेर त्याने सूत कातायची कला आत्मसात केलीच.

शांती नावाची एक मुलगी एके दिवशी जात्यावर दळायला बसली होती. खुंटा वरचेवर निघत होता. ती तो पुन्हा पुन्हा ठोकून बसवीत होती. मध्येच एक लहानशी चिंधी घेऊन ती पाण्यात भिजविण्यासाठी निघाली. प्रथम ती हे काय करते आहे हे अनुताईंच्या लक्षात येईना पण मग पाहतात तो ती ओली चिंधुटी तिने खुंट्याखाली ठेवली व मग खुंटा घट्ट बसवला.

अडचणीतून मार्ग काढण्याची तिची ही शक्ती पाहून अनुताईंना कौतुक वाटले व इथे काही सगळाच खडक नाही, असा दिलासादेखील मिळाला.

एकदा फावड्या–कुदळींना दांडे लावायचे होते. हे काम मुलांना आवडले व कसलाही पूर्वानुभव व मार्गदर्शन नसूनही मुलांनी डोकी लढवून दिवसभर बसून हे काम पूर्ण केले. मुलांना गलोली करायला सांगितल्या की कितीही परिश्रम आवडीने घेत.

आदिवासी मुलांमध्ये चिकाटी आहे, ती आपली मने केन्द्रित करू शकतात ही गोष्ट अशा उदाहरणांवरून सिद्ध होत होती. ही तद्रूपता मग कोठून येते ? अभ्यासाच्या बाबतीतच मग हे का घडत नाही ?—की या मुलांना ज्ञानाची भूकच नाही ?

'एकुचा धडा दे ग !' म्हणून मुले आपणहून पाटी घेऊन येत, दिव्यापाशी जाऊन

बसून त्या दिवसापुरता एकचा तो आकार व उच्चार सहज आत्मसातही करीत. मात्र "काल शिकवलेले अक्षर आज काढून दाखव" म्हटले की चेहऱ्यावर शून्य उमटायचे! मग पुन्हा पहिल्यापासून सुरुवात. आणि हे एकदा, दोनदा, तीनदा नव्हे तर महिनो न् महिने, दोन-दोन वर्षे चाललेले. वेगवेगळ्या पद्धतींनी शिकवूनसुद्धा अक्षरांची वळणे तेवढी मुलांच्या लक्षात का राहू नयेत? एखादे अक्षर जरी आले तरी जो अननुभूत आनंद होत असे तो पाहून वाटायचे, ज्ञानाची भूकसुद्धा जागृत करावी लागते. पण सहा-सहा महिने गोष्ट सांगूनसुद्धा साधे कृष्णाचे नाव काही त्यांच्या लक्षात राहत नसे.

—कंस मात्र लक्षात! 'ताई, कंसाची गोष्ट सांगा ना' हा हट्ट! हे म्हणजे रामायणाला रावणायन म्हणण्यापैकीच होई.

शिक्षिका मनातून वैतागून जात. कधी कंटाळून म्हणत, "कुठे 'पाटी' ओतून येतात, कुणास ठाऊक!—शिकवलेलं ध्यानात ठेवायची या कोसबाड गावची रीतच नाही!"

या विसरण्याच्या नैपुण्यातून त्यांना बाहेर कसे काढावे हा त्यांच्यापुढचा सततचा सवाल होता. दोनतीन वर्षे नेमाने शिकणाऱ्या मुलांनासुद्धा पन्नासपर्यंत पोचता पोचता धाप लागत असे. मग याही प्रश्नाचे उत्तर ताराबाईंनी शोधून काढले. मुलांच्या बुद्धीला जागे करायचे आपलेच प्रयत्न कुठेतरी कमी पडत असावेत, तोकडे ठरत असावेत. मुलांचे रसप्रदेश आणि शालेय अभ्यासक्रम यांत खूप मोठी भेग आणि भेद राहत असला पाहिजे. तेव्हा ही भेग भरून येईपर्यंत हे सर्व बदलत गेले पाहिजे. शहरातल्या मुलांना दूध आवडत नाही, भूक लागण्यापूर्वीच ते आपण त्यांच्यापुढे ठेवतो. तेव्हा आपण चव, रंग, वास बदलून ते आकर्षक करण्याचा प्रयत्न करतो. जेवणामध्ये अनेक पदार्थ व प्रकार करून ते सजवितो. या मुलांच्या बाबतीत, त्यांना ज्ञानाची भूक नसताना ज्ञानार्जनाची साधने उचलायला लावायची तर ती आकर्षक केली पाहिजेत.

मग सतत प्रयत्न आणि प्रयोग करून ताराबाईंनी मुलांना शाळेच्या कार्यक्रमाचे आकर्षण वाटेल, त्यांच्या जिज्ञासू वृत्तीला योग्य चेतना मिळेल असा अभ्यासक्रम व शिक्षणपद्धती तयार केली.

बौद्धिक कसरतीमध्ये ही मुले उणी ठरली तरी शारीरिक मेहेनतीच्या व कौशल्याच्या कोणत्याही कामात वारल्यांची मुले इतर मुलांपेक्षा वरचढ होती. तेव्हा श्रम व उद्योग यांना शाळेत विशेष स्थान द्यावयाचे ठरले. त्यामुळे त्यांची ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये तरतरीत राहणार होती. शिवाय भविष्यातली त्यांची जीवनपद्धती लक्षात घेता त्यांची शारीरिक क्षमता जोपासणे आवश्यकच होते. मग झाडांवर चढण्याच्या स्पर्धेसारख्या कार्यक्रमांवर जास्त भर देण्यात आला.

त्यांच्या रोजच्या जीवनाशी, त्यांच्या शाळेतले कार्यक्रम सुसंगत असावेत या दृष्टीने खेकडे पकडणे, पळसाची पाने तोडणे, कोवळ्या बांबूचे कोंब तोडून आणणे, सामूहिक तारपानृत्य, कांबडी नृत्य, अगदी जिच्याशी त्यांचे निकटचे नाते त्या मातीत, चिखलात मनसोक्त लोळण्याच्या कार्यक्रमालासुद्धा स्थान देण्यात आले; तोच शाळेतला एक तास ठरला.



या मुलांची भटक्या जीवनाची सवय आणि आवड लक्षात घेऊन सहली व प्रवास यांवर विशेष जोर देण्यात आला. त्यांतून आजूबाजूच्या परिसराशी, बाहेरच्या जगाशी त्यांचा जो परिचय करून दिला जाई तो महत्त्वाचा असे. कधी मुलांना मुंबई पाहायलाही नेत. एखाद्या वेळी समुद्रकाठच्या विशाल रेतीपटाचा उपयोग करून वाळूत डोंगर, नद्या, तलाव, बेटे, खाडी, आखात तयार करून दाखवायची. शक्य तर मग तशी ठिकाणे दाखवायला न्यायची. छापील व्याख्या पाठ करण्यापेक्षा हे कितीतरी अधिक परिणामकारक होणार होते. कधी गावातले वेगवेगळे व्यवसाय दाखवायची व्यवस्था व्हायची तर कधी बैलगाडी, होडी, बस, आगगाडी अशा सर्व वहानांतून मुलांना प्रवास घडवायचा.

दुसरे म्हणजे या मुलांना पुस्तकी ज्ञानापेक्षा यांत्रिक कामाची उपजत आवड होती. तेव्हा अशा कार्यक्रमांवर अभ्यासक्रमात भर द्यायचा. उद्याचे कुशल तंत्रज्ञ, कामगार त्यातून निर्माण होतील अशी ही कल्पना होती.

पुस्तकी शिक्षणाचा इथे फारसा उपयोग नव्हता, म्हणून त्याऐवजी प्रत्यक्ष कृती, अनुभव व मौखिक शिक्षण यांवर भर द्यायचा ठरला. अमूर्त गोष्टींना शक्य तेवढे मूर्त रूप द्यायचे ठरले. साधने, चित्रे, कृती यांचा वापर वाढवायचा ठरला. विज्ञान, भूगोल, आरोग्यशास्त्र, वनस्पतिशास्त्र प्राणिशास्त्र, पदार्थविज्ञान— सर्वच विषयांत दृष्टिनिरीक्षण व प्रत्यक्ष प्रयोग यांच्यावर भर देण्यात आला. गणितातसुद्धा गणन, मापन शिकविताना नुसते दशकांचे हिशेब न सांगता रानातल्या सळ्या वेचून, त्यात छोटी पाने ओवून त्यांचे केलेले दशक एकमेकांना मोजून देणे; खडे, बिया, फळे जमवून लुटुपुटीच्या दुकानदारीतून नकली खरेदी-विक्री करून हळूहळू शंभरापर्यंत आकडे व हिशेब पक्के करणे—यांत यश मिळविले.

पुस्तकी शिक्षणाच्या दृष्टीने त्या मुलांची अनुभवाची पार्श्वभूमीच अयोग्य, अपुरी असे. घरी त्यांनी कधी कुणाला लिहिताना-वाचताना पाहिलेले नसे. त्यांच्या घरातल्या वडील माणसांचे सर्व व्यवहार लेखी अक्षरे व आकडे यांच्या वाटेला न जाता व्यवस्थित चाललेले दिसत. आजूबाजूला जाहिराती, वर्तमानपत्रे, चित्रे सुद्धा त्यांना फारशी दिसत नसत. त्यांच्या पिढ्या न् पिढ्या निरक्षर स्थितीत समाधानाने जगल्या आहेत आणि वाचायचे म्हटले तरी त्यांच्याजवळ पुस्तके उपलब्ध नसतात. असली तर त्यांना रस वाटेल असा मजकूर त्यांत नसतो. वाचनासाठी दिवाबत्तीची सोयदेखील त्यांच्या झोपड्यांतून असत नाही. मग त्यांना वाचनाचे महत्त्व काय वाटणार आणि गोडी कशी वाटणार?

आता विकासवाडीत त्यांच्यासाठी नवीन धडे लिहिले गेले. त्यांची शब्दसंपदा वाढावी

म्हणून त्यांच्या रोजच्या परिचयाच्या वस्तूंबद्दल, व्यवसायांबद्दल सोपी सोपी गाणी तयार केली. लेखन–वाचन यावर अवास्तव भर देऊन या रानातल्या मुलांना जेरीस न आणता त्यांच्यात वाचनाची आवड निर्माण व्हावी म्हणून प्रयत्न केले गेले. अगदी पहिल्या इयत्तेतल्या मुलांनासुद्धा वाचनालयात नाळून पुस्तके चाळणे, चित्रे पाहणे, अक्षरे वाचणे यांची सवय लावण्याचे प्रयत्न करण्यात आले.

या आदिवासी मुलांच्या बाबतीत भाषेचा प्रश्नसुद्धा आव्हान देत उभा होताच. वारल्यांच्या भाषेवर मराठीची दाट छाया असली तरी ती एक निश्चितपणे वेगळी बोली आहे. आदिवासींच्या भाषेवर सीमेवरच्या इतर भाषांचा नेहेमी परिणाम होत असतो. कधीकधी वारल्यांची भाषा गुजराती वळणेही घेते. ही मुले गुरांना म्हणतात ढोबी, पातळाला म्हणायचे लुडकी, म्हातारीला म्हणायचे बाहगीण आणि चिमणीला म्हणायचे खेकडा !

आता शिक्षकाने त्यांची ही भाषा शिकायची की मुलांवर शुद्ध मराठी भाषा लादून त्यांच्या मातृभाषेला शाळेत निषिद्ध समजायचे ? ज्या भाषेतून ही मुले विचार करायला शिकली आहेत ती त्यांच्यापासून एकदम तोडणे योग्य नव्हते, आवश्यकही नव्हते. शिक्षकांनी मुलांची भाषा शिकायला हवी, समजून घ्यायला हवी हेही ताराबाईंना मान्य होते. पण मराठीसारखी संपन्न अर्थाचे विविध बारकावे सांभाळू शकणारी विकसित भाषा हाताच्या अंतरावर असून तिचा लाभ त्यांना घेता येणार नव्हता. शिवाय अशी तर भाषा दर दहाबारा मैलांवर बदलायची !

मग त्यांनी ठरवले, मुलांशी मराठीतच, सरळ, सोप्या शब्दांचा वापर करून बोलायचे. त्या शब्दांचे अर्थ आणि उच्चार मुलांच्या मनात ठसावेत म्हणून शब्दांना शक्यतो कृतीची जोड देत राहायचे. त्यातून काही वेळा दोन भाषांचा गोंधळ होऊ लागला तर त्या वेळी मुलांच्या त्या मातृभाषेचा जरूर वापर करायचा. आपल्या भाषेला इथे बंदी आहे अशी भावना मुलांमध्ये निर्माण होऊ द्यायची नाही. गाणी, गोष्टी, बडबडगीते, अभिनय, शब्दांचे खेळ, चित्रांचे वाचन या मार्गांनी व मॉन्टेसोरी पद्धतीतली भाषाशिक्षणाची खास साधने वापरून भाषेचा हा प्रश्न विकासवाडीने पुष्कळ सुलभ करून घेतला. पाच-सहा वर्षांच्या आदिवासी मुलाला शिक्षकाचे बोलणे सहज समजू लागले. त्याचे उच्चार स्पष्ट होत गेले. वाणी शुद्ध झाली. ऐकून ऐकून नवे शब्द सवयीचे झाले. पुढे पुढे ही मुले आपल्या आईवडलांशीही नकळत मराठीत बोलताना दिसू लागली.

अशा रीतीने माध्यम, अभ्यासक्रम, शिकविण्याची पद्धत, जागा व वेळा या सर्वांतच आमूलाग्र बदल करून अखेर या मंडळींनी मुलांना शिक्षणाभिमुख करून घेण्यात यश मिळविले. ही मागास भागातील मुलेसुद्धा अगदी मुंबईतल्या मुलांसारखी गणित, व्याकरण, भूमिती अशा विषयांतदेखील रमू शकतात हे सप्रयोग सिद्ध केले.



आदिवासी मुले मुळातच मठ्ठ असतात व म्हणून नापास होतात अशी जी प्रचलित समजूत होती ती तपासण्याकरिता व शाळेतला अभ्यासक्रम नक्की करण्यासाठीही मुलांचा बुध्द्यंक काढून घ्यावा असे ताराबाईंनी ठरविले व त्याप्रमाणे १९६४ साली काही सोप्या प्रमाणित कृतिकसोट्या वापरून सुमारे दीडशे मुलांचे बुद्धिमापन विकासवाडीत करण्यात आले.* पुढे शिक्षकांना स्वतःच मुलांची बौद्धिक चाचणी कशी घेता येईल त्याकरता कोणत्या पद्धती वापराव्या व त्यांचा उपयोग मुलांच्या अभ्यासाच्या दृष्टीने कसा करून घेता येईल या बाबतीतसुद्धा काही संशोधन विकासवाडीत केले गेले. एकूण, निकृष्ट परिस्थितीचा परिणाम म्हणूनही असेल; आदिवासी मुले बुद्धीच्या बाबतीत थोडी मागासलेली दिसली. मात्र शेकडा ७ टक्के मुले १२०–१५० या बुध्द्यंक श्रेणीतली निघाली आणि सर्वांत उच्च म्हणजे १४०–१५० च्या बुध्द्यंक श्रेणीतलाही एक मुलगा आढळला.

१९६० साली महाराष्ट्र सरकारने कोसबाड गावची पाहणी करण्यासाठी संस्थेला आठ हजार रुपयांचे अनुदान दिले. तीन प्रकारचे प्रश्नावलींचे तक्ते तयार करून त्याद्वारा सुमारे ३५४ झोपड्यांतून आर्थिक आरोग्य व शिक्षणविषयक माहिती गोळा करण्यात आली व त्यावरून एक अहवाल तयार केला गेला. या सामाजिक पाहणीचा उपयोग मुलांचा अभ्यासक्रम नक्की करण्याच्या दृष्टीने पार्श्वभूमी म्हणून अवश्य झाला.

विकासवाडी योजना हाती घेतल्यानंतर पहिल्या काही दिवसांतच ताराबाईंना एक गोष्ट विशेष प्रकर्षाने जाणवली होती. त्यांच्या लक्षात आले होते की आदिवासी मुलांना शिक्षित करण्याकरता शाळेचे स्वरूप, अभ्यासक्रम, शिकविण्याची पद्धत हे सर्व ज्याप्रमाणे बदलायला हवे त्याचप्रमाणे या भागात काम करण्यासाठी जे शिक्षक हवेत त्यांची मनोवृत्तीदेखील निराळी हवी, त्यांच्या मनाची जडणघडण येथे बदलायला हवी. इथले कार्य त्यांनी जीवनकार्य समजून मनोभावे करायला हवे व त्यासाठी निराळीच निष्ठा, तळमळ, कणखरता त्यांच्यात जोपासायला हवी. मागास वर्गाकडे पाहायचा त्यांचा दृष्टिकोनही बदलायला हवा. आपण कोणीतरी श्रेष्ठ आहोत, खेड्यांचा उद्धार करायला आलो आहोत, असे त्यांना वाटून चालणार नाही. त्याचप्रमाणे शहराकडे त्यांचा ओढा असूनही चालणार नाही. ग्रामजीवनाशी पूर्णपणे समरस होऊन खेड्यातील संस्कृती फुलविण्याच्या कामात त्यांना रस असायला हवा. जेथे बौद्धिक करमणूक नाही, औषधपाणी, जीवनोपयोगी वस्तू इ. ची उपलब्धता कमी, सोयी अपुऱ्या, वरातल्या बायकांना आदिवासींखेरीज कुणाची संगत नाही, मुलांसाठी चांगल्या शिक्षणाची, उच्च शिक्षणाची सोय नाही, अशा ठिकाणी मनापासून राहण्याची त्यांची तयारी पाहिजे. वनातला निवास त्यांना वनवास वाटता कामा नये. त्यांची तोंडे शहराकडे असून चालणार नाहीत. आदिवासी मुले

* ‘मानसशास्त्रीय सर्वेक्षण’ — प्रा. कु. इंदुमती गोखले.

शहरातील मुलांप्रमाणे विषय आवडला नाही, कळला नाही तरी वर्गात बसून राहत नाहीत. शिक्षा केली तर येईनाशी होतात. ऋतुप्रमाणे त्यांच्या समस्या बदलतात. या सर्वांमुळे अधिक कुशल, खंबीर, अनुभवी शिक्षक येथे हवेत व येथल्या रोजच्या नवनव्या अडचणींना तोंड देत मार्ग कसा काढावा, इथल्या मुलांची ज्ञानलालसा कशी चेतवावी याचे बाळकडू त्यांना मिळायला हवे.

हे सर्व जमेस धरून १९५७ च्या जूनमध्ये ताराबाईंनी पूर्वप्राथमिक प्रशिक्षणाचे काम सुरू केले. केन्द्रीय समाजकल्याण बोर्डातर्फे ग्रामसेविका प्रशिक्षण केन्द्र पुन्हा सुरू करण्यात आले व सुमारे ८८ ग्रामसेविका तिथून प्रशिक्षित होऊन गेल्या. यापुढे 'इंडियन कौन्सिल ऑफ चाइल्ड वेलफेअर' तर्फे बालग्रामसेविका विद्यालय १९६४ साली सुरू करण्यात आले आणि त्यातूनही सुमारे ६०० विद्यार्थिनी शिकून गेल्या. या बालसेविकांना वर्गाला येण्यापूर्वीच नोकरी शोधून ठेवावी लागते. त्यांच्या अभ्यासक्रमात बालवाडी-संचालनाबरोबरच बाल-आरोग्य, पोषण, मनोरंजन हेही विषय असतात. वेगवेगळ्या संस्था, ग्रामपंचायती, सरकारी व निमसरकारी संस्था या बालसेविकांना पाठवितात व प्रशिक्षण पूर्ण करून परत गेल्यावर किमान तीन वर्षे त्यांना नोकरीवर ठेवण्याची हमी त्या संस्थांनी द्यावी लागते. अशा प्रकारे चालविलेली इतर सर्व केन्द्रे शहरात आहेत. ग्रामीण भागात चालणारे हे एकमेव केन्द्र.

अकरा महिन्यांच्या या प्रशिक्षणासाठी दरवर्षी पन्नास विद्यार्थिनींना प्रवेश दिला जातो व त्यांना दरमहा रु. ४०/- वेतन मिळते.

याखेरीज आदिवासी भागांतील प्राथमिक शाळांमधून योग्य तऱ्हेने काम करण्यासाठी शिक्षक तयार करावेत या हेतूने विकासवाडी अध्यापनमंदिर सुरू करण्यात आले. सुरवातीस हे प्राथमिक प्रशिक्षण विद्यालय सरकारी धोरणानेच चालवावे व पुढे हळूहळू आवश्यक ते बदल घडवून आणावेत अशी कल्पना होती. पूर्वप्राथमिक प्रशिक्षण देण्याचा अनुभव असला व त्यात ताराबाईंनी नवे पायंडे पाडले असले तरी प्राथमिक शिक्षणाच्या अध्यापनाचा हा पहिलाच प्रयत्न होता. सरकारने नुकत्याच स्वीकारलेल्या मूलोद्योग शिक्षणपद्धतीबद्दल जनतेत असंतोष होता. त्यातून संस्था नव्या जागी रुजत असल्यामुळे विद्यार्थ्यांचे जरा हालच झाले. इमारतींचे बांधकाम अर्धवट झाले होते, पाण्याची व्यवस्था अपुरी होती आणि वर त्या भागातला पाऊस त्यांना झोडपून काढू लागला. प्रशिक्षणासाठी लागणारे योग्य, अनुभवी कार्यकर्तेही हाताशी नव्हते, होते ते काही शिकाऊ तर काही उसने घेतलेले. प्रशिक्षणाला आलेले विद्यार्थीदेखील अनिच्छेनेच आले होते. कारण त्यांच्यापैकी अनेकांच्या आकांक्षा शहरी होत्या व हे शिक्षण घेतल्यामुळे आपल्याला आता जन्मभर आदिवासी विभागातच काम करावे लागणार, अशी त्यांची समजूत झाली होती. अध्यापनमंदिराचे काम चालविण्यासाठी जे 'प्रॅक्टिसिंग स्कूल' लागते तियली



बालवाडीतली उपस्थितीही अपुरी व बेभरवशाची होती. अशा परिस्थितीत अध्यापनमंदिर चालविणे व चालते ठेवणे म्हणजे कार्यकर्त्यांच्या जिद्दीची, हौसेची, प्रयोगशीलतेची व चातुर्याची कसोटीच ठरली. अंधारात बुडलेला, सतत चढ असलेला रस्ता, न पेलणारी ओझी व अपुरी शक्ती यांच्या बळावर जणू दमछाक होऊ न देता शिखर गाठायचे होते. आणि हे सर्व करताना एकीकडे चालू शिक्षणपद्धतीतल्या शंभर-शंभर वर्षांच्या जुन्या, चुकीच्या परंपरा मोडून काढायच्या होत्या. हा बदल जुन्या चाकोरीला रुळलेल्या शिक्षक, पालक व विद्यार्थी या त्रिवर्गाच्या पचनी पाडायचा होता, आणि त्याबरोबरच आदिवासी शाळेचा अभ्यासक्रम ठरवून तो रुजवायचा होता.

पहिली दोन वर्षे वसतिगृह काढून प्राथमिक शाळांतील उपस्थिती वाढविण्याचे प्रयत्न करावे लागले. गावोगाव शिक्षकांना पाठवून मुलींच्या वसतिगृहातील संख्या वाढविण्याचे प्रयत्न सतत चालू होते. प्रशिक्षणाच्या विद्यार्थ्यांची नाराजी व निरुत्साहही हळूहळू दूर करण्यात आला. आणि मग ताराबाई आपल्या मूळ उद्दिष्टाकडे वळल्या. हळूहळू अध्यापनमंदिराच्या अभ्यासक्रमात त्यांनी योग्य त्या सुधारणा घडवून आणल्या. तसेच नेहमीच्या अभ्यासक्रमाच्या जोडीला त्यांनी आदिवासी विभागात काम करण्यासाठी आवश्यक असा विशेष अभ्यासक्रम तयार केला व शासनाकडून त्याला मान्यताही मिळाली. हे विशेष प्रशिक्षित शिक्षक पुढे आदिवासी क्षेत्रात काम करू लागले तर त्यांना काही खास सवलती व थोडाबहुत जादा पगार देण्याचे सरकारने ठरविले. सरकारी अभ्यासक्रम बुनियादी प्रशिक्षण विद्यालयाप्रमाणेच होता. आदिवासी क्षेत्रात काम करण्याच्या दृष्टीने हा जो खास अभ्यासक्रम आखण्यात आला त्याचे नाव ओरिएन्टेशन ट्रेनिंग प्रोग्राम असे आहे. या अभ्यासक्रमात आदिवासींच्या जीवनपद्धतीचा, भाषेचा, आर्थिक, भौगोलिक, ऐतिहासिक परिस्थितीचा अभ्यास इ. गोष्टींचा समावेश आहे. त्याचप्रमाणे लोकसाहित्य, लोकनृत्य, लोकनाट्य व खेळ यांचाही अंतर्भाव आहे. ज्या गावात काम करायचे त्याची पाहणी करणे, तेथील लोकांची मने अनुकूल करून घेणे, त्यांच्या अडचणी समजून घेणे इ. बाबतीतही शिक्षण देण्यात येते. त्याकरिता पाच-पाच विद्यार्थ्यांच्या गटाने एखादा पाडा निवडून तेथे वर्षातून पंधरा दिवस काम करायचे असते. बालवाडी, पाळणाघर, अंगणवाडी, कुरणशाळा इ. चालविण्याची कल्पना व प्रत्यक्ष अनुभव देण्यात येतात. तसेच आजूबाजूच्या परिसरात मिळणाऱ्या वस्तूंमधून शैक्षणिक साधने निर्माण करणे, एक-शिक्षकी शाळा, रात्रशाळा चालविणे इ. चे खास शिक्षण दिले जाते. या अभ्यासक्रमाकरिता N C E R T* कडून रु. १०,०००/- अनुदान लाभले होते. आजवर असे सुमारे ५०० । ६०० विद्यार्थी इथून प्रशिक्षण घेऊन गेले.

---

* National Council of Educational Research and Training

प्रशिक्षणाच्या या मूळ अभ्यासक्रमाबरोबरच आता कोसबाड येथे अंगणवाडी वर्कर्स ट्रेनिंग हा चार महिन्याचा संक्षिप्त अभ्यासक्रमही चालतो. पाचव्या पंचवार्षिक योजनेतील बालकांच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीने आखलेल्या Intergrated Child Development Scheme खाली उपक्रम सुरू आहे.

आज या प्रशिक्षण महाविद्यालयात सुमारे १६० विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. अशी सुमारे पाच प्रशिक्षण महाविद्यालये ठाणे जिल्ह्यात आहेत. पूर्वप्राथमिक प्रशिक्षण मिळण्याची सोय मात्र केवळ कोसबाड येथे आहे.

एकशिक्षकी शाळा चालवून पाहण्याचा आणखी एक प्रयत्न ताराबाईंनी केला. मागास भागात पुष्कळ शाळा निघाल्या होत्या. या सर्व शाळा चार इयत्तांच्या असत व चार इयत्तांना मिळून एकच शिक्षक असे; कारण दर चाळीस मुलांना एक शिक्षक असे प्रमाण जिल्हा परिषदेकडून ठरवून देण्यात आले होते व लहान गावात चाळीस मुले जमणेदेखील कठीण जात असे. त्यामुळे एकाच शिक्षकाला एका वेळी चारही इयत्ता चालवाव्या लागत. साधारणपणे हा शिक्षक मग वरच्या वर्गाकडे जास्त लक्ष देई आणि खालच्या वर्गाला कशात तरी गुंतवून ठेवण्याचा प्रयत्न करी. खालच्या वर्गाकडे त्यामुळे कायम दुर्लक्ष व उपेक्षा होई.

शिक्षकाला हे काम योग्य प्रकारे करता यावे म्हणून ताराबाईंनी याबाबत थोडे संशोधन करायचे ठरवले व विकासवाडीत एक कृत्रिम एकशिक्षकी शाळा सुरू केली.

शासनाच्या एकशिक्षकी शाळेमधल्या शिक्षकाला नेहमी तारेवरची कसरत करावयास लागत असे; परंतु बालमंदिराच्या विशेष साधनांचा व मॉन्टेसोरी पद्धतीचा वापर करून शिक्षकाला चारही वर्गांचा एकाच वेळी व्यवस्थित व भरपूर अभ्यास घेता येईल, हे ताराबाईंनी सिद्ध केले व मग ही पद्धत शिक्षक व विद्यार्थीशिक्षक यांनासुद्धा शिकवण्यात आली. त्यांच्याकडून अनुभव म्हणून एकशिक्षकी शाळा चालवून घेण्यात येऊ लागल्या.

ताराबाईंच्या या प्रयोगाची मौलिकता आणखी एका दृष्टीने आहे. आजकाल शहरातसुद्धा एकेका वर्गात साठसत्तर मुले कोंबतात व शिक्षकाला असे वर्ग घेणे जिकीरीचेच होते. तेव्हा अशा ठिकाणी ही स्वयंशिक्षण पद्धत जर उपयोगात आणली —म्हणजे मॉन्टेसोरी धर्तीची साधने देऊन मुलांना आपले आपण शिकत खेळत ठेवले— तर शिक्षकाचे काम सुलभ होईल व वर्गाचे काम व्यवस्थित चालेल. शिवाय खेड्यातसुद्धा चाळीसहून अधिक मुले एकदम शिकू शकतील.

शिक्षक घडविण्याच्या आपल्या या कामाविषयी पुढे एका सत्कारप्रसंगी भाषणात ताराबाईंनी म्हटले,

"मी या योजनेला हात घातला तेव्हा अनेक अनुभवी मंडळी सद्बुद्धीने इशारा देत होती की ' आपला प्राथमिक शिक्षकांचा वर्ग असा आहे की प्रत्यक्ष ब्रह्मदेव उतरला तरी त्यांच्यात सुधारणा करू शकणार नाही! त्यांच्याकडून काही कामे होतील अशी अपेक्षा करणे फोल आहे. ते सर्व आपल्या वागण्याच्या रीतीभातीत दृढमूलच होऊन तुमच्याकडे शिकायला येतात. शतकानुशतके जमिनीत पडून राहिलेल्या वनस्पती व प्राणी जसे दगड ( fossils ) बनतात तशी या शिक्षकांची मने आहेत. ' हे उत्तर ऐकून मला फार दुःख होई, क्वचित निराशाही उपजे. पण माझा या म्हणण्यावर विश्वास बसत नसे. मला वाटे, जिवंत माणसे कशी फॉसिल किंवा दगड असतील? सध्या ती निष्क्रिय असतील तर त्याला काही कारणे असतील, ती दूर केली पाहिजेत... अशा काही आशा ठेवून आम्ही कामाला लागलो. दहा वर्षांनंतर आशेचे किरण दिसू लागले..."

'माझी बालवाडी'* या त्यांच्या लेखातसुद्धा त्यांनी त्यांच्या कामाच्या संदर्भात महत्त्वपूर्ण उल्लेख केला आहे—

"ग्रामीण भागात कार्य करण्यास पुष्कळ अधिक लोकांनी यावे असे आम्हाला वाटते; परंतु त्यांनी हे फार सुंदर व सोपे काम आहे असा चुकीचा समज करून घेऊ नये, व नंतर निराश होऊ नये. त्याचप्रमाणे हे अगदीच दुरापास्त, म्हणून घाबरून या बाजूला वळणेच सोडू नये. चिकाटीने, धीराने काम करीत राहिले तर ते फारच रसपूर्ण व आनंददायक काम आहे यात शंका नाही."

विकासवाडी येथील या मुख्य विभागांखेरीज काही पूरक म्हणता येतील असे उपविभागही आहेत.

उदाहरणार्थ, प्रशिक्षणाच्या विद्यार्थी विद्यार्थिनींसाठी व प्राथमिक शाळेतल्या मुलामुलींसाठी अशी चार वसतिगृहे विकासवाडीत चालू आहेत. वसतिगृहांच्या संचालनात विद्यार्थी भाग घेतात. हिशेब, स्वयंपाक इ. पाळीपाळीने सांभाळतात. प्रसंगानुसार वेगवेगळे कार्यक्रम पण सादर करतात व आजूबाजूच्या आदिवासी रहिवाशांनाही सामील करून घेतात. मोखाड्यासारख्या दूरच्या तालुक्यांमधूनसुद्धा मुले दाखल होतात. प्रथम शिक्षकांना मुले मिळविण्यासाठी प्रयत्न करावे लागले; परंतु पुढे मात्र वसतिगृहांत पुरेशी व नियमित भरती होऊ लागली.

सध्या ६९ शालेय विद्यार्थी व ४४ विद्यार्थिनी या वसती गृहात राहतात. त्यांच्यापैकी ५०% आदिवासी व बाकीचे मागासवर्गीय आहेत. समाजकल्याणखाते या मुलांसाठी प्रत्येकी रु. ४५ ( विद्यार्थी ) ते रु. ५० ( विद्यार्थिनी ) देत असते. इतर खर्च संस्थेकडून भागविला जातो.

मात्र ही वसतीगृहाची योजना लाभदायक व यशस्वी ठरली तर ताराबाईंना त्याचे काही तोटेही जाणवले. एक तर ज्या घरात बालसंगोपन, गुरे वळणे, कमाई इ. आघाड्या

* शिक्षणपत्रिका, जून १९४८

सांभाळण्यासाठी इतर चार पाच भावंडे असत अशा कुटुंबातले एखादेच मूल वसतिगृहात धाडणे पालकांना शक्य होई. त्यामुळे इतर भावंडांचा शिक्षणप्रश्न तसाच राही. दुसरे म्हणजे वसतिगृहात राहिल्यामुळे या आदिवासी मुलांची राहणी, कल्पना, रीतीभाती बदलतात असाही अनुभव आला. शिक्षणाबरोबर ही मुले पांढरपेशा वर्गाचा पोशाखी-पणा, छानछोकीसुद्धा आत्मसात करू लागली. पुढे ही मुले आपल्या वन्य, आदिवासी जीवनक्रमाशी समरस होऊ शकली नाहीत व कायमची असंतुष्ट राहिली तर ? ताराबाईंना वारल्यांच्या मुलांना सुशिक्षित, सुसंस्कारित करायचे होते पण त्यांना असे मुळापासून उपटायची त्यांची इच्छा व तयारी नव्हती. तिसरे म्हणजे, रोज घरून शाळेत येणाऱ्या मुलांच्या बाबतीत एक असा फायदा दिसून आला की ही मुले शाळेतली शिकवण, मूल्ये, संस्कार, आदर्श, भाषा, इ. रोज कणाकणाने घरी नेतात. आपल्याबरोबर नकळत घरच्यांकडूनही ती स्वच्छतेचे, आरोग्याचे, नीटनेटकेपणाचे धडे गिरवून घेत असतात व त्याचा धीमा पण निश्चित सुपरिणाम होत असतो.

संध्याकाळी अंधार पडल्यावर ही मुले अंगणात जमून आईवडलांना शाळेत शिक-विलेली नाच–गाणी, गोष्टी करून–म्हणून दाखवीत, पालकही कौतुकाने ऐकायला बसत.

पालक कौतुकाने सांगत, “ताई, आमची सोमी आम्हाला हात धुतल्याखेरीज, प्रार्थना म्हटल्याखेरीज जेवू देत नाही, भाकरतुकडा नुसता हातात दिलेला आता तिला चालत नाही, नीट गोल करून सगळ्यांना बसायला लावते !”

कुणी म्हणे; “जेठ्या सबंध केळे सोलू देत नाही; ‘फुल’ करून खा म्हणतो.” ( केळ्यांचे संपूर्ण साल एकदम न काढता थोडे थोडे सोलत खाणे. )

हे सर्व ध्यानात घरून ताराबाईंनी विकासवाडीचे धोरण ठरविले. मुले शक्यतो आपल्या कुटुंबातच राहिली पाहिजेत, त्यांच्या झोपडीतच त्यांची पाळेमुळे राहिली पाहिजेत, असा निर्णय त्यांनी घेतला.

संस्थेची स्वतःची प्रकाशनशाखा १९५२ साली सुरू झाली. ग्राम बालशिक्षा केंद्राची स्थापना झाल्यापासून जे विविध शैक्षणिक प्रयोग या मंडळींनी केले व ते करताना ग्रामीण व आदिवासी जनतेच्या जीवनपद्धतीविषयी, परिस्थिती व अडचणींविषयी जे अनुभव त्यांना वेळोवेळी आले त्यांचे कोठेतरी ग्रथन केलेले असावे या दृष्टीने हा प्रकाशनविभाग काढण्यात आला होता. ‘बालविकास व शिस्त’ व ‘बिचारी बालके’ या ताराबाई मोडकांच्याच दोन पुस्तकांचे पुनर्मुद्रण करून प्रकाशनाला आरंभ झाला. विकासाच्या मार्गावर, बालवाडी कैसे चलावें, आमचे घर, बालकांचा हट्ट, बिचारा बाळको, कुरणशाळा इ. बऱ्याच मराठी, गुजराती व व हिन्दी पुस्तकांचे प्रकाशन या विभागातर्फे झाले व होत आहे.

आता ग्रामीण व आदिवासी विभागास योग्य अशी पाठ्यपुस्तके व पुरवणी पुस्तके काढण्याचे काम प्रकाशनविभाग करीत आहे तसेच शिक्षणपत्रिका हे संस्थेचे मुखपत्र दरमहा येथूनच प्रकाशित होत असते.



प्रशिक्षण विद्यालयासाठी शेती हा मूलोद्योग घेण्याचे ठरल्यामुळे सुरवातीलाच सुमारे १३ एकर जमीन लागवडीसाठी खरेदी करण्यात आली होती. मोठी विहीर खणण्यात आली, एंजिन बसवले व मग ‘सूतकताई-विणकाम’ हाच मूलोद्योग घ्यावा लागला. तरीही विकासवाडीने पूरक काम म्हणून शेती व बागायतीचे काम सुरू केले. बाहेरच्या शेतमजुरांबरोबरच संस्थेतले कार्यकर्ते, छोटे–मोठे विद्यार्थी, ग्रामसेविका, बालसेविका असे सारेजण लावणी, कापणी व इतर कामांत हौसेने भाग घेऊ लागले. शेजारच्या कृषि-विद्यालयातील तज्ज्ञ मित्रांच्या मदतीने २०० ते २५० आंब्याची, चिकूची कलमे लावण्यात आली, भाजीपाला फुलू लागला. पुढे १९६४ पासून मुख्य मूलोद्योग शेती झाला व सर्व कामे विद्यार्थीच करू लागले.

शेती मुख्यतः भातशेतीची आहे व हे भात वसतिगृहांसाठीच, तेथल्या तेथे वापरले जाते. पाणीपुरवठ्यासाठी ऑस्ट्रेलियाकडून मदत मिळाली असून दोन विहिरी खोदल्या आहेत, त्यामुळे फळझाडांचा उत्तम बगीचा तयार झाला आहे. आंब्या–चिक्कूंची फळे, तशीच कलमेही विकली जातात. दरसाल साधारण रु. २००० ते २५०० फायदा होतो. परंतु शेती मुख्यतः निसर्गाच्या लहरीवर चालत असल्यामुळे व फायदा झाला तरी तो परत त्यातच घालावा लागत असल्यामुळे सर्वसाधारणपणे हा व्यवहार ‘ना नफा ना तोटा’ पद्धतीनेच चालू आहे, असे म्हणता येईल. संस्थेला पुरेसे दूधदुभते मिळण्याइतके डेअरीचे कामही चालू आहे.

छापखाना, (विकास मुद्रणालय) हा १९७३ साली स्थापन झालेला विभाग. आदिवासी मुलांचा अभ्यासक्रम त्यांच्या भोवतालातूनच फुलला पाहिजे, असे ताराबाईंचे मत होते. त्या दृष्टीने व आदिवासी मुलांची साक्षरता टिकवायची असेल व त्यांना वाचते ठेवायचे असेल तर त्यांच्यासाठी खास साहित्यही लिहिले, छापले गेले पाहिजे, या हेतूने १९७३ साली हा छापखाना निघाला. या छापखान्यात काम करणारे सर्व विद्यार्थी आदिवासीच आहेत व बालवाडी व प्राथमिक शाळेसाठी लागणारी सुमारे १२ ते १५ पुस्तके त्यांनी ‘शिक्षक मित्र माला प्रकाशन’ म्हणून प्रसिद्ध केली आहेत. ताराबाई मोडक व अनुताई वाघ यांची काही प्रकाशने पुनर्मुद्रितही केली आहेत. शिवाय दरमहा ‘शिक्षणपत्रिके’ची छपाई येथे होतेच.

याखेरीज संस्थेशी संलग्न असलेल्या पाच खेड्यांतील बालवाड्या, सकस आहार योजना, सहा वर्षांखालील मुलांसाठी व गरोदर स्त्रियांसाठी पूरक अन्न पुरवणाऱ्या दोन पूरक अन्न योजना ही व इतर ग्रामसुधारणेची कामेही चालतात. ग्राम विकास खाते,

समाज कल्याण संस्था, युनिसेफ् यांच्या प्रोत्साहनाने व सहकार्याने ही पूरक कामे चालतात. आजूबाजूच्या दहा गावांतील अन्नपुरवठ्यासाठी युनिसेफतर्फे फ्रिज व मोटर ही पुरविण्यात आली आहे.

या योजनांतर्फे मधून मधून ७ दिवसांचे शिबिर भरवून काही व्याख्याने व वीस प्रात्यक्षिकांद्वारा आदिवासी महिलामंडळांतर्फे आलेल्या सभासद भगिनींना समतोल आहार, स्वयंपाक, अन्नघटक, मुलांचे पालनपोषण, गरोदर महिलांची निगा इत्यादींचे शिक्षण दिले जाते. याखेरीज इतर दहा खेड्यांतूनही चित्रे, तक्ते, इत्यादींचा वापर करून हे काम चालते. महालक्ष्मीच्या जत्रेत दरवर्षी दहा दिवस प्रदर्शनही भरवले जाते. शिवाय हजारोंनी येणाऱ्या आदिवासींच्या बालकांना सांभाळण्यासाठी तेथे संस्थेतर्फे पाळणाघर चालविले जाते.

संक्षेपाने सांगायचे तर आदिवासी भागातल्या मुलांचे शिक्षण खऱ्या अर्थाने जीवन-शिक्षण कसे होईल, त्यांना शिक्षणाभिमुख, विज्ञानाभिमुख कसे करता येईल, त्यांच्यासाठी योग्य असे बालसाहित्य त्यांना कसे पुरवता येईल, त्यांचा अभ्यासक्रम कसा असावा, एकशिक्षकी शाळेतून त्यांना व्यवस्थित शिक्षण कसे देता येईल, या दृष्टीने अनेक प्रयोग, प्रयत्न करण्यात ताराबाईंची विकासवाडी गेली पंचवीस वर्षे गुंतलेली आहे.

बालशिक्षणाचा जो विराट प्रयोग आपल्या आयुष्यातील पन्नासांहून अधिक वर्षे ताराबाईंनी केला, त्या प्रयोगाची सांगता म्हणजे त्यांची ही जंगलातल्या टेकडीवरची विराणी, वर्धिष्णु संस्था—विकासवाडी.

आजमितीस या संस्थेत खालील विभाग कार्य करीत आहेत—

( १ ) बालवाडी ( ९५ % मुले आदिवासी )
( २ ) पाळणाघर ( १०० % आदिवासी बाळे )
( ३ ) प्राथमिक शाळा ( इयत्ता १ ली ते ७ वी पर्यंत. सुमारे २२० विद्यार्थी शिक्षण घेत आहेत व त्यांतले ९५ % आदिवासी आहेत. )
( ४ ) प्राथमिक प्रशिक्षण विद्यालय व त्याचे वसतिगृह. (सुमारे १०० विद्यार्थी पूर्वप्राथमिक व प्राथमिक प्रशिक्षण–Pre D.Ed व D.Ed – घेत असतात.)
( ५ ) महाराष्ट्र राज्याच्या समाज कल्याण खात्याच्या मदतीने, आदिवासी मुलांसाठी व मुलींसाठी चालवलेली दोन वसतिगृहे.
( ६ ) पाच खेड्यांतील बालवाड्या.
( ७ ) शेती व फळबाग.
( ८ ) उद्योगालय
( ९ ) ग्राम बालसेविका प्रशिक्षण वर्ग–पन्नास मुलींसाठी राहण्यास योग्य अशा वसतिगृहासह.



( १० ) सकस आहार योजना.
( ११ ) दोन पूरक अन्न योजना.
( १२ ) प्रकाशनसंस्था.
( १३ ) छापखाना. ( विकास मुद्रणालय, १९७३ पासून ).
( १४ ) कुरणशाळा.
( १५ ) रात्रशाळा.
( १६ ) खेडपाडा व चिंचावे येथील बालवाड्यांची केन्द्रे.

याखेरीज शबरी उद्योगालय या १९७७ साली सुरू केलेल्या विभागातून बालशिक्षणास उपयुक्त व आवश्यक अशा शैक्षणिक साधनसामग्रीची निर्मिती व विक्री होत असते.

१९७३ नंतर असे सुमारे सात नवीन विभाग अगर शाखा संस्थेत सुरू झाल्या आहेत. पैकी १९७९ साली सुरू झालेले तीस प्रौढ शिक्षण वर्ग हा सर्वात अभिनव विभाग म्हणता येईल.

विकासवाडी व संलग्न केन्द्रे मिळून सुमारे ८०० आदिवासी विद्यार्थी वेगवेगळ्या शाखांतून आज शिक्षण घेत असतात.

याखेरीज कार्यकर्ते व नोकरवर्ग ( सर्व प्रकारचा ) मिळून ९३ माणसे तेथे काम करीत असतात.

ज्यांना भगीरथ प्रयत्नांची उपमाच शोभून दिसेल असे अविश्रांत परिश्रम घेऊन ताराबाईंनी आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी विकासवाडीच्या आपल्या कल्पनेला हे मूर्तस्वरूप दिले आणि अर्भकावस्थेपासून संस्कार करून एका पिढीतच आदिवासी समाज चालू समाजाबरोबर आणता येईल, हा आपला विश्वास, संस्थांची एक परिणामकारक व उपयुक्त साखळी काढून सिद्ध केला.

" जर एखाद्या देशाच्या, समाजाच्या विशेष चालीरीती, पद्धती बदलायच्या असतील, लोकांच्या गुणधर्मांना चेतवायचे असेल तर बालकालाच आपले केन्द्र समजले पाहिजे. " मॅडम मॉन्टेसोरींनी लिहून ठेवले होते.

" शिक्षणाचे नवे युग बालकावर विश्वास ठेवील." गिजुभाई बधेकांनी भाकीत केले होते.

ताराबाईही म्हणाल्या होत्या, " आमची विकासवाडी योजना आपल्या देशातील मागास जमातीची नवरचना करण्याचे एक प्रभावी साधन ठरेल. "

हा साहसपूर्ण प्रयोग करण्यासाठी ताराबाई मोडक स्वतः रानात जाऊन राहिल्या, टेकडी चढल्या, झोपडीत शिरल्या आणि आपल्या अभागी प्रभाने रिकाम्या केलेल्या मांडीवर त्यांनी वारल्यांची, आदिवासींची– देशाचीच शेकडो मुले जणू दत्तक घेतली. रानाच्या काठावर उगवलेल्या, कुत्र्यांच्या छत्र्यांसारखे जिणे जगणाऱ्या त्या रानमाणसांची मुले त्यांनी उचलली, पुसली–पुसली. त्यांचे भांग पाडले, त्यांना जागे केले, त्यांची

कल्पनाशक्ती चेतवली. त्यांच्यात स्वच्छता, सुव्यवस्था सहकार यांची आवड निर्माण केली. उपयुक्त संस्कार करून त्यांना शिक्षणाभिमुख केले. त्यासाठी तेथली परिस्थिती, भूगोल, लोकजीवन, आचारविचार, उद्योग हे सर्व लक्षात घेऊन त्यांनी शिक्षणालाच नवे वळण दिले.

ताराबाईंचा शिक्षक तेथे गुराखी बनला, परिचारक झाला. डॉक्टर बनला, वैदू झाला. आया बनला, शेतकरी झाला, व्यापारी झाला. माळी, धोबी, सुतार, शिंपी, आचारी, वाढपी, गवंडी, न्हावीसुद्धा झाला ! या सर्वांनी मिळून विकासवाडी हे सोपे नाव असलेले कठीण कार्य यशस्वी करून दाखवले.

ताराबाईंच्या या बहुमोल अशा शिक्षणकार्याबद्दल भारत सरकारकडून १९६२ साली 'पद्मभूषण' हा किताब व सुवर्णपदक देऊन ताराबाईंचा गौरव करण्यात आला.

मात्र शासनाचा हा सत्कार स्वीकारण्यास ताराबाई दिल्लीला गेल्या नाहीत. त्यांच्याच शब्दांत सांगायचे तर,

"...एक तर माझ्या नावाचा थांगपत्ता लागून, माझा पत्ता मिळून आमंत्रणाचे पत्र माझ्या हाती पडायला खूपच उशीर झाला होता. आणि त्यानंतर कार्यक्रमाला हजर राहायचे म्हणजे दिल्लीला विमानानेच जावे लागते असते. स्वतःचा मानसन्मान करून घ्यायला एवढा वेळ व पैसा खर्च करणं मला परवडण्यासारखं नव्हतं... "

ताराबाईंचे मानचिन्ह व सनद यथावकाश टपालाने त्यांच्याकडे पाठविण्यात आली.

# २०. निरोप

शिक्षणतज्ज्ञ ताराबाई मोडकांना 'पद्मभूषण' हा सन्मान मिळाल्यानंतरची ही हकीकत आहे—

एके दिवशी सायंकाळी ताराबाई त्यांच्या संस्थेतील एक प्रमुख कार्यकर्ते श्री. अप्पा कोसके यांच्याशी गप्पा मारीत टेकडीवरच्या पाण्याच्या टाकीवर विसावल्या होत्या. अप्पांना त्या म्हणाल्या, " आप्पा, वयाची साठी उलटून गेल्यावर माझ्या डोक्यात ही विकासवाडी योजना शिरली. अनेकांनी मला वेड्यात काढलं, नाउमेद केलं, आणि ही योजना स्वीकारण्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. त्याच वेळी ज्यांच्या कणखर सहकार्याच्या आधारावर ही मोठी योजना राबवता येईल असं वाटत होतं ते दोन-तीन कर्तबगार कार्यकर्ते काही मतभेदांमुळे मला सोडून गेले. पण माझी जिद्द हटली नाही, आत्मविश्वास भंगला नाही. एखादं पिसं अंगात शिरल्याप्रमाणे मी पुढं चालले, माघार घेतली नाही. आणि खरोखरच चमत्कार घडावा तशी एकेक इमारत ह्या टेकडीवर उभी राहिली. सर्व विकासवाडी योजना कार्यान्वित झाली. येवढं मोठं कॉन्ट्रॅक्टरचं कर्ज शिरावर होतं ते फिटलं. हे सर्व पाहून आता माझं मलाच, आप्पा, आश्चर्य वाटतं आहे की हे कठिण आणि अशक्य काम शक्य झालं कसं ? "

खरोखरच ताराबाईंना स्वतःलासुद्धा अचंबा वाटावा अशी किमया रानातल्या त्या टेकडीवर घडली होती ! आज 'विकासवाडी, कोसबाड' हा एक फळताफुलता, वर्धिष्णू असा शिक्षणप्रकल्प आहे परंतु आजच्या विकासवाडीमागे शिक्षणतज्ज्ञ ताराबाईंचे कर्तृत्व तसेच त्यांच्या अनेक सहकाऱ्यांच्या सतत कष्टांचा, चिकाटीचा, प्रयत्नांचा रोमहर्षक इतिहास आहे. मात्र तसे ताराबाईंचे एकूण आयुष्य व समग्र कार्य हेच एक आश्चर्य होते असे म्हटल्यास अतिशयोक्ती ठरू नये.

त्यांच्या प्रदीर्घ व वेगवेगळ्या स्तरांवरील कार्यात त्यांचे मन निराशेने भरून टाकतील अशा कैक अडचणी उद्भवल्या. शिशुविहार काढताना स्थानिक लोकांचा तीव्र प्रतिकार त्यांना सोसावा लागला. एकीकडे प्रभा आणि केव्हाही ही समस्या बनत चाललेली माणसे सांभाळायची होतीच. पुढे बोर्डीच्या व कोसबाडच्या कामांत तर अडचणींच्या मालिकाच पुढे उभ्या राहिल्या. कुठे स्पृश्यास्पृश्यतेचा प्रश्न तर कुठे शासनाचा असहकार. आर्थिक कुचंबणा व कार्यकर्त्यांचे दुर्भिक्ष्य ही तर ताराबाईंच्या संस्थांच्या पाचवीलाच पुजलेली असत. हरघडी नवीन समस्या संस्थेच्या गळ्याला नख लावू पाही. ताराबाईंचे आयुष्य

जसे दुःखांच्या टप्प्याटप्प्यांनी भरलेले होते तसे त्यांचे कार्यसुद्धा नित्य नव्या अडचणी उत्पन्न करणारे होते. ताराबाईंची झुंजार वृत्ती, धैर्य, खंबीरपणा, योजकता हे सारे सतत दोन्ही आघाड्यांवर पणाला लागले आणि सतत सिद्धही झाले.

कार्याच्या संदर्भात त्यांना कायम विवंचना असे, ती पैशाची. शिशुविहार, बोर्डी, कोसबाड असे त्यांच्या कार्याचे ठळक भाग पाडले तर असे दिसून येते की या एकेका प्रयोगाची घडी बसविण्यासाठी त्यांनी सर्वसाधारणपणे सोळा सोळा वर्षे खर्च केली आणि एक योजना आकार घेते आहे तेवढ्यात त्या दुसरा कार्यप्रकल्प हाती घेत असत. बोर्डीला जाऊन प्रत्यक्ष ग्राम-बाल-शिक्षणकार्याला हात घालण्यापूर्वी त्या मुंबईहून तीन वर्षे तो व्याप रचीत, सांभाळीत होत्या व बोर्डी सोडण्यापूर्वी कोसबाडची योजना कागदावरून जमिनीवर उतरली होती. एवढे मोठे प्रकल्प आखण्याची, हजारो-लाखो रुपयांच्या उलाढाली अंगीकारण्याची धमक या जेमतेम तीन आकडी पगार घेणाऱ्या बाईमाणसात आली कोठून ?

ताराबाईंचे सारे संकल्प रिकाम्या तिजोरीच्या आधारानेच सोडले जात. त्यांच्या कामाचे स्वरूप ठराविक साच्याचे, सर्वसाधारण अनुदानात बसणारे नसे. त्यामुळे अनुदान मिळत नसे. जनता उदासीन असे, ती अभिमुख करून घ्यावी लागे. साहजिकच ताराबाई व त्यांचे सहकारी सतत पैशासाठी वणवण करताना दिसत. पैसा जमविण्यासाठी ताराबाईंनी शेकडो वेळा रात्री-अपरात्री प्रवास केला, शेकडो वेळा त्या कोसबाडची टेकडी चढल्या व उतरल्या. बराचसा वेळ व श्रम पैसे गोळा करण्याच्या खटपटीतच जाई आणि इतके करूनही अहोरात्र त्यांना पैशाची काळजी बाळीत असेच.

मात्र पैसा नाही म्हणून त्या थांबत नसत. कार्यकर्ते असोत नसोत, अनुदान मिळो न मिळो, सरकारी कृपा होवो न होवो, त्या विश्वासाने, हिमतीने पुढे पाऊल टाकीत आणि त्यामुळेच अशक्य गोष्टीसुद्धा शक्य होत. 'कामापाठीमागे पैसा येतोच' अशी दृढ श्रद्धा त्यांच्या मनात होती. "होईल, सारे होईल, मला वाट पाहायची सवय आहे." त्या म्हणत.

याच जोरावर त्यांनी बालशिक्षणातले अनेक क्रांतिकारक व संदिग्ध विचार प्रत्यक्ष प्रयोगाने सिद्ध केले, संस्थारूपाने यशस्वी केले. कोसबाडसारख्या ओसाड टेकडीवर जेथे फक्त शेळ्या-मेंढ्या चरत असत व दगडगोटेच पडलेले दिसत तेथे त्यांनी दहाबारा इमारतींची संस्था रचली. तीनशे-चारशे माणसांची वस्ती फुलविली, शेती साधली, गोठे बांधले, बागा रुजवल्या आणि पाणी, वीज, मोटर, फ्रिज, फोनपर्यंत सारे मिळवले. पैशाशिवाय हे स्वप्न साकार होणे शक्यच नव्हते. स्वतः अक्षरशः उन्हाळ-पावसात दारे ठोठावीत हिंडून त्यांनी हा पैसा उभारला, कर्जे घेतली व फेडली.

पैशाच्या बाबतीत त्यांची भूमिका निःसंदिग्ध होती. स्वतःसाठी, स्वतःच्या खाजगी खर्चासाठी त्यांनी कधी दुसऱ्याचा पैसा घेतला नाही, वापरला नाही; उलट अशा



बाबतीत— स्मरणपूर्वक परतफेड करण्याच्या बाबतीत त्या जागरूक असत. मात्र त्याबरोबरच कार्याच्या दृष्टीने ताराबाईंचा दुसऱ्याच्या पैशावर —चांगल्या अर्थाने— डोळा खरा ! त्यांचा परिवार मोठा होता व गरजही मोठी होती. देणग्या मागणे, जागा मागणे, मुक्काम ठोकणे, शिक्षणपत्रिकेची वर्गणी वसूल करणे, आणि या ना त्या निमित्ताने कार्यासाठी लागणारे द्रव्याचे खतपाणी भोवतालच्या परिसरातून मिळविणे, हे सतत चाले. पैशाशिवाय कामे उभी रहाणार कशी ? एक विचारसरणी आपल्याला पुढे न्यायची आहे, संस्था चालवायची आहे, कार्य धकवायचे आहे ही जाणीव सतत जागृत असे व त्यासाठी ताराबाई भिकारडेपणाचा आरोप पत्करूनसुद्धा आपला हात कायम पसरलेलाच ठेवीत. त्यांची ही दृष्टी अनेकांना खटकेसुद्धा.

आज, संस्था स्थापन होऊन इतकी वर्षे लोटली तरी विकासवाडीच्या गळ्यातली भिक्षेची धोकटी सुटलेली नाही. संस्थेला प्रांतीय सरकारची व केन्द्रीय सरकारची मान्यता असल्यामुळे काही अनुदाने मिळतात. परंतु संस्थेने तेवढीच रक्कम इतर मार्गांनी उभी करून आपला वाटा उचलल्याखेरीज,—म्हणजेच matching contribution केल्याखेरीज ती पदरात पडत नाहीत. शिवाय, अन्न, औषधे, कपडा, साबण, तेल इ. चा पुरवठा — असे अनेक उपक्रम शासनाच्या नियमांत बसत नाहीत. फी मिळायची तर आशाच नाही आणि उत्पन्नाचा मार्गही नाही. अशा स्थितीत दानशूर लोकांकडून व संस्थांकडून निधी गोळा करून दरवर्षी होणारी रु. २५,००० ची तूट भरून काढावी लागते. मुंबईसारख्या शहरात चित्रपट दाखवायचे, रंजन-कार्यक्रम करायचे, स्मरणिका छापायच्या; कधी हळदतिखट कुटून घेऊन विकायला बघायचे, कधी संस्थेच्या उद्योगालयात बनणाऱ्या छत्र्यांना गिऱ्हाइके मिळवायची. निम्मी शक्ती व वेळ असा पैसा उभा करण्यातच जातो आणि मिळालेला पैसा व त्यासाठी केलेले कष्ट यांचे प्रमाण नेहेमीच व्यस्त असते. अशा परिस्थितीत संस्थेला स्वतःची प्रयोगशाळा, सुसज्ज वाचनालय, खेळाचे मैदान इ. स्वप्नेसुद्धा दिसायलाच नकोत.

एके ठिकाणी ताराबाईंनी लिहिले आहे. "आम्ही बोलून चालून आदिवासी विभागात काम करीत आहोत. तेव्हा आमची स्थिती कायम हलाखीची असणे साहजिकच आहे आणि योग्यही आहे. अनुताईंना मी नेहमी म्हणते की आपली पैशाची ददात मिटली तर आपण सारे आळशी होऊ. तेव्हा आहे ही स्थिती वाईट नाही. गरिबी माणसाला पुष्कळ काही शिकवत असते..."

परंतु दुसऱ्या एका पत्रकात त्यांनी कळवळून लिहिले आहे—

" We feel the work we are doing here of spreading education amongst tribal children and adults and also of general welfare has a national significance ... The unfortunate thing is that our

hands are tied, our enthusiasm is damped, our visions cannot materealize and our energies are blocked for no other reason than that we are lamentably short of funds..."

आणि याच ताराबाईंच्या अनुताई एखाद्या सभेत पैशाची अशी जाहीर मागणी करता करता चक्क हुंदका आवरतात. उद्योगालयासाठी, छापखान्यासाठी, शिवणासाठी ऑर्डर्स मिळविण्याचे प्रयत्न करताना दिशादिशांना पत्रे धाडून शेवटी गहिवरून लिहितात " ...पण आपल्या अडचणी आम्ही तरी आपल्या माणसापुढेच मांडणार ना ? "

पैशाप्रमाणेच ताराबाईंना दुसरी चणचण सदैव जाणवत राही ती म्हणजे कार्यकर्त्यांची. कार्यकर्त्यांची भरती व ओहोटी सतत चालू असे. ताराबाईंना माणसांची पारख चांगली होती व ज्याच्याकडून जे काम घेता येईल ते करून घ्यायची कुशलतादेखील त्यांच्या ठिकाणी होती; तरीसुद्धा कार्यकर्ते सोडून जाणे सतत चालू असे हे, त्यांची वेळोवेळी प्रसिद्ध होणारी माहितीपत्रके व अहवाल पाहिले की, ध्यानात येते. कुणी लग्न झाल्या-मुळे गाव सोडून जात, कुणी अधिक पगाराच्या आशेने, कुणी शहरी जीवनाचे आकर्षण वाटून सोडून जात आणि कधी ताराबाईंच्या हातून माणसे सोडली–तोडलीही जात. उभयपक्षी मग अपेक्षाभंग व निराशा अनुभवाला येई. शिशुविहारच्या बाबतीत काम शहरातले असल्यामुळे फारसा तुटवडा जाणवला नाही. उलट कार्यकर्त्यांची एक पिढी तयार ठेवून ताराबाईंनी मुंबई सोडली. परंतु बोर्डीसारख्या ग्रामीण भागात व नंतर कोसबाडसारख्या आदिवासी विभागात काम करताना कार्यकर्त्यांची बेरीज–वजावाकी अखंड चालू असे.

कधी ताराबाईंची निवड चुकेदेखील. प्रथम विश्वासू, कर्तबगार वाटलेला कार्यकर्ता प्रत्यक्षात तसा निघत नसे. कधी एखाद्याला वठणीवर आणावे लागे तर कधी कुणाचे उपद्व्यापच निस्तरावे लागत. काही जण फसवाफसवी करीत तर काहींशी मतभेद होई. आणि मग त्या त्या कार्यकर्त्यावर घेतलेली मेहनत वाया जाई. सुधाताई खेर, मालिनी देसाई, भाऊ केळकर असे काही समर्थ सहकारी सोडून गेले त्यावेळी ताराबाई खूप हळहळल्या, कारण कसलेले कार्यकर्ते सोडून गेले की निर्माण होणारी पोकळी भरून काढणे कठिण जाई.

पण मग पुन्हा जवळपास उपलब्ध असेल ती व्यक्ती हाताशी धरायची आणि घड-वायला घ्यायची. पहिलीवर घेतलेले कष्ट स्वयंशिक्षणखात्यावर किंवा अक्कलखात्यावर जमा करून टाकायचे. काही काळाने नवा कार्यकर्तासुद्धा सोडून जाणार असेच; किंवा नालायक ठरला म्हणून काढूनही टाकावा लागे. पण तोवर त्याने एखादी तरी वीट चढवलेली असे. विकासवाडीच्या कामाला आजचे रूप देताना अशा कितीतरी तात्पुरत्या कार्य-कर्त्यांचे श्रम कारणी लागले आहेत. ताराबाई स्वतःच कधी कधी विनोदाने म्हणत, " संस्थेत प्रथमपासून आतापर्यंत टिकले असे फक्त दोघे कार्यकर्ते. एक आमच्या अनुताई व दुसरा वामन शिपाई ! "



ताराबाईंना पुष्कळदा आपला राग काबूत ठेवता येत नसे. कामात किरकोळ चुका झालेल्यासुद्धा त्यांना खपत नसत व अशा वेळी मग त्यांना काळवेळाचे भान राहत नसे. कुठेही, कोणाहीसमोर त्या कठोर वाक्ताडन करीत व साहजिकच काहींना ते लागे. सरलाताई देवधर यांनी ताईंच्या रागावर एक उपाय शोधून काढला होता. त्या म्हणत, " मी आपली ताईंचा राग साठवायला एक पिशवी शिवून ठेवली आहे. त्या बोलायला लागल्या की पिशवीचं तोंड उघडायचं आणि आपलं तोंड बंद ठेवायचं ! " कारण अशा वेळी त्या काही ऐकून घ्यायच्या मनःस्थितीतच नसत.

कधी कधी अतिशय सामान्य, सुमार समजशक्तीच्या माणसांनासुद्धा ताराबाईंना चुचकारून ठेवावे लागे. एखादा ताज्या दमाचा, नवा कार्यकर्ता मग ताराबाईंना रागावून म्हणे, " ही कसली माणसं गोळा करून ठेवला तुम्ही ? इतकी वर्षं इथे राहून जी इतकी कोरडी ठणठणीत राहतात, त्यांना तुम्ही हाकलूनच दिलं पाहिजे ! "

ताराबाई त्याला समजावीत, " बाबा रे, ही माणसं तशी आहेतच. पण त्यांच्यावाचून माझं चालायचं नाही ! अशाच माणसांकडून मला नेहमी काम करून घ्यावं लागतं. आणि लागणार आहे. मला याहून लायक सहकारी नको आहेत का ? पण ते आणू कसे आणि कुठून ? "

इतर मुखवस्तू संस्थांच्या प्रमुखांप्रमाणे कार्यकर्त्यांच्या बाबतीत कडक धोरण ठेवणे त्यांना परवडणारे नव्हते. अशा तुलनेने नवीन, अनाकर्षक, लोकांच्या नजरेत न भरणाऱ्या व मंद गतीने आकार घेणाऱ्या कार्याकडे वळणारे आंबटशौकीन मुळातच कमी असतात. त्यात कर्तृत्व, सचोटी, समरसता अशा सर्वच अपेक्षा व अटी ताराबाई कशाच्या बळावर घालणार ? अखेर कार्यकर्त्यांना केव्हाही सोडून जाता येई. ताराबाईंना ती सवलत नव्हती.

ताराबाईंना खऱ्या अर्थाने अनुयायी भेटला तो अनुताईंच्या रूपाने. १९४५ पासून अनुताईंनी अतिशय निष्ठेने व जबाबदारीपूर्वक ताराबाईंची साथ सांभाळली. बालवाडी संचालकाच्या मदतनिसापासून ते केंद्रसंचालिकेपर्यंतच्या विविध जागा अनुताईंनी तारा-बाईंच्या आज्ञेनुसार सांभाळल्या. पाण्यात ढकलून द्यावे तशा ताराबाई अनुताईंना नव्या कामगिरीवर सोडून देत आणि चुकतमाकत, बोलणी खात अखेर अनुताई त्यात तरबेज होऊन जात.

पुढे शासनाने १९७२ साली महाराष्ट्र राज्य आदर्श शिक्षक पुरस्कार देऊन अनु-ताईंना अलंकृत केले. १९७५ साली ' दलितमित्र ' म्हणून गौरविले. १९७५ सालीच आंतरराष्ट्रीय महिला गौरव त्यांना सन्मानित करून गेला. १९७८ साली फाय फाउंडेशन ( इचलकरंजी ) पुरस्कार, ( रु. १०,००० ) १९७७ साली महाराष्ट्र राज्य विज्ञान

परिषद पुरस्कार, व १९७९ साली आंतरराष्ट्रीय बालकवर्ष राष्ट्रीय पुरस्कार (रु. २०,०००) असे विविध गौरव करून समाजाने त्यांच्याविषयी सद्‌भाव, आदरभाव व्यक्त केला. परंतु ताराबाईंनी मात्र अनुताईंना त्याही पूर्वी आपला 'मुलगा' म्हणून गौरविले होते.

(१९४८ साली त्या ग्रामबालशिक्षा केंद्राच्या चिटणीस व व्यवस्थापिका झाल्या. १९६१ साली संस्थेच्या उपसंचालिका व १९७३ पासून संचालिका झाल्या. १९७१ पासून शिक्षणपत्रिकेच्या त्या संपादिका आहेत तसेच १९७३ पासून नूतन बालशिक्षण संघाच्या जनरल सेक्रेटरी आहेत.)

"तुमच्यानंतर तुमची संस्था पोरकी होईल." अशी भीती जेव्हा ताराबाईंचे चहाते व्यक्त करत तेव्हा ताराबाईंकडून उत्तर येई,

"माझ्याबद्दलच्या विशेष भावनेनं तुम्ही असं म्हणत असाल कदाचित, पण मला काही तसं खरं वाटत नाही. संस्था चालवणारी आणि संस्थेविषयी आपुलकी असणारी इतकी माणसं असताना संस्था पोरकी का व्हावी ?"

मात्र प्रत्यक्षात अनुताई–ताराबाई हे नाते मोठे मजेशीर होते. अनुताईंना ताराबाईंनी लोभाचे–रागाचे एकच माणूस म्हणून 'लेबल' लावून टाकले होते! ताराबाई शीघ्रकोपी तर अनुताईंचे विचार स्वतंत्र. त्यामुळे त्यांच्या सारख्या चकमकी उडत. अखेर अनुताईंच्या डोळ्यांना धारा लागत. शेवटीशेवटी मात्र त्यांनाही 'पिशवी' शिवता आली. कानावर हात न ठेवता कान बंद ठेवण्याचे कसब त्यांनाही साधले.

ताराबाईंमधली गृहिणी सतत कार्यरत असे. एरीच्या घरातसुद्धा घरातली ठेवरेव, रोजचा भोजनबेत, कुणाचे पथ्यपाणी, पाहुण्यांच्या आवडीनिवडी, वेळा, फळांची तजवीज, उशीरा जेवायला येणाऱ्यांसाठी थंड पाणी उरले आहे की नाही, कुणाचा उपास, कुणाला आंबा मिळाला की नाही, इत्यादींकडे त्यांचे बारीक लक्ष असे. सहसा त्या पाहुण्यांना जेवल्याशिवाय जाऊ देत नसत. वेळ काढून त्यांच्या आवडीचे पदार्थ करीत, पुन्हा केव्हा येणार ते विचारून, त्यांची आवड लक्षात ठेवून त्याप्रमाणे तो बेत आखत.

याउलट अनुताईंचा खाक्या. त्यांचे लक्ष सतत बाहेरच्या व्यापांमध्ये गुंतलेले. ताराबाई घरातले पाहतच त्यामुळेही त्यांचे तिकडे फारसे लक्ष नसे. ताराबाई कधी कधी उपरोधाने म्हणत,

"अनुताईंना काहीसुद्धा माहीत नसतं; त्यांना नका विचारू. त्या आहेत पुरुष!" मग त्यांच्या कृत्रिम डोळ्याच्या संदर्भात विनोद केला जाई. "मात्र आमचा हा कर्ता पुरुष कडक शिस्तीचा भोक्ता आहे हं! अनुताईंचा एक डोळा नेहमी वटारलेलाच असतो."

त्यांची भांडणे ऐकणारे कुणीतरी गमतीने प्रश्न करी, "ताई, तुमच्यातली पत्नी कोण नि पती कोण ?"

ताराबाई म्हणत, "शेवटी अनुताईच आपलं ते खरं करतात; तेव्हा त्याही दृष्टीने



पुरुष त्याच!"

अनुताईंना बरे नसले की ताराबाई त्यांच्या औषधपाण्यावर नजर ठेवीत. त्या छत्री विसरून गेल्या किंवा त्यांना परतायला उशीर झाला की त्यांच्या जिवाची थेट पत्नी-प्रमाणेच घालमेल होई. पुढे संचालिका अनुताईंनी संस्था समर्थपणे सांभाळून आपल्याला डकविण्यात आलेला हा पुरुषार्थ सिद्ध केला!

कधी कधी ताराबाई विनोदाने म्हणत, "पुरुषांना बरी एकेक 'मिसेस' असते. कोणतंही किचकट, वेळखाऊ काम सांगा, लगेच म्हणतात, 'मिसेसला सांगतो', 'दुपारी मिसेसना पाठवतो.' मला पण एखादी मिसेस असती तर किती बरं झालं असतं!"

—तर अनुताई ताराबाईंच्या 'मिसेस'सुद्धा होत्या!

अनुताईंचा अपवाद सोडल्यास बोर्डीच्या व कोसबाडच्या कामात अनेक कार्यकर्ते, शिक्षक, अध्यापक व कर्मचारी एकेक, दोन–दोन किंवा त्याहून अधिक वर्षे राहून काम करून गेले. स. आ. केळकर, तारा देशमुख, शकुताई लिमये, ज्योतिभाई देसाई, लीला तेलंग, खड्डूभाई व रामीबेन पाटील त्याचप्रमाणे श्री. वि. वि. भागवत, नागले, कोप्पीकर, बोरगावकर अशी अनेक नावे घेता येतील. सध्याच्या स्थिरावलेल्या व विशेष आत्मीयतेने काम करणाऱ्या कार्यकर्त्यांपैकी आप्पा कोसके, कदमगुरुजी, वासंतीताई शेट्टी, आप्पा अमृते, शकुताई फाटक, वसंत पाटील, द्वारकाताई पाटील आणि विशेष म्हणजे विकासवाडीत खऱ्या अर्थाने लहानाच्या मोठ्या होऊन शिक्षिकांचे काम करू लागलेल्या आदिवासी तरुणी ताया व सुंदर यांचा नामोल्लेख स्थलाभावास्तव वगळून चालणार नाही; डॉ. करंदीकर, खोरशीदबेन, माधवराव राऊत, हरिश्चंद्र पाटील, जयंतराव पाटील, बापू अमृते यांसारखी जोडून ठेवलेली माणसे संस्थेला वर्षानुवर्षे अप्रत्यक्ष, प्रत्यक्ष सहाय्य करत राहिली म्हणूनच संस्थाशिल्प स्थिरावले.

ताराबाईंचे कार्यकर्ते, सहकारी, मदतनीस, शिष्य त्यांच्या सहवासात कसे घडत, घडविले जात याचा तपशील त्यांच्या काही अनुयायांच्या आठवणींमधून हाती येतो—

...बोर्डी येथे शिक्षिकेचे काम करून गेलेल्या चंपूताईने आपला एक अनुभव लिहून ठेवला आहे—

"गांधीवधाचा दिवस होता, देशभर हरताळ पडला होता. ही तरुण शिक्षिकाही त्या दिवशी शाळेत गेली नाही. दुसऱ्या दिवशी चंपूताई कचेरीत दाखल होताच भाऊ केळकरांनी त्यांना हटकले, "काल कुठे होतात ? खुशाल गैरहजर राहता ?" चंपूताईंनाही राग आला. विद्यार्थीसुद्धा आले नव्हते मग आपल्यालाच का म्हणून बोलणी बसावीत ! "मला गरज नाही तुमच्या नोकरीची." त्या तडकल्या, "माझा राजीनामा घ्या."

तेवढ्यात ताराबाईंनी शांत स्वरात म्हटले, "चंपूताई, वर्गात मुलं वाट पाहत असतील... आणि आज साधनं देण्यापूर्वी मुलांना गोलावर घेऊन बापूजींबद्दल माहिती सांगा."

ताराबाईंना उत्तर देण्याचा धीर चंपूताईंना झाला नाही, धुमसतच त्या निघून गेल्या. संध्याकाळी ताराबाईंचा निरोप आला,

"मुलांच्या प्रगतीची अवलोकनवही घेऊन वर या."

चंपूताई दिसताच ताराबाई हसत हसत म्हणाल्या,

"शिक्षकाची कर्तव्यं काय असतात हे तुम्हाला ठाऊक दिसत नाही. विद्यार्थ्यापेक्षा काही वेगळ्या अपेक्षा शिक्षकांकडून असतात. त्यांची बंधनं, कर्तव्यं निराळी असतात."

इतक्या साध्या शब्दात, सौम्य स्वरात ताराबाईंनी चंपूताईंची चूक त्यांना पटवून दिली की, सकाळच्या आपल्या उद्धटपणानंतरही ताराबाई शांत कशा राहिल्या याचेच चंपूताईंना आश्चर्य वाटत राहिले.

...एका दिवाळ्यात एक लेकुरवाळी स्त्री संस्थेत पाहुणी आली. थंडीमुळे कपडे लौकर वाळेनात म्हणून तिने आपल्या तान्ह्या बाळाची वस्त्रे, दुपटी बाहेरच्या कठड्यावर, अंगणात वाळत घातली. व्यवस्थापकांना तो शिस्तभंग वाटला. त्यांनी त्या बाईंना समज दिली, "अहो, अशी दुपटी बाहेर काय घातलीत? हे बरोबर नाही, ही संस्था आहे."

परंतु ताराबाई उलट त्यांनाच रागावल्या, "हे पाहा, लहान मुलांचे कपडे नीट वाळलेच पाहिजेत आणि माझी संस्था लेकुरवाळीच आहे, तिला दुपट्यांची लाज वाटण्याचं कारण नाही. अहो, ही दुपटी म्हणजे तर मोठी शोभा आहे."

...'मुलांसाठी गणवेष ठरवा' म्हणून मागे लागलेल्या शिक्षकांना त्या म्हणत, "अहो, एवढ्यात त्यांना गणवेषात का अडकवता? ही तर फुलं आहेत, फुलपाखरं आहेत. फुलं आणि फुलपाखरं कधी एकाच रंगाची असतात का?"

भजन म्हणायचे असो, भाजी करायची असो, लेख लिहायचा असो किंवा रात्रीच्या जेवणानंतरचा ताराबाईंना आवडणारा पत्त्यांचा 'वेडा डाव' खेळायचा असो; तन्मयता हा ताराबाईंचा विशेष. एकीकडे डाळतांदूळ निवडत चुलीवरच्या पदार्थाकडे लक्ष ठेवीत, तोंडाने त्या लेखनिकेला मजकूर सांगत आणि तीनही कामे उत्तम प्रकारे पार पडत.

...एक विद्यार्थिनी वर्षभर त्यांच्याकडे राहायला होती. दुपारच्या नाश्त्याला ती मैत्रिणीला घेऊन पळत-पळत यायची आणि उभ्या उभ्याच कपाटातलं काहीतरी खाऊन तशीच पुन्हा वर्गाकडे परतायची. ताईंनी ते एक-दोन वेळा पाहिले.



"अग, असं का करता? उद्यापासून मी सर्व तयार ठेवेन. मला वेळ सांगून जा. खाण्याचं काम स्वस्थ चित्तानं, व्यवस्थित केलं पाहिजे. काम, झोप, खेळ, खाणे सर्वच वेळच्यावेळी आणि शांत मनानं करावं!"

दुसऱ्या दिवसापासून त्या खरोखरच तयारी ठेवू लागल्या. मुलींना संकोच वाटला. त्या मग ताईंच्या शिकवणीप्रमाणे वागू लागल्या.

...मुंबईला असताना एकदा त्या टायफस नावाच्या आजाराने आजारी होत्या. डोके दुखायचे. एका रात्री तर फारच डोके दुखले. दुसऱ्या दिवशी ताराबाई म्हणाल्या, "आता उद्या गल्लीतल्या सगळ्या लोकांकडच्या भाज्या आणून ठेवा ग! रात्रभर बसून निवडून, चिरून तरी ठेवीन."

...जुन्या संस्कारात वाढल्यामुळे काही विद्यार्थिनींचे उपास असत. अनुताईंचेही काही उपवास असत. साबुदाण्याची खिचडी, रताळी, केळी असे काहीतरी फराळाला असे. ताई प्रार्थनासमाजी असल्यामुळे अशा कर्मकांडाच्या विरुद्ध. मालिनीही उपास करी. ताराबाई तिला एकदा म्हणाल्या, "अग, तू नवीन जमान्याची. जरा विचार तरी कर की उपास आणि ईश्वरप्राप्तीचा संबंध काय? ईश्वरप्राप्ती सेवेत आणि संकल्पात आहे. उपवास आरोग्यासाठी व संकल्पशक्ती वाढवण्यासाठी आहेत. तुम्ही तर भरपूर खाता. त्यामध्ये संयमपण नाही आणि आरोग्यदृष्टीही नाही. तेव्हा स्वतःच्या बुद्धीच्या कसोटीवर कोणतीही गोष्ट चढवा. असे 'पुराने लकीरके फकीर' बनू नका. आता काळ बदलला आहे. भावना-परंपरांना जखडून बसून चालणार नाही. त्यामुळे विकास होणार नाही. नवीन समाजासाठी नवीन विचारांना चालना द्या. तुम्ही बालशिक्षक हे करणार नाही तर मग कोण करणार? बालकांना नव्या विचारांचं बाळकडू तुमच्याकडून मिळायला हवं."

ताईंच्या संगतीत राहून हळूहळू मालुताईंचे सर्व उपास-नेम सुटले. ताईंची शिकवण पुढेही वरचेवर त्यांना आठवत असे.

त्यानंतर पंधरा वर्षांनी मालुताईंच्या दहा वर्षांच्या मुलीने, स्वातीने एक व्रत करायचे डोक्यात घेतले. मालुताईंनी तिला परवानगी दिली पण ताईंप्रमाणेच नवीन दृष्टिकोन समजावून सांगितला. काही दिवसांनी इतर मुलींना उपासाच्या नावाने खरखरे चरताना पाहून स्वाती स्वतःच म्हणते, "वा! असा उपवास म्हणजे खरंच थोतांड आहे. यानं काहीच साधत नाही. आता तू म्हणतेस तसंच मी करीन."

...राम कदम या शिक्षकाची गोष्ट बरीच अलीकडच्या काळातली आहे. हा पोरगेलासा

शिक्षक ताराबाईंच्याच संस्थेत प्रशिक्षण घेऊन कुरणशाळेच्या व प्राथमिक शाळेच्या कामावर लागला होता. अनुताईंशी त्याचा संबंध येई. ताराबाईंना मात्र तो तोंड दाखवीत नसे. ताराबाईंच्या ते लक्षात आले. एकदा अनुताई गावाला गेलेल्या असताना त्यांचा राम कदम यांना निरोप गेला,

" दुपारी घरी येऊन भेटा. "

कदम कुबजी कल्पनेनेच निकालात निघाले.

ताराबाईंचा दुपारचा चहा चालू होता. कदम तेथे पोचले आणि संकोचून उभे राहिले. ताराबाईंनी ' या बसा ' म्हटले, पुन्हा ' बसा ' म्हटले, पण शिक्षकांची भीड चेपेना—ताईंशेजारी कसे बसायचे ?

शेवटी ताराबाई थोड्या रागावल्याच, " अरे, तुला ऐकू येत नाही का ! एवढी कसली भीती वाटते ? मी कोण आहे वाघ की सिंह ? "

या ' डरकाळी 'मुळे शिक्षकमहाशय मटकन खुर्चीत बसले ! वाघाच्या ताटात सह-भोजन करणाऱ्या शेळीप्रमाणे त्यांनी ताराबाईंनी पुढे ठेवलेली चहा, बिस्किटे भराभर संपवली. कपबशी उचलून ठेवायचा प्रयत्न करताच वाघानेच ती स्वतःच्या कपबशीबरोबर उचलली. मग सुरू झाली कामाची चौकशी.

" शाळेत कोणती गाणी घेतोस ? मुलं किती येतात ? साधनं कोणकोणती आहेत ? सगळ्या मुलामुलींची घरं माहीत आहेत का ? कुरणशाळेत किती ते किती जातोस ? तिथे बकऱ्या किती, गायी किती ? "

साधनांचा तपशील सांगताना शिक्षकांना पुन्हा घाम फुटला, " अरे, स्पष्ट उत्तरं दे. घाबरू नये. हे तर आपले एक मोठं कुटुंब आहे. आपला पसारा मोठा. तो नीट चालतो की नाही हे मी कुटुंबप्रमुख म्हणून पाहते. तू तुझ्या घरी काम करतोस की नाही ? मग ते केलं की नाही म्हणून आईवडील विचारतात की नाही ?— तशीच इथे मी विचारते. वडील माणसांना असं घाबरायचं नाही. "

वाघाने पाठीवरून हात फिरवणे तेवढे बाकी ठेवले...

मुलाखत नीट पुढे चालू झाली. पुढे आठ दिवस रोज ठराविक वेळी या शिक्षकाने ताराबाईंची भेट घ्यायची, त्यांच्याकडून काम शिकून घ्यायचे असे ठरले.

रोज राम कदम ताराबाईंकडे पोचे तो ताराबाईंनी त्या दिवशी करावयाच्या सर्व साधनांची माहिती तयार ठेवलेली असे. चित्रचिठ्ठ्या, वस्तूचिठ्ठ्या, शब्दपेट्या यांची आकार, उकार, इकार वगैरेंच्या वर्गीकरणाप्रमाणे यादी तयार करून ठेवलेली असायची. जरूर तेथे ताराबाई पाठही घेऊन दाखवीत. एकेका साधनाची माहिती घ्यायची, नवीन साधन तयार करायचे, रोजच्या कामाचा रिपोर्ट द्यायचा, अडचणी ताराबाईंना सांगायच्या.

शेवटच्या दिवशी त्या म्हणाल्या, " मी खरं म्हणजे तुला, रात्रीची शाळासुद्धा घ्यायला सांगणार होते, परंतु आता मी बेत बदलला आहे सकाळ–संध्याकाळ कुरणशाळा दुपारी शाळा, शिवाय दोन वेळचा स्वयंपाक तूच करतोस. तेव्हा रात्री विश्रांतीच घेत जा आता तुला नीट सर्व समजलं आहे. काम चांगलं करशील. पंच्याहत्तर रुपये पगार पुरतो ना ? घरी किती पाठवावे लागतात ? आईवडील, भाऊबहिणी काय काय करतात ? काही अडचणी असतील तर सांगत चल. "



मात्र ताराबाईंनी असे अनेकांवर संस्कार केले तरी त्यांच्या कार्याचा जीवितकार्य म्हणून अंगीकार करण्यासाठी फार थोड्यांना प्रेरित किंवा उद्युक्त करणे त्यांना शक्य झाले. विशेषतः उच्चशिक्षित, कर्तबगार व समर्थ अशा कार्यकर्त्यांना त्या किंवा त्यांचे कार्य कायमचे आकर्षित करू शकले नाही. असे सर्व कार्यकर्ते काही ना काही मतभेद होऊन संस्था सोडून गेले. त्यांतले काही अप्रत्यक्षपणे त्यांच्या कार्याला मदत करीत राहिले, काही लांबूनच ताराबाईंवर विरोधभक्ती करत राहिले; परंतु विशेष लायक सहकाऱ्यांना टिकवून धरण्यात ताराबाईंना अपयश आले हे खरे. त्यांना आपले कार्यशिल्प उभारावे लागले ते अनेक सर्वसामान्य, हंगामी व मर्यादित कर्तृत्वशक्तीच्या कार्यकर्त्यांना अल्प-स्वल्प काळ राबवून ...

मिशनरी लोकांचा धार्मिक हेतू मनात धरून नव्हे, परंतु तेवढ्याच तळमळीने ताराबाईंमधल्या शिक्षकाने एकवीस वर्षांपूर्वी लहान मुलाचे बोट धरून आदिवासींच्या खोपटात प्रवेश केला आणि रानातल्या एका ओसाड टेकाडावर आदिवासींसाठी फुलामुलांनी फुललेले, गजबजलेले असे एक शैक्षणिक पंढरपूरच वसविले. संस्थेच्या विविध विभागांतल्या दैनंदिन व्यवहाराखेरीज तऱ्हेतऱ्हेचे राष्ट्रीय उत्सव, प्रशिक्षणवर्ग, शिक्षक मेळावे, आदिवासी भगिनींचे मेळावे, रंजनकार्यक्रम, संस्कारवर्ग, बालशिक्षणविषयक प्रदर्शने इ. कार्यक्रम कोसबाडच्या टेकडीवर वर्षभर चालू असतात, मुंग्यांच्या वारुळासारखीच ताराबाईंची ही नमुनेदार संस्थासुद्धा जवळून पाहिल्यास सतत उद्योगमग्न दिसते. ठिकठिकाणचे कार्यकर्ते व शिक्षणतज्ज्ञ ही संस्था पाहण्याकरता येत असतात.

वीस वर्षांपूर्वी केन्द्राच्या सेविकांना ' मुले पाठवा ' म्हणून आर्जवे करीत पाड्यापाड्यातून हिंडावे लागे; एखाद्या दिवशी ' रमाताई ' गेल्या नाहीत किंवा त्यांना उशीर झाला की वारली आया फणकारून म्हणत, " चार इसा पगार घेती, पण पोयरीला न्यायाला आली नाही. " आज या परिस्थितीत फरक पडला आहे. एखाद्याच पाड्यावरून का होईना, पण ' आमच्या वस्तीवर बालवाडी काढा ' म्हणून बोलावणे करायला आदिवासी पालक आपण होऊन येऊ लागले आहेत. ' मुलांची शाळा ' आज वारल्यांच्या कुटुंबव्यवस्थेने, अर्थव्यवस्थेनेही स्वीकारलेली बाब आहे. मूल शाळेत जाण्याच्या वयाचे झाले की आजचे वारली आईवडील त्याला बोटाशी धरून शाळेकडे घेऊन येतात.

शाळेत पाठवताना मुलांना स्वच्छ करून पाठविले पाहिजे ही जाण त्यांना आली आहे. विकासवाडीच्या प्राथमिक शाळेत आज योग्य इयत्तेत योग्य वयाचे विद्यार्थी दिसतात, बहुतेक विद्यार्थी सहा ते दहा या शालेय वयात चौथीपर्यंत पोचतात. प्राथमिक शाळेतील विद्यार्थ्यांपैकी बालवाडीतून शाळेत आलेली मुले अधिक चुणचुणीत व हुशार असतात, असा शिक्षकांचा अनुभव आहे. आजच्या वारली विद्यार्थ्यांच्या व्यक्तिमत्त्वात, पोशाखाव इस्त्रीची शहरी रेघ नाही, परंतु त्यांच्या राहणीतले, नजरेतले पहिले मळभ दूर झाले आहे. एक प्रकारची जाण, कुतूहल व चौकसपणा त्यांच्या डोळ्यात दिसू लागला आहे, त्यांच्या भाषेतही फरक पडला आहे. बालवाडी, प्राथमिक शाळा असा शैक्षणिक प्रवास करून बाहेर पडलेले पाचसहा विद्यार्थी आता शिक्षक झाले आहेत, कोणी नोकरीसाठी मुंबईला व इतर ठिकाणी रवाना झाले आहेत. घरात कुणी आजारी पडले तर त्याला भगताकडे न नेता डॉक्टरकडे न्यायचा आग्रह ही मुले धरू लागली आहेत. त्यांचा भुताखेतांवरचा विश्वास पूर्णपणे गेला नसला तरी पुष्कळ कमी झाला आहे, तसेच दारूपासून दूर राहायचा कमी अधिक यशस्वी प्रयत्नही दिसतो. उद्योगालयात काम करून, रात्रशाळेत शिक्षण घेऊन मिळवत्या झालेल्या वारली तरुणांच्या राहणीत, विचारसरणीत फरक पडलेला स्पष्ट दिसतो. ही मुले उद्योगालयाचे सर्व व्यवहार सांभाळतात, पैशांचे हिशेब चोख ठेवतात, वर्तमानपत्रे वाचून भोवतालचे भान ठेवतात. घड्याळे वापरतात, बचत करतात, विमे उतरवतात. “ शिकून पुढे काय करणार ? ” या प्रश्नाचे “ आमच्या जातीतल्या मुलांना शिकायला सांगणार ” अशा प्रकारचे उत्तर एखादा वारली विद्यार्थी अर्धवट जाणिवपूर्वक का होईना, पण देऊ लागला आहे. “ फावल्या वेळात काय करतोस ? ” या प्रश्नाला “ कादंबऱ्या वाचतो ” असे उत्तर आता मिळू शकते. विकासवाडीच्या छापखान्यात आज शेवंती, विजया व विमल या आदिवासी मुलीही मुद्रणकाम करताना दिसतात. ताया, सुंदर, प्रभा दाक, राजू सातवी अशा बोटांवर मोजण्याइतक्या मुली आता स्वतंत्रपणे बालवाडी चालवू लागल्या आहेत, आणि या सुजाण वारली तरुणींना योग्य, लायक निर्व्यसनी नवरे मिळतात की नाही हा आता त्यापुढचा प्रश्न आहे !

घाटाळपाडा व ढाकपाडा या दोन पाड्यांतून आपण होऊन आदिवासींच्या प्रतिनिधींनी ‘ बालवाडी काढा ’ अशी मागणी केली. हे श्रेयही मोठेच आहे. विकासवाडीत शिकून मोठ्या झालेल्या दोघा वारली भावांचा यात पुढाकार आहे.

वारली मुलांपेक्षा मुली शिक्षणाने जास्त धीट, चौकस, मोकळ्या होत आहेत हा एक विशेष मानायला हवा.

काही काळापूर्वी झालेल्या हळदीकुंकू समारंभात तर दोन आदिवासी महिलांनी भाषणे केली व शिक्षणाचे महत्त्व श्रोत्यांना पटवून दिले.

अर्थात बीस वर्षांच्या बेहिशेबी परिश्रमांचे फलित म्हणून गणित मांडून या सुधारणांकडे पाहिले तर हे सर्व बदल मंद आणि हे साफल्य मर्यादित वाटेल. आपल्या पांढरपेशा शहरी सवयीनुसार आकडेवारी मिळवून हे यश कागदावर मांडल्यास विशेष उत्साहवर्धक बेरीज पदरात पडणार नाही. ताराबाईंनीच एके ठिकाणी लिहिल्याप्रमाणे. “आज जी काही थोडी सफलता आम्हाला मिळाल्यासारखी वाटते ती नुसती सुरुवातीचे पहिले शिखर गाठल्यासारखी आहे. ” आणि ही जाणीव संस्थेतल्या सध्याच्या कार्यकर्त्यांनाही आहे.



आदिवासींसाठी काढलेल्या या शिक्षणसंस्थेचे स्वरूप ठरविताना आदिवासी बालकांच्या शिक्षणवाटेतल्या अनेक प्रश्नांची उत्तरे ताराबाईंच्या हाती आली, आणि उत्तरांमधूनच पुन्हा पुढचे प्रश्नही दिसू लागले. उदाहरणार्थ, वसतिगृहात राहून शिक्षण घेणारी मुले पुस्तकी शिक्षणाबरोबर नागरी संस्कृतीतला दिखाऊपणा, कृत्रिमता आत्मसात करीत आहेत असे दिसून आले; आणि ही मुले आपले घर, कुटुंब, समाज, भाषा यांना पारखी व परकी बनून त्यांची त्रिशंकूप्रमाणे परिस्थिती तर होणार नाही, अशी भीती त्यांना वाटू लागली.

दुसरे म्हणजे आजवर त्यांची शरीरे श्रमाने कसली जात होती व मने व मते प्रत्यक्ष जीवनानुभवातून घडत होती. आता शिक्षणाच्या मागे लागल्यामुळे त्यांची शरीरे श्रमाला अक्षम व त्यांची मने दुसऱ्यांनी सांगितलेले, लिहिलेले चमच्याने भरवून घेण्याच्या मागे लागून दुबळी बनत नाहीत ना, हेही पाहायला हवे होते.

आणखी एक म्हणजे या लोकांना शिक्षित करताना त्यांच्या शिक्षणाला उत्पादक, स्वतंत्र धंद्याची, व्यवसायाची जोड वेळेवर व पुरेशा प्रमाणात दिली जाते ना, याचे भान ठेवणे जरूर होते. एरवी, त्यांना शिक्षित केल्याने सुशिक्षित बेकारांच्या संख्येत भर तेवढी पडली, त्यांचे समाधान हिरावून घेऊन शिक्षणाच्या बदल्यात आपण त्यांना कायमचे वैफल्य मात्र दिले, अशी अवस्था होणार. खेड्यातच त्यांना पुरेसा कामधंदा उपलब्ध झाला नाही तर हे तरुण नोकरीनिमित्त शहरात जाऊन गर्दी करणार व त्यांचे कुटुंबीय दरमहा मनिऑर्डरची वाट पाहत खेड्यात-पाड्यात दिवस काढणार हे भवितव्य स्पष्ट होते. आदिवासींना सुधारण्याच्या ताराबाईंच्या कल्पनेशी हे चित्र विसंगत होते.

या सर्वाबरोबरच आणखीही एक आव्हान ताराबाईंना जाणवले. त्यांना दिसत होते की वारली समाजाची स्वतःची अशी एक बरीवाईट संस्कृती आहे. स्पष्टपणे निराळी अशी एक जगण्याची पद्धत आहे. मर्यादित शब्दसंख्येची का होईना, भाषा आहे. त्यांच्या या मूळ संस्कृतीवर आपल्या विकासाच्या योजनांमुळे घाला येऊ नये अशी दक्षता आपण घ्यायला हवी. त्यांच्या खाण्यापिण्याच्या सवयी सुधारल्या पाहिजेत, त्यांची प्रगती रोखून धरणाऱ्या चालीरीती मोडून काढल्या पाहिजेत, त्यांचा विचाराभाव, आळस, धर्मभोळेपणा, अंधश्रद्धा, अल्पसंतुष्टपणा, अस्वच्छता ही दूर केली पाहिजेत हे खरे. परंतु

हे सर्व करताना त्यांच्या या विश्वावर पांढरपेशा पावलांचे अतिक्रमणदेखील होता कामा नये.

आपल्या संस्कृतीतले तरी सगळेच चांगले आहे का? आदिवासींना शिक्षित करताना आपल्यासारखा संग्रहाचा रोगट हव्यास त्यांच्यात उत्पन्न होता कामा नये, आपली कृत्रिम वागण्याची पद्धत त्यांच्यात भिनता कामा नये. त्यांच्या समाजातसुद्धा काही चांगली मूल्ये आहेत. ती टिकवण्याजोगी आहेत. आदिवासींचा सरळ भाव, निरागसपणा समाधानी वृत्ती, अपरिग्रह, त्यांच्यातली श्रमाची आवड, निकोप वृत्ती, नृत्यातली त्यांची तन्मयता व चापल्य, त्यांचे ते मोराच्या पिसासारखे सहज फुलून उठणारे निर्भेळ आनंदाचे हास्य, स्त्री-पुरुष संबंधातला त्यांचा निरोगी समभाव व अकृत्रिमपणा ही त्यांच्या संस्कृतीतली चांगली मूल्ये सुधारलेल्या समाजालाही अद्याप साध्य झालेली नाहीत.

प्रशिक्षणाच्या बाबतीतही बाहेरचे, शहरी संस्कृतीत वाढलेले शिक्षक, अध्यापक व कार्यकर्ते इथे रुजविण्यापेक्षा त्यांच्या समाजातूनच वारली शिक्षक, कार्यकर्ते निर्माण झाले पाहिजेत, निर्माण केले पाहिजेत, हे स्पष्ट झाले. शहरातून येणाऱ्या शिक्षकाला वारली भाषा शिकून, त्यांच्या संस्कृतीशी परिचय करून घेऊन त्यांच्याशी नव्याने समरस व्हावे लागते. याउलट वारली शिक्षकाला, तो त्याच समाजात लहानाचा मोठा झालेला असल्यामुळे वारली लोकांच्या कौटुंबिक, सामाजिक समस्यांची आतून जाण असते. त्याला त्यांच्याविषयी खरी आत्मीयता, आस्था असते आणि त्यांच्यात काम करताना त्याला त्यामुळे वेळ वाया चालल्याची, वैफल्याची भावना जाणवत नाही. अर्थात वारली माणसाला त्याच्या कोषातून बाहेर काढून, आपले आपण स्वप्रयत्नाने आपल्या पायांवर व ताठ उभे राहायला लावण्याचे काम सहजसाध्य नव्हते आणि नाहीही.

पंचवीस वर्षांपूर्वी ताराबाईंनी या भागात येऊन ही संमिश्र स्वरूपाची शिक्षणसंस्था घडवायला घेण्यापूर्वी इथला आदिवासी म्हणजे एक अबोल, भित्रा, एकलकोंडा, अल्प-संतुष्ट ( किंवा अतिसंतुष्ट ) आणि विनमहत्त्वाकांक्षी माणूस होता. एक प्रकारच्या दडपणा-खाली वावरणारा, आत्मविश्वासाचा अभाव असलेला, न्यूनगंडाने ग्रासलेला, असामाजिक वृत्तीचा आणि एकूण, आपल्या भयानक दुःस्थितीशी कसलेच भांडण नसलेला असा माणूस होता. पिढ्यापिढ्यांचा मागासलेपणा त्याच्या बटलेल्या मनाला वेढून होता आणि स्वोन्नतीची आच नसल्यामुळे उपाशीपोटीसुद्धा तो सुस्त राहू शकत होता. आता चार अक्षरे काढता आली, चार इयत्ता पार केल्या, चार पैसे मिळू लागले म्हणून त्याच्या या वृत्तीत फारसा फरक पडला आहे, त्याचा स्वाभिमान, महत्त्वाकांक्षा जागृत झालेली आहेत असे नाही. सुधारलेल्या समाजाकडे डोळ्याला डोळा भिडवून पाहणे अद्याप त्याला जमलेले नाही. सहकाराने, संघटित प्रयत्नाने आपल्या समाजाला पुढे आले पाहिजे ही जाण त्याला अजून आलेली नाही. शेती-मळ्यात व संस्थेचे नोकर ( office peon ) म्हणून काही आदिवासींची नेमणूक संस्थेने केली आहे व बाहेर काहींना अशा नोकऱ्या



मिळाल्या आहेत. बोटांवर मोजण्याइतके आदिवासी शिक्षकही झाले आहेत. ( विकास-वाडीत एकच आदिवासी शिक्षक आहे. ) परंतु कचेरीतील कारकुनाच्या जागी एकही अर्ज अजून आलेला नाही! अर्थात दारिद्र्याच्या, अज्ञानाच्या ज्या गर्तेतून या वन्य माणसांना बाहेर काढायचे होते ती लक्षात घेता पाठोपाठ त्याच श्वासात त्यांना आपल्या पायांवर उभे करणे, स्वावलंबन व स्वोन्नतीसाठी त्यांना सिद्ध करणे कोणत्याही संस्थेला जमले नसतेच. कदाचित शतकानुशतकांचा गंज एका पिढीत दूर होईल ही अपेक्षा किंवा हिशेबच चुकीचा असू शकेल. आपल्या तुलनेने पुरेशा प्रगत असलेल्या समाजालासुद्धा सुमारे सव्वाशे वर्षांपूर्वी म्हणजे पाच पिढ्यांपूर्वी सुरू झालेल्या इंग्रजी शिक्षणापासून धरले तरीही अंधश्रद्धा, मानसिक मागासलेपणा, रूढिप्रियता, विचाराभाव, निरक्षरता, विषमता, जातीयता, सामाजिक दुखणी इ. पूर्णपणे दूर करणे अद्याप साध्य झालेले नाही, तेथे आदिवासींच्या वृत्तीमध्ये पंचवीस वर्षांत आमूलाग्र बदल व्हावा, त्यांचा कायाकल्प व्हावा ही अपेक्षा करणे कितपत बरोबर ठरेल? किंबहुना, ताराबाई, अनुताई आणि त्यांचे सहकारी असे हिशेब करीत नाहीत म्हणूनच त्यांच्या भल्यासाठी आपण आपला वैयक्तिक स्वार्थ, घरदार सोडून रानात येऊन राहिलो त्यांच्या मनात आपल्याविषयी कृतज्ञतेचा अंशही नाही, ही वस्तुस्थिती मनावर न घेता हे ' देवाचे काम आहे ' अशा श्रद्धेने ते आपल्याकडून जगन्नाथाचा रथ ओढत राहू शकतात.

" मी जे काही केले त्यात माझ्या स्वतःच्या आनंदाचा मोठा भाग होता. " असे म्हणताना ताराबाईंनी या बाबतीतली आपली भूमिका पुढील शब्दांत स्पष्ट केली आहे.—

" ही आदिवासी जमात केवढी मोठी आहे व कित्येक शतके त्यांना व्यवस्थितपणे मागे ठेवून डोंगरात व जंगलात घालवून देऊन आपण मूठभर लोकांनी पुढारलेले होऊन देशाला आज ही पावशिक्षित अवस्था आणली आहे. तर त्यांना सर्व दृष्टींनी पुढे येण्यास मदत करणे आपले सर्वांचे आद्य कर्तव्यच आहे. "

मात्र विकासवाडी हेच काही ताराबाईंचे जीवितकार्य नव्हते. ओढीने पन्नास वर्षे जो एक बालशिक्षणाचा राष्ट्रव्यापी प्रयोग त्यांचे आयुष्य व्यापून होता, त्याचा ' विकासवाडी प्रकल्प ' हा शेवटचा व महत्त्वाचा अध्याय होय. समाजाच्या चारही स्तरांवर साधलेले शिक्षणक्षेत्रातले हे अपूर्व यश व त्यांच्या खाजगी जीवनातले त्यांचे दारुण अपयश या दोन्हींचे उत्तर ताराबाईंच्या व्यक्तिमत्त्वात सापडते तसेच त्यांच्या घटनाप्रधान, चाकोरी-बाहेरच्या जीवनक्रमातही सापडते. ताराबाईंचे व्यक्तिमत्त्व आणि त्यांचे कार्य, त्यांचे कौटुंबिक अपयश व शिक्षणक्षेत्रातले कार्यसाफल्य ही एकमेकांत गुंतलेली आहेत.

" ...अमरावतीला असताना मी चारचौघींसारखीच सुखवस्तू होते. पुढे हे सर्व-साधारण स्त्रीच्या जीवनक्रमापेक्षा भिन्न असे जीवन मी निवडले ते अगदी खाजगी कारणा-मुळे. प्रेरणेचा वगैरे इथे संबंध नाही. आयुष्यातल्या काही आपत्तीतून जाताना मी मार्ग

शोधीत होते... स्वार्थापोटीच म्हणा हवे तर, मी या बालशिक्षणाकडे वळले." ताराबाईंनी स्वतःच एका प्रासंगिक निवेदनात म्हटले आहे.

कौटुंबिक जीवनात ताराबाईंना खरोखरच दुःखाचे मोठाले तडाखे सहन करावे लागले. औटघटकेचे वैवाहिक सुख, पुढे प्रभाचा असाध्य आजार, तिचा दुर्दैवी आत्मघात, केव्हींचा हृदयद्रावक अन्त, एकीकडे आर्थिक कुचंबणा, शारीरिक दुखणी व एकलेपणा परंतु हे सारे ताराबाईंनी न रडता न भेकता; खचून न जाता, धैर्याने सोसले. नियतीची आव्हाने स्वीकारून प्रसंगी नियतीला आव्हाने देत त्या लढल्या. आपल्या प्राक्तनाबद्दल त्या कधी दैवाला, देवाला दोष देत बसल्या नाहीत. आपल्या चुकत गेलेल्या अंदाजाची जबाबदारी त्यांनी कुठल्या दूरस्थ ग्रहाच्या माथी मारली नाही की कुणाच्या जन्मवेळेला चिकटविली नाही; किंवा कटू अनुभवांमुळे त्या नास्तिकही झाल्या नाहीत. उलट, आपल्या दुःखाला कवटाळत न राहता त्यांनी दुसऱ्यानाही हसविले आणि त्या दुःखांच्या पायावरच आपले आयुष्य घडविले.

आयुष्यात जी इनमिन दोनच माणसे त्यांच्या वाट्याला आली त्यांनी ताराबाईंचे आयुष्य बिघडवले तसेच घडवलेही. म्हणूनच अनुताईंसारख्या त्यांच्या शिष्या म्हणतात, "हा तारा घरातून निखळला म्हणूनच बालअंगणात आला, आम्हाला मिळाला!" परंतु दुःखातून, अपयशातून वाट काढताना, ताराबाईंना आपले अपयश, आपले दुःख कार्याच्या पसाऱ्यात गुंतवून टाकले. ज्या वेळी केव्ही आपल्या आयुष्यातल्या त्रुटी मद्याच्या गुंगीत बुडवून टाकण्याचा प्रयत्न करीत होते त्यावेळी ताराबाई मात्र आपल्या जखमा बालसहवासाने भरून काढीत होत्या. प्रभाची आत्महत्या हा तर वृद्धापकाळी व हृदयविकारासारखे दुखणे जडल्यानंतर ओढवलेला दुर्धर प्रसंग; परंतु तेही दुःख ताराबाईंनी कार्यरतावस्थेत बुडविले. प्रत्येक वेळी आपल्या ताज्या दुःखाचाच पाया करून ताराबाई एकेक टोलेजंग असे कार्य उभारीत गेल्या. एका तऱ्हेने त्यांचे कार्य ही त्यांच्यासाठी मनःशांतीची साधनाच होती. म्हणून आपल्या प्रदीर्घ आयुष्याच्या शेवटी ताराबाई म्हणू शकल्या, "दुःखांनी मला घडवलं; तेव्हा त्यांचीही मी ऋणी आहे."

ताराबाईंनी कधी देवपूजा केली नाही. प्रार्थना करतानाही त्या फारशा कुणाला दिसल्या नाहीत, आणि तरीही एवढे आघात सोसून त्या अश्रद्ध मात्र बनल्या नाहीत. त्यांचा जीवनातला रस कधी आटला नाही आणि त्यांच्या जिभेवरच्या विनोद कधी सरला नाही. कार्यातही सदैव चढण चढत राहावे लागले, परंतु सोपा मार्ग त्यांनी कधी स्वीकारलाही नाही. "मळलेली वाट चालण्यामध्ये काय मजा असते! नवी वाट पाडण्यातच खरा पुरुषार्थ आहे." असे त्या म्हणत. आणि खरोखरच आकाशाला ठिगळे लावत राहण्याची, वेळप्रसंगी तानाजीप्रमाणे हाताला शेला गुंडाळून लढण्याची झुंजार वृत्ती त्यांच्यापाशी होती. या त्यांच्या वृत्तिविशेषामुळेच त्यांना जीवनाची ही कठिण साधना



जमली. हरणे, हातपाय गाळणे इ. शब्दप्रयोगच त्यांच्या शब्दकोशात नसावेत.

कार्याच्या बाबतीत त्यांनी म्हटले आहे, "हा खटाटोप कशाला करायचा, हा प्रश्न शहरात खुर्चीवर बसून विचार करणाऱ्यापेक्षा प्रत्यक्ष काम करणाऱ्यांना जास्त वेळा बोचतो. हे कार्य अत्यंत कठिण क्षणोक्षणी निराशा उत्पन्न करणारे, सुकृद्दर्शनी निरर्थक दिसणारे आणि कार्यकर्त्यांना थकवणारे आहे... पण माणसाचा माणूसपणा कठिण आणि अशक्यप्राय दिसणारी कामे करण्यातच आहे."

ताराबाईंच्या समग्र कार्याचे सिंहावलोकन केल्यास त्यांच्या यशाचे मर्मही उमगू लागते. ऐन उमेदीत त्यांनी बालशिक्षणाचे व्रत घेऊन आपली देखणी नोकरी बाजूला सारली आणि पुढे वयाची सत्तरी जवळ आल्यावरही त्या शहर सोडून जंगलात गेल्या आणि आदिवासी माणसांत राहून बालशिक्षण प्रयोग करीत राहिल्या. या सर्वांच्या मागे त्यांची उत्कट अशी संवेदनक्षमता होती. मात्र यातला कुठलाही निर्णय त्यांनी भावनेपोटी किंवा भावनेच्या आहारी जाऊन घेतला नाही. त्यांच्या आचारविचारातले भावना व बुद्धी यांचे योग्य प्रमाण प्रभा आणि केव्ही याच्या संदर्भातले घरगुती प्रश्न सोडविताना प्रतीत होई तसे ते त्यांच्या कार्यपद्धतीत देखील प्रतिबिंबित होई. हा समतोल त्यांच्या वृत्तीत होता म्हणूनच डॉ. मॉन्टेसोरी किंवा त्यांची शिक्षणपद्धती, गांधीजींचे व्यक्तिमत्त्व वा विचारसरणी, गिजुभाई, प्रार्थनासमाज — कशातच, कोणातच त्या प्रमाणाबाहेर गुंतून पडल्या नाहीत की कोणाच्या, कशाच्या आहारी त्या गेल्या नाहीत. त्यांची प्रज्ञा कायम स्वतंत्र राहिली. त्यामुळे त्यांनी कधी कुणाचा शिक्का उमटवून घेतला नाही की गंडा बांधून घेतला नाही.

त्यांचा हा बुद्धिवादी दृष्टिकोन आणि प्रायोगिक वृत्ती त्यांच्या कार्यपद्धतीत नेहमीच प्रतिबिंबित होत असे. आवश्यक त्या बाबतीत स्वतंत्रपणे प्रयोग करणे, प्रत्येक अनुभवाकडे चिकित्सक, संशयी दृष्टीने पाहणे, प्रयोगात काही चुकलेले आढळल्यास पुन्हा पहिले सर्व पुसून नव्याने प्रयोग मांडणे, या पद्धतीने त्यांनी शिक्षणक्षेत्रातले अमुक नवीन पायंडे पाडले. शिक्षणपत्रिकेतल्या लिखाणातसुद्धा नुसत्या तात्त्विक विवेचनापेक्षा प्रत्यक्ष कृती, अनुभवचित्रण, चर्चा, उदाहरणे यावर त्यांचा भर दिसतो. कोसबाड येथे विहीर खणण्याचा प्रश्न निघाला. वैदूला, भगताला बोलावून विहिरीची जागा ठरविणे त्यांनी अमान्य केले. मात्र त्याच वेळी पाणी कुठे व किती लागेल याची शास्त्रशुद्ध पाहणी करणाऱ्या तज्ज्ञाला पाचारण करण्यास त्यांनी मागेपुढे पाहिले नाही. आदिवासी मुलांचे बुद्धिमापन करून त्यांचा बुद्ध्यंक काढणे व त्या मानसशास्त्रीय सर्वेक्षणावर आधारित अभ्यासक्रम आखणे ही कल्पना पुरोगामी वृत्तीच्या ताराबाईंचीच होती. 'शिक्षणक्षेत्रातला एक अभिनव व अत्यंत आवश्यक असा प्रयोग,' 'एका नव्या दिशेने प्रयत्न करण्याची ही लहानशी सुरुवात' असे म्हणून या सर्वेक्षणाचा अहवाल त्यांनी पुस्तकरूपाने प्रसिद्धही केला (१९७०).

आपला हा बुद्धिवादी दृष्टिकोन आणि प्रयोगशीलता बालशिक्षणाद्वारा शहरी व ग्रामीण मुलांमध्येही निर्माण करण्याचा त्यांचा जाणीवपूर्वक प्रयत्न असे, याचा प्रत्यय शिक्षणपत्रिकेतल्या मजकुरात, बालसाहित्यात व शिशुविहार, बोर्डी व कोसबाड येथील प्रत्यक्ष प्रयोगांतही वारंवार येत असे. मुलांना चमच्याचमच्याने ज्ञानामृत पाजण्यापेक्षा त्यांच्या जिज्ञासू वृत्तीला जागे करून प्रत्यक्ष प्रयोगातून, कृतीतून, स्वतः विचार करून त्यांनी विविध कार्यकारणसंबंध समजून घ्यावेत, असा त्यांचा आग्रह दिसे.

भावना व बुद्धी यांचा मधुर समन्वय त्यांच्या ठिकाणी कसा झाला होता याची प्रचीती अण्णा कोसबर्यांनी केलेल्या एका हृद्य स्मृतिकथनातून येते—

१९५२ साली प्रभाचे निधन झाल्यावर तिच्या स्मरणार्थ ताराबाईंनी आपले सर्वांत आवडते फळ म्हणजे आंबा खाणे सोडले होते. वर्षानुवर्षे संस्थेतली सर्व मंडळी आंबे खात, परंतु ताराबाईंनी कधी आंब्याला स्पर्श केला नाही. संस्थेच्या वाडीत दरवर्षी उत्तम कलमी आंबे निघतात पण ताराबाईंच्या तोंडात एकही फोड जात नाही याचे अनुताईंसकट सार्‍यांना फार वाईट वाटे. परंतु बोलणार कोण? कारण ताराबाई कधी आपल्या दुःखाचा पाढा कुणापुढे वाचत नसत. आठवणी उगाळीत नसत. अखेर १९७० च्या उन्हाळ्यात अण्णांनी न राहवून धाडस केले. "ताई, तुम्ही तुमच्या कन्येच्या वियोगाप्रीत्यर्थ आंबा सोडलात. माझ्या मते यात केवळ इमोशनल आउटलुक आहे. इंटलेक्चुअल नाही. तुम्ही तर प्रत्येक गोष्टीकडे इंटलेक्चुअली, रॅशनली पाहता—मग आंबा का बरं खात नाही?"

ताराबाई विचार करीत गप्प राहिल्या. त्यांनी नाही म्हटले नव्हते! अण्णांनी आत आत जाऊन एक रसरशीत आंबा आणला आणि कापून दोन फोडी पुढे केल्या. ताराबाईंनी मूक हास्य करून त्या घेतल्या आणि अठरा वर्षांनंतर प्रथमच आंब्याचा आस्वाद घेतला!

त्यांच्या बुद्धिवादी, प्रयोगशील वृत्तीमुळेच पुढे आपल्या कार्याच्या संदर्भात आपला देव्हारा माजविला जाऊ लागला आहे की काय अशी नुसती शंका येताच त्यांनी स्पष्टपणे खुलासा करून टाकला, "मी कुणासाठी म्हणून काही केलं नाही, माझ्या स्वतःच्या आनंदाचा त्यात मोठा भाग होता. दया, परोपकार हे शब्द माझ्यासाठी खर्च करू नका, मला त्यांचा नाद नाही." मात्र त्यांची ही प्रायोगिक वृत्ती केवळ वैज्ञानिकाच्या प्रयोगशाळेतली, कोरडी नव्हती. तिला सहृदयतेचा, माणुसकीचा पदर नेहमीच होता; त्यामुळे पुढे त्यांनी लिहिले आहे, "अर्थात जे केले ते मागासजमातींबद्दल सहानुभूती होती व राष्ट्राच्या प्रगतीच्या दृष्टीने या कार्याचे महत्त्व पटले होते, म्हणूनच." केवळ एक सिद्धान्त सिद्ध करायचा म्हणून त्या शिशुविहारातही आल्या नाहीत आणि जंगलातही गेल्या नाहीत. त्यांच्या प्रयत्नांमागे अस्सल आत्मीयता, सद्भाव, कळकळ व मानवता होती आणि त्याखेरीज त्यांचे प्रयोग यशस्वी झालेही नसते. मुलांना, आदिवासी मुलांना त्यांनी कायम हाडामांसाचेच मानले. 'कच्चा माल' किंवा प्रयोगाचे उंदीर ठरविले नाही. प्रभाच्या व केव्हींच्या बाबतीत त्यांचा बुद्धिप्रधान दृष्टीकोन फार प्रखरतेने सिद्ध झाला. एकीकडे प्रभाच्या मानसिक रोगावर उपचार म्हणून कोल्हापुरच्या अंबाबाईला नवस करणे त्यांनी दृढपणे नाकारले आणि दुसरीकडे तिच्या शरीराची नैसर्गिक भूक अनैतिक संबंधापर्यंत पोचली तरी मोठ्या मनाने ती समजून घेतली. केव्हींना त्या अखेरपर्यंत पैसे पाठवीत राहिल्या, परंतु "केव्ही आता जगले काय आणि मेले काय, कुणालाही ते भारभूतच होणार." असे उद्गारही त्यांनी निःसंदिग्धपणे काढले.



प्रत्येक बाबतीत आपल्या बुद्धीला पटेल तेच करण्याच्या त्यांच्या वृत्तीमुळे शिक्षणक्षेत्रात अतिशय मौलिक आणि क्रांतिकारक असे प्रयोग व संशोधन त्यांच्या हातून झाले. वास्तविक मॉन्टेसोरी शिक्षणपद्धती परकीय, परक्या भूमीत जन्मलेली होती. त्यामुळे विचारवंतांच्या मनातही तिच्याविषयी आकस होता, परंतु हा आकसामागचा आंधळा राष्ट्रवाद ताराबाईंनी बरोबर ओळखला आणि 'कुठलीही शिक्षणपद्धत एका राष्ट्राच्या मालकीची असू शकत नाही, असे प्रतिपादून, ते ठणकावून, गांधीजींसारख्या नेत्याकडून वदवून घेतले व पुढे प्रत्यक्ष प्रयोगांद्वारा सिद्ध केले. परदेशातून आयात केलेल्या, उचललेल्या बऱ्याच कल्पना, योजना स्वदेशात रुजत नाहीत, या भूमीतून त्या फुललेल्या नसल्यामुळे बांडगुळाप्रमाणे त्या वरवरच वाढत राहतात, असा अनुभव आजदेखील अनेक बाबतींत येतो. परंतु ताराबाईंचे द्रष्टेपण असे की या परक्या शिक्षणपद्धतीचे राष्ट्रीयीकरण, ग्रामीणीकरण, पुढे तर 'आदिवासीकरण'सुद्धा त्यांनी इतक्या बेमालूमपणे केले की त्यामुळे त्यांच्या हाती ती शिक्षणपद्धत परकी राहिलीच नाही. काही काळ, समाज, परिस्थिती, आर्थिक परिस्थिती, मुलांच्या गरजा यांत होणाऱ्या बदलांना सुसंगत असे बदल तिच्यात त्या करीत गेल्या; लोक तिचे कूळ, मूळ विसरले आणि तिची नूतन बालशिक्षणपद्धती बनली. तंत्राचे अवडंबर माजवून आणि साधनांच्या वापराबद्दल आग्रही भूमिका घेऊन आपण आपल्या शिक्षणपद्धतीची व्याप्ती मर्यादित व कालसापेक्ष करीत आहो याची कल्पना डॉ. मॉन्टेसोरींना आली नाही आणि गुरुभक्तीच्या भावनेतून मॉन्टेसोरींच्या नावाशी जखडून घेतल्यामुळे आपली शिक्षणपद्धत पुरेशी लवचिक, परिवर्तनशील व उपयुक्त राहणार नाही याचे भान गिजुभाईंना राहिले नाही. या दृष्टीने ताराबाई या दोन्ही गुरुंपेक्षा अधिक धोरणी व दूरदर्शी ठरल्या, असे म्हणावे लागते.

अंगणवाडीसारखे काही मोजके प्रयोग सोडल्यास ताराबाईंच्या बहुतेक कल्पनांचे सूत्र शिक्षणक्षेत्रात इतरत्र सापडू शकते. Meadow School काय किंवा शिक्षण व कमाई यांची सांगड घालण्याची योजना काय, मूळ कल्पना ताराबाईंच्या नव्हेत. ताराबाईंचे मोठेपण असे की योग्य ठिकाणी, योग्य बाबतीत त्या योग्य ते प्रयोग करीत गेल्या, वेग-

वेगळ्या पद्धतींचा योग्य तो समन्वय साधीत गेल्या आणि हे सर्व करताना परिस्थितीनुसार, बदलत्या गरजांनुसार त्यांनी मूळ कल्पना इतक्या नव्याने वाढविल्या की या सर्व प्रयत्नांचे, प्रयोगांचे प्रक्रियाप्राप्त रसायन त्यांना शिक्षणक्षेत्रात स्वयंभू शिक्षणमहर्षीचे स्थान देऊन गेले.

परंपरागत शिक्षणपद्धतीतल्या जबरदस्तीच्या शिक्षेच्या, वेळापत्रकाच्या, साच्याच्या कल्पनांच्या मुळांवर घाव घालणाऱ्या, मॉन्टेसोरींच्या मूळ तत्त्वांना त्यांनी धक्का लागू दिला नाही. मात्र त्यांचे शिक्षणविषयक धोरण एका बाजूला राष्ट्रीय तर दुसऱ्या बाजूने स्थलकालातीत होते. कोणत्याही देशातील विशिष्ट परिस्थितीला अनुसरून, तेथली संस्कृती लक्षात घेऊन त्या भूमीतील जीवनमूल्यांना पूरक पोषक, आविष्कृत करणारी अशी त्या देशातील शिक्षणपद्धती असावी लागते, राष्ट्रीय समस्यांचे स्वरूप लक्षात घेऊन, इतर देशांतील प्रयोगांचा लाभ घेऊन तिला आकार द्यावा लागतो, कालमानानुसार ती बदलावीही लागते. हे लक्षात घेऊन उपलब्ध साहित्य, टाकाऊ पदार्थ वापरून स्वस्त, काटकसरीचे व सोयीचे बालशिक्षण त्या घडवीत गेल्या. ग्रामस्वच्छता, व्यवस्था, आरोग्य, अन्नवस्त्रांचा, औषधांचा पुरवठा यांचाही समावेश त्यात त्या करीत गेल्या.

शिक्षणाचा सर्वप्रथम उद्देश व्यक्तिविकास. आणि व्यक्तिविकासाचा उद्देश जीवन सुखी, समृद्ध करणे. त्या दृष्टीने वैयक्तिक व सामाजिक — दोन्ही दृष्टींनी प्रत्यक्ष जीवनासाठी उपयुक्त, त्याच्याशी सुसंगत असे शिक्षण मुलांना, प्रत्यक्ष जगताना द्यायचे, शिक्षणाला पुस्तकी बनू न देता सतत त्याला जीवनव्यवहाराची जोड द्यावयाची आणि त्यातून व्यक्तिविकास साधावयाचा.

वर्धायोजनेमध्ये गांधीजींनी ही जीवनशिक्षणाची कल्पना मध्यवर्ती ठरवली व भारतीयांनी अंगीकारलेल्या, लोकसत्ताक समाजवादी समाजव्यवस्थेच्या धोरणाला सुसंगत असे, एक मूलोद्योग मानून त्याचे माध्यम करण्याचे नवीन सूत्र आखले तेव्हा ताराबाईंना आपल्या मॉन्टेसोरीनिष्ठेची व गांधीनिष्ठेची सांगड आपल्या शिक्षणपद्धतीत कुठलीही तडजोड न करता घालता आली याचे मर्म त्यांच्या या वृत्तीत तर आहेच, शिवाय गांधीजींच्या व मॉन्टेसोरींच्या बालकाच्या स्वातंत्र्याविषयीच्या, स्वयंविकाससंबंधीच्या कल्पना समान होत्या. सामाजिक जीवनाच्या, शिक्षणाच्या, जीवनशिक्षणाच्याही विचारात तफावत नव्हती. उद्योगातून अनुभव, अनुभवातून शिक्षण हे सूत्र दोघांच्याही तत्त्वप्रणालीत मुळाशी होते. मात्र मूलोद्योग पद्धतीशी बालशिक्षणाचा मेळ घालताना ताराबाईंनी शासनाने नेमून घेतलेल्या साच्यात आपली शिक्षणपद्धती अडकू दिली नाही. Freedom of the Child हा मॉन्टेसोरींचा मंत्र सांभाळला. एखाद्या जीवनव्यवहाराचे माध्यम करून शिक्षणात सूत्रबद्धता आणण्याची कल्पना त्यांच्या प्रयोगांत, प्रयत्नांत फार पूर्वीपासून दिसते. दक्षिणामूर्ती सोडल्यावर अमरावतीमध्ये मागासमागातील महिलांमध्ये साक्षरताप्रसार करताना त्यांच्या ओव्यांचे माध्यम करायचा प्रयत्न, आबारी प्रमाच्या मनोवृत्तीला एखाद्या छंदाचे माध्यम करून वळण लावण्याची धडपड, आदिवासी मुलांना बालसंगोपनाचे माध्यम तर गुराखी-पोरांसाठी निसर्गाचे माध्यम.



येनकेन प्रकारेण समाजाच्या शेवटच्या स्थरापर्यंत शिक्षण, बालशिक्षण नेऊन भिडवण्याचे त्यांचे ध्येय व ते शेवटास तडीस नेण्याचे अगदी टोकाचे प्रयत्न यांतून आंगणवाडी, कुरणशाळा व शेवटी खास आदिवासींच्या समस्येवर उत्तर म्हणून काढलेला विकासवाडी या सातळीसंस्थेचा प्रयोग असे मौलिक आकार त्यांच्या हाती लागले.

पालकशिक्षणाचा समावेश, प्रौढशिक्षण, प्रौढसहकारावर भर, हाही ताराबाईंच्या कार्याचा एक विशेष मानता येईल.

धर्म, नीती, कायदा, शिक्षण, भाषा, पैसा, सामाजिक परंपरा इत्यादींमधले अनेक तपशील पुष्कळदा वेदवाक्यसदृश होऊन बसतात आणि या सर्व बाबी अखेर माणसांकरता आहेत, माणूस त्यांच्याकरता नाही ह्या वस्तुस्थितीची विस्मृती होते. बालक आणि शिक्षण यांच्यातले असे नाते ताराबाई कधी विसरल्या नाहीत म्हणूनच त्यांनी बालकाला केन्द्र मानून शिक्षणपद्धतीत योग्य ते फेरफार करण्याचे स्वातंत्र्य स्वतःपाशी कायम ठेवले. मुलांनी आपल्याकडे आले पाहिजे असा हेका न धरता ताराबाईंची शाळा त्यांच्या अंगणात, कुरणात गेली. मुलांना आकर्षक, स्वीकारार्ह वाटेपर्यंत त्यांनी शिक्षणाचे स्वरूप बदलले.

ताराबाईंच्या उड्या नेहमीच मोठ्या असत. बांसबाहून त्या मुंबईला आल्या त्याच एक बालमंदिर काढण्यासाठी नव्हे तर महाराष्ट्रात बालशिक्षणप्रसार करण्याच्या उद्देशाने एक आदर्श शिक्षणसंस्था घडविण्यासाठी, बोर्डीला त्या गेल्या ते प्रत्यक्ष प्रयोगातून ग्रामीण बालशिक्षणाची घडी बसविण्याकरता आणि कोसबाडच्या प्रयोगात प्रश्न मूठभर वारली मुलांचा नसून समाजाच्या शेवटच्या स्तरापर्यंत आपला शिक्षणविचार आपण पोचविणार आहोत, राष्ट्राच्या एका मोठ्या बिकट समस्येला आपण उकल पाडायला घेतला आहे याची जाणीव ठेवून. मात्र ताराबाईंच्या स्वप्नांची उंची नेहमीच मोठी असली तरी त्यांची नजर केवळ आभाळात कधीच नसे आणि पाय तर नेहमीच जमिनीवर असत. सदोदित समाजाच्या वरच्या, खालच्या दोन्ही स्तरांशी सांधे जोडीत, तडजोडी करीत त्यांनी आपल्या संस्थांना आकार दिला. राजेरजवाडे, नेते, राजकारणी, शासनाधिकारी, शिक्षणक्षेत्रातील नामवंत, साऱ्यांचे लक्ष आपल्या कार्याकडे वेधून घेण्याचे सर्व वैध प्रयत्न त्यांनी केले; त्याबरोबरच आपले अंगीकृत कार्य पुढे नेण्याच्या दृष्टीने उपयुक्त ठरेल अशा प्रत्येक लहानसहान व्यक्तीला हाताळून, आपली म्हणून तिच्याकडून जमेल तेवढे काम घेण्याचे धोरण ठेवले. ताराबाईंसारख्या व्यक्तिमाहात्म्य न मानणाऱ्या व कोपऱ्यात बसून काम करायला आवडणाऱ्या व्यक्तीच्या बाबतीत ही कसरत म्हणजे साधनेचा

भागच ठरत असेल.

लोकशाही वृत्ती हा ताराबाईंचा आणखी एक विशेष मानायला हवा. त्यांना, 'प्रोप्रायटर-शिप' नको असे. ज्या पद्धतीने नूतन बाल शिक्षण संघाची कार्यप्रणाली त्यांनी आखली, ज्या पद्धतीने शिशुविहारमधल्या प्रशिक्षणाच्या परीक्षांना मान्यता मिळवली, अभ्यासक्रम व परीक्षासमिती ठरवली, आपल्या कार्याच्या तपासणीसाठी, मूल्यांकन समिती बनवून तिचे वेळोवेळी मार्गदर्शन घेण्याची गरज व्यक्त केली, त्या सर्वांतून लोकशाही मूल्यांची प्रगल्भ जाण दिसते.

ताराबाईंचा चतुरस्र उरक हा सदैव त्यांच्या चाहत्यांचा कौतुकाचा विषय बनून असे. उतारवयात अन् एका हाती त्या इतके चौफेर व्याप–ताप कसे सांभाळतात, तपशिलांना, बारकाव्यांनाही न्याय कसा देतात याचा त्यांच्या निकटवर्तीयांनासुद्धा अचंबा वाटे. एक प्रकारची मानसिक शिस्त त्यांच्या मुळाशी होती. एकाच वेळी अनेक कप्प्यांचे भान ठेवणे आणि त्याच वेळी हातातल्या चालू उद्योगाकडे पूर्ण समरसतेने लक्ष पुरविणे हे कसब त्यांना साधत असे. त्यामुळे चिडचिड, तारांबळ यांतले काही न होता त्या शिशु-विहारातली स्वच्छता जातीने निरखीत, प्रभाच्या औषधपाण्यावर नजर ठेवीत, घरातल्या पाहुण्यांची सोय–गैरसोय पाहात. दोन्हीकडच्या संस्था, उत्सव–समारंभ यांचे नेतृत्व भूष-वीत. आणि त्याचवेळी गीतारहस्य वाचून ते आपल्याला पूर्वीपेक्षा किती अधिक समजते आहे यांच्या नोंदी करणे चालूच असे! एवढे करून पुन्हा प्रकृतीची हेळसांड करणे त्यांना मंजूर नसेच. 'होईल हळू हळू बरं. त्यासाठी थांबायचं नाही, पुढे जायचं. थांबलं की होत नाही.' असे म्हणत त्यांची आगेकूच चालू राही.

ताराबाईंनी सुमारे पन्नास वर्षे बालशिक्षणक्षेत्रात कार्य केले. त्यांपैकी पहिली काही वर्षे त्यांनी पूर्वप्राथमिक शिक्षणाचा प्रसार केला आणि नंतर त्या क्षेत्रातले काही मूल-गामी संशोधन, प्रयोग केले. एकूण, भारतात या क्षेत्रात काम करणाऱ्या प्रारंभिक व्यक्तीं-पैकी त्या एक आहेत. पूर्वप्राथमिकशिक्षणाचे तोवर कागदोपत्रीच असलेले महत्त्व प्रत्यक्ष व्यवहारात उतरवण्याचे बरेचसे श्रेय ज्या थोड्या प्रमुख व्यक्तींकडे जाते त्यांपैकी एक ताराबाई होत. मात्र मुलांच्या शिक्षण-वाटेतला 'बालमंदिर' हा एक टप्पा आज ठरून गेला असला आणि बालमंदिराचे महत्त्व सामाजिक गरज म्हणून आज पटलेले असले तरी बालशिक्षणामागची भूमिका आजच्या पालकांना कितपत कळलेली आहे याची शंकाच आहे. त्यामुळे घर व बालमंदिर एकमेकांना पूरक असावीत ही कल्पना केवळ कल्पनास्वरूपातच राहिली आहे. शिक्षणपत्रिकेसारख्या शिक्षणविषयक नियत-कालिकांमधून, शिक्षक–पालक सभा, संघटनांमधून पालकांची या बाबतीतली समज, सहकार्य, जागरूकता वाढवण्याचे प्रयत्नही आजकाल तरी थंडावल्यासारखेच दिसतात. बालमंदिरांची तपासणी करून त्यांना मार्गदर्शन करणारी खाजगी वा शासकीय यंत्रणा



निर्माण न झाल्यामुळे आज गल्लोगल्ली अप्रशिक्षित लोकांनी अपुऱ्या जागेत काढलेल्या बालशाळा इतक्या बोकाळल्या आहेत की त्यामुळे बालशिक्षणाचा मूळ सिद्धान्तच डागाळू लागला आहे, आणि बालशिक्षणाचा प्रसार झाला असला तरी दर्जा आणि गुणवत्ता मात्र खालावली आहे. प्रत्यक्ष शिक्षणपद्धतीत, ताराबाई-अनुताईंसारख्या जातिवंत शिक्षण-तज्ज्ञांनी प्रयोग करणे वेगळे आणि गल्लीबोळांतल्या कोणत्याही सामान्य कुवतीच्या शिक्षिकेने आपल्या सोयीनुसार बदल करीत जाणे निराळे. आजकाल शहरांतल्या, सरकारमान्य बालमंदिरांमधूनसुद्धा ताराबाईंच्या अध्यापनमंदिरांतून प्रशिक्षण घेऊन बाहेर पडलेल्या शिक्षिकांसकट सर्व शिक्षकशिक्षिका ज्या भेंडगुजरी प्रकाराने पंतोजी पद्धती-पासून ते नूतन बालशिक्षण पद्धतीपर्यंत कुठल्याही पद्धतीने आपल्या बालशाळेचा वेळ भरून काढीत असतात, तिला ढोबळपणे केलेला समन्वय म्हणणे धाडसाचे ठरेल!

दुसरे म्हणजे, मुलांचा शारीरिक, मानसिक, बौद्धिक, भावनिक विकास अधिक निरोगी पद्धतीने होणे, मुले अधिक धीट, समाजाभिमुख, शिक्षणाभिमुख होणे ही जी पूर्व-प्राथमिक शिक्षणाची मूळ उद्दिष्टे आहेत ती कितपत सफल होतात, सिद्ध होतात हे आता शहरी व ग्रामीण अशा दोन्ही पातळ्यांवर शास्त्रशुद्ध पद्धतीने पाहाणी करून अजमाविणे आवश्यक आहे. सध्या बालमंदिरातील सर्व मुले पुढे वेगवेगळ्या प्राथमिक व माध्यमिक शाळांमधून गडप होत असल्यामुळे स्वयंशिक्षण, स्वयंअनुभव यांसारख्या शैक्षणिक तत्त्वांमुळे त्यांच्या व्यक्तिमत्त्वात, वागणुकीत, दृष्टिकोनात कितपत, कोणता फरक पडतो हे मोजण्यास काहीच साधन उरत नाही. पूर्वप्राथमिक वयानंतरचे शिक्षण एकदम तर्के साचेबंद व चाकोरीतले होऊन जाते की विद्यार्थ्यांचे यशापयश हे सातवीच्या व शालान्त परीक्षेतल्या गुणांवरच ठरत असते.

अर्थात अशा प्रकारची छाननी केवळ ताराबाईंची बालशिक्षणपद्धती व बालशिक्षण-संस्था यांच्या बाबतीत न होता पूर्वप्राथमिक–शिक्षण–प्रसाराचे जे प्रयत्न व प्रयोग वेग-वेगळ्या पातळ्यांवरून व पद्धतींनी चालू आहेत (उदा. बालोद्यान पद्धतीची बालमंदिरे) त्या सर्वांचेच समग्रपणे मूल्यमापन केले गेले पाहिजे, तरच पूर्वप्राथमिक शिक्षणामागचा शैक्षणिक हेतू आणि आशय सिद्ध व साध्य होतो की नाही हे स्पष्ट होईल आणि या बालशाळांचे अस्तित्व अधिक समर्थनीय होईल, महत्त्व खऱ्या अर्थाने मानले जाईल; वृद्धिंगत होईल.

गिजुभाईंच्या व ताराबाईंच्या यशाचा बराचसा भाग त्या दोघांच्या लोकविलक्षण, चैतन्यपूर्ण व्यक्तिमत्त्वांमधून असामान्य कर्तृत्वशक्तीतून व समर्पणशक्तीतून निर्माण झाला. परंतु त्यांच्यासारख्या व्यक्ती विरळा. एरवी, शिक्षणाचा अवाढव्य डोलारा रचलेला असतो तो सामान्य, मर्यादित आवाक्याच्या शिक्षकांच्या अध्यापकांच्या खांद्यावर. कुरणशाळेसारख्या काही प्रयोगांमध्ये शिक्षकाच्या कार्यकुशलतेवर, हिकमती वृत्तीवर,

समर्पणावर फार भिस्त असते आणि त्यामुळे त्याची वैयक्तिक जबाबदारी फार वाढते. आज तरी शिक्षणक्षेत्र एक उपेक्षित, अनाकर्षक क्षेत्र समजले जाते. गरजेपोटी तो पेशा स्वीकारणाऱ्या किती शिक्षकांना त्या पेशामागच्या उदात्त कल्पनेची जाणीव असते ही शंकाच आहे. तेव्हा अशा स्थितीत कुरणशाळेसारख्या प्रयोगांना निश्चित स्वरूप देण्याचा, अभ्यासक्रम आखण्याचा प्रयत्न केला पाहिजे, असे वाटते. मात्र त्याच वेळी या प्रयोगातली सहजता, जिवंतपणा, लवचिकता जाऊन त्याचा निर्जीव साचा बनण्याचा धोकाही उत्पन्न होतो. ताराबाईंच्या ' कुरणशाळा ' या पुस्तिकेला प्रस्तावना लिहिताना कुरणशाळेची हीच मर्यादा जाणवून मुलभाबाई पाणंदीकरांनी लिहिले आहे, " ...पण जोवर हा प्रयोग श्रीमती ताराबाई मोडक व श्रीमती अनुताई वाघ यांच्यासारख्या अनुभवी व ध्येयवादी शिक्षणतज्ज्ञांच्या मार्गदर्शनाखाली होत आहे तोवर ही भीती बाळगण्याचे कोणतेच कारण नाही. "

ताराबाईंसारखे शिक्षणमहर्षी दिशा सूचित करण्याचे, फार महत्त्वाचे कार्य करून जातात. त्यांच्यामागून येणाऱ्या कार्यकर्त्यांना त्या पुढचे प्रश्न प्रत्यक्ष कार्यवाहीतून सोडवावे लागतात आणि ते बहुधा अनुत्तरित राहतात. कारण ते कार्यकर्ते शिक्षणमहर्षी नसतात. अर्थात ताराबाईंसारख्यांनी केलेल्या अद्‌भुत कार्याची महत्ता त्यामुळे कमी होते असे नाहीच.

ताराबाईंचे भाचे श्री. स. आ. केळकर यांनी १९६२ साली लिहिलेल्या ' ताराबाई व बालशिक्षण ' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत श्री. काकासाहेब कालेलकरांसारख्या अधिकारी विचारवन्तांनी या बाबतीत काढलेले उद्‌गार महत्त्वपूर्ण आहेत. त्यांनी लिहिले आहे —

" राष्ट्रीय जीवनाचा पाया मजबूत करण्याचे ताराबाईंचे काम मुंबईसरकारच्या नजरेस आले आहे...भारत सरकार देखील त्यांच्या कामाची कदर करील. पण कोण जाणे कशामुळे, जी गोष्ट सरकारच्या हाती गेली ती चैतन्यरहित होऊन जाते. परिसाचा लोखंडाला स्पर्श झाला म्हणजे लोखंडी वस्तूचा बाह्य आकार कायम राहतो, पण लोखंडाचे सोने होते. तसेच पण उलट प्रकारे ज्या प्रवृत्तीला सरकारचा हात लागतो त्या प्रवृत्तीची परिभाषा कायम राहिली, व्याकरणही बरोबर राहिले तरी त्यातील चैतन्य क्षीण होते व ती प्रवृत्ती जसजशी व्यापक होत जाईल तसतसे तिला भाडोत्री रूप येते... "

श्री. काकासाहेब कालेलकरांनी हा इशारा ध्वनित केला त्यावेळी ताराबाई हयात होत्या आणि पूर्णपणे कार्यरत होत्या. परंतु ताराबाईंसारख्या व्यक्ती अखेर समाजाच्या तळहातावर परीस ठेवून निघून जातात, मागे राहते ते त्यांचे कार्य.

ताराबाईंना एक्याऐंशी वर्षांचे प्रदीर्घ आयुष्य लाभले व ते त्यांनी अखेरच्या घटकेपर्यंत बालशिक्षणवेदीवर सत्कारणी लावले. शेवटची काही वर्षे त्या संस्था सोडून बाहेरही पडत नसत. संध्याकाळी अनुताईंना किंवा इतर कुणाला तरी बरोबर घेऊन, काठी टेकीत



कोसबाडच्या टेकडीवरच फिरायला जात, पुढे पुढे प्रकृती अस्वास्थ्यामुळे, पायदुखीमुळे तेदेखील थांबले. एकीकडे संस्थेचा पत्रव्यवहार पाहत, गुंते सोडवीत, सूत्रे सांभाळीत, शिक्षणपत्रिकेसाठी मजकूर लिहीत, संस्थेच्या छापखान्याकरता आर्थिक बळ कोठून मिळवावे याची चिंता करीत कधी ' सखाराम बाइंडर 'सारख्या नाटकावर परीक्षणही लिहीत त्या आता तिसऱ्या घंटेची वाट पाहत होत्या. तसा त्यांचा परिवार त्यांनी शंभरी गाठावी अशी इच्छा बाळगून होता आणि ताराबाईंनाही जीवनात पूर्णपणे रस होता; परंतु ते व्हायचे नव्हते.

आतापर्यंत मोठमोठ्या दुखण्यांशी त्यांच्या झुंजार शरीराने यशस्वीरीत्या मुकाबला केला होता. मधुमेह, रक्तदाब, हृदयरोग या पंचवीस वर्षे साथ देत आलेल्या रोगांच्या यादीत मधल्या काळात अर्धांगही सामील झाला होता. कोसबाडला राहायला आल्यानंतर पाच वर्षांच्या अंतराने दोनदा त्यांना अर्धांगाचे झटके येऊन गेले होते. पहिल्या झटक्यात उजवा हात व एक पाय कमजोर झाला होता, त्यामुळे त्यांना एक पाय ओढत चालावे लागे. उजव्या हाताने लिहिता येईनासे झाले म्हणून त्यांनी डाव्या हाताने लिहिण्याचा सराव करून घेतला. पुढे आश्चर्याची गोष्ट म्हणजे दुसऱ्या झटक्यात त्यांना उजव्या हातानेही पुन्हा लिहिता येऊ लागले; पण अक्षर वेडेवाकडे येई. या झटक्यात Facial paralysis होऊन चेहरा थोडा वाकडा झाला.

परंतु आतापर्यंतच्या सर्व आजारातून ताराबाई जिद्दीने बाहेर पडल्या होत्या; कोणत्या दुखण्याने त्या खचल्या नव्हत्या. दुखण्याची, प्रकृतीची कधी हेळसांड करायची नाही, डॉक्टरांच्या सल्ल्याकडे दुर्लक्ष करायचे नाही; मात्र दुखण्याचा बाऊही करायचा नाही असे त्यांचे धोरण होते. पथ्यपाणी, औषधोपचार, विश्रांती; व्यायाम, मालिश इ. बाबतीत त्यांनी कधी चालढकल केली नाही ( शेवटची काही वर्षे पोटाच्या विकारामुळे त्या बिनतिखट आहार घेत. ) मात्र प्रकृतीखातर कार्य बाजूला ठेवणे त्यांना पटत नसे.

आता १९७३ च्या आरंभास त्यांच्या छातीत गाठ लागू लागली; ती मात्र कर्करोगाची चाहूल होती ! कॅन्सर आपल्या घातकी स्वभावानुसार मुंगीच्या पावलांनी सुरुवात करून मग हत्तीच्या पावलांनी पुढे सरकला. १९ एप्रिल १९७३ रोजी ताराबाईंचा ८१ वा शेवटचा वाढदिवस साजरा झाला आणि मे महिन्यात मुंबईहून त्यांच्या नेहमीच्या तज्ज्ञ डॉक्टरांना पाचारण करण्यात आले. दुखण्याच्या गांभीर्याची कल्पना येताच डॉक्टरांनी ताराबाईंना पुढील तपासणीकरिता मुंबईला नेण्याचे ठरविले. फार थोड्या दिवसांसाठी आपण जात आहोत, लौकरच परत येऊन आपण पूर्ववत कामाला लागू अशी ताराबाईंची कल्पना होती आणि त्याप्रमाणे कार्यकर्त्या मंडळींचा, संस्थेचा तात्पुरता निरोप घेऊन त्यांनी कोसबाड सोडले. कॉलनी नर्सिंग होम या माटुंगा येथील डॉ. फडके यांच्या शुश्रूषालयात त्यांना दाखल करण्यात आले. ताराबाई तेथून पुन्हा कोसबाडला परतल्याच नाहीत.

कॅन्सरची गाठ काढून टाकण्याची पहिली शस्त्रक्रिया यशस्वी झाली, सातव्या दिवशी टाके काढले. ताराबाईंना त्या दिवशी खूपच बरे वाटत होते. " डॉक्टर, आता कोसबाडला कधी जायचं ? " त्यांनी डॉ. निळूभाऊ आपटे यांना विचारले.

" दोनचार दिवसांनी जाता येईल. " त्यांना उत्तर मिळाले.

ताराबाई आणि अनुताई बरेच दिवस कोसबाड येथे आदिवासी विद्यार्थ्यांसाठी छापखाना काढायच्या खटपटीत होत्या. नुकताच त्यांना छापखान्याकरिता एकरकमी देणगी देणारा एक दाता भेटला होता आणि त्याप्रमाणे ३१ ऑगस्ट १९७३ रोजी गणेश-चतुर्थीच्या सुमुहूर्तावर छापखान्याचे उद्‌घाटन करायचे ठरले होते. तोवर आपण बऱ्या होऊन परत जाऊ, निदान एक दिवसापुरते उपचार थांबवून, जाऊन येता येईल अशी ताराबाईंची कल्पना होती.

परंतु दुखण्याने पाहता पाहता उग्र स्वरूप धारण केले, एकदम रंगच बदलला. ताराबाईंना वेदना असह्य होऊ लागल्या, जीव घाबरा होऊ लागला. आपले हे शेवटचे दुखणे असल्याची ताराबाईंनाही आतून कल्पना आली. अनुताई एका दिवसापुरत्या काही कामासाठी कोसबाडला गेल्या होत्या त्यांचा ताराबाईंनी ध्यासच घेतला. अनुताईंना तेवढ्या रात्री दूरध्वनी करून खास गाडीने परत आणण्यात आले; अनुताई मग पुन्हा त्यांना सोडून गेल्याच नाहीत.

सुमारे अडीच-तीन महिने ताराबाई मुंबईत रुग्णावस्थेत होत्या. त्यांचे शरीर दुखण्याशी झगडत होते आणि त्यांचे आशावादी आप्तेष्ट –व कधी कधी स्वत: ताराबाईसुद्धा– कोणता तरी चमत्कार घडेल व ताराबाईंच्या प्रकृतीत पुन्हा सुधारणा होईल, यातून अजूनही त्या उठतील अशी आशा, म्हणण्यापेक्षा इच्छा बाळगून होते. ताराबाईंच्या देहाने अनेकदा ढाल बनून, मोठाले आजार परतवून लावले होते, हेही खरेच.

परंतु अखेर कर्करोगापुढे नाइलाज झाला. दुखणे पुढे सरकत राहिले.

ताराबाईंच्या छोट्याशा कुटुंबातला एकही कुटुंबीय आता हयात नव्हता. प्रभा आणि केव्हा जाऊन विसांहून अधिक वर्षांचा काळ लोटला होता ! परंतु त्यांचा हा एकलेपणा कोणाच्या ध्यानातही येत नव्हता इतकी भेटायला येणाऱ्यांची रीघ लागली होती.

नाकामध्ये ऑक्सिजनच्या नळ्या, डाव्या हाताला सलाइन जोडलेले, आणि सतत ठणका लागलेल्या सर्वांगावरून एकेका वेळी पाच पाच माणसे–यात शिक्षिका, स्नेही, नातेवाईक, शिष्या सारे आळीपाळीने असत– हात फिरवीत असलेली. अशा स्थितीत भेटायला येणाऱ्या प्रत्येक व्यक्तीशी ताराबाई चारदोन वाक्ये बोलत. नवीन कोणी आले की खोलीत कोणी असेल त्याच्याशी त्याची योग्य संदर्भात ओळख करून देणे, त्यांच्या कामाची, प्रकृतीची आस्थेने चौकशी करणे, त्यांना कोसबाडला यायचे आमंत्रण देणे, विनोद करून हसविणेही चालू असे. शिवाय भेटायला येणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला हात



जोडून नमस्कार करण्याबाबत कटाक्ष असे. त्यासाठी दरवेळी सलाइन लावलेल्या डाव्या हातावर उजवा हाडकुळा, सुरकुतलेला हात दुसऱ्याच्या मदतीने उचलून ठेवीत.

समाचाराला येणाऱ्यांपैकी काहींची तर दहापंधरा वर्षांत गाठभेटही झालेली नसे. ताराबाई या दुखण्यातून उठत नाहीत याची कल्पना आलेली असल्यामुळे कुठून कुठून माणसे भेटीसाठी, अखेरच्या दर्शनासाठी येत होती. त्यांतल्या प्रत्येकाला ताराबाई बरोबर ओळखत, त्याची विचारपूस करीत. कोणी फार पूर्वी एखाद्या पुस्तकासंबंधी त्यांच्याकडून काही माहिती विचारून गेलेला असे, त्याला नेमकी त्या पुस्तकाविषयी विचारणा होई. कोणी दोन दिवसांपूर्वी सर्दीतापाने आजारी असल्याचे कानावर आलेले असे. तो आला की त्याला बसायला, विश्रांती घ्यायला जागा आहे की नाही याची चौकशी होई. आपल्या शेजारच्या पलंगावर पडायचा त्याला आग्रह केला जाई. कोणी अस्वस्थपणे घुटमळताना दिसले की " तो बाथरूम शोधतो आहे वाटतं, त्याला दाखवा ", म्हणून व्यवस्था केली जाई. कुणाला शेवटचे आमंत्रण दिले जाई, " अजून तुम्ही कोसबाडला आलाच नाहीत पण जरूर या ... ... Perhaps it may be too late, I may not be there..."

वेदना कमी झाल्या व जरा आराम वाटला की वाचन सुरू होई. ' दुर्दम्य 'चा पहिला भाग त्या दुसऱ्यांदा वाचून नेत होत्या. श्री. माधव मनोहर येताच त्यांना सांगण्यात आले, " लगेच दुसरा भाग पाठवून द्या. तो जास्त चांगला आहे असं म्हणतात. त्यानंतर मग न. र. फाटकांचं ' लोकमान्य ' वाचून पाहणार आहे. "

कधी कधी मात्र यातना सहन होत नसत. अशा वेळी त्यांचा सलाइन लावलेला हात कोणीतरी दाबून धरून ठेवावा लागे. ताराबाईंना ते अगदी असह्य होई.

एके दिवशी सरलाताईंनी तो हात घट्ट धरून ठेवला होता.

" सरलाताई, हात सोडा बघू ! सरलाताई शहाण्या आहेत. त्या माझं ऐकतील. सोडा. "

सरलाताईंनी साहजिकच ऐकले नाही. ताराबाई एकदम चवताळून ओरडल्या, " तुम्ही हल्ली फार अनरीझनेबल, इर्रॅशनल होत चालला आहात, बरं का ! माऊंना सांगितलं पाहिजे ते अमेरिकेहून आल्यावर. "

एकदा तर ताराबाई चिडून म्हणाल्या " आजतागायत कुणी माझा एवढा अपमान नव्हता केला. तुम्हांला सर्वांना दोन दोन थपडा दिल्या पाहिजेत. "

ऐकणारी सारी नेहमीचीच, जवळची होती. कोणालाही कधीच चुकूनही न मारणाऱ्या ताईंच्या तोंडून असे वाक्य निघावे ! म्हणजे किती वेदना होत असतील...

इतक्यात ताराबाईच म्हणाल्या, " माझ्या जागी लहान मूल असतं तर पंधरा मिनिटांत गेलं असतं. इतक्या भयंकर कळा आहेत या. "

मग पुन्हा जरा उतार पडला की विनोद सुरू होई. सगळ्यांना चिडवीत आणि हसवीत, कधी कधी अनुताईंना छेडत, " अनुताईंनी एव्हाना जामाबिगासुद्धा ठरवून टाकली असेल, काय हो अनुताई ? "

सरलाताई शिशुविहारात जाता जाता भेटायला आल्या की त्यांचा जामानिमा पाहून त्यांची थट्टा सुरू होई. " या आल्या आमच्या रॉयल सरलाताई ! काय सरलाताई, भाऊ वेळेवर परत येताहेत की नाही आमच्यासाठी ? "

" आम्ही खेड्यात गरीब संस्थेत काम करतो पण सरलाताई सुखवस्तू आहेत आणि सुखवस्तू संस्थेत काम करतात. आम्हाला पाहायला आवडतं " असे त्या म्हणत.

सरलाताईंना ' कामचलाऊ डॉक्टर ' अशीही एक पदवी मिळाली होती कारण ' काव्याचे लोणचे खा ', ' कढत पाणी पीत जा ' अशा त्यांच्या सारख्या सूचना चालत.

फार पूर्वी प्रभा व ताराबाई देवधर कुटुंबाबरोबर महाबळेश्वरला गेल्या होत्या. त्यांना त्यावेळी हृदयविकाराचा झटका येऊन गेला होता त्यामुळे एका उंच पॉइंटपाशी त्या थांबल्या.

" तुम्ही सर्व जाऊन या, " त्या म्हणाल्या.

पण भाऊ म्हणाले, " आम्ही तुम्हाला उचलून नेतो. "

" माझं वजन फार आहे हो. "

पण भाऊ व त्यांचे बंधू अप्पा देवधर यांनी त्यांना खरोखरच हातांची पालखी करून वर नेले.

" तुमचं वजन किती का असेना, अगदी शेवटच्या क्षणीसुद्धा बोलवा. कुठेही असलो तरी येऊ आणि उचलू तुम्हाला "–असेही बोलणे झाले होते. आता ताराबाईंना सारखी भाऊंची आठवण येत होती. " भाऊंना बोलावलं की नाही ? त्या दोघांनी मला कबूल केलं आहे. आता या म्हणावं ! "

एकदा राम कदम खोलीत होतेच; अनुताई आणि तायाही होत्या. तेवढ्यात श्री. छापेकर आले. लगेच " व्यवस्था झाली, चला अनुताई, चौघं जमलेच आहेत. आता उचला मला ! आणि पुढे मडकं धरून चालतात ना, तशा तुम्ही चाला ही सलाइनची बाटली धरून ... बाकी तुम्ही बायका काय कामाच्या म्हणा, त्याला हवेत चांगले भक्कम पुरुष ! "

वयाच्या मानाने ताराबाईंचे केस दाट होते. दुखण्यात गुंता झाल्यामुळे ते कापावे लागले. त्यावरही विनोद झाला. " चला, श्रावणी सोमवार आहे ना आज ! मुहूर्तावर कापून टाका तर मग ! "

अशाने वातावरणातला ताण कमी होई. डॉक्टरांच्या व परिचारिकांच्याही त्या मागे लागत.



डॉ. तुळपुळे यांना नाव मिळाले होते ' आद्य डॉक्टर '; पुतण्या डॉ. रामभाऊ मोडक म्हणजे ' डॉक्टर डिक्टेटर ' "— हे इथले हेड वॉर्डर ! सारखं ' हे करू नका, ते करू नका. ' आता मीच त्याला ऑर्डर करते, ' यू गेट आउट ' ! "

या पुतण्याने स्वतःच्या विवाहाच्या वेळी ताराबाईंना एक खादीचे पातळ दिले होते. त्याबद्दल आभार मानायचे राहून गेले असे वाटून आता त्यांना पत्र लिहून घेतले गेले, " तुम्ही मला पातळ दिलेत. फार फार आभारी आहे. पत्र फारच उशीरा लिहित आहे. क्षमा करा.— तुमची, ताराबाई मोडक. "

या विवाहाला त्यावेळी एकतीस वर्षे होऊन गेली होती !

परिचारिकांनादेखील वेगवेगळी नावे मिळाली होती, " या मिस इन्ट्राव्हेनस ! " दुसरी ठरली होती, " वॉर्डसुंदरी. " तिसरीचे आडनाव ' केळकर ' होते, म्हणून तिला ' सूनबाई ' म्हणत.

एका नर्सने गळ्यात लॉकेट घातले होते.

" काय ग, लॉकेटमध्ये कुणाचा फोटो आहे ? "

" आहे देवाचा. "

"—नवऱ्याचा ठेव की ! "

" हाच बरा आहे. "

" ठेवशील ! ठेवशील ! "

ताराबाईंचे भाचे श्री. बाबा गद्रे व त्यांच्या पत्नी सौ. विजया गद्रे सतत त्यांच्या सेवेत असत. हे जोडपे चांगले पन्नास–पंचावन्न वर्षांचे. परंतु त्यांचीही थट्टा होई.

एकदा बाबा गद्रे ताराबाईंच्या पायागती उभे होते. उशाशी विजयाताई होत्या. खोलीत आणखीही कोणी कोणी होते.

" तो कोण ग उभा आहे ? " ताराबाईंनी विचारले.

" बाबा आहे. " विजयाताई म्हणाल्या.

" —तरीच मला वाटलं, माझ्याकडे येवढा टक लावून कोण बघतोय म्हातारीकडे ! "

विजयाताईंना एकदम भरून आले. खाली वाकून ताराबाईंचा पापा घेत त्या म्हणाल्या,

" नाही हो, तो तुमच्याकडेच बघत होता. "

" मुळीच नाही, तुला शोधत आला असेल तो ! "

सगळ्यांनाच हसू आले.

" अग, ' तो ' कोण ? " पुन्हा त्या म्हणाल्या.

" बाबा ! "

" ए, तू त्याला ' ए ' म्हणालीस, आणि माझ्यासमोर ! "

" ताई, काय हा तुमचा विनोद ? " सरलाताई शेवटी हसत हसत म्हणाल्या.

" अहो, माणसाचा स्वभाव शेवटच्या घटकेपर्यंत तसाच राहतो, बदलत नाही ! " —ताराबाईंचे उत्तर !

सलाइनची नवी बाटली आणली की पृच्छा होई, " हे काय, हा मँगोला की गोल्ड स्पॉट ? "

मालूताई मनोहरांनी एक दिवस त्यांच्यासाठी सुरळीच्या पाटवड्या करून आणल्या. " छानच झाल्या आहेत. इंदिरा गांधींसाठी अशाच केल्या होत्या, त्यांनाही आवडल्या होत्या, नाही ? "

श्री. आवटींची तर पंचवीस वर्षांनी भेट झाली तरीसुद्धा लगेच ओळखले. कुणी नवीन आले की पृच्छा होई, " यांना ओळखलंत ना ? " शेवटी एकदा चिडून म्हणाल्या, " माझी परीक्षा काय घेता सारखी ? "

—पण हळू हळू स्थळकाळाची गफलत होत चालली होती.

ताया आणि सुंदर या दोन आदिवासी बहिणी बरीच वर्षे ताराबाई-अनुताईंच्या सहवासातच होत्या. दोघी रात्रीच्या शाळेत सातवीमध्ये शिकत. दिवसा ताया ताराबाईंचे घरकाम सांभाळी. स्वयंपाक, शिवणकाम, पापड-कुरड्या सारे दोघी करीत. सुंदर तर बालवाडीही चालवीत असे. सात वर्षांपूर्वी वडील वारल्यापासून धाकट्या भावंडांचे शिक्षण त्याच करीत होत्या, त्यांचा अभ्यास घेत होत्या. घर चालवीत होत्या. वडलांचे कर्जही त्यांनी फेडले होते. शिक्षणाविषयी एवढे जागरूक असलेले, झालेले हे पहिलेच आदिवासी कुटुंब.

एकवीस वर्षांची सुंदर आणि अठरा वर्षांची ताया यांच्यात तीन महिनेपर्यंत एका लहानशा गोष्टीवरून अबोला होता.

ताराबाईंच्या या आजारात ताया सतत त्यांच्या सेवेत होती. सुंदर भेटायला आली, ती तायाशी बोलली.

ताराबाईंनी लिहिलेल्या, लिहून घेतलेल्या शेवटच्या पत्रांपैकी एक त्यांना गेले.

" चि. ताया व सुंदर,

अनेक आ.

तुम्ही दोघींनी अबोला सोडला. तुमचे भांडण मिटले. फार बरे वाटले. बहिणी-बहिणींनी फार दिवस भांडण लक्षात ठेवायचेच नसते. अशाच, खेळीमेळीने राहा. आनंद वाटला.

तुमची,
ताराबाई मोडक

छापलान्याच्या उद्‌घाटन-समारंभासाठी कोसबाडला जायचा मात्र त्यांनी घ्यासच घेतला होता. " अनुताई, तुम्ही मला खांद्यावर घ्या उचलून. मग आपण पळत पळत जाऊ कोसबाडला. " असे सारखे चालले होते. " डॉक्टर लाडांच्या व्यायामशाळेत जाईन आणि मालिश करून घेऊन पुन्हा हिंडतीफिरती होईन. संस्थेला मी अजून हवीच आहे. " असेही म्हणत.



अनुताईंना त्यांची तगमग पाहवेना. अखेर ताराबाईंच्या समाधानासाठी त्यांनी तेथल्या तेथे एक छुट्टपुटीचा उद्‌घाटन समारंभ घडवून आणला ! ताराबाईंकडून संदेश व त्यावर सही घेण्यात आली. पेढे वाटण्यात आले. उपस्थितांनी टाळ्या वाजविल्या.

आपण कोसबाडला परतलो आहो अशीच ताराबाईंची समजूत झाली होती, व त्याप्रमाणे बाहेर मांडव घालून पंगती उठत होत्या ! भोजनबेत त्यांनीच ठरवून दिला होता.

" गुजराती पाहुण्यांना तोंडल्यांची भाजी परतून केली आहे का ? त्यांना पाणी घातलेली आवडत नाही ! "... " ताया, चहा दे सर्वांना आणि स्वयंपाक लौकर कर. सगळ्यांना माझ्यासारखं बिनतिखटाचं वाढशील ! तिखट घाल. आटप, इथे उभी राहू नकोस. " असे सारखे चालले होते.

त्या दिवशी भेटीला येणाऱ्या सगळ्यांनी तृप्तीची ढेकर देत खोलीत प्रवेश करायचा होता.

" चहा घेतला ?, जेवल्याशिवाय कुणी जाऊ नका हं. "

सर्वांना ताकीद मिळत होती.

मध्येच रागावून म्हणाल्या, " हे काय, अशा आनंदाच्या प्रसंगात प्रभाला कशी विसरता सगळी ? "

त्यांच्या पलंगासमोरचा प्रभाचा फोटो, त्यांना दिसला नव्हता ! सरलाताईंनी गडबडीने जाऊन आपल्या घरचा एक प्रभाचा फोटो फ्रेम करून आणला व भिंतीवर लावला.

ताराबाईंना असे फसविताना अनुताईंचे डोळे भरून येत होते. पण त्या दिवसापासून ताराबाईंची तळमळ थांबली खरी. उद्‌घाटनाचा विषय पुन्हा निघाला नाही.

मध्येच एके दिवशी त्यांना पैशाची काळजी लागली होती.

उद्‌घाटनाचा भोजनबेत ठरत होता, " बुंदीचे लाडू किती करावेत ? "

" सहाशे करू या ! "

" प्रत्येक पानाला खर्च किती येईल ? ...पण आपल्याजवळ तर एवढे पैसे नाहीत. मग लाडू नकोत ! किंवा कमी करू या. "

" चारशे करावेत." अनुताई म्हणाल्या. " तुमच्या-माझ्या खात्यावर आहेत की पैसे."

" आहेत ना, मग ते घ्या सगळे. किंवा कुणाकडून तरी घ्यावेत सध्या. "

शिशुविहार ताराबाईंना दरमहा रु. १०० निवृत्तिवेतन देत असे. या शेवटच्या दोन वर्षांत संस्थेने त्यांचा पगार रु. १०० चा रु. २०० केला.

" संस्थेनं पगार का वाढवला ? आधीच मी काम इथलं करते आणि पगार तिकडचा.

घेते. शिशुविहार मला पगार देतं हेच जास्त आहे."

"आता तर घ्या! उरला तर शिशुविहारला परत द्या. पैसे पुरत नाहीत म्हणून तुम्ही औषधाची काटकसर करता म्हणून पगार वाढवला आहे."

त्याप्रमाणे खरोखरच ताराबाईंनी रु. ६०० वेगळे ठेवले होते. ताराबाईंच्या मृत्यूनंतर ते त्यांच्या इच्छेप्रमाणे अनुताईंनी शिशुविहारला परत केले. संस्थेने त्यात रु. ४०० ची भर घातली व रु. १००० ताराबाई मोडकांची देणगी म्हणून नोंदले गेले!

दुखणे वाढले तशी एकच काळजी ताराबाईंना ग्रासत होती. आपले डोके शाबूत राहील ना, असे त्यांना भय वाटत होते. त्यांच्या सासरच्या बऱ्याच माणसांचे मानसिक दौर्बल्य त्यांनी अनुभवले होते व माहेरीदेखील तशी काही उदाहरणे होती. परंतु डॉक्टर त्यांना खात्री देत होते, "ताराबाई, तुमचा टॉप अगदी टॉप स्थितीत आहे. काही काळजी करू नका. You are a very brave fighter. देवाला दिसत नसेल का ते?"

एकीकडे आपण कोणत्या दिवशी जगाचा निरोप घ्यायचा याची तारीखदेखील त्यांनी विचारपूर्वक ठरवली होती. २४ ऑगस्टला इंदिराबाई, २५ ऑगस्टला एक भाऊ, २६ ऑगस्टला प्रभा, २८ ऑगस्टला दुसरा भाऊ असे पाठोपाठ ऑगस्टअखेरीसच त्यांच्या घरातले मृत्यू झाले होते.

"माझ्यासाठी २७ ऑगस्ट ही एकच तारीख काय ती शिल्लक आहे." असे त्या म्हणत. अखेर ३१ ऑगस्ट ही छापखान्याच्या उद्घाटन-समारंभाची तारीखच मृत्यूने निश्चित केली. ३१ ता. ला कोसबाडला परत जाण्याचा ताराबाईंनी चंग बांधला होता, तो अखेरीस असा पुरा झाला.

त्या दिवशी गणेशचतुर्थी होती. प्रभाचा मृत्यूही त्याच तिथीला झाला होता. याच मुहूर्तावर व तारखेलाही ताराबाईंच्या शिशुविहारची स्थापना झाली होती आणि मॅडम मॉन्टेसोरींचा जन्म याच तारखेला झाला होता.

३१ ऑगस्ट १९७३ रोजी सकाळी ७॥ वाजता ताराबाई मोडक अर्धवट निद्रावस्थेतच मृत्यूच्या आधीन झाल्या.

आपल्या अंत्ययात्रेच्या प्रसंगी कोणीही भाषणे करू नयेत अशी इच्छा त्यांनी व्यक्त केली होती. आपला अंत्यविधी कोसबाडला व्हावा आणि अनुताईंनी आपल्याला अग्नी द्यावा अशाही दोन इच्छा त्यांनी व्यक्त केल्या होत्या. परंतु अग्नी देण्याचे धाडस मात्र अनुताईंच्याने झाले नाही.

ताराबाईंचा अचेतन देह घेऊन एक खास बस मुसळधार पावसात रानातल्या कोसबाडटेकडीच्या दिशेने निघून गेली.

टेकडीवर ज्या ठिकाणी ताराबाईंचे दहन झाले तेथे आज एका साध्याशा समाधीवर एक तुळशीचे रोपटे डुलत असते...

# प रि शि ष्टे

## — १ —

ताराबाईंनी आपले अनुभव, आठवणी किंवा विचार एकत्रितपणे लिहून ठेवलेले नाहीत. परंतु त्यांच्या संस्थेत, घरगुती वातावरणात त्यांचे वाढदिवस साजरे होत, त्यावेळी त्या जे निवेदन करीत त्यातून वेळोवेळी त्यांचे विचार, व्यक्तिमत्त्व, कार्यविषयक भूमिका व कार्यकर्त्यांकडून असलेल्या त्यांच्या अपेक्षा इ. प्रतिबिंबित होई.

१९६८ ते १९७२ या सालांतील निवेदनांचा हा सारांश आहे :

### 'मी'

मला माझे जीवनकार्य खरे लाभले पुष्कळ उशिरा. शिक्षण व त्यातही लहान मुलांचे शिक्षण याकडे माझा कल होता. खरी मी एक मुलींची शाळाही काही दिवस चालवली. पण खरे वाचन, मनन अथवा अभ्यास केलेला नव्हता. तेव्हाही 'मुलांना कसे वाढवावे, वळण लावावे' या विषयावर स्त्रियांच्या सभेत भाषण केलेले मला आठवते. पण ते सर्व वरवरचे, आणि खरे दर्शन न घडलेल्या अवस्थेतील होते, असे वाटते. त्यावेळी B. A. झालेल्या स्त्रिया फार कमी, म्हणून आम्ही फार सुशिक्षित समजल्या जात होतो. त्यामुळे लेख लिहिणे, भाषणे करणे हे आमच्या वाट्याला येई. थोडीफार वाहवाही होई. आता तो साराच काळ अनघड व उथळ वाटतो.

पुढे हे सर्वसाधारण स्त्रीच्या जीवनक्रमापेक्षा असे भिन्न जीवन मी निवडले ते अगदी खाजगी कारणामुळे. अमरावतीहून मी राजकोटला गेले ती दुःखी अंतःकरणानेच. संसार विस्कटला होता. अडीच-तीन वर्षांच्या मुलीला आता तिच्या बालमनावर कोणताही ताण न पडता निर्दोष व समृद्ध वातावरणात शिक्षण देता यावे हीच माझी विवंचना होती. स्वार्थापोटीच म्हणा हवं तर, मी या बालशिक्षणाकडे वळले.

या विषयावरील खरे वाचन, मनन झाले श्रीदक्षिणामूर्तीतल्या वास्तव्यात. मला भरभर व पुष्कळसे वाचता येत नाही. कधी एखादा प्याराच वाचला तरी सबंध दिवस तो मनात घोळत राहायचा. अनेक मौलिक ग्रंथ तेव्हा मी वाचले. डॉ. मॉन्टेसोरींच्या ग्रंथांचे परि-

शीलन केले, त्यांवरच्या उलटसुलट टीकाही वाचल्या. शिक्षणक्षेत्रातले इतरही नवे विचार समजून घेतले. मानसशास्त्रावर अनेक लेखकांचे – अगदी फ्रॉइड, युंग व ॲडलर यांचेही अनेक ग्रंथ वाचले, अभ्यासले. मुख्य म्हणजे प्रत्यक्ष बालकांमध्ये काम करून हे सर्व पडताळून पाहिले. छापील पुस्तकांपेक्षा ही छोटी, जिवंत पुस्तके वाचण्याचा मला नाद लागला. त्याच वेळी राष्ट्रीय व राजकीय क्षेत्रात मन गुंतू लागले पण अखेरीस मला पटले की बालशिक्षण हेच आपले क्षेत्र. तेव्हापासून त्याच एका क्षेत्रात मी स्वतःला कोंडून घेतले आहे.

स्वभावतःच मला कोपऱ्यात बसून एखादे काम विचारपूर्वक करीत राहावे व बारीक-सारीक गोष्टीत लक्ष घालावे हे आवडते. अडचणींने मला अधिक चेव येतो. प्रखर झुंज देण्यास माझे मन डगमगत नाही. त्यामुळेच, मला वाटते, पाऊणशे वर्षांच्या वयात मला विफलता किंवा निराशा वाटत नाही, किंवा मनाने थकवा आला नाही.

एखाद्याला जसा कोडी सोडवण्यात आनंद वाटतो तसा मला माझ्या क्षेत्रातील कठीण कामे अंगावर घेण्यात वाटतो. दहा वर्षांपूर्वी मी आदिवासी मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न हाती घेतला तो याच वृत्तीने. एक आवडता छंद म्हणून, आपल्याला आव्हान म्हणून. अर्थात मागास जमातीबद्दल सहानुभूती होती व या कार्याचे राष्ट्राच्या प्रगतीच्या दृष्टीने महत्त्व पटले होते म्हणून.

१९५२ साली मला हृदयविकाराचा जोराचा झटका आला व त्यात दीड वर्ष काही न करता गेले. पण शरीर थांबले म्हणून मन व डोके थोडेच थांबते ? मनात विकासवाडीने आकार घेतला व १९५३ च्या जूनमध्ये तिने मूर्तस्वरूप घेतले.

मूळ कल्पनेला, आकाराला प्रत्यक्षात मर्यादा पडल्या. प्रत्यक्ष अनुभव व वास्तवताच तिला आकार देऊ लागली. विकासवाडीला आकार देताना माझ्या प्रयत्नांत माझ्या सहकाऱ्यांचा वाटा फार मोठा आहे. त्यांचे प्रत्यक्ष कार्य, अनुभव, परिस्थितीचा अभ्यास व माझे मनन-चिंतन व आधीच्या तीस वर्षांच्या शैक्षणिक प्रयोगांची पार्श्वभूमी यांतून योजना साकार झाली. कधी संस्था अगदी श्वास लागलेल्या स्थितीत असे, तिला नेटाने जिवंत ठेवावी लागे. १९५७ साली कोसबाडला आल्यावर ग्रामबालशिक्षाकेन्द्राचे काम मोठ्या पायावर सुरू झाले.

५३ ते ५७ पर्यंतच्या चार वर्षांच्या काळात पुष्कळ काही घडले. मुख्य म्हणजे माझे वय पाच वर्षांनी वाढले. साठचे पासष्ट झाले. माझ्या मित्रमंडळींच्या मनावर याचा परिणाम झाला. काहींचा माझ्या या साहसात सहकार होता. काहींच्या मनात शंका असली तरी ते सहानुभूतीने मदत करत राहिले आणि काही तर उघड उघड चर्चा करीत होते की 'या ताराबाईंना वेड तर लागले नाही ? उद्या जायच्या असल्या तर आजच कोसबाडतील एखादे वेळी ! जीवघेणे रोग पाठीस लागलेले असताना या आता या वयात काय करायला निघाल्या आहेत ! '

संघानेही मला परावृत्त करण्याच्या दृष्टीने ठराव केला की संघ ही जबाबदारी घेणार नाही. पण त्यावेळी कसल्या भुताने मला पछाडलेले होते कोण जाणे ? त्यावेळी मी जणू मी नव्हतेच. खरोखरच मी एक झपाटलेली कार्यकर्ती होते.

" ती जबाबदारी माझ्याकडे लागली. " असे म्हणून मी तबकातला विडा उचलला. बस, आपण सुरवात तर करावी. पाया असला तर पुढे त्याच्यावर कोणीतरी येऊन इमारत उभारील असे वाटे. त्यावेळी मला खोरशीदबेन, कपिलाबेन यांसारख्यांकडून पाठिंबाही मिळाला व काम पुढे सरकले. माझ्या प्रकृतीने पण या चार वर्षांत चांगला हात दिला. दिल्लीच्या वाऱ्या, अनेकांच्या भेटीगाठी, मुंबईची अनेक कार्यालये, त्यांच्या वेळा, मंत्र्यांच्या खोल्या व ठाणे, पुणे, मुलुंड तर विचारूच नका. आता विचार केला म्हणजे वाटते की खरोखरच झपाटलेल्या माणसाप्रमाणेच माझे त्यावेळचे काम होते.

द्वितीय पंचवार्षिक योजनेत १९५९ च्या अखेरीस आमच्या योजनेस स्थान मिळाले व पहिला चाळीस हजारांचा चेकही हातात आला. कपिलाबेन मेहता, सरोजबेन योध इत्यादींनी जवळजवळ सत्तर हजार रुपये गोळा केले. यामागे अनेकांची मेहनत व दान-शूरता होती. दहा पैशांपासून ते शंभर रुपयांपर्यंत अनेक देणग्या येतच होत्या. येथपर्यंतचा रस्ता अनेक खाचाखळगे, काटेकुटे, आशानिराशा, कसोट्या यांनी भरलेला होता. त्यामुळे १९५५ साली अगदी घरगुती रीतीने कार्याचे उद्‌घाटन करून मी म्हटले,

" आम्ही अगदी दाट जंगलातून वाट काढत आलो व यापुढेही आम्हाला तसाच रस्ता शोधायचा आहे. मळलेली वाट कोठेच नाही. आतापर्यंत ज्या ईश्वरी शक्तीने आम्हाला येथवर आणले तीच आम्हाला पुढेही नेईल अशी श्रद्धा आहे. "

यापुढचा काळही सरळसोधा नव्हताच. अनेक कडूगोड, तिखट, आंबट, खारट अनुभवांनी आम्ही अनुभवसंपन्न झालो आहोत. त्यातल्या त्यात थोडा कमी कटकटीचा काळ असला तर तो आताचाच आहे, असे म्हटले तरी चालेल.

बालवाडीने आता लोकांत आकर्षण उत्पन्न केले आहे. थेट दिल्लीपर्यंत तिने आदिवासी विभागात सिद्धान्ताला धरून चालणारी बालवाडी म्हणून नाव कमावले आहे. प्राथमिक शालान्त परीक्षेला आपले विद्यार्थी बसू लागले आहेत. शिक्षकवर्ग वरपासून तालपर्यंत चांगला स्थिर झाला आहे. आपल्या अध्यापन मंदिराच्या बारा तुकड्या बाहेर पडल्या आहेत. त्यांचे निकाल संतोषकारक आहेत. बालसेविकांचा पाचवा वर्ग पुरा होत आला आहे. येथून बाहेर पडलेल्या दोनशे जणींपैकी जवळजवळ सर्वच कामाला लागल्या आहेत. आपल्यायेथील अध्यापन मंदिराचे एक, मुलामुलींची दोन व बालसेविकांचे एक अशी चार वसतिगृहे बरीच व्यवस्थित चालू आहेत. आपला शेतीविभाग व सहकारी उत्पादनकेन्द्र हीही बरीच चांगली चालली आहेत.

एकंदरीत वीज, फोन व सकस आहार योजनेमुळे आलेली, पॉम पॉम करून सगळीकडे हिंडणारी जीपगाडी—या सर्वांमुळे आपली शान व सोय वाढली आहे. मंडळींना आता आपण खेडवळ दिसत नाही म्हणून बरे वाटू लागले आहे !

सरकारने प्राथमिक शाळा व शिक्षकांच्या अध्यापकांच्या पगारात चांगली वाढ केल्यामुळे त्यांनाही आर्थिक स्वस्थता लाभली आहे.

...ही सर्व झाली जमेची बाजू. संस्थेच्या शासन–व्यवस्थापकांचे हाल मात्र पूर्वीपेक्षा थोडे वाढलेच आहेत, असे म्हणायला हवे. त्यामुळे अनुताई व अप्पांच्या डोईवरील पांढऱ्या केसांत बरीच वाढ झाली आहे. लहानशा संसारातही दोन टोकांची तोंडमिळवणी करणाऱ्याच्या अडचणी त्याच्या त्यालाच माहीत. बाकीच्यांनी तर, “ मला पुस्तक हवे, वह्या हव्यात, सिनेमाला जायचंय, फी वाढली आहे, ” वगैरे तुमच्या खर्चाच्या बाजू दाखवून मागण्याच करायच्या असतात व जर आईबाबांनी “ आत्ता नकोत नवे कपडे ” म्हटले तर त्यांनी हक्काने नाराज व्हायचे असते. संस्थेची तीच स्थिती असते. जितका व्याप वाढतो, शान वाढते तितका शासनखात्याचा संताप वाढत असतो हे ओळखूनच जनमानसाने “ व्याप तितका संताप ” ही म्हण करून ठेवली आहे. तिचा स्वाद अनुताई वगैरे नेहमी चाखत असतात व त्यांना नेहमी धडपडच करावी लागत असते. अनुताई तर माझ्या मुळपासूनच आहेत. अनेक कामांचा बोजा आपल्या बळकट खांद्यावर पेलून पुन्हा त्या नवीन बोजे उचलत असतात व आरडा–ओरडा करीत, रणारणात पुढे जात आहेत.

५७ साली आम्ही येथे आलो तेव्हापासून तारापूरच्या थर्मल केन्द्राप्रमाणे आमची ही कामे चालू आहेत. तेथून जसा विद्युतप्रवाह निघून मोठा प्रदेश उजळून निघणार आहे, तसाच शक्तिमान प्रवाह या कार्यातूनही प्रत्येक व्यक्तीच्या अंतःकरणातून निघून आम्ही ज्या अंधाऱ्या भागात आलो त्याला ज्ञानज्योतीने उजळणार नाही का ? अवश्य उजळील !

मी ही योजना हाती घेण्याचा विचार केला तेव्हा अनेक अनुभवी मंडळी सद्बुद्धीने इशारा देत होती, की ‘ आपला प्राथमिक शिक्षकांचा वर्ग असा आहे की प्रत्यक्ष ब्रह्मदेव उतरला तरी त्यांच्यात सुधारणा करू शकणार नाही ! त्यांच्याकडून काही कामे होतील अशी अपेक्षा करणे फोल आहे. ते सर्व आपल्या वागण्याच्या रीतीभातीत दृढमूल होऊन तुमच्याकडे शिकायला येतात. शतकानुशतके जमिनीत पडून राहणाऱ्या वनस्पती व प्राणी जसे दगड ( fossils ) बनतात तशी या शिक्षकांची मने आहेत. ’ हे ऐकून मला फार दुःख होई; क्वचित निराशाही उपजे, पण माझ्या या म्हणण्यावर विश्वास बसत नसे. मला वाटे, जिवंत माणसे कशी फॉसिल किंवा दगड असतील ? खरोखरा ती निष्क्रिय असतील तर त्याला काही कारणे असतील, ती दूर केली पाहिजेत ...

अशा काही आशा ठेवून आम्ही कामाला लागलो. दहा वर्षांनंतर आशेचे किरण



दिसू लागले. आमच्या पाळणाघरापासून ते महाविद्यालयापर्यंतची मुलेमुली, रात्रशाळेतले विद्यार्थी, उद्योगकेन्द्रातले कारागीर, प्रशिक्षणाचे विद्यार्थी, शिक्षक – सगळ्यांमध्येच प्रगती दिसू लागली. आम्हाला दिसणारा उजेड मंद होता पण उजेडच होता. मुंबईच्या झगझगाटात राहणाऱ्या माणसांना न दिसणारे मार्ग खेड्यातल्या लोकांना, ताऱ्यांच्या प्रकाशात स्पष्ट दिसतात ... या २० वर्षांच्या वाटचालीत आमच्या कार्यकर्त्यांपैकी किती जण आले व गेले याचा पाढा फार मोठा आहे. फारसे कुणी स्थिरावले नाही.

आपल्या कल्पना, छंद कृतीत उतरवण्याचा प्रयत्न करणाऱ्या संस्थांना आर्थिक अडचणीतच जन्म काढावा लागतो. पण ही परिस्थिती स्वागतार्हच आहे, त्यात वाईट काही नाही. आपल्यापुढे आव्हान असले की जिद्द धरावी लागते.

या संबंधात मला महर्षी कर्व्यांच्या संस्थेची आठवण येते. मी काही घरगुती अडचणींमुळे त्या संस्थेचा आश्रय घेतला होता. त्यावेळी मी पाहिले की अनाथ बालिकाश्रम फार आर्थिक अडचणीत होता. त्यावेळी महर्षींनी विद्यापीठ, विद्यालय सुरू केले होते. विद्यालयातील प्राध्यापक म्हणून ज्या कार्यकर्त्यांना नेमले होते त्यांना रु. १५० हा त्यावेळी मोठा समजला जाणारा पगार होता. त्यातला निम्मा त्यांनी अनाथ बालिकाश्रमाला द्यायचा ठरवला होता. त्यावेळी ७५ रुपयांमध्ये एका कुटुंबाचे साधारणपणे चालत असे. हा कठीण काळ या मंडळींनी निभावून नेला म्हणूनच आजची भरभराट संस्थेला दिसली.

तेव्हा आता हा संसार तुम्हा सर्वांच्या स्वाधीन करायचा आहे आणि येथेच माझी काशी समजून तिसऱ्या घंटेची वाट पाहत राहायचे आहे.

अडचणींच्या काळात मात्र मला थोडे अपराधी वाटू लागते. घरातल्या मुख्य पुरुषाने वृद्धापकाळी संसार वाढवणे जसे अविवेकाचे असते तसे संस्थाप्रमुखानेही वृद्धापकाळी संस्थेचा पसारा वाढवणे अयोग्य असते. आपण गेल्यावर आपला उरलेला भार आपल्या मुलांवर टाकून जाणार आहोत अशी चिंता त्याला वाटत असते.

मी हे का केले ? संस्थेचा व्याप विस्तार एवढ्या उतारवयात का वाढवला ?

एक गोष्ट मनापासून पटली व म्हणून मी ती केली. हा भाग निद्रिस्त, अविकसित राहणे राष्ट्रविघातक आहे, आणि हे आदिवासींना पुढे येण्यास मदत करण्याचे कार्य म्हणजे आपली पडिक जमीन लागवडीलाली आणण्यासारखे आहे. आदिवासींना सुखसोयी मिळवून देण्याचा प्रयत्न सरकार व कार्यकर्ते करत होते, पण त्यांच्या मुलाबाळांना खतपाणी देण्याचे, शिकवण्याचे काम कोणी करत नव्हते व याचे कारण कोणी शिक्षणतज्ज्ञ आपले जीवनकार्य समजून हे काम हाती घेत नव्हते.

तेव्हा मी ठरवले की राहिलेले आयुष्य यासाठी आपण खपलो तर निदान या कार्याला एक दिशा देण्याचे काम तरी आपल्या हातून सुरू होईल. आपण ते फार दिवस करू शकलो नाही तरी दुसरे कोणी येऊन ते पुढे नेईल ! आपण जे काही करीत

आहो ते समाजाचे काम आहे, तेव्हा आपण गेल्यावर त्याचे काय होईल याची चिंता आपण करायची नाही. शेवटच्या घटकेपर्यंत आपण आपले कर्तव्य करत राहावे. खाटेवर पडल्या पडल्या मरण्यापेक्षा काम करता करता मला रस्त्यात मरण आले तरी फिकीर नाही.

ईश्वराने हात दिला व गेल्या सोळा वर्षांत माझ्याच्याने होईल तितके काम मी पुढे रेटू शकले. मला अधिक आयुष्य मिळावे असे मी मुळीच इच्छित नाही. मिळाले हेच खूप झाले आहे.

तुम्ही दरवर्षी माझ्या वाढदिवसाला अशी जमता, शुभेच्छा देता...आगगाडीने येता-जाता, वाचकांच्या रीतीप्रमाणे पुष्कळदा मला विचारण्यात येते की तुम्हाला मुले-बाळे किती ? घरी कोणकोण आहे ? वगैरे. मी उत्तर देते की मुलेबाळे कोणी नाहीत. पण मनातल्या मनात वाटते की हे उत्तर खरे नाही. माझे कुटुंब खूप मोठे आहे. अगदी खरे खरे मुलाबाळांनी भरलेले आहे. तेथे सर्वजण सुखासमाधानाने नांदत आहेत. मुख्य म्हणजे घरची म्हातारी आजी कोणाला जड झालेली नाही. उलट तिचे कौतुकच फार चालते. पण विचारणाऱ्याच्या संकुचित अर्थाने ते खोटे ठरेल म्हणून मला खोटे वाटत असलेले उत्तर मी देते...पण या वाढदिवसांमध्ये काही अर्थ आहे का ? सत्तरी झाली, पंच्याहत्तरी आली. आता सगळी म्हणताहा, शंभरी होवो. पण ते काही खरे नाही. नावडत्या गोष्टी झाकण्यापेक्षा त्यांच्या दृष्टीला दृष्टी देऊन सरळ पाहणे व त्या अटळ असल्यास आनंदाने स्वीकारण्यातच अर्थ असतो. तसे केले म्हणजे आपण गैरसावध राहत नाही, तयारीतच असतो. यदिच्छेच्या भाराने पसले जात नाही. ही स्तुतिसुमने, हा गोड खाऊ – हे सर्व खरे म्हणजे वेळेचा अपव्ययच आहे.

आपल्या सध्याच्या मनःस्थितीत आपण एक फायदा करून घेतला पाहिजे तो असा की आता आपल्याला सावकाशी नाही. कारण केव्हा तिसऱ्या घंटेचा ठोका पडेल माहीत नाही, कधी कधी तर गाडी स्टेशनात आल्यावरच एक ठोका पडतो.

आमची मूळ भूमिका प्रयोगाची होती. अद्याप कोणी जेथे जाऊन वाट रुळवली नाही, ती नवी वाट शोधण्याचा शौक आम्हाला होता आणि ती चाल कासवाच्या गतीने आम्ही चालत राहिलो.

एक निश्चित कल्पना मनात आखून मी ५७ साली इथे आले. त्यापैकी काय साध्य झाले, काय व्हायचे राहिले याचा आढावा घेऊन भरभर त्या कामाला लागलो तर हा वाढदिवस करण्यात काही अर्थ.

आम्ही नेहमी म्हणतो की हजारो शाळांसारखी एक शाळा, बालवाडी किंवा अध्यापनमंदिर चालवण्यासाठी आम्ही हा सर्व प्रपंच घेतला नाही. काही विशिष्ट हेतूने, ध्येयाने आम्ही येथे एकत्र आलो व पिसाटाप्रमाणे त्याच्या पूर्तीसाठी त्याच्यामागे लागतो, भरकटतो. तेच पिसे, तोच भडका, तीच ज्योत येथे जे जे विद्यार्थी, पालक, मित्र म्हणून



येतील त्यांच्या मनात प्रज्वलित करायची आहे.

आज मी आहे, उद्या मी नसेन तेव्हाही आज जशी आपण पाने, फुले, यांनी शोभा करतो व तोंड गोड करतो तसेच सर्व व्हायला हवे. मात्र त्याचबरोबर काय झाले, काय राहिले, कुठे चुकले, कोठवर आलो, कोठे जायचे या सर्व गोष्टी आपल्या चिंतनाचा, मननाचा, निश्चयाचा विषय व्हायला हव्यात.

मोठाली राज्ये असतात. राजा असतो, अध्यक्ष असतो, ही सर्व कधी असतात, कधी नसतात. पण राज्य तर असतेच. तसेच संस्थेचे आहे. अध्यक्ष, संस्थापक, व्यवस्थापक, कार्यकर्ते सर्व असतात परंतु कधी त्यांपैकी एखादे नसले तरी ती जागा भरली जाते. कामे चालू राहतात —चालू राहिली पाहिजेत; अधिक जोराने चालू राहिली पाहिजेत.

मला तुमच्या उत्सवीवृत्तीला मागे खेचायचे नाही. आनंद व उत्सव तर आपल्या जीवनात असलेच पाहिजेत. माझे म्हणणे एवढेच की त्यासाठी एखाद्या व्यक्तीला कारणीभूत करू नये. खरे महत्त्व कार्याचेच असते आणि असायलाही हवे.

मी जे काही थोडे कार्य केले ते हौशीने, मनाच्या उत्साहाने. त्याग, तपश्चर्या, सेवा, दया हे शब्द उगाच माझ्यासाठी खर्च करू नका. त्यांचा मला नाद नाही. मी कुणासाठी म्हणून काही केले नाही. माझ्या स्वतःच्या आनंदाचा मोठा भाग त्यात होता. तशी मी बुद्धिप्रधान आहे. नेम वगैरे मी मानत नाही. शरीराला ज्याची जेवढी गरज आहे तेवढे मी पुरवते. अट्टाहासाने काही सोडत नाही. मनावर लादून काही करत नाही. लौकिकदृष्ट्या करायची ती व्रतवैकल्ये मला हास्यास्पद वाटतात. परंतु शास्त्रीजींनी सुचवलेला सोमवारचा उपास मी श्रद्धेने करते. मनातल्या संयमाचे महत्त्व मला फार वाटते. मी काकासाहेब कालेलकरांना एकदा म्हटले होते, ‘ हे व्रत धरा, ते सोडा ’ असे आश्रमी बंधन मला पटत नाही. बंधनातून केलेल्या गोष्टीत कृत्रिमपणा येतो. त्यागाची जाणीव राहते. करायचे ते सहजप्रवृत्तीला पटेल तेच करावे. आव्हान मिळाले की मला जोर चढतो, हा माझा स्वभाव आहे.

आता मी जी काही आहे. ती खाजगी आयुष्यातील अपयशांमुळेच. संकटांनी मला घडवले, त्यामुळे दुःख भोगावे लागले त्याचेही मी ऋण मानते.

गीता मला आवडते. तुकाराम त्याहून आवडतो. ‘ उल्हासे न संतापे ’ अशी स्थितप्रज्ञता मला अधिक आकर्षिते.

कार्याच्या उपयुक्ततेसंबंधी दृढ श्रद्धा बाळगून आपण आपले तन, मन, धन कार्याला वाहून घेतले तर आपण कसोटीला उतरतो असा मला दृढ विश्वास वाटतो. कार्य जर होत राहिले तर त्याला आर्थिक अडचणी आल्या तरी मदत येत राहते, असा माझा अनुभव आहे. हे कार्य माझे नव्हे, तुमचे नव्हे, येथील नोकरवर्गाचे नव्हे, हे राष्ट्रकार्य आहे. म्हणून ते आपण प्रामाणिकपणे उचलले आहे, तर त्याला कुठूनही मदतीचा हात मिळेलच.

कोठेही निःस्वार्थपणे व कार्याचे महत्त्व पटून मनापासून कार्य होत राहिले तर त्याला कुठून तरी दैवाचा हात मिळतोच. अर्थात दैवही जबरे असते. अगदी संपूर्णपणे अवघडात अवघड कसोटी घेतल्याशिवाय कोणाला ते हात देत नसते.

—सर्वेऽत्र सुखिनः सन्तु ।

– २ –

' सुबोध पत्रिके 'च्या प्रार्थनासमाज शतसंवत्सरी खास अंकासाठी ( १९६७ ) लिहिलेल्या या लेखात ताराबाईंचा प्रार्थनासमाजाविषयीचा दृष्टिकोन त्यांनी स्पष्ट केला आहे.

## ' प्रार्थनासमाजाने मला काय दिले ? '

( १ ) मुंबई प्रार्थनासमाजाचे एके वेळचे मिशनरी व सुबोधपत्रिकेचे संपादक प. वा. सदाशिव पांडुरंग केळकर व प. वा. उमाबाई केळकर यांची मी कन्या असल्यामुळे माझ्या जन्मापासूनच माझ्यावर प्रार्थनासमाजाच्या धार्मिक व सामाजिक तत्त्वांचे संस्कार झाले. मला कळू लागल्यापासून वयाच्या २२ व्या वर्षापर्यंत मी इंदूर व मुंबई येथे प्रार्थनासमाजाच्या बृहत् कुटुंबातच वाढले. त्यामुळे माझ्या आचारविचारांना प्रथमपासून तेच वळण लागले.

( २ ) मी प्रार्थनासमाजाची सभासद नाही; परंतु माझे नातलग व मित्रमंडळी प्रार्थनासमाजाची असल्यामुळे व जुन्या २२ वर्षांच्या संबंधामुळे प्रार्थनासमाजाविषयी जवळीक वाटते व संबंधही चालू आहेत.

( ३ ) सभासद होऊन प्रार्थनासमाजात एकरूप होण्याची इच्छा झाली नाही, कारण माझा स्वभाव स्वतंत्रपणे विचार करण्याचा असल्यामुळे कोणत्याही पंथ किंवा आचार–विचार–प्रणालीस बांधून घेणे मला नको होते.

( ४ ) माझ्यावर सर्वांत अधिक छाप माझे वडील व मातोश्री यांची पडली असे म्हणता येईल...बाबांचा सहवास मला वयाच्या १४ व्या वर्षापर्यंत लाभला तरी अजूनही त्यांच्याशी झालेल्या चर्चा व घरी होत असलेल्या गोष्टी आठवतात.

( ५ ) याशिवाय प्रार्थनासमाजाच्या परिसरातील अनेक पुढाऱ्यांच्या सहवासात आम्ही असूच.



( ६ ) प्रथम जेव्हा आम्ही प्रार्थनासमाजात अंगभूतपणे वावरत होतो, तेव्हा एकाच कुटुंबात असल्याची भावना असे व सर्व प्रार्थनासमाजाच्या कुटुंबाशी जवळीक वाटे. पुढे मोठेपणी ती जवळीक तितकी नसली तरी थोड्याफार प्रमाणात आहेच. सैद्धान्तिक विचारसरणीत गांधीजी, विनोबाजींच्या आचार–विचारसरणीचा प्रभाव माझ्यावर अधिकतर पडला व त्यांच्या जागतिक विचारापुढे प्रार्थनासमाज संकुचित वाटू लागला. तरी मी जशी प्रार्थनासमाजापासून दूर राहिले, तशीच गांधीपंथात कधी शिरले नाही.

( ७ ) माझ्या मते, प्रार्थनासमाज किंवा त्याही पूर्वी ब्राह्मसमाज स्थापन झाला त्या वेळी हिंदुधर्माच्या आचारात फारच संकुचितपणा, वर्णभेद, वर्गभेद, उच्चनीचपणा आला होता, व स्वार्थी धर्मगुरूंनी माजविलेल्या तांत्रिक आचारांवर भर दिला गेला होता, त्यामुळे धर्माचा धार्मिकपणाच नाहीसा झाला होता. त्या वेळी सामाजिक व धार्मिक आचारांच्या शुद्धीवर व काही गोष्टींचा धिक्कार करण्यावर भर देणे आवश्यक होते. १०० वर्षांत काळ बदलला आहे, त्याची प्रार्थनासमाजाने दखल घ्यायला हवी म्हणजे आताही करावयास हव्या अशा पुष्कळ गोष्टी आहेत त्या दृष्टीने कार्याच्या दिशेत फेरफार व्हावयास हवा.

तसेच सुरुवातीस हे विचार अतिसुशिक्षित व वरच्या थराच्या मंडळींस स्फुरले व तेथे ते अंकुरित झाले हे ठीक. पण आता बहुजनसमाजाने आपले स्थान ओळखले आहे. त्यांच्यापासून प्रार्थनासमाज फार दूर दूर जात आहे असे मला वाटते. प्रार्थनासमाजात संतांच्या वाणीचा आधार घेऊन आपले धर्मासंबंधी विचार प्रस्थापित केले जातात. संत या बहुजनसमाजातील होते व त्यांचे कार्यही त्यांच्यातच झाले. अगदी अशिक्षित व खालच्या थरातून चोखामेळ्यासारखे अनेक संत निर्माण झाले व अध्यात्माची बहुमोल वाणी उच्चारून गेले. प्रार्थनासमाज अद्याप सुशिक्षित मध्यमवर्गाच्या स्त्री–वर्गात व खेड्यापाड्यात फारसा पोचू शकला नाही.

शतकानुशतक ज्या स्थानांनी व तंत्राने लोकांच्या मनात श्रद्धा उत्पन्न झाली आहे ती नेस्तनाबूद करायचा प्रयत्न म्हणजे महमद तघलखाप्रमाणे मूर्तिभंजकच होणे आहे. मूर्ती देवळात दगडाने घेतलेल्या आकारात नसते पण मानवमनात एक आध्यात्मिक जीवनाची मूर्ती तयार होऊन तिच्याविषयी श्रद्धा उत्पन्न होते. ती तोडण्याचे नव्हे तर सुधारण्याचे काम धर्मप्रचारकांचे व त्यांच्या अनुयायांचे असते. विनोबाजींनी काशी-विश्वेश्वराच्या किंवा पंढरीच्या विठ्ठलाच्या दर्शनास जाण्यास नकार दिला नाही पण त्यांच्याबरोबर असलेल्या अस्पृश्य वर्गास इतर धर्मीयांसमवेत जाण्याचा आग्रह धरला. काशीला त्यांना मार खावा लागला व पंढरपुरास संकुचित वृत्तीच्या धर्मबंधनास पूजणाऱ्या पुजारीमंडळीत हृदयपालट होऊन त्यांच्या सर्व संघासहित त्यांना विठोबाच्या मंदिरात प्रवेश मिळाला. म्हणजे जनतेच्या मनात शतकानुशतक श्रद्धास्थाने होऊन बसलेल्या

थानांस विनोबांनी अव्हेरले नाही व त्यांच्या श्रद्धेस धक्का दिला नाही. परंतु त्यांवर साचलेली जळमटे काढून टाकण्याचा आग्रह धरला. सारांश, आजच्या काळाच्या गरजा ओळखून प्रार्थनासमाजाने कार्यपद्धतीत योग्य तो फेरफार करावयास हवा असे मला वाटते.

त्याचप्रमाणे प्रत्येक धर्मात कालांतराने जडता येते. खऱ्या आध्यात्मिक साधनेपेक्षा जड तंत्राचा आग्रह वाढतो व आपल्या संकुचित वृत्तीच्या बाहेर राहणाऱ्याविषयी थोडी अनुदार वृत्ती मूळ धरू लागते. काळाच्या परिणामाने उत्पन्न होणाऱ्या या दोषांविषयीही दीर्घकाळ टिकणाऱ्या धर्मसंस्थेने जागरूक राहावयास हवे. प्रार्थनासमाजातही विचाराचे पुराणत्व ( orthodoxy ) व तंत्रास चिकटून राहण्याची वृत्ती शिरते की काय, ते आत्मपरीक्षणाने पाहावयास हवे. पुष्कळशा शारीरिक व मानसिक सवयी जडतात. पण यात बदल करायची आवश्यकता असेल तेथे त्या बदलण्याची ताकदही असावयास हवी. मुख्य म्हणजे बाह्य तांत्रिक संस्कार व खरी आध्यात्मिक मूल्ये यांच्यातील भेद ओळखणे व खऱ्या मूल्यांची जोपासना करणे, व बाह्य— वरच्या गोष्टी फेकून देणे हे नव्या धर्म-संस्थांनी करावयाचे आहे.

( ८ ) आज तर ब्राह्म व प्रार्थनासमाज या दोन संस्था भारतीय समाजाच्या आजच्या गरजा भागविणाऱ्या संस्था म्हणून समाजात फारसे स्थान मिळवू शकल्या नाहीत. या संस्थांत खऱ्या तळमळीची व धर्मकार्यास वाहून घेणारी ( dedicated ) व संस्थेचे कार्य पुढे चालविण्यास उत्सुक अशी मंडळी आहेत. ती काळाच्या गरजा भागविण्यास पुढे येतील अशी आशा आहे.

— ३ —

## आदिवासींच्या शिक्षणाचे उद्दिष्ट

आजकाल शिक्षणक्षेत्रात ज्या दिशेने पावले टाकली जात आहेत ती पहिली की असे खरोखरच वाटू लागते की मागासलेल्या लोकांना पुढे आणण्याचा प्रयत्न चालू झालेला आहे. मात्र हे कार्य कोणत्या प्रकारे साधायला पाहिजे यासंबंधीचा विचार झालेले त्यावरून दिसत नाही. आपली पिढी ज्या पद्धतीने शिकली आणि जशी घडली आहे त्याच स्थितीप्रत या मागासलेल्या लोकांचे व्हावे असाच सर्वसाधारण रोख सध्या दिसून येतो. परंतु आपण शिक्षित होऊन आज जे काही बनलो आहोत, झालो आहोत ती



स्थिती आदर्श आहे असे म्हणता येईल का ? जीवनप्रवाहाची नैतिक आणि माणुसकीची पातळी खरोखरच उंचावली आहे का ? या बाबतीतही विचारविनिमय होणे जरूर आहे.

आदिवासी लोकांना सर्वप्रथम त्यांच्या प्राथमिक गरजा भागविण्याची साधने मिळाली पाहिजेत. त्यानंतर ज्ञान मिळून तांत्रिक–यांत्रिक कौशल्याचे शिक्षण मिळून आपले हातपाय बुद्धी व नवनिर्मितीची क्षमता यांचा उपयोग करण्याची साधने जर त्यांना मिळाली तर मग या साधनांचा वापर करण्याची आवड त्यांच्या ठिकाणी उत्पन्न होईल आणि मग हा वर्ग इतर सुशिक्षितांची बरोबरी करू शकेल. हे काम करतानासुद्धा कार्यकर्त्यांनी, संयोजकांनी एका बाबतीत सावध राहायला हवे, ती अशी—सुशिक्षितांप्रमाणे मायबापसरकार किंवा दानशूर श्रीमंत लोकांच्या पैशावर जगून, फक्त अभ्यास करण्याची संधी मिळून मग वयाच्या २५/३० वर्षांच्या सुमारास अध्ययन पूर्ण झाल्यावर चांगलीशी नोकरी मिळवण्याच्या खटपटीला लागण्याची सवय ! या गतानुगतिकत्वाच्या चक्रात त्यांनी गुरफटून जाता कामा नये. अलीकडे खेड्यांतील जीवनही अनेक सोयींनी समृद्ध, सुंदर आणि सुखावह असून देखील शिकल्यासवरलेल्या लोकांचा लोंढा शहरांकडे का जात असतो ? आणि आता या मागासलेल्या जातीतल्या शिक्षितांना ते त्यांचेच अनुकरण करून या प्रवाहात सामील व्हावेत अशी आपण सोय करून द्यायची आहे का ? अशा प्रकारच्या सर्व समस्यांचा पूर्ण विचार करूनच मग शैक्षणिक योजनेची आखणी करायला हवी. आपले उद्दिष्ट काय, हे ठरवायला हवे. माझ्या मताने तर खेड्यांचे रूपांतर नंदनवनात करण्याची क्षमता या ' मागास ' म्हणून मानल्या गेलेल्या लोकांमध्ये आहे. त्यांना त्यासाठी योग्य साधने, संधी आणि सवड मात्र मिळाली पाहिजेत. असो.

शिक्षणातून आपल्याला काय साधायचे आहे याचा जर आपण विचार केला तर असे वाटते की त्या लोकांमध्ये खास त्यांच्या अशा ज्या विशिष्ट, उपयुक्त चाली आहेत, प्रथा आहेत त्या तर टिकून राहायला पाहिजेत. ( आमच्यासारखी त्यांची स्थिती न व्हावी ! ) एक काळ असा होता की आम्ही सुशिक्षित असूनही पाश्चात्यांचे अंधानुकरण करायला जाऊन आपल्या उष्ण कटिबंधातील गरम देशातसुद्धा आणि जरूरीपेक्षा पुष्कळच अधिक कपडे घालणे सुरू केले. आवश्यकता नसूनही बूटमोजे पायात चढवू लागलो आणि पाश्चात्य देशांप्रमाणे येथील हवामान थंड नसूनसुद्धा मद्य आणि तऱ्हेतऱ्हेची उष्णता निर्माण करणारी पेये पिऊ लागलो.

आदिवासीही आपल्यासारखे शिक्षणाच्या योगे असे मर्कटानुकरण करण्यास न शिकोत ! आज ते जसे आपल्या जीवनपद्धतीवर संतुष्ट आणि तृप्त आहेत तसेच ते योग्य शिक्षण मिळाल्यावरही असावेत, हेच सर्वांचे मत पडेल.

शिक्षणामुळे या समाजामध्ये तीन हेतू साध्य व्हायला हवेत. त्यांची आर्थिक परिस्थिती ज्यामुळे सुधारेल अशा प्रकारची योजना—ही पहिली गोष्ट. दररोज पोटभर जेवण, थंडी–

वारा-ऊन-पाऊस यांपासून रक्षण होईल असे एखादे निवाऱ्याचे ठिकाण किंवा घर प्रत्येक कुटुंबाला मिळणे आणि शरीराच्छादनासाठी कपडे, या मानवी जीवनाच्या प्राथमिक गरजा पूर्ण व्हायला हव्यात. त्या दृष्टीने त्यांची कमाई वाढावी अशा प्रकारचे काही उपक्रम शाळांतून आणि ग्रामसुधारणा कार्यातून हाती घेतले गेले पाहिजेत. असे शिक्षण मिळायला हवे की ज्या योगे त्यांच्या मुख्य धंद्यातील त्यांचे कौशल्य वाढेल, त्या धंद्यातले शास्त्रीय ज्ञान त्यांना मिळेल आणि त्यातून त्यांना आपल्या धंद्यातले उत्पादनाचे प्रमाण वाढवता येईल. मुख्य धंद्यावर सबंध वर्ष काढणे अशक्य असते. म्हणून मुख्य धंदा सांभाळूनच करता येतील असे जोड-धंदे करायला त्यांना याबरोबरच शिकवायला हवे. भुकेलेल्या आणि अर्धपोटी अवस्थेतल्या, थंडीने कुडकुडणाऱ्या, पावसाने चिंब भिजलेल्या अशा या मुलांना ‘ शाळेत या, शिका, सुंदर सुंदर चित्रे काढा, नाटके बसवा ’ वगैरे म्हणणे म्हणजे निव्वळ क्रौर्यच आहे ! अशा शिक्षणाने आपल्या परिस्थितीत काहीही बदल होत नाही, हे या लोकांना अनुभवाने ठाऊक असते; आणि ते खोटेही नाही. मग ते शिकायच्या फंदात न पडता मुलांना नियमितपणाने शाळेत पाठवत नाहीत हे, खरे तर, त्यांचे शहाणपणच म्हटले पाहिजे. मध्यमवर्गीय लोकांच्या शाळेत लेखन-वाचन-गणित वगैरे जो शालेय अभ्यासक्रम असतो त्याला दुय्यम स्थान देऊन त्यांची आर्थिक परिस्थिती सुधारायला उपयोगी पडेल अशा प्रकारच्या शिक्षणपद्धतीला येथे या परिस्थितीत अग्रक्रम दिला पाहिजे.

हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी ज्या ज्या भागात जो जो मुख्य उद्योग असेल त्याला पाठशाळेत अग्रक्रम दिला पाहिजे आणि त्याबरोबरच पूरक उद्योगाचे शिक्षणही दिले पाहिजे. शिक्षणक्रम योजणाऱ्यांचे लक्ष धंद्याच्या व जोडधंद्याच्या शिक्षणाकडे गेले आहे. परंतु या औद्योगिक, व्होकेशनल, मल्टिपर्पज वगैरे सर्व प्रकारच्या शिक्षणाकरिता प्रथम शालान्त परीक्षेपर्यंत शिकण्याची किंवा निदान लिहिता-वाचता येईल इतपत प्राथमिक शिक्षणाची आवश्यकता असते. परिणामी, प्रथम प्राथमिक शिक्षण आणि नंतर धंदे-शिक्षण असा हा उलटा क्रम होऊन बसला आहे. इतर ठिकाणी हे ठीक आहे. परंतु मागासलेल्या विभागात जेथे पराकाष्ठेचे दारिद्र्य आहे तेथे प्रथम अर्थोत्पादक काम, पूरक उद्योगाचे शिक्षण आणि त्याबरोबर थोडेफार शालेय शिक्षण असा क्रम असला पाहिजे. पूरक उद्योगांतसुद्धा ज्या धंद्यांत हस्तकौशल्याला आणि नवनिर्मितीला वाव आहे आणि आर्थिक उत्पादनाच्या दृष्टीनेही जे लाभदायक आहेत असेच उद्योग निवडले गेले तर जास्त फायदेशीर होईल. परंतु सध्या आपले लक्ष प्रथम पाहिजे मुलांच्या अन्न, वस्त्र, निवारा या गरजा भागवण्यावर. त्यासाठी शिक्षणाचे माध्यम म्हणून निवडल्या गेलेल्या मूलोद्योगांतही आर्थिक उत्पादनाची दृष्टी हवी. शेती, विणकाम, सुतारकाम यांपैकी कोणताही उद्योग जर आर्थिकदृष्ट्या किफायतशीर ठरत असेल तर त्याचा समावेश शिक्षण-



क्रमात करावयास काहीच हरकत नाही. कारण शिक्षणाच्या दृष्टीने त्यात विशेष गुण आहेतच. परंतु असा क्रम अशक्य असेल तर त्या परिसरात जो धंदा उपलब्ध असेल तो प्रथम हाती घेऊन, मुलांच्या पोटापाण्याची त्यांतून सोय झाल्यानंतर मगच मूलोद्योगाकडे वळले पाहिजे.

दुसरी गोष्ट म्हणजे विद्यार्थ्यांमध्ये जगाकडे पाहण्याची शास्त्रीय दृष्टी निर्माण करणे. जगात चाललेल्या विविध घटनांमागची वैज्ञानिक कारणमीमांसा त्यांच्या ध्यानात आणून देणे हे शिक्षणाचे मुख्य उद्दिष्ट आणि मुख्य विषय असला पाहिजे. सृष्टीच्या सजीव व निर्जीव घटकांपैकी कोणते मानवी जीवनाला उपयुक्त वा अपकारक आहेत याचीही संपूर्ण जाण आली पाहिजे. त्यातूनच धर्मभोळेपणामधून रूढ झालेल्या अशास्त्रीय कल्पना नाहीशा होतील, अज्ञात शक्तींची भीती दूर होईल. याचा अर्थ असा की लेखन-वाचन यावर भर न देता वैज्ञानिक शिक्षणावर जोर दिला पाहिजे, आणि हे शिक्षण व्याख्याने आणि प्रत्यक्ष प्रयोग इ. माध्यमांतून देणे इष्ट ठरेल. यातूनच आपल्याखेरीज इतर मानवी जीवनाबद्दल माहिती करून घेण्याची, भूगोलाचे ज्ञान मिळवण्याची इच्छा उत्पन्न होईल आणि ही जिज्ञासा जर योग्य साधनांद्वारा व योग्य प्रकारे तृप्त केली गेली तर ती आणखी आणखी वाढतच जाईल. याबरोबरच वाचनाची आवश्यकता मनाला उमगत जाईल आणि मुले आपोआप लेखन-वाचनाकडे वळतील. तोपर्यंत त्यांच्या अवतीभोवती सचित्र पुस्तके, विविध शब्द, अक्षरांचे आकार, वृत्तपत्रे इ. साधने पुरेशा प्रमाणात डोळ्यां समोर येत राहिली पाहिजेत. एकीकडे लिहिण्या-वाचण्याची महती त्यांच्या मनावर बिंबवली जाईल आणि दुसरीकडे हे शिकून घेण्याची आस बळावत जाईल. एवढे झाल्यावर लेखन-वाचनाच्या शिक्षणाची सुरवात केली गेली, तर मुले हे ज्ञान केव्हाच आत्मसात करतील.

तिसरी गोष्ट म्हणजे, आपणही या देशाचे नागरिक आहोत याची जाणीव या लोकांना होणे. त्यांना त्यांच्या आजूबाजूला जे शिकलेसवरलेले, श्रीमंत, भिन्न राहणीचे, भिन्न विचारांचे, भिन्न संस्कृतीचे — ज्यांच्यापासून ते मनाने खूपच दूर गेले आहेत असे लोक त्यांना आढळतात, त्यांचा आणि आपला देश एकच आहे, ही भावना त्यांच्या मनांत उत्पन्न झाली पाहिजे. आज सुशिक्षित, शहरी माणसे आणि मागासलेली, ग्रामीण जनता या दोन वर्गांत व्यवहारदृष्ट्या जी लांबरुंद भेग पडली आहे ती भरून निघाली पाहिजे.

आज शहरातून जे सरकारी कार्यकर्ते आणि समाजसेवकही खेड्यांत जातात ते त्यांच्याशी कितीही आपलेपणाने वागले तरी ही वन्य जमातीतील माणसे त्यांना परकीच समजतात. प्रथम तर, हे लोक आपल्या कल्याणासाठी इथे आले आहेत, ही गोष्टच मुळी

त्यांच्या गळी उतरत नाही. त्यांना वाटत असते की यांना सरकारकडून पगार मिळतो त्या पगारासाठीच ही मंडळी आपल्या पुढे पुढे करताहेत. त्यांच्या कार्यामुळे आपलाही काही फायदा होईल यावर त्यांचा विश्वासच नसत नाही. कारण या लोकांचे जे उपक्रम असतात — उदा. शालेय शिक्षण, समाजशिक्षण, सांस्कृतिक कार्यक्रम, चित्रपट, व्याख्यानबाजी, त्यातून त्यांचा जो तात्कालिक रोग ' भूक ' — यावर काही औषध असलेले त्यांना आढळत नाही. साहजिकच समाजकल्याणकार्य, शिक्षणाच्या सोयी इ. कार्याबद्दल मनातून त्यांना अजिबात आदर किंवा आस्था नसते. परंतु त्यांच्या रोटी-कपडा-मकानाची जर त्यांतून सोय झाली, त्यांच्या रोजच्या जीवनाशी निगडित अशा प्रकारची सृष्टीची अद्‌भुतता जर त्यांना समजून घेता आली आणि त्यांच्या हृदयात अधिक ज्ञानलालसा उत्पन्न झाली ( त्याप्रमाणे जिज्ञासापूर्ती करणाऱ्या लोकांच्याबद्दल आपलेपणा वाटू लागणे साहजिकच आहे ) तर त्यांच्याबद्दल त्यांच्या मनात आस्था निर्माण होईल. आणि मगच समाजकल्याण, सामाजिक शिक्षण करू इच्छिणाऱ्या कार्यकर्त्यांच्या, शाळेतल्या शिक्षकांच्या सांगण्याला ही मंडळी मान देऊ लागतील. त्यांचे सांगणे ऐकायला आपण होऊन त्यांच्याजवळ जातील आणि या निकट येण्यामधूनच आपल्यात आणि या शहरी माणसांमध्ये बराच भेद असला तरी साम्यही बरेच आहे, हे त्यांना समजू लागेल. ' माणूस ' या नात्याने एका समाजातील, कुटुंबातील सुखदुःखे, आनंदाचे प्रसंग, भावना सर्वत्र एकच, सारख्याच असतात हे त्यांच्या लक्षात येईल आणि एकदा या गोष्टीचे आकलन झाल्यानंतर एकमेकांचे आचारविचार आपलेसे करण्यातले अडथळेही आपोआप कमी होतील. आम्ही सारे एकाच देशातले रहिवासी आहोत, ही भावना जागृत होण्यासाठी कल्पनाशक्ती तेवढी विकसित असावला हवी. आपण पाहतोच की उच्चशिक्षित आणि पुढारलेल्या लोकांनाही आपले गाव, आपला परिसर, आपल्या प्रांतातले लोक त्यांच्याबद्दल जेवढी आत्मीयता असते, ओढा असतो तेवढा आपल्याच देशातल्या पण अन्य प्रांतातल्या लोकांविषयी नसतो. इतर प्रांतांतील लोकांबरोबर आपले हितसंबंध गुंतलेले आहेत हे बुद्धिद्वारा कळल्यावरसुद्धा भावनेला ' वळत ' नाही आणि त्यामुळे मन मग प्रांतीयता, जातीयता इ.कडे झुकू लागते. सुशिक्षितांची ही स्थिती ! मग निरक्षर लोकांमध्ये देशप्रेम, अभिमान, ऐक्य इ. भावना अंकुरायला कितीतरी काळ लागेल, यात काय संशय ? यासाठी आंतरप्रांतीय संघटन, देवाणघेवाण जसजशी वाढत जाईल तसतशी ही भावना दृढमूल होत जाईल आणि तशी होणे देशाच्या भवितव्याच्या दृष्टीने अर्थात अत्यावश्यकच आहे.

ह्या विवेचनाचा मग सारांश एवढाच की शिक्षणाचे उद्दिष्ट सांगणे किंवा ठरवणे जेवढे सोपे आहे तेवढे ते पुरे करणे सोपे नाही, हेच खरे !



— ४ —

कार्यबाहुल्यामुळे ताराबाईंची बहुतेक लेखनशक्ती त्यांनी जे आपले जीवनकार्य मानले होते त्या शिक्षणकार्यावर, बालशिक्षणकार्यावरच केन्द्रित झाली होती. तरीही ताराबाईंनी काही महत्त्वाचे स्फुट लेखनही केले. ' स्त्री ' मासिकामध्ये त्यांनी काही सडेतोड व विचारप्रवर्तक लेख लिहिले. चाळीस–पंचेचाळीस वर्षांपूर्वीच्या ( १९३६–१९४० ) काळात त्यांनी ' स्त्री 'च्या व्यासपीठावरून मांडलेले विचार व मते किती बेधडक, धीट व पुरोगामी होती, विशेषतः त्यांचा स्त्रीविषयक दृष्टिकोन किती प्रौढ, पक्व व परखड होता हे त्यांच्या ' स्त्रीजातिविकास ' ( १९३६ ) या लेखावरून स्पष्ट होईल.

## स्त्रीजातिविकास

असे म्हणतात की स्त्रीजातीवर अनन्वित जुलूम झाले आहेत व ते पुरुषजातीकडून झाले आहेत.

असेही म्हणतात— स्त्रिया म्हणतात व पुरुषही म्हणतात— की स्त्रीहृदय अत्यंत दयाळू, कनवाळू, मायाळू, अत्यंत कोमल, अत्यंत प्रेमळ— सर्व अत्यंत !

असे म्हणतात की स्त्री म्हणजे त्यागमूर्ती ! स्त्रीचे समग्र जीवन म्हणजे एक महायाग, अतक्र्य असा प्रेमयज्ञ !

प…ण— पण माझे मत निराळे आहे. माझा अनुभव निराळा आहे.

सध्याच्या युगात ते सांगण्याचे धाडस करणे म्हणजे सोळा आणे मूर्खपणा होय. महिला परिषदेत ते सांगता येत नाही, सांगता कामाच नये. पुरुषपरिषदेतही सांगता कामा नये. लिहायचे म्हटले तर ' स्त्री ' मासिकात छापता कामा नये व पुरुषमासिकातही छापता येत नाही.

' अरे ! अरे ! अरे ! स्त्री असून आपल्या जातीचा अभिमान नाही ? पुरुषसुद्धा आमचे गुण गातात व तुम्ही एक स्त्री असूनही असली विधाने ? धिक्कार ! धिक्कार ! ' मला कोणी अध्यक्ष तर व्हायला सांगणारच नाही पण महिला परिषदेची प्रतिनिधीही राहू देणार नाही.

बरे, पुरुषांत बोलावे तर त्यांच्या स्त्रीदाक्षिण्यास धक्का बसणार. कवी, चित्रकार, लघुकथाकार वगैरे तर कोणी माझे ऐकूनही घेणार नाहीत, कारण त्यांची स्फूर्तिदेवताच मुळी स्त्री; व इतर तरी कोण ऐकणार ? निदान चारचौघांत राजरोसपणे माझे म्हणणे आपल्याला पटले असे म्हणणार नाही. कारण सध्याच्या काळात त्यांना ते परवडणार नाही.

स्त्रियांच्यासारखी दीर्घद्वेषी व ईर्षाखोर जात पुरुषांची खास नाही, पुरुष स्त्रियांच्याइतके क्रूरही खास नाहीत.

आणि स्त्रियांचा स्वार्थत्याग! स्त्रीजातीत स्वार्थत्याग केवळ असंभव दिसतो. स्त्री-स्वभावातच त्याग नाही. शतकानुशतक काय, पण युगानुयुग स्त्रीने आपले असे जे काही आहे त्याचे रक्षण करण्याचे काम केले आहे. ते राखून, जपून ठेवायचे हीच तिची निसर्गसिद्ध उपजत बुद्धी बनली आहे. तिच्या जीवनात क्वचित कुठे त्यागाचा भास होतो तो तिला जे नकोसे वाटते, ज्याची किंमत कळत नाही, अथवा तिच्या मताने किंमत नाही ते ती टाकून देते, जाऊ देते व लोकांमध्ये भास होतो की तिने स्वार्थत्याग केला.

आपल्या अपत्यांकरिता—आपल्या कुटुंबाकरिता ती स्वतःचे सुख त्यजताना दिसून येते. पण तेथे आपल्या अपत्यांचे रक्षण, आपला पती, आपले-आपले असे जे काही तिला वाटते त्यांचे ती रक्षण करीत असते. स्वार्थत्याग करीत नसते, पण स्वार्थच साधीत असते. त्या स्वार्थाच्या आड कोणी आले असता ती वाघिणीसारखी क्रूर बनते व विशेष प्रसंगी वाटेल त्याचे वाटेल ते नुकसान करण्यास उद्युक्त होते.

स्त्रीच्या मनास दुसऱ्याच्या दुःखाने दुःख होत नाही, पण आनंद होतो. तिच्या मनास पीळ तर अपवादरूपेच पडत असेल.

आतापर्यंत सास्वांनी, नणंदांनी सुनांना व भावजयींना जितके छळले तितके सासऱ्यांनी, दिरांनी किंवा नवऱ्यांनी खास छळले नाही व जेथे जेथे पुरुषांकडून छळ झाला आहे तेथे तो करायला लावणारी कोणी स्त्रीच होती असे दिसून येईल. पुरुषांनी छळाची अम्मलबजावणी केली असेल. पण मूळ हुकूम सोडणारी कोणी स्त्रीच असते. आईच्या सांगण्यावरून अथवा बहिणीच्या, आतेच्या, मामीच्या, बायकोच्या अथवा जिच्या प्रेमात पडला आहे अशा बाहेरच्या कोणा बाईच्या सांगण्यावरून, अथवा तिला खूष करण्याकरिता पुरुषाने कोणा बाईस छळले असेल, आईसही छळले असेल. पण स्वतःच स्वतःच्या इच्छेने पुरुषाने असे केलेले क्वचितच दिसून येईल. पुरुष स्वतः होऊन तात्कालिक रागाच्या भरात वाटेल ते बोलेल अथवा आवेशाच्या भरात वाटेल ते करून बसेल. पण दुसऱ्याच क्षणी ते विसरून जाईल. अथवा फार अनन्वित केले असल्यास पश्चात्ताप करीत बसेल, पाय धरायलाही तयार होईल व वाटेल ते प्रायश्चित्त घेण्यास तयार होईल.

स्त्रियांच्याकडून स्त्रियांस जितका अन्याय मिळतो तितका पुरुषजातीकडून खास मिळत नाही. स्त्रिया जितकी स्त्रियांची निंदा करतात, जितकी एकमेकींसंबंधी अनुदारता दाखवितात, जितका दुसरीच्या पतनामध्ये आनंद मानतात, जितकी दुसरीच्या संकटांसंबंधी बेपर्वाई दाखवितात तितके पुरुष खास दाखवीत नाहीत. 'समाज अनुदार' 'समाज निंदक'—अशा ज्या समाजाविषयी स्त्रिया फिर्याद करीत असतात त्या समाजाकडे



पाहिले असता त्यातील नव्वद अंश स्त्रियांचा असतो व दहा अंश पुरुष त्यात असतात असे दिसून येईल. अनुदार, निंदक, दया न दाखविणारा, क्षमा न करणारा, उपाय करायच्या ऐवजी फक्त धिक्कार करणारा समाज हा स्त्रीसमाजच आहे—स्त्रीजगच आहे. अडचणीत सापडलेल्या स्त्रीस न्याय देणे केवळ पुरुषांकडे सोपविले असता त्यांच्यामध्ये वसत असलेल्या स्त्रीजातीविषयीच्या नैसर्गिक मार्दवाने, दाक्षिण्याने त्यांचा न्याय बराच न्याय्य व दयाळू होईल. परंतु स्त्रियांच्या एकंदर एकमेकींविषयीच्या अनुदार व कडक मतांचा परिणाम पुरुषांच्या मनावर त्यांच्या बाळपणापासून होतच असतो. त्यामुळे पुष्कळशा पुरुषांची मतेही अनुदार असतात. तरीही दोघांमध्ये स्त्रीस पुरुषाकडूनच अधिक न्याय मिळण्याचा संभव आहे व दयापूर्वक तिची स्थिती समजून घेण्याचा प्रयत्न होणे शक्य आहे.

प्रेमामध्ये स्त्री अत्यंत उच्च कक्षेस पोचलेली समजण्यात येते. पण सामान्य पशुभूमिकेच्या वर ती फारशी चढलीच नाही. सामान्य उपजत बुद्धीने दाखविलेले तेवढे ती करते. स्वतःच्या व्यक्तिगत सुखापलिकडे ती कशाचाच विचार करीत नसते.

आणि तिने आपल्या नेहमीच्या प्रदेशाच्या बाहेर जाऊन थोडेसे काही कधी केलेच तर त्यास महायज्ञ, महान स्वार्थत्यागाचे स्वरूप येते. खरे पाहिले असता पुरुषांनी आतापर्यंत त्या क्षेत्रात जे केले त्या मानाने ते काहीच नसते, परंतु स्त्री काहीच करीत नाही त्या मानाने ते पुष्कळच असते, म्हणून तिचे सर्वत्र नाव होते.

बाकीचे प्रदेश तर सोडूनच द्या परंतु प्रेमाच्या प्रदेशातही स्त्रीने अकल्प्य असा स्वार्थत्याग केलेला कुठेच दिसून येत नाही. घरच्या घरी आपल्या मुलांकरिता अथवा पतीकरिता—घरधन्याकरिता ती लहान लहान त्याग करीत असते. परंतु त्यास पुरुषांनीच खूप वाखाणले म्हणून स्त्रियाही आपण फार त्यागी असे स्वतःला समजू लागल्या.

स्वपोषण, स्वसंरक्षण, संततिजनन व संतति-पोषण-रक्षण यांच्या प्राथमिक अवस्थेपलीकडे स्त्रियांच्या प्रेरणा फारशा गेल्या नाहीत. सामान्य जीवनात आपली कामे त्या सामान्य दक्षतेने पार पाडीत असतात, परंतु काही विशेष करण्याची पाळी आली असता पुरुष जसा आश्चर्यचकित करून सोडण्यासारखे काहीतरी करून टाकतो तशी स्त्री करून शकत नाही. अत्यंत महान असे फारसे काहीच स्त्रियात संभवत नाही; म्हणजे सध्या तरी संभवत नाही.

स्त्रियांची संस्कारिता ( रिफाइनमेंट ) उच्च प्रकारची आहे असे म्हणतात. पुरुष ओबडधोबड, पाशवी, ढोबळ वृत्तीचा व स्त्रिया नाजुक, दैवी, उच्च वृत्तीच्या, असे म्हणतात. पण ते खरे नाही. नेहमीच्या व्यवहारात स्त्रिया संस्कारी दिसतात; पण त्यांची संस्कारिता कसास लागत नाही तोपर्यंतच. कसोटीची वेळ आली म्हणजे स्त्रिया अगदी सामान्य कोटीच्या दिसून येतात. सामान्य प्रेरणांच्या पलीकडे त्यांची संस्कारिता फारशी गेलेली

दिसत नाही. पुरुष मित्राच्याकरिता आपली गर्दन कापून टाकील, पण स्त्री फार झाले तर आपल्या अपत्यांच्या सुखाकरिता दुसऱ्याची गर्दन तिसऱ्याकडून कापविण्याचा व्यूह रचील.

याचा अर्थ असा नाही की सामान्यतः मनुष्य या नात्याने पुरुष व स्त्री यांच्यात फारसा भेद आहे. दोघांच्यातही मूलभूत तत्त्वे तीच आहेत, एकच एक प्रकारची जीवन-शक्ती दोघांच्याही जीवनात खेळत असते. परंतु पुष्कळ शतकांच्या राहणीच्या फरकामुळे व थोड्याबहुत मूलभूत स्वभावभेदामुळे या दोहोंमध्ये थोडाफार फरक दिसून येतो. स्त्रीचे जीवन संकुचित राहिले, तिची दृष्टी कोती राहिली, तिच्या भावनाही बलवान असल्या तरी आकुंचित राहिल्या. पुरुषांस जीवनाची विविधता मिळाली, प्रसंगांची विविधता दिसली, त्याच्या कार्यक्षेत्रास विशालता लाभली त्यामुळे त्याच्या मूलभूत प्रेरणांस निर-निराळी रूपे घेण्यास अवकाश मिळाला. त्याच्या जीवनात धारिष्ट्यास स्थान मिळाले. तो स्वतःच्या कर्तृत्वावर, सामर्थ्यावर जीवन चालवू लागला; त्यामुळे सहजच औदार्यासारखे गुण त्याच्यात विशेष विकास पावले. कारण ज्याच्या हातात पुन्हा दुसरे मिळविण्याची ताकद आहे त्यास असलेले घालवून टाकण्यात, कोणाला देऊन टाकण्यात काही वाटत नाही. स्वतः कित्येकदा अडचणीत आलेला असतो. निर्बलतेचे कित्येक क्षण अनुभवलेले असतात, त्यामुळे दुसऱ्याच्या अडचणींकडे अथवा पतनाकडे तो सहानुभूतिपूर्वक पाहू शकतो. त्याने जीवनाच्या अनेक बाजू पाहिलेल्या असतात. मानवजातीची हीनदीनता राहिलेली असते. भव्यता, उच्चता व बळही पाहिलेले असते. मानवी दुर्बलता व क्षुद्रताही पाहिलेली असते. त्यामुळे तो मानवजातीकडे सहानुभूतिपूर्वक व दयेच्या नजरेने पाहू शकतो. मानवस्वभावाची अद्भुत महत्ताही त्याच्या कल्पनेस आकलन करता येते, येऊ लागली, इतकेच नव्हे, तर आचरणात वाटेल ती विविधता आणण्याची निर्भयता त्याच्यात आली.

पण स्त्रियांनी एकच संकुचित रस्ता पाहिला. त्यांच्यात पाप करण्याचीही हिम्मत राहिली नाही तर महान पुण्यकर्म करण्याची शक्ती अगर योग्यता कोठली ? त्यांचे मोठे बळ म्हणजे त्यांचे पातिव्रत्य. पण त्यांच्या पातिव्रत्याचे जर पृथक्करण केले तर त्यात शक्तीपेक्षा अशक्तीच जास्त दिसून येईल व त्याला नैतिक किंमत फारशी काहीच नाही. अशा स्वतःच्या काल्पनिक मोठेपणाच्या जोरावर त्या विहिरीतल्या बेडकांप्रमाणे डराव डराव करून एकमेकींना डरवीत असतात व अनादिकालापासून चालत आलेल्या एकाच धोपटमार्गाने सर्वांना चालायला लावीत असतात. त्यांतून जरा निराळी जाईल तिला टोचूनटोचून सळो की पळो करून सोडीत असतात.

अर्थात समाजाच्या प्रगतीत कदाचित ब्रेक म्हणून, 'कॉन्झर्व्हेटिव्ह'—स्थितिस्थापक तत्त्व म्हणून स्त्रियांचा उपयोग झाला असेल. बालरक्षणाच्या दृष्टीनेही त्यांच्या या स्थिर जीवनाचा फायदा समाजास मिळाला असेल. पुरुषांस त्यांच्या विविध आणि अस्थिर



जीवनात शांती व स्थिरतेचे स्थान या दृष्टीने स्त्रिया व घर हे विश्रामस्थान असेल.

परंतु त्यामुळे परिणाम हा झाला की स्त्रीस्वभावाचा पुरुषस्वभावाइतका विकास झाला नाही, संधीच मिळाली नाही. त्यांचे मन कोते राहिले. त्यांच्यात सहिष्णुता व अनुदारता यांनी घर केले. त्यांना नुसता निराळेपणा अथवा विविधता हीसुद्धा असह्य झाली. त्यांच्यात भावनांची सामान्य संस्कारिता आली, पण विशेष प्रसंगी विशेष रीतीने वाग-ण्याची वेळ आली असता त्या फार उंच अथवा पुढे जाऊ शकत नाहीतशा झाल्या. एकंदरीत दुर्बलतेचे सर्व गुण व दुर्गुण त्यांच्यात आले. त्यांच्या शरीराचा व भावनेचा नाजूकपणा, त्यांची स्थिरता, त्यांची कोमलता, ईर्षा, द्वेष, दीर्घवैर, गुप्त कारस्थाने व प्रसंगविशेषी स्वजातीविषयी क्रूरता या सर्व गुणावगुणांचा परिपाक हा त्यांच्या संकुचित जीवनाचा स्वाभाविक परिणाम झाला.

आता स्त्रीजीवनात थोडा फरक पडला आहे. तरी स्त्रीस्वभावात फारसा फरक पडला आहे असे नाही. शतकांचे परिणाम शतकांनीच जाणार. त्यातून आपल्याकडे अद्यापि स्त्रीजीवनात फारसा फरकही पडला नाही व जो थोडासा पडला त्यास दीर्घकाल लोटला नाही. त्यामुळे स्त्रियांच्या विचारसरणीत अथवा वर्तनात फरक कोठून येणार !

समाजविकाससंबंधीचे सिद्धान्त कधीच रसायनादि शास्त्रांसारखे नक्की असू शकत नाहीत. त्यात पुष्कळसा कल्पनेस वाव असतो त्याचप्रमाणे कित्येक उदाहरणे अनुकूल तर कित्येक विरुद्ध बाजूची दिसतात. त्यात नियमास अनुसरून कोणती व अपवादात्मक कोणती ते नक्की करताना पुष्कळदा चूक होते. त्यामुळे एखाद्या विशिष्ट स्त्रीचे उदाहरण अपवादात्मक समजायचे की नियमात्मक समजायचे यात नेहमी मतभेद राहणारच.

परंतु अगदी वरपासून खालपर्यंतचा विचार केला, श्रीमंत–गरीब, शिकलेल्या–न शिकलेल्या, पुढे गेलेल्या–मागासलेल्या, सर्वांना विचारात घेतले तरी तसे दिसून येते की स्त्रीस्वभावाचा विकास फार थोडा झाला आहे.

अर्थात माझे म्हणणे चुकीचे आहे असे कोणी दाखवून दिले व माझे विधान खोटे ठरले तर मला विषाद वाटण्याऐवजी, स्वजाती मला वाटते तितकी मागासलेली नाही याबद्दल मला आनंदच वाटेल. वस्तुस्थिती दाखविण्याचे मी धार्ष्ट्य केले म्हणून माझ्या जातीबद्दल अभिमान नाही असे थोडेच आहे ? मी जरा निराळ्या दृष्टीने स्त्रीजातीकडे पाहण्याचे धैर्य केले एवढेच. आतापर्यंत स्त्रिया स्त्रियांकडे दोन दृष्टींनी पाहत आल्या. एक पुरुषांच्या दृष्टीने व एक स्त्रियांच्या दृष्टीने. आपण कशा दिसत असू, हा एक विचार. त्यात पुरुषांनी स्त्रियांचे जे जे गुण गाइले ते स्त्रियाही आपले गुण असे मानू लागल्या व गाऊ लागल्या. स्त्रियांची दुसरी दृष्टी म्हणजे ईर्षेची. तिच्यातही मूलभूत पुरुषाची दृष्टीच आहे. दुसरी स्त्री पुरुषास कशी दिसते, आपल्यापेक्षा ती रूपाने, गुणाने, नखऱ्याने, पोशाखाने अधिक आकर्षक आहे की काय व ती तशी असल्यास

तिची निंदा करून, तिचे दोष दाखवून ती कमी आकर्षक होईल असे करण्याची प्रवृत्ती आली. सध्या समाजव्यवस्था बरीच निराळी असली तरी ही वृत्ती राहिलीच आहे. स्त्रीदृष्टीने स्त्रिया जेव्हा एकमेकींकडे पाहतात तेव्हा टीका करणे, नावे ठेवणे, दोष काढणे वगैरे प्रकार दिसतात.

स्त्रीची नाही व पुरुषाचीही नाही अशा अभ्यासक दृष्टीने, निरहंतपणे, स्त्रीविकासाकडे पाहण्याची आवश्यकता आहे. त्याशिवाय आपला थांबलेला विकास अस्खलित होऊ शकणार नाही. या दृष्टीने अनेक प्रकारच्या स्त्रियांच्या परिचयाने व स्त्रियांच्या जीवनातील अनेक गुंतागुंतीच्या प्रश्नांच्या परिचयाने जे दिसून आले ते स्पष्टपणे न भिता मांडणाऱ्या या प्रयत्नास स्त्रिया तर काय पण पुरुष तरी कितपत सहन करतील कोण जाणे!

याचा अर्थ असा नाही की मूलतः स्त्री कनिष्ठ दर्जाचीच आहे. तिची पुरुषांच्या बरोबरीने अथवा अधिक वाढ होणे अशक्य आहे असे माझे म्हणणे नाही. पण आतापर्यंतच्या संकुचित जीवनाने तिला शक्ती, विशालता, औदार्य, विविधता मिळविण्याची संधीच फारशी मिळाली नाही. तिच्यात जे काही बीजरूपाने आहे ते वाढून पूर्ण विकास पावण्यास अवकाश मिळाला नाही. त्यामुळे सध्याच्या स्त्रियांच्या कामात, त्यांच्या लेखनात, त्यांच्या मनात, एकमेकींशी असलेल्या वर्तनात, जिकडेतिकडे बायकीपणा, असहिष्णुता, अनौदार्य, अपरिपक्वता वगैरे दिसतात. तरी स्त्रियांनी आपण सध्या कोठे आहोत, आपल्यात कोठे सुधारणा होणे जरूर आहे व ती कशा प्रकारे होईल याचा विचार केला पाहिजे. आत्मविकासाची पहिली पायरी प्रामाणिक व निष्ठुर असे आत्मपरीक्षणच होय. त्या दृष्टीने वरील लेख लिहिला आहे. त्यात स्त्रियांना हाणून पाडण्याचा, अथवा त्या कनिष्ठ आहेत व पुरुषच मानवजातीत श्रेष्ठ आहेत व नेहमी त्या अशाच राहणार असे दाखविण्याचा हेतू नाही.

(' स्त्री '- जानेवारी १९३५)

—५—

ताराबाई स्वतः बांगड्या, मंगळसूत्र, कुंकू यापैकी कोणतीही चीज सौभाग्यलेणे म्हणून अपरिहार्य किंवा सक्तीची मानत नसत. त्या स्वतः काळे कुंकू लावत व मुंड्या हातांनी वावरत. कुंकवाविषयीची आपली नेमकी भूमिका त्यांनी आपल्या ' स्त्रिया व कुंकू ' या लेखात स्पष्ट केली आहे :



## स्त्रिया व कुंकू

...आपल्याकडे सौभाग्यदर्शक समजल्या गेलेल्या कुंकवाचा खरा अर्थ म्हणजे एका स्त्रीला नाथ आहे, मालक आहे, दुसरीला तो नाही. कुत्र्याच्या गळ्यातील पट्ट्यात आणि स्त्रीच्या कपाळावरील कुंकवात वास्तविक काहीच फरक नाही. जिच्या कपाळाला कुंकू आहे, तिलाच फक्त समाजात स्थान. लग्नाला, बारशाला हजर राहण्याचा हक्क. ती तेवढी श्रेष्ठ, मंगल, सभ्य. पुरुष विवाहित असो, विधुर असो, त्याचे लग्न ही खाजगी बाब. त्याला मंगळसूत्र, कुंकू काही वापरावे लागत नाही. त्याला नावापुढे श्रीयुत लावण्याचा हक्क. त्यामुळे त्याच्या बायकोवरच्या प्रेमास बाध येत नाही की समाजातले त्याचे स्थान त्यामुळे खालावत नाही. त्याला ' सौभाग्यवती 'सारखा शिक्का मिरवावा लागत नाही. स्त्रिया मात्र नुसत्या ' ताराबाई मोडक ' असूच शकत नाहीत. ' सौ. ' स्त्रियांना ' श्रीमती ' म्हटले की त्यांच्या हृदयावर आघात होतो. ही स्त्रीची नुसती नाजूक सवय नाही तर तिच्या परप्रकाशित्वाचे हे लक्षण आहे, गुलामगिरीची सवय आहे. कोणी म्हणतात, " कपाळाला कुंकू असले की प्रवासात वगैरे स्त्री निर्धास्त असू शकते. परपुरुष तिच्याकडे वाकड्या नजरेने पाहत नाहीत..."

—म्हणजे इथे कुंकवाचा अर्थ असा की, " मी काही बिनवारशी ढोर नाही! मला मालक आहे. तू जर कागाळ्या केल्यास तर माझा मालक दंडा मारील. " यापेक्षा मी म्हणेन की स्त्रिया स्वतःच मोठा दंडा घेऊन प्रवासास का निघत नाहीत? त्यात स्त्रीजातीचे जास्त तेज, शोभा नाही का? आम्हाला मालक आहे, रक्षक आहे असे म्हणणाऱ्या स्त्रिया सन्मान्य की आमच्या नीतीचे रक्षण करण्यास आम्ही सिद्ध आहोत असे म्हणणाऱ्या स्त्रिया सन्मान्य?...

–६–

## ताराबाईंची पुस्तकमाला

**मराठी : पालकांसाठी**

१. आमचे घर
२. बालकांचा हट्ट
३. स्वयंविकास व शिस्त
४. विचारी बालके

**मराठी : लहान मुलांसाठी**

५. नदीची गोष्ट
६. गंपू आणि लाकूडदंड्या
७. परोपकारी राजा विक्रम
८. आजीबाईंच्या गोष्टी – भाग १ ला
९. आजीबाईंच्या गोष्टी – भाग २ रा
१०. कावळ्याला लागली तहान
११. बिरबल–बादशहाच्या गोष्टी

**गुजराती :**

१२. ताराबेनना पाठो
१३. आपणुं घर
१४. बाळकोनु हठ
१५. स्वयंविकास अने शिस्त
१६. घरमां मॉन्टेसोरी
१७. मंगेशना पोपट

**इंग्रजी :**

18. Balwadi in Rural Area
19. Meadow School
२०. कुरणशाळा ( मराठी )

**ताराबाई मोडक व अनुताई वाघ**

२१. विकासाच्या मार्गावर ( मराठी )
२२. विकास के मार्ग पर ( हिन्दी )

आपल्या लिखाणाबद्दल बोलताना एकदा ताराबाई म्हणाल्या,

" लिहिणं हे माझं कार्य नव्हे. माझं क्षेत्र शिक्षणाचं. त्याला पूरक म्हणून मी लिहू लागले. मला लिहिती केली, सौराष्ट्रातल्या लोकांनी. ' घरमां मॉन्टेसोरी ' हे पहिलं गुजराती पुस्तक मी लिहिलं. त्या सुमारास ते चांगलं गाजलं, असं म्हणायला हरकत नाही. मग इतर काही पुस्तकं लिहिली. कर्नाटक प्रेस, पद्मा प्रकाशन यांनी ती प्रसिद्ध केली.

" खरं सांगायचं म्हणजे, तसा मी पुस्तकांचा असा फार मोठा विचारच केला नाही. तीन भाषांतून शिक्षणपत्रिका काढणं व बालशिक्षणाचं काम करणं या गोष्टींत मी इतकी गुंतलेली असायची की हा व्यवहार मला कधी जमलाच नाही. अंगाईगीतांचं एक चांगलं पुस्तक निघालं होतं...

–अहो या काहीतरी पूर्वजन्मीच्या आठवणी सांगितल्यासारखी सांगतेय मी ! माझ्याकडे आता कुठलीच पुस्तकं नाही आहेत. "



–७–

## ताराबाई मोडक : जीवनपट

**जन्म** : मुंबई, १९–४–१८९२
बडिलांचा मृत्यू : १९०७
मॅट्रिक उत्तीर्ण : १९०७
बी. ए. ( मुंबई विद्यापीठ ) : १९१४
विवाह ( श्री. के.व्ही. मोडक ) : १९१५
कन्या प्रभाचा जन्म : १९२०
प्राचार्या, बार्टन फीमेल ट्रेनिंग कॉलेज, राजकोट : १९२१
दक्षिणामूर्ती येथे वास्तव्य व कार्य : १९२३ ते १९३२
बांसदा येथे ट्यूटेसची नोकरी : १९३३ ते १९३५
शिशुविहार ( मुंबई ) येथे बालशिक्षण प्रसारकार्य : १९३६ ते १९४८
ग्रामीण बाल शिक्षण कार्य, बोर्डी : १९४५ ते १९५७
नूतन बाल शिक्षण संघ, चिटणीसपद : १९४० ते १९५४
संपादन ' शिक्षणपत्रिका ' (मराठी, गुजराती, हिन्दी ) : १४ वर्षे
एम. एल. ए., महाराष्ट्र विधानसभा : १९४६ ते १९५१
कन्या प्रभाचा मृत्यू १९५२
पती श्री. के. व्ही. मोडक यांचा मृत्यू : १९५३
कोसबाड येथे आदिवासी शिक्षण कार्य : १९५५ ते १९७३
' पद्मभूषण 'सन्मान : २६ जानेवारी १९६२
**मृत्यू** : मुंबई, ३१ ऑगस्ट १९७३